# न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे

## व्यक्तित्व, धर्मविचार आणि कार्य

---



---


**नवभारत**

वर्ष ४६ । अंक १०–११–१२; वर्ष ४७ । अंक १ । जुलै-ऑगस्ट-सप्टें.-ऑक्टो., १९९३
(आषाढ-श्रावण-अधिक भाद्रपद-निजभाद्रपद-आश्विन, शके १९१५)



अनुक्रमणिका












नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४६ । अंक १०-११-१२; वर्ष ४७ । अंक १ ।
जुलै-ऑगस्ट-सप्टें.-ऑक्टो. १९९३
आषाढ-श्रावण-अधिक भाद्रपद-निज भाद्रपद-अश्विन, शके १९१५
वार्षिक वर्गणी ६० रुपये.
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ५००/–   संस्था : रु. ७५०/–



---



---

**संपादकीय पत्रव्यवहार :**
मे. पुं. रेगे,
संपादक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

---








# नवभारत

जुलै-ऑगस्ट-सप्टें.-ऑक्टो., १९९३

## अनुक्रम

# संपादकीय निवेदन

न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांची थोरवी सर्वमान्य असली तरी, लोकमान्य टिळकांच्या राजकारण-समाजकारणाच्या उत्कर्षानंतर, किंबहुना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रभुत्व प्रस्थापित झाल्यावर रानड्यांचा विसर पडल्या-सारखाच झाला. आजही त्यांचे समग्र लेखन एकत्रितपणे प्रसिद्ध झालेले नाही. ज्या थोड्या व्यक्तींनी एकाच वेळी राजकारण, अर्थकारण, समाजकारण आणि धर्मकारण सारख्याच आस्थेने व क्षमतेने हाताळले, त्यांच्यात महाराष्ट्रीयांमध्ये तरी रानडे सर्वश्रेष्ठ पुरुष ठरतात.

'**नवभारत**'च्या प्रस्तुत अंकात न्यायमूर्तींची धर्मपर व्याख्याने या पुस्तकाचे पुनर्मुद्रण केले आहे. ज्या आवृत्तीवरून पुनर्मुद्रण केले आहे ती १९०२ सालची, बहुधा पहिलीच, आवृत्ती रानडे यांच्या पत्नी रमाबाई यांनी छापवून प्रसिद्ध केली. मुद्रण निर्णयसागर प्रेस, मुंबई येथे केले होते.

न्या. रानडे यांच्या या धर्मपर व्याख्यानांच्या पुनर्मुद्रणाला प्रा. मे. पुं. रेगे यांनी विवेचक प्रस्तावना लिहिली आहे. रानड्यांची धर्मदृष्टी जाणण्यास, त्यांच्या धर्मविचारांचे महत्त्व ध्यानात येण्यास तिचा उपयोग होईल.

**नवभारत**च्या अंकाचा हा मध्यवर्ती विशेष भाग. रानड्यांच्या व्यक्तित्व, कार्य व कार्यपद्धती यांचा सम्यक् परिचय व्हावा या हेतूने यात इतर काही साहित्य समाविष्ट केले आहे.

प्रो. द. गो. कर्वे तीन पिढ्यांपूर्वीचे न्यायमूर्तींच्या संप्रदायातले एक नामवंत अर्थशास्त्रज्ञ व प्राध्यापक. त्यांनी रानड्यांचे चरित्रही जन्मशताब्दीच्या वर्षी (१९४२) प्रसिद्ध केले. त्या चरित्रग्रंथातील काही निवडक प्रकरणे समाविष्ट केली आहेत. केसरी-मराठा ट्रस्टतर्फे अनेक वर्षे प्रसिद्ध होणाऱ्या '**सह्याद्री**' या मासिकाने रानड्यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षी एक विशेषांक प्रसिद्ध केला. त्यातील प्रो. कर्वे यांचाही लेख येथे समाविष्ट केला आहे. रानडे यांचे व्यक्तित्व, कार्य, कार्यामागील दृष्टी व कार्यपद्धती यांचे समग्रतेने आकलन होण्याच्या दृष्टीने प्रो. कर्वे यांचे लेखन मौलिक आहे.

"**सह्याद्री**"च्या विशेषांकामधील आणखी काही लेख येथे समाविष्ट केले आहेत [illegible]

अनुक्रमणिका






प्रातिनिधिक मूल्यमापन या लेखांमधून समोर येते.

रानडे हे एकेश्वरवादी ( Theist ) होते. त्यांच्या A Theist's Confession of Faith या निबंधाचे एक आगळेवेगळे स्थान व महत्त्व आहे. त्याचे भाषांतर येथे आवर्जून समाविष्ट केले आहे. एम. बी. कोलासकर यांनी संकलित केलेल्या व गोपाळ नारायण आणि कं., मुंबई यांनी १९०२ साली प्रसिद्ध केलेल्या Religious and Social Reform या पुस्तकातून तो घेतला आहे. रानड्यांनी स्वतःच्या श्रद्धेची कैफियत ज्या संयतपणे पण त्याच वेळी चोखपणे मांडली आहे तो एक आदर्श वस्तुपाठ आहे.

रानडे यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या जागी मुंबई हायकोर्टाचे न्यायाधीश म्हणून नेमणूक झालेले सर नारायण गणेश चंदावरकर हे राजकारण, धर्म व समाजसुधारणा या कार्यात रानड्यांसारखेच अग्रेसर होते. विचारांनी रानड्यांच्याच पावलावर पाऊल टाकणारे. त्यांनी रेखाटलेले रानड्यांचे रेखाचित्र एका समकालीन सहकाऱ्याचे, व त्या काळात रेखाटलेले, येथे समाविष्ट करता आले याचे समाधान वाटते. ते (बहुधा) दामोदर सांवळाराम आणि मंडळी यांनी प्रकाशित केलेल्या ' सर नारायण गणेश चंदावरकर यांची व्याख्याने ' या पुस्तकातून घेतले आहे.

ज्या व्यक्ती व प्रकाशकांनी ही पुस्तके प्रसिद्ध केली त्या रमाबाईसाहेब रानडे, एम. बी. कोलासकर व गोपाळ नारायण आणि कं., मुंबई, प्रो. द. गो. कर्वे, व आर्यभूषण मुद्रणालय, पुणे आणि दामोदर सांवळाराम आणि मंडळी, मुंबई यांचे आम्ही ऋणी आहोत. केसरी-मराठा ट्रस्टच्या विश्वस्तांनी सह्याद्रीच्या अंकातील लेखन समाविष्ट करण्यास अनुमती दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

* * *

अनुक्रमणिका

# महादेव गोविंद रानडे*

## नारायण गणेश चंदावरकर

[ एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या व विसाव्या शतकाच्या पहिल्या तीस वर्षांच्या काळातले राजकीय व सामाजिक सुधारणांच्या चळवळींचे एक नामवंत पुढारी. इंद्रप्रकाश या त्या काळच्या प्रख्यात वृत्तपत्राच्या इंग्रजी विभागाचे संपादन काही काळ केले. मुंबई युनिव्हर्सिटीचे तिसरे एतद्देशीय कुलगुरू होण्याचा मान त्यांना मिळाला. राष्ट्रसभेच्या १९०० सालच्या लाहोर येथील अधिवेशनाचे अध्यक्षपद भूषविले. न्यायमूर्ती रानडे यांच्या मृत्यूनंतर त्यांची १९०१ साली मुंबई हायकोर्टावर न्यायाधीश म्हणून नेमणूक झाली. सरकार दरबारीही यांचा मान मोठा होता. १९१० साली यांना 'सर' ही पदवी बहाल केली गेली. इंदूर संस्थानचे दिवाण म्हणूनही त्यांनी काम केले. अस्पृश्य जातीयांच्या उत्थानासाठी कार्य करणाऱ्या महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांना डिप्रेस्ड क्लासेस मिशनच्या कार्यात यांचे सहकार्य व मार्गदर्शन असे. न्यायमूर्ती रानडे यांचे ते मित्र व सहकारी होते. राजकीय नेमस्त व सामाजिक सुधारक. प्रार्थनासमाजाचे ते एक अध्वर्यू होते. ]

( १ )

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे अंगीं ।
न भंगे प्रसंगीं धैर्य बळ ॥ १ ॥
न म्हणे कोणासी उत्तम वाईट ।
महत्त्व वरिष्ठ नसे जेथें ॥ २ ॥
अंतरीं सबाह्य सारिखे निर्मळ ।
हृदय कोमळ गंगारूप ॥ ३ ॥
तुका म्हणे काया कुरंवडीन तया ।
ठेवीन मी पायां मस्तक हें ॥ ४ ॥

आतां आपण जो अभंग गाईला, व ज्याच्या आधारेंच मी आतां दोन शब्द बोलणार आहें, तो अभंग ज्या प्रियबंधूच्या मृत्यूबद्दल आपणांस अत्यंत खेद होत आहे व ज्याच्याबद्दल सर्व देश हळहळत आहे, त्या बंधूची ह्या क्षणीं, ह्या स्थळीं सहजच आपणांस आठवण करून देईल. ज्या आम्ही प्रार्थनासमाजाचे सभासदांनीं त्यांच्या चरणापाशीं बसून त्यांच्या बोधामृताचा लाभ घेतला व ज्यांना आम्हीं मार्गदर्शक व गुरु असें मानिलें त्या आमचें, त्यांच्या निधनामुळें फारच मोठें नुकसान झालें आहे, ह्याविषयीं कांहीं शंका नाहीं. पुष्कळ प्रसंगीं त्यांनीं ह्या ठिकाणावरून उपदेश केले आहेत, त्या वेळींचें त्यांचें वक्तृत्व, त्यांचा उत्साह, त्यांची प्रेमळ वाणी हीं आतां जरी आम्हांस अनुभवास येणार नाहींत व ऐकावयास मिळणार नाहींत, तरी त्यांचा आम्हांस केव्हांही विसर पडणार नाहीं. काळानें त्यांना आम्हांमधून नेलें आहे त्यामुळें आज आम्हांला आमचा मार्गदर्शक, ज्यानें आमच्या अंतःकरणास चटका लाविला आणि ज्यानें आमच्या समाजास वळण लाविलें, तो गेला असें आम्हांस वाटत आहे, आणि त्यामुळें आम्ही अगदीं दीन झालों आहोंत असा अनुभव येत आहे. परंतु जें ठिकाण ईश्वरासच वाहिलें आहे, जेथें मन व अंतःकरण ह्यांनीं ऐहिकांतच न गुरफटतां पारमार्थिकच विषयाचा विचार करावयाचा असतो आणि जेथें जे आमचे बंधु गत झाले आहेत, त्यांनीं वारंवार आणि विशेष आस्थेनें आम्हांस सांगितलें आहे कीं, जे गत झाले आहेत, त्यांच्याबद्दल दुःख न करतां त्यांच्यासाठीं देवाची प्रार्थना करणें व ते आपल्या दृष्टीसमोरून गेले, म्हणून ते नष्ट झाले असें न समजतां ते नेहमी आपल्याजवळच आहेत असें मानणें, हें आपलें कर्तव्य आहे, त्या ह्या ठिकाणीं त्यांचे उपदेश, त्यांचें कार्य व त्यांचें चरित्र ह्यांपासून बोध घेण्याचा प्रयत्न होणें हें अगदीं सहाजिक आहे. या ठिकाणाहून त्यांचीं जीं धर्मपर व्याख्यानें होत, व जीं ऐकून पुष्कळांना आपणांस कांहीं तरी अधिकार प्राप्त झाला आहे असें वाटत असे, त्यांस कांहीं वर्षांपूर्वी त्यांनीं मृत्यु म्हणजे काय ह्या विषयावर जें व्याख्यान दिलें, त्याची आजच्या दिवशीं आठवण झाल्यावांचून राहाणार नाहीं. त्या वेळीं ज्या आभंगांत तुकारामांनीं **"मरण माझें मरूनि गेलें। मज केलें अमर"** असें म्हटलें आहे तो अभंग आधारभूत घेऊन त्यांनीं सांगितलें कीं, एक मृत्यु असा आहे कीं, ज्याच्या योगें आपण खरोखरच मरतों; पण दुसरा मृत्यू असा आहे कीं जेथें त्या मृत्यूलाच मरण येतें, व आपण मात्र जिवंत राहतों. जो भक्त

* न्यायमूर्ती रानडे यांच्यावरील येथे पुनर्मुद्रित केलेली दोन टिपणे 'सर नारायण गणेश चंदावरकर यांची व्याख्याने' या संग्रहामधून घेतलेली आहेत.

अनुक्रमणिका

परमेश्वराची प्रार्थना करीत असतांना किंवा उपदेश करीत असतांना आपणा स्वतःला जणूं काय विसरून जातो, व ज्याचा आत्मा ईश्वराकडून प्रेरणा झालेलाच असा भासतों; जो विद्वान् गृहस्थ आपल्या अभ्यासामध्यें इतका गर्क होतो कीं, तो आपल्या स्वतःलाच विसरतो, आणि आपल्या अभ्यासाच्या विषयावांचून त्याला दुसरें कांहींही दिसत नाहीं, जो मनुष्य आपल्या स्वतःला अत्यंय शारीरिक वेदना होत असतांना त्या वेदना विसरून आपल्या कर्तव्यामध्यें कोणत्याही प्रकारचें न्यून पडूं देत नाहीं, त्या माणसाचें मरण मरून गेलें व तो जिवंत राहिला असें म्हणतां येतें. हें आपलें शरीर निचेष्ट पडलें म्हणजे आपणांस मृत्यु प्राप्त होतो, ही जी साधारण कल्पना ती मृत्यूसंबंधाची खरी कल्पना नव्हे. ज्या वेळीं आपण आपलें शरीर व त्याचें सुख, व आनंद यांचेंच स्तोम माजवितों, व स्वार्थपर जीवनामध्येंच दिवस कंठितों त्या वेळीं आपणांस खरा मृत्यु प्राप्त होतो. मग त्यांच्याच शब्दांनीं आज आपणांस असें म्हणता येणार नाहीं काय कीं **रानडे** मरण पावले नाहींत, तर त्यांचा मृत्यु मरण पावला आणि ते अमर होऊन आपणांमध्यें राहिले आहेत ?

**रानडे** आज आपणांमध्यें आहेत. आणि ते लौकिकदृष्टचा जिवंत असतांना आम्हांमध्यें जितक्या प्रमाणानें होते, त्यापेक्षां अधिक प्रमाणानें ते इतःपर आमच्यांत राहतील; ज्या त्यांच्या तेजाचा सर्व हिंदुस्थानभर प्रकाश पडत असे, तें त्यांचें तेज आतां अधिकच तेजःपुंज भासेल; मात्र आम्हीं त्यांच्या चरित्राचें रहस्य लक्षांत घेतलें पाहिजे. गेल्या बुधवारीं जो प्रसंग घडला, त्याची नजीकता, त्याची भयंकर आकस्मिकता, ह्यांमुळें आम्हांस जें दुःख झालें आहे, त्यानें आम्ही इतके स्तंभित झालों कीं, आमचे विचार एकत्र करण्याचें सामर्थ्य आम्हांस राहिलें नाहीं. जें त्यांचें चरित्र आम्हां सर्वांना बुद्धिविषयक व नीतिविषयक बाबतींत आदर्शवत् झालें होतें, त्या चरित्रापासून घेण्यासारख्या बोधाविषयीं दोन शब्द बोलण्यास आवश्यक असें जें स्वास्थ्य तें आम्हांस अद्याप प्राप्त झालें नाहीं. त्यांच्या चरित्रांतील अनेक प्रसंगांचा इतिहास म्हणजे एका अर्थी--आणि हाच खरा अर्थ होय– म्हणजे आमचा गेल्या चाळीस वर्षांतील महत्त्वाच्या प्रसंगाचा इतिहास होय. त्यांची बुद्धिमत्ता असामान्य होती. ते फार गूढ विचार करणारे होते, ते फार जाडे विद्वान होते, ते मोठे नांवाजलेले न्यायाधीश होते, आस्थेवाईक सुधारक होते, व अनेक दिशांनीं ते काम करणारे होते, ह्या गोष्टी सर्वांस मान्य आहेत. रानडे एक असाधारण चारित्र्यवान् होते व त्यांच्या चरित्राचा सर्व देशावर परिणाम झालेला असल्यामुळें प्रत्येकाला आपला मित्र, आपला मार्गदर्शक गेला असें वाटत आहे. असें ज्या पुरुषांचें चारित्र्य होतें, आणि ज्यांची असाधारण कारकीर्द होती, त्यांच्या चरित्राचें आपण फार आस्थेनें मनन केलें पाहिजे. आणि गेलीं २० वर्षे अनेक प्रकारच्या चळवळींमुळें त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध आल्यामुळें, त्यांच्या सहवासाचा लाभ मिळाला असल्यामुळें, मला तर असें वाटतें कीं, त्यांच्या एकंदर चरित्राची व त्यांनी जें महाकार्य केलें आहे, त्याची किल्ली कशांत आहे, हें आपण लक्षांत घेतल्यावांचून त्यांच्या चरित्राचें अध्ययन करून व्हावा तसा कांहीं फायदा व्हावयाचा नाहीं. आणि ही त्यांची किल्ली आपणास ज्ञात व्हावी असें ज्यांस वाटत असेल, त्यांनीं त्यांचें आध्यात्मिक जीवन प्रथम लक्षांत घेतलें पाहिजे. ज्या कृतींच्या योगें त्यांची असाधारण बुद्धिमत्ता अनुभवास आली, त्यांचें नैतिक गुण स्पष्ट झाले, त्यांच्या भिन्न भिन्न प्रकारच्या चळवळी सर्व कांहीं त्यांच्या धर्मशीलतेचें परिणाम होत. त्यांनीं जीं जीं कामें केली, तीं सर्व करीत असतां त्या धर्मशीलतेचें वर्चस्व अनुभवास येई व म्हणून त्यांच्या चरित्राचा त्यांची धर्मशीलता हाच पाया होय, असें मला वाटतें. आणि त्यांच्याशीं ज्यांचा ज्यांचा संबंध आला, ते सर्व अगदीं जणूं काय भारले जात असत, त्याचेंहि कारण त्यांचें आध्यात्मिक बल व तेज होय. **रानड्यांचें** वर्णन जर अगदीं थोड्या शब्दांनीं मला करण्याचा प्रसंग आला, किंवा थोड्या शब्दांनीं त्यांच्या चरित्राचें रहस्य सांगावयाचें असलें, तर मी असें म्हणेन कीं **रानडे** यांचा धर्मावरील विश्वास असाधारण होता. त्यांची असामान्य बुद्धिमत्ता, त्यांची नैतिक श्रेष्ठता, त्यांची अप्रतिहत उद्यमशीलता, स्वार्थाचा बिलकुल विचार न करितां जें जें कांहीं चांगलें आहे, त्याच्यासाठीं उद्योग करणें, सर्व आयुष्यभर त्यांनीं ऐषआरामाचा निश्चयात्मक रीतीनें केलेला तिरस्कार, आपलें जें ध्येय त्याचा बिलकुल त्याग न करितां अनेक प्रकारच्या अडचणी व यातना आनंदानें सहन करण्याची सिद्धता, इ. त्यांचे गुणच त्यांच्या ठिकाणीं असलेल्या दैवी तेजाची साक्ष पटवीत असत आणि ज्यांच्या

अनुक्रमणिका

ठिकाणीं हें दैवि तेज असतें, तेच कोणत्याही प्रकारच्या स्थितींत असतांना आपलें पौरुष कायम राखूं शकतात. जेव्हां रानड्यांचा भाव असाधारण होता, असें मी म्हणतों; त्या वेळीं ज्या ह्या भावाच्या योगें ते इतक्या उन्नत स्थितिप्रत गेले तो भाव तरी कोणत्या प्रकारचा होता, त्याचें थोडेंसें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. कांहीं व्यक्ति अशा असतात कीं, त्यांचा देवावर विश्वास असतो, परंतु एकंदर मनुष्यजातीसंबंधानें त्यांची अविश्वासाची स्थिति असते. आपणांमध्यें पुष्कळ धार्मिक माणसें होऊन गेलीं आहेत, आजही तशीं माणसें पुष्कळ आहेत कीं, ज्यांची धर्मशीलता अगदीं निर्दोष आहे, परंतु हा संसार असार, सर्व व्यवहार मायामय, सर्व कांहीं व्यर्थ आहे, ह्या विचाराचा त्यांच्या मनावर इतका परिणाम झालेला असतो कीं, ते सर्वांपासून दूर राहून फक्त आपल्याच उन्नतीसाठीं झटणें हें आपलें ध्येय कल्पून तें साधण्यासाठीं त्यांचे सर्व उद्योग चालू असतात; त्यांचा स्वर्ग इतरत्र असून तेथें त्यांचा देव राहत असतो. जगांतील सर्व कांहीं व्यर्थ, नाशवंत म्हणून त्यांचा त्याग केला पाहिजे; सर्व मनुष्यजातीपासून दूर जाण्याचें व त्यांच्या हिताहिताचा व हिताहिताच्या चळवळींचा कांहींही विचार करावयाचा नाहीं, हें त्यांचें ध्येय, यांतच त्यांना इतिकर्तव्यता वाटत असते. या ठिकाणीं मला **बर्मिंगह्याम** येथील डॉ. डेल यांची आठवण होते. त्यांच्या दृष्टीनें देवाच्या १० आज्ञांचा व्यक्तीच्या खाजगी चरित्रांशींच संबंध नसून, त्यांचा संबंध सार्वजनिक हिताशींही फार निकटचा आहे असाच विश्वास आपल्या गत मित्रांचा होता म्हणून तर सामाजिक, राजकीय, धर्मविषयक, शिक्षणविषयक अगर लोकहिताची दुसरी कोणतीही चळवळ असली तरी तींत पडून पुढाकार घेणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे, हें एक धर्मकार्यच आहें, असें ते समजत असत; आणि मग कोणत्याही प्रकारची चळवळ असली तरी तींत ते मोठ्या आस्थेनें पडत असत; आणि असें करीत असतां त्यांची कोणी कितीही निंदा केली, त्यांची मानहानि केली, त्यांस कोणी छळिलें, त्यांच्या मार्गांत कोणी नसत्या अडचणी उपस्थित केल्या, त्यांना कितीही निराशेचे प्रसंग अनुभवावे लागले, तरी ते आपल्या स्वीकृत कार्यापासून रतिभरही च्युत होत नसत. त्यांचा उद्योग चालूच असे. कार्य जर पवित्र आहे, चांगलें आहे, तर त्यांत यश येत आहे, कीं अपयश येत आहे याचा विचार करण्याच्या भानगडींत ते पडत नसत. सार्वजनिक हिताच्या बाबतींत ऐहिक व पारमार्थिक असला भेद त्यांनीं केला नाहीं. एकदां येथें एक धर्मपर व्याख्यान देत असतांना ते म्हणाले, 'कांहीं लोकांना असें वाटत असतें कीं, मनुष्याला पूर्वजन्मही नाहीं व पुनर्जन्मही नाहीं. ह्या जीवनाच्या मागें कांहीं होतें, किंवा पुढें कांहीं आहे व त्याच्या त्या जीवनाशी संबंध आहे असें नाहीं. कांहीं लोकांना असें वाटतें कीं, आपली जी नित्यावस्था आहे ती आपल्या मुलाबाळांच्या रूपानें राहते, त्या पलीकडे आपल्याला कांहीं अवस्था आहे असें मानण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. परंतु विचाराच्या या दोन्ही दिशा आपल्या दृष्टीनें समाधानकारक नाहींत. आपण भाकर मागत असतांना हातीं वरवटा देण्यासारखेंच हें आहे. पण त्या दोन विचारांपेक्षां तिसरा एक विचार आहे. आणि त्यांत आपलें समाधान करण्याचें सामर्थ्य आहे, ह्यांत आपली खरी तृप्ति आहे. तो विचार असा कीं, आपली नेहमीं उन्नतिच व्हावयाची आहे, मग ती ह्या जगीं होवो किंवा अन्यत्र होवो, मात्र आपण नित्य आहों, नाशवंत नाहीं, ह्या दृष्टीनें सर्व उद्योग केले पाहिजेत.' हा जो त्यांचा स्वतःचा विश्वास त्याच्या स्पष्टीकरणार्थ ते म्हणाले– "थोड्या दिवसांपूर्वी मी उत्तर हिंदुस्थानांत गेलों होतों, त्या वेळीं गंगेच्या कांठीं उभा असतांना नदीचें तें विशाल पात्र, तो प्रचंड प्रवाह पाहून मन अगदी प्रसन्न झालें, त्या एकंदर वैभवाचा मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला व एकदम माझ्या तोंडून असे उद्गार निघाले 'हिंदुस्थाना ! तूं धन्य आहेस ?' पण लागलाच माझ्या मनांत विचार आला कीं, 'काय ही गंगा तरी शाश्वत आहे काय ?' एके दिवशीं हीही अंतर्धान पावणार नाहीं कशावरून ? मग मी माझ्या मनाशींच विचार करितां माझ्या हें लक्षांत आलें कीं, प्रवाहाच्या रीतीनें शाश्वत स्थिति आहे, परंतु व्यक्तीच्या रीतीनें मरण, नाश हीं घडामोड चालली आहे." यावरून आम्हांला किती तरी बोध होत आहे बरें ! पहा आपण ज्या व्यक्ति आहोंत, त्या, समाजाचे परिमाणू होत. आणि हे जे आपण परमाणू ते नष्ट होणार आहों. परंतु आपण गेलों, म्हणजे एकंदर जनसमाज गेला, असें नाहीं. ज्याप्रमाणें गंगेचा प्रवाह सतत चालू राहणार, त्याप्रमाणें हा लोकगंगेचा प्रवाह नित्य आहे. आणि हा जो प्रवाह तो भव्य करणें, हे आम्ही

जे परमाणू, घटक, त्यांच्या हातांत आहे, हा ज्यांचा विश्वास, व ह्या विश्वासानें प्रेरित होऊन ज्यांचीं सर्व कार्ये होत होतीं त्यांस निराशेचा कधी स्पर्श व्हावा तरी कसा ? एकदां ते येथेंच उपासना चालवीत असतां म्हणाले "आम्ही पतन पावलों, किंवा आम्हांला यश आले नाहीं, तर त्यांत काय झालें ? आम्हांला अपयश व त्रास हें सर्व सहन करायचेंच आहे. पण जें कांहीं आपल्याला सहन करावयाचें आहे, तें सहन करून धीरानें व शौर्यानें पुढील मार्ग चालूं या." हा जो त्यांचा मनुष्यजातीवरील विश्वास त्यांच्यायोगें त्यांच्या ठिकाणीं उदारभाव नांदूं लागला. हा उदारभाव त्यांच्यांत इतक्या प्रमाणानें होता, तसा तो आपणास क्वचित्च आढळेल. अशाच उदार भावयुक्त जातीसंबंधानें एका ख्रिस्ती साधूनें म्हटलें आहे 'ते पुष्कळ दुःखें बहुतकालपर्यंत सहन करितात, पण स्वतः फार मायाळु असतात, त्यांच्या हातून कोणाचा हेवा होत नाही, त्यांच्या ठिकाणीं दंभाचा अंशही वास करीत नाहींत; ते फुगून जात नाहींत व कधीं पुढें पुढें करीत नाहींत; ते कधीं सहसा चिडत नाहींत व कोणाच्या वाइटाचा विचार त्यांस शिवत नाहीं; अनाचर, अनीति पाहून नव्हे, तर सदाचार, सत्यनीति, सत्यनिष्ठा पाहून त्यांस आनंद होतो. सर्व प्रकारच्या प्राप्त स्थितीचा ते शांतपणें अनुभव घेतात, जें विश्वास ठेवण्यासारखें असेल त्यावर विश्वास ठेवितात व जें सहन करणें जरूर तें सहन करितात.' हें सर्व वर्णन आमच्या वंधूंस पूर्णपणें लावतां येतें. कोणाही व्यक्तीविषयीं त्यांच्या तोंडून कधीं कठोर शब्द निघालेले कोणास माहीत नाहींत. आपापसांतील कलह, मतभेद, मत्सर, ह्यांच्या पलीकडे ते असल्यामुळें त्यांच्या उदार अंतःकरणांत सर्वांचा वास असे. एकदां ते म्हणाले 'लोकांना तुम्ही अगदीं निरुपयोगी आहां, तुमचा कोणालाच कांहीं उपयोग नाहीं, तुम्ही भूमिभार आहां असें सांगून काय फायदा होणें शक्य आहे ? त्यांना ह्या जगाचा हेतु काय, त्यांचें येथें काय कर्तव्य आहे हें त्यांस कळावें व त्यांच्या हातून कांहीं चांगलीं कार्ये व्हावींत अशी जर तुमची इच्छा आहे, तर त्यांच्या ठिकाणीं चांगुलपणाचा जो अंश आहे व ज्याच्याद्वारें महा कार्यें होणें शक्य आहे, तो जागृत करण्याचा प्रयत्न करा, त्यांची निर्भर्त्सना करूं नका व त्यांस हिडीस फिडीस करूं नका." आणि हेंच धोरण नित्य आपल्या दृष्टीपुढें ठेवून त्यांचें वर्तन होत असे. हाच अत्यंत उदार भाव त्यांच्या ठिकाणीं होता. म्हणूनच ज्या ज्या चांगल्या संस्था प्रागतिक धोरण आपल्या दृष्टीपुढें ठेवून निघत असत त्यांच्यावर त्यांचें प्रेम वसे व त्यांच्या कर्माविषयीं त्यांच्या ठिकाणीं सहानुभूति वसत असे. जेव्हां आर्यसमाजाचे संस्थापक **स्वामी दयानंद** हे मुंबई इलाख्यांत प्रचारासाठीं आले, त्या वेळीं स्वतः **प्रार्थनासमाजाचे** सभासद असल्यामुळें आर्यसमाजाचे सर्व सिद्धान्त जरी त्यांस मान्य नव्हते, तरी दयानंदस्वामींना न्या. रानडे ह्यांनीं जवळ करून सर्व प्रकारचें साहाय्य केलें. रानडे यांच्या पुष्कळ मित्रांनीं त्यांस म्हणावें कीं, आपण प्रार्थनासमाजाचे सभासद, **राजा राममोहन** यांनीं उपदेशिलेलीं तत्त्वें आपल्याला पूर्णपणें मान्य, असें असून आपण आर्यसमाजांत व्याख्यानें देतां व देवळांत जाऊन पुराण सांगतां, अगर व्याख्यान देतां याचा अर्थ काय व हें आपणास जमतें कसें ? जेथें जेथें धर्मविषयक जागृति आहे, तेथें तेथें अल्पस्वल्प प्रमाणानें रानडे साहाय्य करावयास सिद्ध असत, हा त्यांचा दोष नसून त्यांच्यांतील हा फार मोठा गुण होता. याचेवरून त्यांच्या ठिकाणीं परमतसहिष्णुता जी होती ती कोणत्या प्रकारची होती त्याची साक्ष पटते. त्यांचें एक मोठे तत्त्व असें कीं, ज्यास प्रागतिक धोरण म्हणावयाचें तें आकुंचित नसावें. त्याचा विचार व्हावयास पुष्कळ अवकाश असावा. जर आज अनेक धर्मसंस्था उदार ध्येय आपल्यापुढे ठेवून उदार धर्माचा प्रसार करूं पहात आहेत अशा वेळीं ह्या निरनिराळ्या संकटांत कोण कोणत्या गोष्टींसंबंधानें ऐक्य आहे, तें पाहिलें पाहिजे. व मतभेदाचे जे भाग असतील त्यांचें स्तोम न माजविण्याचा आपला निश्चय असला पाहिजे. वेदच तेवढे ईश्वरदत्त, व म्हणून सर्वांशीं प्रमाण असें दयानंदस्वामींनीं म्हटलें, तर त्यांत आपलें काय कमी झालें ? त्यांचा तो विश्वास त्यांस लखलाभ होवो. परंतु वरवरच न पहातां जरा खोल प्रवेश करून, हें एक तत्त्व बाजूस ठेवल्यावर आपल्या तत्त्वांशीं जुळण्यासारखें त्यांच्यांत कांहीं आहे कीं नाहीं, हें पहावयास काय हरकत आहे ? असें त्यांनीं म्हणावें. आणि इतर धर्मांचा विचार करीत असतां हें उदार धोरणच ते दृष्टीपुढें ठेवीत असत. १८९९ सालीं लखनौ येथें त्यांनीं जे उद्गार काढले, त्यांवरून व्याख्यानें देतांना आपलें मनौदार्य ते कसें सर्वांच्या निदर्शनास आणून देत असत तें दिसतें. त्या वेळीं **गुरुनानकांच्या** शब्दांचा उपयोग करून ते म्हणाले






मी हिंदुही आहें व मुसलमानही आहें. म्हणजे अर्थात् ज्याप्रमाणें हिंदूकडून होणारी जीं सत्कृत्यें त्यांच्याविषयी माझी जशी सहानुभूति आहे, त्याप्रमाणें मुसलमानाकडूनही होणाऱ्या चांगल्या कृत्यासंबंधानें आहे. माणसामाणसांतील, जातीजातींतील, राष्ट्राराष्ट्रांतील भेद हे त्यांना अगदीं भ्रममूलक, कायम न राहणारे असे वाटत, म्हणून वरच्या खळबळीच्या आंत जावयाचा त्या उदारधीचा नित्य प्रयत्न असे. कारण असें केल्यानेंच सर्वांतरात्मा जो परमेश्वर त्याचें दर्शन आत्म्यास होतें व तोच आपल्या ठिकाणीं जो दैवि अंश आहे त्यास उद्दीपित करितो. असे जे हे थोर पुरुष, ज्यांनीं केवळ परहितासाठीं आपलें जीवित कंठिलें, सर्व कांहीं उद्योग लोककल्याणासाठीं आत्महिताचा बिलकुल विचार न करितां, एवढेंच नव्हे, तर स्वहिताचा त्याग करून केले, लोकांचें कल्याण हाच ज्यांचा जीवनहेतु व जेथें जेथें म्हणून त्यांना चांगुलपणा दिसला तो ज्यांच्या प्रेमाचा विषय झाला, ज्यांनीं आपल्या मार्गांत येणाऱ्या व आलेल्या अडचणींची केव्हांही भीति बाळगिली नाहीं व ज्यांचा त्यामुळें उद्योगही मंदावला नाहीं, ज्यांच्या चित्ताची शांति कधीं ढळली नाहीं, कारण ती त्यांच्या ठिकाणीं बहुतप्रमाणानें वास करीत होती. ज्यांनीं आपल्या चरित्रांत जो साधेपणा व साधुत्व संपादण्यास साहाय्य करणें हें सर्व धर्मांचें साध्य त्या साधेपणाचा व साधुत्वाचा आपल्या सर्व जीवनाच्या द्वारें प्रत्यक्ष अनुभव आणून दिला, त्यांचा ते जरी आज आम्हांस मागें टाकून गेले आहेत तरी आम्हांस केव्हांही विसर पडणार नाहीं. आमच्यासाठीं जें कांहीं केलें त्याचा केव्हांही विसर पडणार नाहीं. आतां आमच्या आयुष्याचें हेंच महत्कार्य व्हावें कीं, त्यांनीं जें महान् कार्य केलें तें आम्हीं आपल्या अल्पसामर्थ्यानुसारें पुढें चालवावें. आम्ही आतां असें सर्वांच्या अनुभवास आणून दिलें पाहिजे कीं, रानडे आमच्यासाठीं इतकी वर्षें जे राबले, खपले ते व्यर्थ नव्हेत; त्यांचे श्रम व्यर्थ गेले नाहींत व त्यांचा जो असाधारण आशावाद, त्यांची सत्कार्यनिष्ठा, त्यांचा देवावरील अढळ विश्वास, त्यांचें अखिल मनुष्यजातीविषयींचें प्रेमही दृष्टीपुढें ठेवून त्यांच्या आशीर्वादानें त्यांचें कार्य पुढें चालवूं व त्यांच्या चरित्रापासून आम्ही साहाय्य घेऊं. त्यांनीं ज्याप्रमाणें **परमेश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व** हें नातें स्थापण्याचा प्रयत्न केला व देवाच्या नांवाचा गजर केला. त्याप्रमाणेंच आपण करण्याचा प्रयत्न करूं या. कारण, आपला असा विश्वास आहे कीं, त्यांचा परमविशुद्ध आत्मा आपण काय करीत आहों तें पहात आहे, त्यांची दृष्टि आपल्याकडे आहे, ते आपणांस विसरले नाहीत.

## (२)*

आजच्या प्रसंगीं व्याख्यान देण्यासाठीं माझी निवडणूक करून आपण जो मला मान दिला त्यास मी पात्र नसल्यामुळें तो मी नाकारण्याच्या विचारांत होतों; परंतु आपल्या चिटणिसांनीं मला असें सांगितलें कीं, आतांपर्यंत व्याख्यान देण्यास दुसरा कोणी योग्य मनुष्य सांपडला नाहीं व आतां असा योग्य मनुष्य शोधून काढण्यास अवकाशही थोडा राहिला; यासाठीं मींच तें काम पत्करलें पाहिजे. आपल्या सेक्रेटरीसाहेबांनीं या प्रमाणें सांगितल्यामुळें नाइलाजानें मला त्यांचे म्हणण्यास रुकार द्यावाच लागला. डॉ. **भांडारकरांनी** आज व्याख्यान द्यावें म्हणून चिटणीसांनीं खटपट केली होती; परंतु तूर्त डॉक्टरसाहेबांची प्रकृति ठीक नसल्याकारणानें मुंबईस येऊन व्याख्यान देणें त्यांजकडून होण्यासारखें नाहीं असें कळतें. न्या. **रानडे** यांचे संबंधानें चार शब्द अधिकारयुक्त वाणीनें बोलण्यास डॉक्टरसाहेबां इतका योग्य दुसरा कोणी नाहीं, म्हणून तेच मुंबईस आले असतें, तर त्यांच्या तोंडचे चार शब्द ऐकण्याचा लाभ आपणां सर्वांस झाला असता. असो. **प. वा. रानडे** यांजबद्दल आतांपर्यंत व्याख्यानद्वारां व लेखद्वारां इतकी माहिती आपणां सर्वांस मिळाली आहे कीं, मीं आतां त्यांजबद्दल विशेष तें काय सांगावें तेंच मला समजत नाहीं. आजच्या उत्सवप्रसंगीं, ठरल्याप्रमाणें कार्यक्रम पार पडलाच पाहिजे, यासाठींच आपण मला जो कार्यभाग नेमून दिलेला आहे, तो माझें कर्तव्य म्हणून मीं ज्या अर्थीं स्वीकारला आहे, त्या अर्थीं तो मला यथाशक्ति बजावलाच पाहिजे.

न्यायमूर्तींशीं माझा प्रथम परिचय सुमारें चोविस वर्षांपूर्वीं झाला. त्याच वेळेच्या सुमारास एका आंग्ल मराठी साप्ताहिक पत्राच्या इंग्लिश बाजूचें संपादकत्व माझ्याकडेस होतें. न्या. **तेलंग** यांची त्या वेळीं माझ्या कामावर देखरेख असे. **रानडे** यांची व माझी त्यावेळीं ओळख नव्हती. त्या वेळीं ते नाशकास सबॉर्डिनेट जज्ज होते. ज्या पत्राचें संपादकत्व त्या वेळीं मजकडे होतें.

*(हिंदु युनियन क्लबच्या वार्षिकोत्सवाचे वेळीं दिलेलें व्याख्यान.)

त्याचे रानडे हे पहिले संपादक असल्यामुळें त्यांची सल्लामसलत मिळाल्यास मला विशेष मदत होईल, या हेतूनें मीं त्यांस पत्र लिहिलें. या पत्राचा जबाब त्यांनीं अगदीं मोकळ्या मनानें दिला व त्याबरोबरच आपला अभिप्रायही त्यांनीं मला कळविला. माझे अग्र व स्फुट लेख आपण वाचीत असतों; परंतु ते स्फुट लेख इतके लांबलचक असणें मला बरे वाटत नाहीं, असें त्यांनीं मला स्पष्ट कळविलें. "तुमच्या अग्र लेखांत जो अघळपघळपणा असतो तो जितका टाळता येईल, तेवढा टाळा. आणि स्फुटांवर जरा विशेष भर ठेवा. आज काल लोकांना लांब लांब लेख वाचण्याइतकी फुरसत नसते. त्यासाठी तुमचे स्फुट लेख लहानच परंतु व्यापक अर्थानें भरलेले आणि चटकदार येतील याकडे लक्ष असूं द्या. **पार्थियन** लोकांच्या शरसंधानाप्रमाणें तुमच्या लेखांचा नेम बिनचूक असूं द्या." याप्रमाणें **रानड्यांनीं** मला उपदेश केला. असो. खुद्द **रानड्यांची** लेखनशैली कांहीं "पार्थियन शरसंधानतुल्य" नव्हती. परंतु त्यांच्या सामर्थ्यवान् विचारपरंपरेस साजेशीच त्यांची लेखनशैली होती. त्यांच्या विचारमालिकेपासूनच तिची उत्पत्ति होती, असें म्हटलें तरी चालेल. त्यांची लेखनशैली भारदस्त होती. ज्याला "अंग्लोसाक्सन इंग्लिश" म्हणतात, तशा प्रकारची सरणी त्यांच्या लेखांत नसे. परंतु त्यांच्या सतेज लेखांच्या उठाव विवेचनपद्धतीमुळें आणि इतिहासविषयक गोष्टी-संबंधानें त्यांच्या ठिकाणीं जी प्रदिप्त कल्पनाशक्ति होती तिच्यामुळें वाचकांचें मन ताबडतोब वेधिलें जाई. "आधुनिक युरोपखंडाचा इतिहास (History of Modern Europe)" या **ॲलिसनसाहेबांनीं** लिहिलेल्या ग्रंथाशीं **रानडे** यांचा जो विद्यार्थीदशेंत ते असतांनाच परिचय झाला, त्यामुळें त्यांच्या भाषापद्धतीवर या ग्रंथाचा बराच सुपरिणाम झाला, असें म्हणतात.

न्या. **रानडे** याच्या बरोबर एलफिन्स्टन कॉलेजांत असलेल्या कांहीं समकालीन विद्यार्थ्यांकडून मीं असें ऐकिलें आहे कीं, एम्. ए. चा अभ्यास करीत असतां **रानडे** हे कॉलेजच्या वाचनालयात दररोज समोरच्या टेबलावर पाय टाकून बांकावर उघडे बोडके बसून तासांचे तास **ॲलिसनचे** ग्रंथ एकटेच मोठमोठ्यानें वाचीत बसत. त्या वेळचें त्या कॉलेजचे प्रिन्सिपाल **सर आलेक्झांडर ग्रांट** यांनीं एक दिवस ही गडबड ऐकून इतक्या मोठ्याने कोण वाचीत आहे म्हणून ते आंत डोकावून पाहूं लागले. असा वेडगळपणानें अस्ताव्यस्त उघडा बोडका बसून कोण वाचीत आहे, म्हणून त्यांनीं कांहीं विद्यार्थ्यांस विचारलें, तेव्हां त्यांना कळलें की आपला **महादेव** (ग्रांटसाहेब **रानडे** यांस **महादेव** म्हणून हांक मारीत) वाचीत आहे. त्यांपैकीं एक विद्यार्थी रानडे यांस ही गोष्ट कळविण्यासाठीं जाऊं लागला तेव्हां प्रिन्सिपाल **ग्रांट** यांनीं त्यास थांबवून म्हटलें कीं, "त्याला व्यत्यय आणूं नकोस, त्याला आपला अभ्यास करूं दे," ही मोठ्यानें वाचण्याची संवय रानडे यांस आमरण होती. स्वतःशींच मोठ्यानें वाचलें म्हणजे आपण काय वाचलें, हें ताबडतोब त्यांच्या मनांत उतरे, असें मला वाटतें. न्यायाधिशाचें काम करीत असतां वकील लोक आपल्या मुद्यांच्या प्रतिपादनार्थ जे आधार दाखवीत ते त्यांस जडलेल्या या संवयीमुळें त्यांना बरोबर समजण्यास अवघड होई कीं काय, अशी मला वारंवार शंका वाटत असे. कारण त्यांचे जोडीस दुसरे न्यायाधीस बसत असल्यामुळें हे दाखविलेले आधार मोठ्यानें स्वतः वाचून पाहणें साध्य नव्हतें, त्यामुळें ते मनांतले मनांतच वाचून पहावे लागत. त्यांच्या समोर काम करणाऱ्या वकिलांच्या हें लवकरच ध्यानीं येऊन चुकलें कीं, आपण जे आधार त्यांच्या समोर मांडतों तें अशा वेळीं यांच्या बरोबर ध्यानांत उतरत नाहींत. ते जेव्हां न्यायमंदिरांतलें काम आटपून आपल्या चेंबर (खोली) मध्यें किंवा घरीं जात त्या वेळीं हे आधार पुनः मोठ्यानें स्वतः वाचीत किंवा दुसऱ्याकडून वाचवून घेत. अशा रीतीनें एकदां ते वाचल्यावर मात्र त्यांतील एकंदर मुद्दे त्यांच्या तंतोतंत ध्यानांत येत. अशा प्रकारें मोठ्यानें वाचण्याच्या संवईमुळें एक फायदा आहे. अशा वाचण्यामुळें आपलें मनच केवळ आपण काय वाचतों हें ग्रहण करतें असें नाहीं, तर कानांना सुद्धां तें ग्रहण करावें लागत असल्यामुळें वाचनाचा परिणाम अधिक दृढ होतो.

**रानडे** यांच्या वाचनामध्यें दुसरा एक विशेष असे. कोणतेंही पुस्तक एक वेळ वाचल्यावर तें जर त्यांना वाचनीय असें वाटलें तर ते त्याचा मथितार्थ पद्धतशीरपणानें सर्व लिहून काढीत. अशा प्रकारें त्यांनीं अनेक ग्रंथांचा सारांश मुद्देसूदपणें लिहून काढला होता. या त्यांच्या संवईमुळें पुढें जेव्हां ते वरिष्ठ न्यायमंदिरा (हायकोर्टा)च्या न्यायासनावर बसले त्या वेळीं त्यांच्या समोर जे दहा बारा मुकदमे हमेश चालत असत, त्यांतल्या प्रत्येक मुकदम्यामधील मुद्याच्या सर्व गोष्टी ध्यानांत ठेवणें त्यांना सुलभ जाई. विशेषतः महत्त्वाच्या



अनुक्रमणिका

खुनी खटल्यांमध्यें गुंतागुंतीच्या बारीकसारीक गोष्टीहि त्यांच्या तावडतोब लक्षांत येत. यावरून त्यांची धारणाशक्ति किती विलक्षण होती, हें दिसून येईल. हायकोर्टांत न्या. रानडयांच्या बरोबरच कांहीं वर्षेपर्यंत बसत असणाऱ्या एका विद्वान् न्यायमूर्तींनीं नुकतेंच कांहीं वर्षांपूर्वी पेनशन घेतलें. न्या. रानडे वारल्यावर त्या गृहस्थांनी मला एकदां लिहिलें कीं, मीं रानडयांच्या जोडीस बसून महत्वाचे कैक फौजदारी खटले निकालांत आणिले. त्या वेळीं अनेक गुंतागुंतीचे अवघड खुनी खटल्याचे निकाल देण्याच्या कामीं मला न्या. रानडे यांचें अतोनात साहाय्य झालें. दुसऱ्या एका इंग्रज मित्रानेंही न्या. रानडे यांच्या ह्या विलक्षण धारणाशक्तीबद्दल मला असा प्रश्न केला कीं, 'यांचे समोर दररोज दहा बारा तरी कज्जे चालतात, त्या सर्वांतल्या मुख्य मुद्याच्या गोष्टी सर्व त्यांच्या डोक्यांत तरी कशा राहतात?' या प्रश्नाला अर्थातच जबाब हा कीं, सतत वाचन व व्यवस्थितपणें वाचलेल्या मजकुराचें मुद्देशीर टांचण करण्याची पद्धत, या अव्याहत व्यासंगाच्या योगानें आपल्या नैसर्गिक तीव्र बुद्धीस रानडे यांनीं योग्य शिस्त लावून दिली असल्यामुळें कोणत्याहि गोष्टी त्यांच्या तावडतोब लक्षांत येत; व त्या गोष्टींच्या कमी अधिक महत्त्वाप्रमाणें आपल्या मनांत ते त्यांची व्यवस्थित मांडणी करीत. मनाला योग्य शिस्त लावल्याशिवाय केवळ बुद्धीच्या जोरावर एवढें काम करीन म्हटलें तर तें कोणासही शक्य नाहीं. उपजतच बुद्धिवान् अशी कांहीं माणसें आहेत कीं तीं केवळ ईश्वरदत्त मानसिक शक्तीवरच अवलंबून राहून अव्यवस्थित वाचनाची संवय लावून घेतात. लेखन, वाचन हें उपजत बुद्धिवैभवाच्याच योगानें प्राप्त होतें, असें फॉलस्टाफ् ज्याप्रमाणें समजत असें त्याप्रमाणें विचारशक्तिही मनुष्याला उपजतच प्राप्त होते, असा या वर्गांतील लोकांचा समज आहे. जे स्वतःची उन्नति करण्याचा प्रयत्न करितात, त्यांनाच ईश्वर झाला तरी सहाय्य करितो. या सृष्टिरूपी विद्यालयांत आपण आपल्या मनास योग्य शिक्षण दिल्याखेरीज आपली उन्नति होणें शक्य नाहीं. रानडे यांना ईश्वरानें उत्तम बुद्धि दिलेली होती. परंतु ह्या ईश्वरदत्त बुद्धिवैभवापेक्षांही त्यांनीं स्वतःचे मेहनतीनें आपल्या मनाचा विकास करून घेतला.

त्यांचा व्यासंग फार दांडगा असे. एका क्षणाचाही ते अपव्यय होऊं देत नसत. अव्याहत व्यासंगाची त्यांना इतकी संवय झाली होती कीं, मनांत आणलें तरी सुद्धां, निरर्थक वेळ दवडणें त्यांना शक्य झालें नसतें. रानडे यांच्या व्यासंगाबद्दल कोणी एका मित्रानें त्यांची प्रशंसा केली असतां ते त्यास म्हणाले की उद्योगीपणाची मला संवय लागली आहे असें म्हणण्यापेक्षां तें मला एक व्यसन जडलें आहे, असें म्हटलें असतां विशेष शोभेल. कारण त्याला प्रतिकार करणेंच मला अशक्य होतें. वाचन आणि विचार यांची त्यांनीं आपल्याला इतकी संवय लावून घेतली होती कीं, या दोन गोष्टींशिवाय त्यांच्या मनास बिलकुल चैन पडत नसे. मनाच्या अशा अप्रतिबद्ध व्यापृततेमुळें आपल्या शरीरप्रकृतीवर परिणाम होत आहे, ही गोष्ट शेवटीं शेवटीं त्यांनाही कळूं लागली होती. उद्योगाची ही आवड त्यांच्या शरीरप्रकृतीस बाधक झाली आणि त्यांची प्रकृति मूळची निकोप व मजबूत असतांही ती हळुहळु कमकुवत होत जाऊन त्याच्या योगें त्यांची आयुर्मर्यादा खुंटली, ही गोष्ट रानडे यांची ज्यांना ज्यांना म्हणून माहिती आहे ते कबूल करितात. त्यांना करमणुकीचे खेळ कोणचेही येत नसत. वाचन, लेखन किंवा विचार यांना जर करमणूक म्हणतां येईल तर ह्याच तीन गोष्टींनीं त्यांच्या मनास करमणूक किंवा आल्हाद प्राप्त होई. त्यांची प्रकृति चांगली असली म्हणजे ते बरेच लांब फिरावयास जात. ते फिरावयास गेले असतां माझी त्यांची पुष्कळ वेळां गांठ पडे, परंतु फिरतांनाही त्यांचें विचार कांहींना कांहीं चालूच असत. सृष्टिवैभवाकडे, निसर्गांतील चमत्कृतिजनक बहुविध देखाव्यांकडे त्यांचें लक्ष बिलकुल अशा वेळीं जात नसे. त्यांचें तें धिप्पाड उंच शरीर चालत असे, परंतु त्यांचें मन दुसरीचकडे कोठें तरी गुंतलेलें असे— अंतरात्म्याशीं त्यांच्या मनाचा संवाद चाललेला असे. शरीराची चलनक्रिया चालली असतां खरें पाहतां मनास, विचारशक्तीस थोडी विश्रांती हवी असते. पण, त्यांचें तसें बिलकुल नसे. ते अति बिकट व गुंतागुंतीच्या विषयांवरही अशा वेळीं विचार करीत असत, आणि शरीर आपलें चालत असे. अशा वेळच्या त्यांच्या अंतस्थ विचाराचीं दोन उदाहरणें मला आठवतात. सन १८९४ च्या मे महिन्यांत लोणावळें येथें त्यांच्या बरोबर मी फिरावयास गेलों असतां, बोलतां बोलतां कित्येक गांवचे गांव नदीच्या महापुरामुळें बुडून गेल्याची जी बातमी त्याच सुमारास वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली होती तिच्याबद्दल विषय निघाला. ते म्हणाले, "ईश्वराचें दूरदर्शित्व या गोष्टीनें कसें सिद्ध करा-

वयाचें ? या गोष्टींनी हितकारक असे कोणते परिणाम होण्यासारखे आहेत ?" इतकें बोलून ते स्वस्थ राहिले. त्यानंतर फिरून घरीं येईपर्यंत ते कांहीं एक बोलले नाहींत. वरील प्रश्नानें त्यांचें मन इतकें व्यापून गेलें होतें कीं, त्यांच्या चेहेऱ्याकडे पाहिलें म्हणजेच त्यांच्याशीं बोलून त्यांच्या विचारांस अडथळा करूं नये असें कोणासही वाटलें असतें. सुमारें दोनच वर्षांपापूर्वी दुसऱ्या एका मित्रास अशाच प्रकारचा दाखला आला. **रानडे** व हे गृहस्थ एके दिवशीं फिरत चालले होते. त्या वेळीं **रानडे** त्यांस म्हणाले:– "**रामदासांनीं** एके ठिकाणी 'महाराष्ट्रधर्माचें रक्षण करा' असें म्हटलें आहे. '**महाराष्ट्रधर्मा**'विषयीं **रामदासांची** काय कल्पना असावी ? इतर हिंदु लोकांच्या धर्मांहून **महाराष्ट्रधर्म** म्हणून कांहीं भिन्न धर्म आहे कां ? रामदासांचा उद्देश तुम्हाला कळला आहे काय ?" यावर अर्थातच त्यांच्या मित्रानें उत्तर दिलें "नाही बोवा. रामदास काय म्हणतात हें आपल्याला कांहीं बरोबर समजत नाहीं. आपण याचा काय बरें अर्थ करतां ?" त्या गृहस्थाला उत्तर मिळालें नाहीं, म्हणून तोच प्रश्न त्याने **रानडयांस** पुन: केला. परंतु **रानडे** विचारांत गुंग झाले होते. त्यांनीं आपण होऊनच जो प्रश्न उपस्थित केला, त्याचा जबाब त्यांच्या मित्रास न मिळाल्यामुळें त्या गृहस्थांना अर्थातच पुढील सवाल बंद करावे लागले. 'गडबड असो, सभोंवार गोंगाट चालला असो, किंवा मंडळी भेटावयास आलेली असो, कशामुळेंच **रानडे** यांच्या उद्योगास व्यत्यय येत नसे. **रानडे** यांजकडे जाण्यास कोणासही मज्जाव नसे. कोणीही केव्हांहि त्यांजपाशीं जावें, त्याला हरकत नसे. कोणीही गेला तरी हातीं घेतलेल्या कामांत त्याच्या जाण्यानें प्रतिबंध होत नसे. मग हा जाणारा गृहस्थ त्यांच्याशीं संभाषण करण्यास पात्र असो, किंवा उगाच कांहीं तरी कामाच्या निमित्तानें व्यर्थ काल दवडण्यासाठीं आलेला असो. त्यांना भेटण्यास आलेले गृहस्थ जर तसेच पात्र असले, तर हातचें काम बाजूस ठेवून ते त्यांच्यांशीं बोलत. पण तोच जर उगाच कोणीतरी कांहींतरी काम घेऊन आलेला असला, तर ते आपलें काम तसेंच करीत बसत; पण तुझ्याशीं बोलायला तूर्त फुरसत नाहीं असें एकासही ते सांगत नसत. या दुसऱ्या वर्गांतील लोकांच्या सपाटयांतून सुटण्याचा त्यांनीं एक मार्ग शोधून काढला होता. अमक्याकडून कांहीं तरी काम होण्यासारखें आहे, असें त्यांना दिसून आलें कीं, त्याला ते असेंच कांहीं तरी काम करावयाला देत. असें झालें म्हणजे अर्थातच अशी रिकामटेकडी मंडळी पुन: त्यांना भेटण्यास म्हणून येत नसे !

अशा प्रकारें वारंवार अडथळे येत आहेत, सभोंवार गोंगाट चालला आहे, अशा स्थितींत काम करण्याची संवय आदरणीय आहे किंवा काय, हें मला खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. श्रेष्ठ प्रकारचे मानसिक श्रम करावयाचे आहेत, तर शरीररूपी यंत्र सुरळितपणें चालावयाला हवें. विशेषत: ज्यांना ज्ञानतंतु ( Nervous System ) म्हणतात ते अविकृत असायला पाहिजेत. परंतु तुमच्या कामांत जर वारंवार तुम्हांला व्यत्यय येऊं लागला; तर ज्ञानतंतु सुव्यवस्थितपणें राहणें शक्यच नाहीं. कोणतेंही काम करीत असतां मनाची एकाग्रता राखण्याची रानडे यांची शक्ति फारच विलक्षण होती. एकांत असो किंवा भोंवतालीं मंडळी जमलेली असो. आपलें काम एकाग्रचित्तानें करण्यास त्यांस मुळींच अडथळा येत नव्हता. त्यांची शरीरप्रकृतिही तशीच निकोप होती. तिच्यामुळें सकाळीं किंवा संध्याकाळीं लांब लांब फिरावयास जाणें एवढाच काय तो व्यायाम करून एकसारखें काम करण्याची शक्ति त्यांचे अंगीं होती. परंतु निसर्गास धाब्यावर बसवून असें किती दिवस चालणार ? अशा प्रकारें दगदगीमध्यें अव्याहत व्यासंग केल्याचें प्रायश्चित्त **रानडे** यांस अखेर भोगावें लागलें. अशा अव्याहत व्यासंगाच्या योगें करून त्यांनीं आपल्या आयुष्याची मर्यादा आपण होऊन संकुचित केली ! कोणाही मोठ्या मनुष्याकडे जाण्यास मज्जाव नसणें याचा अर्थ आमच्या देशात असा करितात कीं, ज्याला जशी फुरसत मिळेल, तसतसें त्याने तुम्हाला भेटायला यावें, मग त्याचें खरोखरच काम असो किंवा नसो; त्यानें आल्याबरोबर तुम्ही त्याजबरोबर तो उठून जाईपर्यंत अघळपघळ बोललें पाहिजे. सतत मानसिक श्रम करणारांना अशा प्रकारची सवलत लोकांना देणें इष्ट नव्हे. मनाची एकाग्रता होण्यास एकांतवास आवश्यक आहे. यासाठीं मानसिक श्रम करणारांनीं अगदीं एकांतवासांत बसून काम करण्याचें व्रत अगदीं तंतोतंत पाळलें पाहिजे. विशेषत: या देशांतील आम्हां लोकांमध्यें या तत्त्वाची जाणीव अद्याप व्हावयाची आहे, असें म्हटलें तरी चालेल. आम्हांला हें तत्त्व समजलें तरी त्याची अंमलबजावणी आमच्याकडून होत नाहीं. सतत परिश्रम करण्याची संवय **रानडे** यांनीं स्वत:ला लावून घेतली होती खरी, तथापि त्यांच्या या एका संवयीमध्यें सुद्धां वर सांगितलेलें एक व्यंग होतें.



अनुक्रमणिका

केवळ अव्याहत परिश्रम केल्यामुळें त्यांना अकालीं मृत्यु आला असें नाहीं. केवळ सतत उद्योग केल्यानें मनुष्य कधीही कमकुवत होत नाहीं, असें जे मोठमोठे प्रख्यात डॉक्टर व वैद्य म्हणतात त्यांत बरेंच सत्य आहे, अशी माझी समजूत आहे. अव्याहत उद्योगापेक्षां अशा प्रकारचा उद्योग दगदगीमध्यें जर केला असला, तर या दगदगीनें मनुष्याची आयुर्मर्यादा खुंटते. जो येईल त्याला कधींही प्रतिबंध न केल्यामुळें त्यांच्या कामामध्ये जे दररोज वारंवार व्यत्यय येत असत त्यामुळें व आपल्या मानसिक शक्ति दिवसांतून कांहीं परिमित काळपर्यंतच विकसित असतात, हें तत्त्व विसरण्याची संवय त्यांना स्वतःला लावून घेतां आली नाहीं, यामुळें सर्व दिवसभर श्रम केल्यानंतर रानडे जर थकले भागलेले दिसत असत, तर त्यांत काय आश्चर्य? सतत विचार आणि वारंवार अडथळे येत चालले आहेत, अशा परिस्थितींत एकसारखा उद्योग करण्याची संवय याचा परिणाम शेवटीं त्यांच्या शरीरप्रकृतीवर झालाच ! त्यांची शरीरसंपत्ति मूळची जरी निकोप होती तरी अशा प्रकारच्या श्रमांचा परिणाम तिचेवर झाल्यावांचून राहिला नाहीं. ज्ञानतंतूंची शक्ति क्षीण क्षीण होत गेली व त्यांना अकालीं मृत्युमुखीं पडावें लागलें ! ! ह्या गोष्टीवर मी विशेष जोर देऊन बोलत आहें, याचें कारण या एका बाबतींत आपल्यापैकीं उत्तमोत्तम माणसांमध्येंही अद्याप बाळवत् अज्ञान आहे, त्यांना ह्या बाबतींत अद्याप पुष्कळ शिकावयाचें आहे, असें मला आढळून आलें आहे. थोड्याच वर्षांपूर्वी एका बड्या हिंदु गृहस्थाचे घरीं त्याला भेटण्यासाठीं मी गेलों होतों. सदरहु गृहस्थ आज हयात आहेत, ईश्वरकृपेनें त्यांना उदंड आयुष्य प्राप्त होवो ! माझें हें भाषण जर या गृहस्थांचे वाचण्यांत आलें तर मी कोणाबद्दल बोलत आहें, हें त्यांच्या तेव्हांच ध्यानांत येईल. असो. एके दिवशी सकाळी पूर्वी वेळ ठरवूनच मी या गृहस्थांचे घरीं गेलों. त्या वेळीं ते आपलें सरकारी काम करण्यांत मग्न झाले होते. म्हणून संध्याकाळीं सात वाजतां मीं येतों, असें ठरवून पुनः एकवार त्यावेळीं मी त्यांजकडे गेलों. त्यावेळीं **लेस्ली स्टीफन** या ग्रंथकारानें लिहिलेलें एक पुस्तक घेऊन ते नुकतेच वाचायला बसण्याचे तयारींत होते. इकडे सभोंवार त्यांचीं मुलें गडबड करीतच होतीं, गडीमाणसें इकडून तिकडे फिरत काम करीत मोठमोठ्यानें बोलत होतींच. मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलें तर त्यांचे चर्येवर थकल्याचें चिन्ह स्पष्ट दिसत होतें. मी आंत गेल्याबरोबर ते मला म्हणाले, 'काय बुवा दुसरा दिवस आज काम करकरून थकलों. नुकताच हा कचेरींतून आलों.' यावर मी बोललों, 'आणि एवढें करून आपण आतां **लेस्ली स्टीफनचे** ग्रंथ वाचायला बसत आहां ?' त्यावर त्यांनीं उत्तर दिलें, 'होय मनाला कांहीं करमणूक तर हवी ?' 'आणि ह्या ग्रंथाच्या वाचनानें आपण मनरंजन करून घेणार म्हणतां ? यामध्यें तर मोठमोठ्या तत्त्वज्ञानानें भरलेले भारदस्त निबंध आहेत, आणि इकडे पहावें तर आपल्या भोंवतालीं मुलांचा कलबलाट आणि गडीमाणसांची दवड चाललेली आहे ?' 'त्याला काय इलाज ? हें तर चालायचेंच' असें म्हणून जणूं काय ह्या बारीक सारीक गोष्टी आपल्याला अनिवार्यच आहेत अशा तऱ्हेनें हे बडे गृहस्थ खुर्चीवर पडून राहिले. वास्तविक पाहतां संस्थानचा कारभार चालविण्यासारखीं मोठमोठीं कामें जे करीत होते, त्यांना असल्या क्षुल्लक गोष्टी अनिवार्य वाटाव्या काय ? कांहीं वर्षांनंतर त्यांची माझी पुनश्च गांठ पडली, त्या वेळीं ते मला म्हणाले कीं, अहो आतां मीं तीं माझी जुनी संवय अगदी सोडलीं आहे ! असो.

आपण पुनः आतां **रानड्यांकडे** वळूं. उल्हासवृत्तीनें सतत उद्योग करण्याची त्यांची संवय आपण आपल्याला लावून घेतली पाहिजे. पण या बाबतींतील त्यांचा जो दोष मीं नुकताच दाखविला, तो मात्र आपण टाळला पाहिजे. त्यांच्या सतत परिश्रमाला **सौम्यस्वभाव** ही एक जोड होती. कांहीं लोकांचा असा समज आहे कीं, रानडे यांचा स्वभाव फार साधा असल्यामुळें त्यांना मनुष्यस्वभावाची खरी परीक्षा होत नसे. त्यामुळें बरावाईट कसाही मनुष्य असला तरी तें त्यांना कळत नसे. परंतु हा त्यांचा समज चुकीचा आहे. बऱ्यावाईटाची त्यांना पारख होत नसे, असें नाहीं; तर त्यांची क्षमावृत्ति नेहमीं जागृत असल्यामुळें कोणी कितीही त्रास दिला, किंवा कोणी कितीही आत्मश्लाघा केली तरी ते त्यावर रागावत नसत. त्यांचा उजवा डोळा साफ निरुपयोगी झाला होता व डाव्याची दृष्टीही मंद झाली होती; तथापि या थोड्याशा शिल्लक राहिलेल्या डाव्या डोळ्यानें त्यांना जें पाहतां येई, तें आम्हां इतर माणसांना दोन्ही डोळ्यांनींही दिसत नाही ! कोण मनुष्य कसा आहे, त्याचा स्वभाव कसा आहे, हें त्यांना लागलेंच कळून येई. परंतु त्यांचें मन मोठे होतें, त्यामुळें दुर्बल माणसें स्वतः जाणून बुजून

किंवा दुसऱ्याच्या नादीं लागून सत्पथापासून बहकलेली त्यांच्या पाहण्यांत आलीं तर त्यांचा रांग येण्याऐवजी **रानडे** यांस त्यांबद्दल कळवळाच उत्पन्न होई. याचें कारण असें कीं, ते व्यक्तीच्या विशिष्ट दोषांकडे पाहतच नसत. त्यांची विहगदृष्टि असे. त्यांचें मानव जातीवरील प्रेम समुच्चयवाचक असे. जणूं काय अखिल मनुष्यजातींतच तें गुरफटुन राहिलेले होतें. व्यक्ति हें सर्वस्व असें वाटून त्या व्यक्तीकडे त्यांचें मन इतकें फारसें वेधत नसे. त्यांच्या मनास अशा प्रकारचें वळण असल्यामुळें ते लोकांना फार प्रिय असत व त्यांवर यांची छाप बसण्यास सुलभ जाई. परंतु उलटपक्षी अशा स्वभावामुळें त्यांच्या मनास थोडा कमजोरपणाही आलेला होता, हें आपण विसरतां नये. त्यांची वृत्ति क्षमाशील असल्यामुळें कधी कधी ते अशी डळमळीत तडजोड करीत असत की, तीमुळें स्वीकृत तत्त्वास धोका उत्पन्न होण्याची धास्ती असे. उदाहरणार्थ, संमति-वयाच्या कायद्याच्या चळवळीच्यावेळी जेंव्हां विरुद्ध पक्षाचें मंडळीनें मोठी ओरड चालविली, तेव्हां **रानडे** यांनी न्या० **तेलंग** व रावबहादूर **नूलकर** यांस लिहिलें कीं, कायद्याची मर्यादा ऋतुप्राप्तीपर्यंत ठेवण्याविषयीं आपण हिंदुस्थान सरकाराकडे रदबदली करावी, म्हणजे सर्व वाद मिटेल. अशा प्रकारची रदबदली केली तर अर्थातच या बिलाचे मूलतत्त्वाची आहुतीच पडेल हें ध्यानांत आणून **तेलंग** आणि **नूलकर** या दोघांनीही तसें करण्याचें साफ नाकारिलें. वास्तविक गोष्ट अशी आहे की, उपयुक्ततेचें तत्त्व **रानडे** कधी कधी मर्यादे-बाहेर उपयोगांत आणण्यास पहात. कोणाचेंही मन दुखवावयाचें त्यांच्या अगदीं जिवावर येई. सर्वांनी मिळून एकदिलानें कार्य करावें असें त्यांना वाटे. लोकनायकाचें ठिकाणी हा गुण असणें श्लाघ्य आहे. परंतु ह्याच तत्त्वास चिकटून राहिल्यानें कधीं कधीं कमकुवतपणा पदरी येण्याचा संभव असतो. तात्पुरतें कोणालाही जरी वाईट वाटलें तरी सत्य तें स्पष्ट बोललेंच पाहिजे. तत्त्वाच्या अढळ भूमिकेवर आपण निर्धारानें उभें राहिलें पाहिजे. जेथें तत्त्वाला बाध येत नाही, त्या ठिकाणी थोडी माघार घेतली तरी हरकत नाही. परंतु स्वीकृत तत्त्वापासून रतीभरही ढळूं नये. या देशांतील आपणांत इतर लोकांमध्यें जो दुबळेपणा आहे तो या एका बाबतीत **रानडे** यांच्याही अंगी होता. परंतु जरी त्यांच्या हातून कधीं अशी चूक होई तरी तिचें कारण असें कीं, त्यांचा स्वभाव सौम्य होता, आणि त्यांचें मन उदात्त होतें. त्यांचे असेच जे लहान सहान दोष आतां मीं दाखविले त्यामुळेंच ते आम्हांस प्रियतर झाले होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तुम्हां आम्हां सर्वांमध्यें हे दोष नाहींत असें नाहीं. परंतु आपल्या कामांत किंवा इतर सद्-गुणाच्या बाबतींत पाहिलें तर ते आपणां सर्वांहून किती तरी पट श्रेष्ठ होते ! त्यांचें वर्तन अगदीं निष्कलंक, शुद्ध व साधें असे, त्यामुळेंच त्यांच्या बुद्धिवैभवालाही शोभा आलेली होती, असें नाहीं, तर त्यामुळें त्यांचे चेहऱ्यालाही सौंदर्य प्राप्त झालें होतें. त्यांची मुद्रा इतकी चित्तवेधक नव्हती असें कोणी म्हणतात. परंतु असें म्हणणारांना खऱ्या सौंदर्याची पारखच नाहीं असें मी समजतों. मीं असें म्हणणें धाष्टर्याचें तर खरेंच; पण तसें म्हटल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं, अंतर्यामीं बसत असलेल्या गुणांचें तेज बाह्यमुद्रेवर झळकतें. **रानडे** स्वस्थ बसले असतांना त्यांच्या चर्येवर ध्यानाचें तेज स्पष्ट दिसत असे. आपल्या आवडत्या कोणच्याही विषयावर बोलण्यास ते उभे राहिले म्हणजे त्यांचें सर्व अंतर्याम जणूं त्यांच्या चर्येवर मुद्रित झालें आहे, असे वाटे. अशा वेळीं त्यांचें सौंदर्य काय वर्णावें ? त्यांच्या प्रेताच्या चेहऱ्यावर तरी काय तेज विकसत होतें ! चेहऱ्यावरून पाहिलें तर हे अद्यापि जिवंतच आहेत असा भास होई !! त्यांचा चेहरा म्हणजे सौम्यतेचें जणूं निवासस्थानच आहे असें वाटे !! मृत्यूनें जरी आपली कामगिरी पुरी केली होती, तरी चितेवर त्यांचें प्रेत दहनासाठीं ठेविलें, त्यावेळीं सुद्धां ईश्वरभक्ति, उदात्तपणा, आणि प्रेम यांचें जें तेज त्यांच्या चर्येवर झळकत होतें तें तिळमात्रही कमी झालें नाहीं. शुद्धतेच्या योगानें त्यांचें मुखकमल तेजःपुंज दिसत होतें. तिच्या योगानें त्यांच्या मुखास एक प्रकारचें सौंदर्य प्राप्त झालेलें होतें. आणि त्यांचा सर्व आयुष्यक्रमच पवित्र असल्यामुळें मृत्यूनंतर हें तेज, हें सौंदर्य त्यांच्या चेहऱ्यावरून ढळलें नाहीं. बाह्य तेज हें त्यांच्या अंतस्थ शीलाचें द्योतक असे. त्यांच्या विशाल बुद्धीला उदात्त शीलाची जोड मिळाल्यामुळें त्यांचें आम्हां सर्वांवर वर्चस्व राहिलें. त्यांच्याकडून आमरण सत्कृत्येंच होत गेलीं. हें थोडें विषयांतर झालें. पण त्याला इलाज नाहीं. असो. **रानडे** यांचे भक्त आपल्या देशांत लक्षावधि आहेत. पण त्यांचें निश्चयानें, प्रेमानें आणि अभिमानानें अनुकरण करणारे त्यांत कितीसे आहेत, हा प्रश्नच आहे. याचें उत्तर देण्याचें धाष्टर्य मी करीत नाहीं.

* *

अनुक्रमणिका





# महादेव गोविंद रानडे यांचा धर्मविचार

मे. पुं. रेगे

"न्या. मू. रानडे ह्यांची धर्मपर व्याख्यानें" हे पुस्तक रानडे यांनी दिलेल्या काही धर्मपर व्याख्यानांचे संकलन आहे. ह्या व्याख्यानांत रानडे ह्यांनी धर्माविषयी मांडलेल्या काही महत्त्वाच्या विचारांचे विवेचन करण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखात मी केला आहे. ह्या व्याख्यानांचे एक वैशिष्टच असे की त्यांच्यांत रानडचांनी स्वतःची (आणि प्रार्थनासमाजाची) धर्मविषयक भूमिका पारंपरिक हिंदू धर्माच्या पार्श्वभूमी-वर मांडली आहे. महादेव गोविंद रानडे आणि रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे प्रार्थनासमाजाचे सर्वश्रेष्ठ प्रवक्ते होते यात शंका नाही. भांडारकरांनी ह्या संग्रहाला जी प्रस्तावना लिहिली आहे तिच्यात ते म्हणतात, "आपल्या समाजामध्ये पूर्वीपासून चालत आलेले जे धर्मपंथ त्यांतील ग्राह्यांशाचा आपण अवश्य संग्रह करावा असा कटाक्ष ठेवूनही रा. ब. माधवरावांनी काही व्याख्याने दिली होती... विचारी पुरुषांस हे मत पूर्णपणे मान्य आहे."

ह्या व्याख्यानांत रानडचांची धर्माविषयीची संपूर्ण भूमिका मांडली गेली आहे असे नाही. 'ए थिइस्ट्स कन्फेशन ऑफ फेथ'– ईश्वरवादी श्रद्धेची मांडणी– निबंधात आधुनिक ज्ञान आणि विचार ह्यांचा संदर्भ घेऊन स्वतःच्या धर्मविषयक भूमिकेचे विवेचन आणि समर्थन केले आहे. ह्या निबंधात त्यांनी मांडलेल्या विचारांचे विवेचन अन्यत्र करावे लागेल.

हिंदू किंवा वैदिक परंपरेचा निर्देश 'सनातन आर्यधर्म' असा रानडे करतात. ही सनातन परंपरा अपरिवर्तनीय नाही उलट विकसनशील आहे. भागवत धर्म हे ह्या परंपरेचे सर्वांत अलीकडचे असे रूप आहे आणि प्रार्थनासमाज हे भागवत धर्माचे अधिक विशुद्ध असे सांप्रतचे रूप आहे ही रानडे यांची भूमिका आहे.

रानडचांच्या मताप्रमाणे ह्या आर्यधर्माची वैशिष्टचे कोणती आहेत ? पहिले आणि अत्यंत महत्त्वाचे वैशिष्टच असे की ईश्वर आणि माणूस, परमात्मा आणि जीवात्मा ह्यांच्यामध्ये साक्षात संबंध असतो असे हा धर्म दृढपणे मानतो. ईश्वर आणि माणूस ह्यांच्यामध्ये संबंध जुळवून आणण्यासाठी संघटित धर्मसंस्था– चर्च– किंवा अभिषिक्त, संस्कारित धर्मगुरू, पुजारी, इ. मध्यस्थांची आवश्यकता नसते. सामाजिक, लौकिक दृष्टचा माणूस कितीही 'उच्च' किंवा 'हीन' असला, कितीही 'अज्ञानी' किंवा 'पतित' असला तरी आंतरिक तळमळीने, भक्तिभावाने त्याने जर ईश्वराला हाक घातली तर ईश्वर त्याला प्रेमाने प्रतिसाद देतोच; आपल्या कृपेचा वर्षाव त्याच्यावर करतोच. ह्यासाठी ज्ञान, आध्यात्मिक अधिकार, उच्च वर्ण ह्यांची काही गरज नसते. माणसाच्या ठिकाणी शुद्ध भक्तिभाव असला तर ते पुरेसे असते.

आर्यधर्मात जे अनेक पंथ होते त्या सर्वांना समान असलेले, आर्यधर्माचे अंगभूत असे दुसरे वैशिष्टच असे की हा 'ऐतिहासिक' धर्म नाही. "अमुक एका काली, अथवा देशी, अमुक एका व्यक्तीला परमेश्वराने रूप धारण करून खरा धर्म सांगितला; अन्यत्र सर्व अंधार ठेवला, हा विचार यात नाही. ... अमुक एकच ग्रंथाची महती आहे असे नाही. ... अमुक ग्रंथ अथवा पंथ पहिला, अमुक दुसरा; एक अधिष्ठाता, एक अधिकरण असे नाही. सर्वांची योग्यता सारखी." (पृ. ८३–८४)

ह्या दुसऱ्या वैशिष्टचाचा निर्देश करताना रानडचांच्या मनात ख्रिस्ती किंवा इस्लामी श्रद्धेचा संदर्भ होता ह्यात शंका नाही. ख्रिस्ती श्रद्धा अशी आहे की माणसाला त्याच्या तारणासाठी ज्या सत्यांचे ज्ञान होणे आवश्यक आहे ती सर्व ईश्वराने वेगवेगळचा प्रेषितांकरवी आणि विशेषत: ख्रिस्ताकरवी प्रकट केली आहेत. ह्या सत्यांवर आधारलेला ख्रिस्ती धर्म हा एकमेव सद्धर्म, खरा धर्म आहे, प्रचलित असलेल्या

अनुक्रमणिका

इतर कोणत्याही धर्माने स्वीकारलेली श्रद्धा ज्या प्रमाणात ह्या सत्यांशी विसंगत असेल त्या प्रमाणात ती असत्याने आणि अज्ञानाने दूषित झालेली असते. ख्रिस्ती धर्म अस्तित्वात आल्यानंतर इतर सर्व धर्मपंथ 'रद्द' झालेले आहेत. इस्लामी श्रद्धा काहीशी अशीच आहे. महंमद पैगंबर ह्यांच्यापूर्वी ईश्वराने अनेक 'पैगंबर', प्रेषित पाठवून त्यांच्याकरवी माणसांसाठी उपयुक्त असलेली सत्ये, त्यांना श्रेयस्कर असलेला जीवनमार्ग प्रकट केला होता. उदा., मोझिस ( मुसा ) व येशू ( इसा ) हे असे पैगंबर होते; त्यांचे संदेश ज्यांच्यांत ग्रथित झाले आहेत ते 'जुना करार', 'नवा करार' इ. धर्मग्रंथ प्रमाण म्हणून स्वीकारले पाहिजेत. पण ते पूर्णपणे प्रमाण नाहीत. कालाच्या ओघात त्यांच्यांत अनेक असत्ये, विकृती शिरल्या आहेत. उलट महंमद पैगंबर हे अंतिम प्रेषित आहेत. त्यांनी आणलेला ईश्वरी संदेश कुराणात चोखपणे मांडण्यात आला आहे. ईश्वराने माणसासाठी प्रकट केलेले सत्य कुराणात संपूर्ण आणि परिपूर्ण अशा स्वरूपात उपलब्ध आहे. तेव्हा वास्तविक पहाता इस्लामखेरीज इतर धर्म वेगवेगळ्या प्रमाणात आणि वेगवेगळ्या प्रकारे अप्रमाण आहेत. रानड्यांचे म्हणणे असे आहे की आर्यधर्मात ह्या स्वरूपाचे स्थान कोणाही प्रेषिताला, 'अवतारा'ला किंवा ग्रंथाला देण्यात आलेले नाही.

हे म्हणणे कितपत वस्तुस्थितीला धरून आहे ? हिंदू धार्मिक परंपरेला वैदिक परंपरा असे म्हणतात आणि ह्या परंपरेत वेदांचे, श्रुतींचे प्रामाण्य स्वीकारलेले आहे. वेद हा ह्या परंपरेतील सर्वश्रेष्ठ असा धर्मग्रंथ आहे. वेदातील कोणत्याही वचनाशी विसंगत असलेले विधान असत्य, अप्रमाण असणारच, मग ते कितीही अधिकारी मानल्या गेलेल्या पुरुषाने किंवा ग्रंथाने केलेले असो, हे तत्त्व सर्व वैदिक पंथोपपंथांनी स्वीकारलेले आहे. मग आर्यधर्म कोणत्याही एका ग्रंथाला एकमेवद्वितीय असे स्थान देत नाही असे रानड्यांना कसे म्हणता येईल ?

पण रानड्यांचे म्हणणे वास्तवाला धरून आहे. जिला 'वैदिक परंपरा' असे म्हणतात तिच्यात अनेक, भिन्न धर्मग्रंथांचे प्रामाण्य स्वीकारण्यात आलेले आहे. ह्या प्रमाण धर्मग्रंथांतील एक विशिष्ट ग्रंथ सर्वश्रेष्ठ आहे आणि त्याच्या प्रामाण्यावर इतर सर्वांचे प्रामाण्य आधारलेले आहे अशी भूमिका तिच्यात स्वीकारण्यात आलेली नाही. वेद प्रमाण आहेत असे अर्थात् मानण्यात येते. वेदांचा उगम, त्यांचे स्वरूप, प्रयोजन, प्रामाण्याची व्याप्ती ह्यांचे विवरण करण्याचा अधिकार मीमांसा (पूर्वमीमांसा) ह्या शास्त्राचा किंवा दर्शनाचा आहे. आता पूर्वमीमांसेच्या म्हणण्याप्रमाणे वेद हे नित्य आणि अपौरुषेय आहेत. ते अपौरुषेय आहेत ह्याचा अर्थ असा की ते कुणाही व्यक्तीने, प्रतिभावंत माणसाने किंवा साक्षात ईश्वराने, रचलेले नाहीत. ते रचले गेल्यामुळे अस्तित्वात आले असे नाही. ते नेहमी होतेच. ह्या अर्थाने ते नित्य आहेत. हे जे विश्व आहे ते नित्य आहे, ते नेहमीच होते आणि राहील, आणि वेद हे ह्या विश्वाचाच एक भाग आहेत. ते नेहमीच होते आणि राहतील. म्हणून ते नित्य आहेत आणि प्रमाण आहेत. ते स्वतःप्रमाण आहेत. त्यांचे प्रामाण्य इतर कशावर आधारलेले नाही. आता वेदांचे प्रामाण्य स्वीकारणारे आणि म्हणून वैदिक असणारे सर्वच पंथ हा सिद्धान्त स्वीकारतात असे नाही. उदा., वेद हे ईश्वराने रचलेले आहेत व म्हणून ते प्रमाण आहेत असे नैयायिकांचे– न्यायदर्शनाच्या पुरस्कर्त्यांचे– मत आहे.

आता मीमांसामताप्रमाणे पहाता, भगवद्गीता हा पौरुषेय ग्रंथ आहे. भगवान् श्रीकृष्ण ह्या पुरुष-विशेषाने, पुरुषोत्तमाने सांगितलेला तो ग्रंथ आहे व म्हणून पौरुषेय आहे. तेव्हा तो स्वतःप्रमाण नाही. वेदात करण्यात आलेली विधाने स्वतःप्रमाण आहेत. म्हणजे ती सत्य आहेत हे श्रद्धेने स्वीकारायचे असते; त्यांची सत्यता सिद्ध करणारा पुरावा काय आहे हा प्रश्न उपस्थित करायचाच नसतो. पण भगवद्गीता हा वेदांहून भिन्न आणि पौरुषेय असा ग्रंथ आहे. त्यातील विधाने स्वतःप्रमाण नाहीत. ती कशावरून सत्य आहेत असा प्रश्न उपस्थित होतो. गीतेतील जी विधाने वेदांतील विधानांचा अनुवाद करतात, वेदात जे सांगितले आहे तेच सांगतात, ती आणि तेवढीच विधाने सत्य आहेत हे ह्या प्रश्नाचे उत्तर आहे. धर्माच्या किंवा अध्यात्माच्या क्षेत्रात वेद सोडून इतर जे सर्व ग्रंथ आहेत त्यांचे प्रामाण्य वेदांच्या प्रामाण्यावर आधारलेले आहे.

पण ही औपचारिक भूमिका आहे. प्रत्यक्षात गीतेत अशी अनेक महत्त्वाची विधाने आहेत की जी वेदांत आढळत नाहीत. तेव्हा वेद आणि प्रमाण मानण्यात आलेले इतर धर्मग्रंथ ह्यांच्यांतील संबंधाविषयीची एक अधिक सौम्य अशी भूमिका प्रचलित झाली. ती अशी की गीता इ. इतर धर्मग्रंथ वेदांचा केवळ अनुवाद करीत नाहीत; ते वेदांना पूरक आहेत. त्यांतील विधाने वेदांतील विधानांशी सुसंगत असतात; पण वेदांतील विधानांचा ती केवळ अनुवाद करीत नाहीत. माणसांना त्यांचे सर्वोच्च आध्यात्मिक श्रेय—मुक्ती किंवा ईश्वराचा प्रसाद— संपादन करण्याला सहायक ठरतील, पण जी वेदांत आढळत नाहीत अशी अनेक सत्ये ह्या ग्रंथांतून सांगण्यात आली आहेत.[१] म्हणून हे ग्रंथ वेदांचे पूरक ग्रंथ आहेत.

वैष्णव, शैव, शाक्त इ. संप्रदायांचे स्वतःचे आगम ग्रंथ आहेत आणि हे संप्रदाय आपापल्या आगमांचे प्रामाण्य श्रद्धेने स्वीकारतात. त्यांच्यातले जे स्वतःला वैदिक मानतात ते अर्थात वेदांचे प्रामाण्यही स्वीकारतात. त्यांच्या दृष्टीने वेद ( श्रुति ), वेदांवर आधारलेल्या स्मृती, आगमग्रंथ इ. मिळून जे ग्रंथ-भांडार सिद्ध होते ते समग्र प्रमाण आहे. ह्या ग्रंथांतून मांडण्यात आलेल्या सर्व विधानांत परस्पर-सुसंगती आहे आणि ही सर्व विधाने सत्य आहेत. ही ह्या संप्रदायांची पारंपरिक दृष्टी आहे.[२] ऐतिहासिक दृष्टीने पाहता असे दिसते की वैष्णव, शैव, शाक्त हे धार्मिक संप्रदाय, सांख्य-योग ह्यांसारखे आध्यात्मिक संप्रदाय हे मुळात अवैदिक होते. वैदिक साहित्य हे ज्या लोकसमूहाचे धार्मिक साहित्य होते त्याहून भिन्न असलेल्या जनसमूहात विकसित झालेले हे (आणि इतर) संप्रदाय होते. त्यांतील ज्या संप्रदायांनी वैदिक संप्रदायात प्रवेश केला त्यांनी वेदप्रामाण्य स्वीकारले, आणि वेदांच्या शिकवणीचा व आपापल्या संप्रदायाचा विशिष्ट सिद्धान्तांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. काही संप्रदाय, उदा., जैन आणि बौद्ध, हे वैदिक प्रवाहाच्या बाहेर राहिले आणि नास्तिक म्हणून, म्हणजे वेदप्रामाण्य नाकारणारे म्हणून, ओळखण्यात येऊ लागले. पण वेदप्रामाण्यावरील श्रद्धा ही एक बाब वगळली तर वैदिक आणि अवैदिक संप्रदायांच्या सिद्धान्तांत आणि साधनेत खूपच साम्य आहे असे आढळून येईल.[३] आणखी एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. वैदिक संप्रदायाचे खास धार्मिक साहित्य म्हणजे वेद ( उपनिषदे धरून ), स्मृती, धर्मसूत्रे, इ. ह्यात मांडण्यात आलेल्या सिद्धान्तांचा आणि मूळच्या अवैदिक पण पुढे वैदिक बनलेल्या संप्रदायांच्या सिद्धान्तांचा सुसंगत समन्वय करण्याचा प्रयत्न शक्य झाला ह्याचे एक महत्त्वाचे कारण असे की वैदिक संप्रदायाने इतर संप्रदायांच्या काही सिद्धान्तांचा स्वीकार केला होता. मूळचा वैदिक संप्रदाय आणि इतर संप्रदाय ह्यांच्या-मध्ये आदानप्रदान संहिता-काळापासूनच सुरू होते आणि इतर संप्रदायांतील संकल्पना, सिद्धान्त, मूल्ये इ. खास वैदिक साहित्यात प्रविष्ट झाली.[४]

तेव्हा आर्यधर्मात ‘ अमुक एकाच ग्रंथाची महती आहे असे नाही ’ हे रानड्यांचे म्हणणे खरे आहे. ह्या संदर्भात आणखी एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. मूळचे अवैदिक असलेले पण नंतर वैदिक परंपरेत सामील झालेले संप्रदाय वेदांच्या शिकवणीचा आणि आपल्या विशिष्ट धर्मग्रंथांच्या शिकवणीचा समन्वय साधण्याचा प्रयत्न करतात हे आपण पाहिले. ह्या समन्वयाचे स्वरूप ध्यानात घेणे आवश्यक आहे. वैदिक परंपरेत वेदवचनांचा पद्धतशीरपणे अर्थ लावणारे शास्त्र म्हणजे मीमांसाशास्त्र होय. वेदांतील वाक्यांचा अर्थ लावताना मीमांसेने स्वीकारलेले एक मूलभूत तत्त्व असे की कोणत्याही वेदवाक्याचे प्रयोजन अमुक एक विशिष्ट कृत्य कर किंवा करू नको, असे सांगण्याचे असते. म्हणजे वेदवाक्य हे नेहमी आज्ञार्थपर, आदेशपर असते. ह्याचे एक नेहमीचे उदाहरण म्हणजे ‘ स्वर्गकामो यजेत ’; ज्याला स्वर्ग हवा आहे त्याने यज्ञ करावा. जगाचे स्वरूप कसे आहे, इतिहासात काय घडले आहे, पुढे काय घडेल, कोण कधी कसा वागला ह्याची माहिती करून देणे हे वेदांचे प्रयोजन नाही. आता अशा व्यक्तींचे वर्णन करणारी, घटनांचे कथन करणारी, ‘ भूतार्थपर ’ वाक्ये वेदांत आढळतात ह्यात शंका नाही. पण केवळ निवेदन करणे हे त्यांचे खरे कार्य नसते. अशी वाक्ये जे सांगतात ते कोणत्यातरी कृत्याच्या संदर्भात सांगत असतात. अशा वाक्यांच्या मागे ‘ अमुक कर्म करा ’ ( विधि ) किंवा ‘अमुक कर्म करू नका’ ( निषेध ) असे सांगणारे वैदिक वाक्य असते. ह्याचे परिचित उदाहरण असे : ‘ तो ( रुद्र ) रडला, त्याचे अश्रू रुपे बनले ’ अशा

आशयाची वाक्ये कृष्ण-यजुर्वेदात आढळतात. ह्या घटना घडल्या हे सांगणे हे ह्या वाक्यांचे प्रयोजन नाही. तर रुपे हे अश्रू व म्हणून अशुभ, अमंगल आहे, म्हणून ते दक्षिणा म्हणून देऊ नये असा निषेध करणे हे त्यांचे प्रयोजन आहे.

म्हणजे मीमांसेच्या मताप्रमाणे वेदांत दोन प्रकारची वाक्ये आहेत. १) आज्ञार्थी किंवा विध्यर्थी, विधिनिषेधपर वाक्ये. काय करावे आणि काय करू नये हे ही वाक्ये सांगतात. ती प्रमाण आहेत. हे आदेश आणि निषेध पाळल्याने आपले हित होते, न पाळल्याने अहित होते. २) दुसऱ्या प्रकारची वाक्ये म्हणजे जगात काय आहे, काय घडले इ. सांगणारी किंवा कशाची तरी निंदा, स्तुती करणारी वाक्ये. ह्यांना 'अर्थवाद' म्हणतात. ही वाक्येसुद्धा प्रमाण असतात. पण ती जे सांगतात ते शब्दशः सत्य असते ह्या अर्थाने ती प्रमाण नसतात. काही सत्य सांगणे हे त्यांचे प्रयोजन नसतेच. तर जी (हितकर) कृत्ये करावी, किंवा (अहितकर) कृत्ये करू नये असे विधिनिषेधपर वाक्यांनी सांगितलेले असते त्यांची प्रशंसा किंवा निंदा करून ती करायला किंवा टाळायला लोकांना प्रवृत्त करणे हे त्यांचे प्रयोजन, कार्य असते.

ह्या मीमांसाप्रणीत दृष्टिकोणाप्रमाणे कर्मकांड प्रकाशित करणे हे श्रुतींचे एकमेव प्रयोजन ठरते. काही कृत्ये करणे आपल्या हिताचे असते हे आपल्या अनुभवाच्या आणि अनुभवावर आधारलेल्या अनुमानांच्या आधारे आपल्याला कळून येते. उदा., शेती कशी केली असता भरघोस पीक येते, किंवा अमुक आजार अमुक औषधाने बरा होतो हे आपल्याला अनुभवाने आणि तर्काने कळते. तेव्हा अमुक पद्धतीने शेती करा किंवा अमक्या आजारावर अमुक औषध घ्या हे सांगण्यासाठी श्रुती आवश्यक नाही. पण अमुक पद्धतीने यज्ञ केला असता माणसाला स्वर्ग मिळतो किंवा विपुल धनधान्य मिळते हे अनुभवाच्या आधारे माणसांना कळू शकत नाही. हे ज्ञान वेदांत प्रकट झाले आहे म्हणूनच माणसाला ते प्राप्त होऊ शकते आणि मग ती विशिष्ट कर्मे करायला तो प्रवृत्त होतो. प्रत्यक्ष आणि अनुमान ह्यांनी ज्या हितकर कर्मांचे ज्ञान होऊ शकत नाही त्यांचे ज्ञान माणसाला उपलब्ध करून देणे हे श्रुतीचे एकमेव उद्दिष्ट आहे; सृष्टीचे, माणसाचे स्वरूप काय आहे ह्याविषयीचे ज्ञान माणसाला प्राप्त करून देणे हे तिचे प्रयोजन नाही अशी मीमांसेची भूमिका आहे.

अनेक वैदिक तत्त्ववेत्त्यांनी ही भूमिका नाकारली. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे श्रुतीचे प्रयोजन दुहेरी आहे. कर्मकांड प्रकट करणे हे श्रुतीचे प्रयोजन आहे हे ते नाकारीत नाहीत. हे श्रुतीचे प्रयोजन आहेच पण शिवाय ह्या विश्वात ज्या अंतिम तत्त्वाचा (ब्रह्म) आविष्कार झाला आहे त्याचे ज्ञान करून देणे तसेच विश्वातील हे अंतिम तत्त्व, आणि माणसाच्या समग्र व्यक्तित्वात ज्याचा आविष्कार झालेला असतो ते त्याचे आत्मतत्त्व ह्यांच्यातील परस्परसंबंध स्पष्ट करणे आणि ह्या विश्वतत्त्वाशी एकरूप होण्यात माणसाचे परमकल्याण असते हे माणसाच्या ध्यानात आणून देणे हेही श्रुतीचे प्रयोजन आहे अशी भूमिका ते स्वीकारतात. श्रुतींचा उपनिषदे हा जो भाग आहे त्याचे मुख्यतः हे दुसरे प्रयोजन आहे. ह्या दृष्टीने वेदांकडे पाहिले असता त्यांचे दोन भाग पडतात. एक भाग म्हणजे कर्मकाण्ड. ह्याच्यात यज्ञयागादी, माणसांना स्वर्ग इ. इष्ट फळे प्राप्त करून देणाऱ्या कर्मांचे ज्ञान प्रकट झालेले आहे. दुसरा भाग म्हणजे ज्ञानकाण्ड. ह्याचे प्रयोजन म्हणजे ब्रह्म, जीवात्मा, त्यांचा परस्परसंबंध, माणसाचे परमश्रेय (मोक्ष) ह्याचे ज्ञान प्रकट करणे. हे ज्ञानही प्रकट व्हावे लागते. कारण, ह्या दृश्य विश्वात एका अंतिम तत्त्वाचा आविष्कार झाला आहे का, असल्यास त्याचे स्वरूप काय आहे, माणसाचा अमर असा आत्मा आहे का, इत्यादी प्रश्नांविषयीचे निर्णायक ज्ञान माणसाला केवळ इंद्रियानुभव आणि अनुमान ह्यांच्या साहाय्याने होऊ शकणार नाही. वेदांत प्रकट झाले आहे म्हणूनच माणसाला ते प्राप्त होऊ शकते आणि त्याच्या आधारे माणूस आपले परमश्रेय साध्य करू शकतो.

हा दृष्टिकोण रूढ झाला. वेदांचे कर्मकांड ( संहिता व ब्राह्मण ) आणि ज्ञानकाण्ड ( उपनिषदे ) असे दोन भाग मानण्यात येऊ लागले. वेदांच्या केवळ कर्मकाण्डात्मक भागाच्या अर्थाचे विवेचन करणे हे

मीमांसेचे कार्य ठरले व मीमांसा ही ( केवळ ) पूर्वमीमांसा बनली. ज्ञानकाण्डाचा अर्थ विशद करणारे दुसरे शास्त्र, उत्तरमीमांसा किंवा वेदान्त म्हणून उदयाला येऊन स्थिर झाले. ह्यातून दुसरी एक गोष्ट झाली. कर्मकाण्ड, म्हणजे वेदांचाच, कोणती कर्मे करावी हे विशद करणारा भाग, ज्ञानकाण्डाच्या तुलनेने गौण ठरला. त्याचे प्रामाण्य नाकारण्यात आले नाही. पण माणसाचे सर्वोच्च श्रेय कसे प्राप्त करून घ्यावे ह्याचे ज्ञान कर्मकाण्डापासून मिळत नाही, त्यासाठी ज्ञानकाण्डाचा आधार घ्यावा लागतो ही दृष्टी स्थिर झाली. कर्मकाण्ड मागे पडले.

ज्ञानकाण्ड म्हणजे उपनिषदे. सांख्य-योग हे संप्रदाय, तसेच आगमांवर आधारलेले शैव, वैष्णव इ. संप्रदाय हे प्रारंभी अवैदिक होते; पण नंतर वेदप्रामाण्याचा स्वीकार करून ते वैदिक बनले हे आपण पाहिले. सांख्य-योग आपले सिद्धान्त अनुभव आणि अनुमान ह्यांच्या आधारे सिद्ध करतात. शैव आणि वैष्णव ह्यांचे सिद्धान्त मूलत: त्यांच्या आगमांवर आधारलेले आहेत. पण वेदांमध्येही हे सिद्धान्त प्रकट झाले आहेत असे दाखवून देणे त्यांना भाग असते कारण नाही तर त्यांनी स्वीकारलेले वेदप्रामाण्य शुष्क, फोल आहे, त्यातून काही निष्पन्न होत नाही, त्याला काही आशय नाही असे होईल. आणि ही गोष्ट ते समर्थपणे करू शकतात, आपले सिद्धान्त उपनिषदांद्वाराही प्रकट झाले आहेत असे साधार दाखवून देऊ शकतात कारण हे सिद्धान्त खरोखरच उपनिषदांत अंतर्भूत झालेले दिसून येतात. ह्याचा अर्थ असा की जी मूळची वैदिक जमात किंवा वैदिक संप्रदाय होता त्याची दृष्टी प्रथमपासूनच स्वागतशील, संग्राहक, समन्वयात्मक अशी होती. आपल्याहून भिन्न असलेल्या परंपरांत जी मते, उपासनापद्धती, साधना इ. विकसित झाल्या होत्या त्यांना आदराने सामावून घेण्याची त्यांची वृत्ती होती.[४]

ज्या ज्ञानाच्या प्रकाशात माणूस जगतो, ज्याच्यामुळे जीवनातील सर्वश्रेष्ठ साध्य काय आहे आणि ते कसे गाठावे हे त्याला कळते ते ज्ञान वेदांमध्येही प्रकट झाले आहे आणि आगमांपासूनही लाभते असे जर असेल तर ह्या ज्ञानाच्या संदर्भात वेद आणि आगम हे दोन भिन्न भूमिका वठवितात, ह्या ज्ञानाला वेगवेगळया प्रकारे योगदान करतात असे मानावे लागते. आगम हे केवळ वेदांचा अनुवाद करतात असे असेल तर त्यांना काही प्रयोजन उरणार नाही. तेव्हा वेदांत ज्या सत्याचा आराखडा प्रकट झाला आहे ते तपशिलवारपणे, समृद्धपणे आगमांत सांगितलेले असते असे मानावे लागते हे आपण पाहिलेच आहे. ह्या-शिवाय एक गोष्ट ध्यानात घेणे आवश्यक आहे. वैदिक परंपरेप्रमाणे समाज चार वर्णांचा बनलेला आहे. पण वेदांचा 'अधिकार' फक्त वरच्या तीन वर्णांना– ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांना–आहे, शूद्रांना नाही. म्हणजे वेदांपासून उपलब्ध होणारे ज्ञान शूद्रांसाठी नाही. उलट आगम, किंवा सांख्य-योग हे सर्वांसाठी आहेत. ह्या दोन्ही दृष्टींनी पाहता, वेद पूर्णपणे प्रमाण आहेत असे मानूनही, आगम वेदांपेक्षा श्रेष्ठ आहेत असे ठरते. अर्थात् श्रद्धावान माणसे ह्या दोहोंत कोण श्रेष्ठ आहे, कोण कनिष्ठ आहे हा प्रश्न धसाला लावणार नाहीत. व्यवहारात, आगम आणि भगवद्गीता यांच्यासारख्या 'पौरुषेय' ग्रंथांचा आश्रय ते वेदांपेक्षा कितीतरी अधिक घेतील. उपनिषदांचे सार भगवद्गीतेत आले आहे तेव्हा केवळ भगवद्गीतेच्या शिकवणीवर संपूर्ण जीवनमार्ग आधारता येतो असे त्यांना मानता येईल. पुढे भगवद्गीतेचे सार ज्ञानेश्वरीत आले आहे, वेदांचे सार सांगणाऱ्या भागवताचे सार तुकारामात आहे अशी धारणा होऊ शकेल. म्हणजे व्यवहारात वेदोप-निषदे मागे पडतील; त्यांची जागा घेणारे भगवद्गीता, भागवत ह्यांसारखे ग्रंथही मागे पडतील. जे मागे पडले आहे ते अप्रमाण, अपुरे ठरले आहे आणि म्हणून ते मागे टाकले पाहिजे असे सामान्यपणे कुणी म्हणणार नाही. अखेरीस ज्ञानेश्वर-तुकाराम ह्यांच्यापर्यंतच्या (आणि पुढच्याही) परंपरेचा अंतिम आधार काय हा प्रश्न उपस्थित झाला तर वेद हाच त्यांचा आधार आहे असेच औपचारिक आणि पूर्णपणे प्रामाणिक असे उत्तर राहील. वेदांच्या शिकवणीत जे गर्भित आहे तेच आगमांत आणि इतर ग्रंथांत स्पष्टपणे मांडण्यात आले आहे आणि त्याचाच विकास नंतरच्या अधिकारी पुरुषांनी आपले मनन-चिंतन, अनुभव आणि साधना ह्यांच्या बळावर केला आहे, हे ज्ञान त्यांनी ज्या ग्रंथांतून मांडले आहे ते आपल्या दृष्टीने अधिक उपयुक्त आहेत अशी धारणा होऊ शकेल.

हा विकास हे आर्यधर्माचे तिसरे वैशिष्टच आहे असे रानडे म्हणतात. "आर्यधर्माचे तिसरे लक्षण हे कीं, हा इतर धर्मांप्रमाणे स्थायिक नसून याला वाढ आहे... याची पूर्वरूपें पुष्कळ झालीं व उत्तररूपें व्हावयाचीं आहेत. याला अनंतकालपर्यंत वाढ आहे. तिला अवधि नाही. यांत नवे संप्रदाय, नवीन रूपांतरें, नवीन मिश्रण होत जाणार आहे. याला ऐतिहासिक रूप नाही म्हटलें म्हणजे वेदादि ग्रंथ तुमच्यांत नाहींत व असल्यास ते तुम्हांस पूज्य नाहींत काय, असा प्रश्न निघतो. होय. तीं धर्मपुस्तकें खरीं व तीं मान्यही आहेत; परंतु प्रथम वेदांचे बंधन होतें. तरी तितक्याने समाधान होईना, तेव्हां उपनिषद्रूप आवरण झालें. पुढें पुराणें झालीं. परंतु त्यांतील बाष्कळपणा न रुचल्यामुळे साधु पुरुषांनीं भक्तिमार्ग, वारकरी पंथ वगैरे स्थापित केले. अशीं अनेक रूपांतरें होत होत स्तिमितपणा, तटस्थपणा, जरा (म्हातारपण) ही अनुभवीत असतांहीं एखादा खच्ची केलेला उंट वाढतो त्याप्रमाणे आपण येथवर आलों आहों; तरीही वाढ चालूच आहे." पृ. ८४–८५)

रानड्यांच्या म्हणण्याप्रमाणे "आर्यधर्माचे चौथे लक्षण हें की ह्या वाढीला एक विशेष दिशा आहे व ती प्रेमाची आहे... दोन हजार वर्षांमागें अग्निहोत्रादि यज्ञासाठी पशुवध होत असत; परंतु प्रेमभावाचे आधिक्य होऊन ती चाल लोकांनी सोडून दिली. प्रेमबंधन वाढावे, मनाला दुःख होऊ नये, हीच सार्वत्रिक प्रवृत्ति. जो मनुष्य सदाचरणानें वागतो त्यास देव पावतो, असें सेंट पॉलनेंहीं म्हटले आहे. परंतु मनुष्याच्या उद्धाराच्या संबंधानें आर्यधर्मांत उदार कल्पना आहेत, तशा इतर कोठें नाहीत. जातिबंधन वगैरे निर्बंध व अडचणीचे प्रकार असतां प्रेमाची वाढ आहे, अधिकार वाढत आहे, व वाढीचा व्याप होत आहे. कर्मठपणा व जातिनिर्बंध असतां ही स्थिति व परस्परांविषयीं वैमनस्य नाहींसे व्हावें हीच इच्छा; तर मग तीं शिथिल होतील तेव्हा काय प्रकार होईल कोण जाणे. छाप मारून दुसरा छाप धर्माच्या बाबतींत उठवूं म्हटल्यास जमत नाहीं. परमेश्वराच्या पायांपासून वाहात आलेल्या ह्या धर्मगंगेचा ओघ प्रेमाचा असून त्यानें प्रफुल्लित झालेल्या ज्ञानावरील भागवतधर्म हें अत्यंत सुवासिक फूल व मधुर फल आहे, असें आपणांस दिसून येईल. व बारकाईनें विचार करून पाहणारास प्रार्थनासमाजाचें व भागवतधर्माचें लक्षणांच्या संबंधाने साहचर्य अत्यंत आहे, हें, त्यांतील सभासदांचे पोषाक, बसणें उठणें कसेंही असलें तरी सहज समजेल. ... कोणी म्हणेल तुमच्या ह्या धर्माच्या आज्ञा किती व कोणत्या आहेत, तें सांगा. त्यास आमचे उत्तर हेंच की आमच्या धर्माच्या आज्ञा आठ आहेत, किंवा दाहा आहेत, असे नाहीं. सर्व मानवबंधूंशीं प्रेमानें वागावें, हीच त्यांतील मुख्य आज्ञा." (पृ. ८५–८६)

ह्या उताऱ्याची दोन वैशिष्टचे लक्षणीय आहेत. आर्यधर्माचा विकास अधिकाधिक विशुद्ध आणि सार्वत्रिक **प्रेमाच्या** दिशेने होत आला आहे असे रानडे म्हणतात. भारतीय परंपरेतील शब्द त्यांनी वापरले असते तर 'आत्मौपम्यबुद्धि', 'सर्वभूतहितरति' किंवा 'करुणा' असे शब्द आले असते ( 'अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।'). 'प्रेम' हा शब्द ते वापरतात हा उघड उघड ख्रिस्ती प्रभाव आहे. पण 'छाप मारून दुसरा छाप धर्माच्या बाबतीत उठवू म्हटल्यास जमत नाही' असेही ते म्हणतात. ह्याचा अर्थ सरळ आहे. ज्या दीर्घ, स्वतःचे सतत उन्नयन करू पाहणाऱ्या धार्मिक परंपरेने आपल्याला घडविलेले असते तिच्यातील वैगुण्ये पाहून तिचा आपण एकाएकी त्याग केला आणि दुसऱ्या, अधिक उन्नत व शुद्ध भासणाऱ्या परंपरेचा स्वीकार केला तर त्याने काही साधत नाही; आपण केवळ एक बाह्य छाप स्वतःवर उमटवून घेतला एवढेच होईल. ख्रिस्ती प्रेमाच्या संकल्पनेतील आणि ह्या प्रेमाचा आविष्कार ज्याच्यात झाला आहे अशा जीवनातील उदात्ततेचा स्पर्श आपल्याला झाला तर तो चैतन्यदायी स्पर्श आहे असेच मानले पाहिजे. ह्या मूल्याचा स्वीकार करून ते आत्मसात् करण्याचा प्रयत्न जरूर केला पाहिजे. पण 'धर्मांतर' करून ख्रिस्ती बनणे हा हे साधण्याचा मार्ग नव्हे. असे करणे म्हणजे केवळ 'ख्रिस्ती' हा छाप स्वतःवर मारून घेण्यासारखे आहे. आपल्या विकसनशील धार्मिक परंपरेत ह्या नवीन मूल्याला अनुकूल असलेली जी मूल्ये स्थिरावलेली असतील त्यांच्या भूमीत नवीन मूल्य रुजविणे हा खरा मार्ग आहे. विविध धार्मिक परंपरांत देवाण-घेवाण होत राहणे, त्यांच्यांत संवाद होत राहणे, इष्ट आहे. पण एका परंपरेचा

उच्छेद करून तिची जागा घेण्याचा प्रयत्न दुसऱ्या परंपरेने करता कामा नये. मानवी बंधुभाव पाळणारा; भक्तिमार्गी एकेश्वरवाद हा विश्वधर्म आहे अशी रानड्यांची धारणा आहे. पण आज ज्या धार्मिक परंपरा नांदत आहेत त्यांना नाकारून त्यांच्या जागी हा धर्म प्रस्थापित केला पाहिजे अशी त्यांची भूमिका नव्हती. कोणतीही परंपरा स्वतःमध्ये अंतर्भूत असलेल्या प्रेरणेला अनुसरून जेव्हा स्वतःच्या परिपूर्ण, शुद्धतम स्वरूपात परिणत होईल तेव्हा तिने विश्वधर्माचें स्वरूप धारण केलेले असेल. प्रत्येक परंपरा ही परमेश्वराच्या पायापासून वाहात आलेली गंगा आहे; ती विश्वधर्माच्या सागरात विलीन होणार आहे.

तेव्हा रानड्यांच्या म्हणण्याप्रमाणे प्रार्थनासमाज म्हणजे आर्यधर्माच्या परंपरेने जे भागवतधर्माचे रूप धारण केले होते त्याचेच अधिक विकसित स्वरूप होय. ह्या परंपरेलाच आधारभूत असलेल्या तिच्या गाभ्यात समाविष्ट असलेल्या संकल्पना म्हणजे ईश्वर सर्वांचा पिता आहे, सर्व माणसे एकमेकांची भावंडे आहेत आणि ईश्वराची भक्ती करण्यात आणि सर्वांवर प्रेम करण्यात माणसाचे कल्याण असते, त्याच्या जीवनाचे खरे सार्थक असते ह्या संकल्पना होत. प्रार्थनासमाज हे जरी भागवत-धर्माचेच अधिक परिणत स्वरूप असले तरी त्यांच्यांत महत्त्वाचे भेदही आहेत. एक भेद असा की भागवत-धर्म वेदप्रामाण्य मानतो. प्रार्थनासमाज कोणत्याच विशिष्ट धर्मग्रंथाचे प्रामाण्य मानीत नाही. रानड्यांनी म्हटल्याप्रमाणे, "आमच्या प्रार्थना-समाजाचा विशेष गुण हाच आहे कीं, सर्व धर्मगुरु, सर्व धर्मपुस्तकें आम्हांस पूज्य आहेत, व सर्वांत जें चांगलें असेल तें ग्राह्य करण्यास आमची हरकत नाही." (पृ. ८४) ह्यात असे अभिप्रेत आहे की एका विशिष्ट धर्मग्रंथावर आपले सिद्धान्त आणि मूल्ये आधारण्याचे बंधन प्रार्थनासमाजावर नाही. दुसरा भेद असा की भागवतपंथाने चातुर्वर्ण्य स्वीकारले होते. प्रार्थनासमाजाच्या दृष्टीने सर्व माणसांवर आपले बांधव म्हणून प्रेम करावे ही जी प्रमुख धर्माज्ञा आहे तिचे पालन करण्यात चातुर्वर्ण्यामुळे अडथळा निर्माण होतो. चातुर्वर्ण्य धर्माज्ञेशी विसंगत आहे व म्हणून त्याज्य आहे.

हिंदू धार्मिक परंपरेची रानड्यांनी तपशिलवारपणे जी चिकित्सा व मूल्यमापन केले आहे त्याची माहिती करून घेण्यासाठी त्यांनी भागवत-धर्मावर जी व्याख्याने दिली त्यांच्याकडे वळावे लागेल (पृ. १ ते ७९). पहिला मुद्दा ते मांडतात तो हा की प्रत्येक जिवंत परंपरेचे सतत अंतर्गत मूल्यमापन होत राहणे इष्ट असते. ज्या ऋषींनी, आचार्यांनी, साधुसंतांनी एखादी धार्मिक परंपरा स्थापन करून तिला चालना दिलेली असते ते, रानडे म्हणतात "कसेही थोर पुरुष असले, तरी ते सर्वप्रकारें स्वतः सिद्ध नसतात. ज्या काळांत त्यांचा जन्म होतो त्या वेळच्या आचारविचारांचा त्यांजवर परिणाम सहजीं घडतो. ते जरी सामर्थ्यानें व बुद्धिप्रभावानें इतर लोकांहून श्रेष्ठ असतात, तरी ज्याप्रमाणें पाण्याच्या प्रवाहाच्या उलट दिशेस जाणें कठीण असतें, त्याचप्रमाणें कालरूपी प्रवाहाच्या सर्वथा विरुद्ध जाणें फारच दुरापास्त आहे. ह्या गोष्टीची सत्यता येशू ख्रिस्त, महंमद, तुकाराम आदिकरून साधुपुरुषांची चरित्रें पाहिलीं असतां चांगली कळून येईल. त्यांच्या ग्रंथांत त्या काळच्या आचारविचारांची पुष्कळ झांक असली तरी त्या योगाने त्यांतील आध्यात्मिक संबंधाच्या ज्या विशेष उक्ति असतात त्यांची किंमत मुळीच कमी होत नाहीं. तसेच, ते थोर पुरुष व आपण सर्व उदकाच्या प्रवाहाप्रमाणे एकसारख्या चालत आलेल्या कालप्रवाहाचे व कर्मपरंपरेचे परिणाम आहोंत; त्यामुळें त्यांचा व आपणा सर्वांचा निकट संबंध आहे, हे लक्षांत ठेवून, त्यांच्या ग्रंथांत त्या वेळचीं कांहीं मतें आढळलीं, तरी त्यांतील विशेष गुणदर्शक शुद्ध, सरळ व सुविचाराचा जो भाग असेल त्याची योग्यता कमी न मानता तो प्रांजल बुद्धीने स्वीकारण्यास आपण तयार असावे, हेंच आपणां सर्वांस उचित होय." (पृ. ३–४) ह्या चिकित्सक परीक्षणाच्या व्याप्तीतून येशू, महंमद यांसारखे धर्मसंस्थापकही रानड्यांनी वगळलेले नाहीत हे ध्यानात घेण्यासारखे आहे.

भारतीय धार्मिक परंपरेचे असे चिकित्सक परीक्षण, ह्या परंपरेत मोक्षप्राप्तीचे जे भिन्न मार्ग विकसित झाले आहेत त्यांच्या विवेचनाद्वारे रानडे करतात. हे रूढ मार्ग म्हणजे योग, ज्ञानमार्ग, कर्ममार्ग आणि भक्तिमार्ग. योगमार्गाचा सर्वसाधारण परिचय आपल्याला असतो. ध्यानधारणा करून चित्त पूर्ण-पणे शुद्ध केले असता त्यात आत्मज्ञान स्फुरते आणि आत्मज्ञान प्राप्त होण्याची अवस्था म्हणजे मोक्षप्राप्ती

होय असे योगमार्गाचे सार आहे. हा मार्ग जीवात्म्याचे स्वरूप आणि विश्वाशी त्याचा असलेला संबंध ह्याविषयीच्या एका दर्शनावर आधारलेला आहे. ह्या दर्शनाचे थोडे विवरण करणे इष्ट ठरेल.

हे दर्शन म्हणजे सांख्य दर्शन होय. ह्या दर्शनाप्रमाणे ह्या विश्वात जे सर्व काही आहे त्याचे दोन प्रकार पडतात. एक प्रकार म्हणजे पुरुष. पुरुषाला जाणीव असते, तो चिन्मय असतो असे त्याचे संपूर्ण स्वरूप असते. पुरुष म्हणजे ज्याला जाणीव आहे असा धर्मी, अशी गोष्ट. ह्याशिवाय इतर कोणतेही लक्षण किंवा वैशिष्टय पुरुषाच्या ठिकाणी नसते. म्हणजे पुरुष स्वतः 'शुद्ध' असतो. शुद्ध जाणीव हे त्याचे संपूर्ण स्वरूप असते. अस्तित्वाचा दुसरा प्रकार म्हणजे प्रकृती. जाणिवेचा जो काही विषय असतो किंवा असू शकतो, ज्या कशाची पुरुषाला जाणीव असते ते सर्व प्रकृतीमध्ये अंतर्भूत असते. जाणिवेच्या विषयांचा संपूर्ण समूह म्हणजे प्रकृती. घट, पट, डोंगर इ. भौतिक वस्तूंची आपल्याला जाणीव असते–ते आपण पाहू, स्पर्शू, इ. शकतो– म्हणून भौतिक वस्तू प्रकृतीत समाविष्ट असतात. पण आपले विचार, इच्छा, भावना इ. मानसिक घटना ( किंवा घटिते ) घेतली तर त्यांचीसुद्धा आपल्याला जाणीव असते. तेव्हा आपले मन किंवा चित्त हे सुद्धा प्रकृतीत अंतर्भूत असते. सर्व भौतिक वस्तू, प्राणिमात्रांची शरीरे, मने, मानसिक घटना ह्यांची मिळून प्रकृती बनलेली असते.

पुरुष आणि प्रकृती ह्यांच्यांत केवळ भेदच नव्हे तर विरोधही असतो. प्रकृतीतील सर्व वस्तू, तिच्यातील मने धरून, जड, अचेतन असतात. फक्त पुरुष चेतन, चिन्मय असतो. सांख्य मताप्रमाणे अनेक ( असंख्य ) पुरुष आहेत. प्रत्येक पुरुष हा प्रकृतीत उदयाला आलेला कोणतातरी एक देह आणि त्याच्याशी संलग्न असलेले मन हे आपले आहे असे मानतो; हे देह-मन म्हणजे आपणच असे मानतो. हे अर्थात् अज्ञान ( किंवा अविद्या ) आहे. वास्तविक पुरुष केवळ चित्स्वरूप आहे, देह-मन हा प्रकृतीचा घटक असल्यामुळे अचेतन, जड आहे, पुरुष आणि देह-मन एकमेकांपासून पूर्णपणे भिन्न आहेत, असे असूनही एक विशिष्ट देह-मन म्हणजे आपणच असे पुरुष अज्ञानाने मानतो. ह्यामुळे शुद्ध जाणीव ह्या निर्लेप स्वरूपाचा पुरुष 'संसारी' बनतो.

त्याची कथा अशी : प्रकृती तीन प्रकारच्या गुणांची बनलेली आहे. गुण म्हणजे प्रकृतीचे अंतिम घटक. गुण म्हणजे अत्यंत सूक्ष्म असे पदार्थ होत. हे सत्त्व, रजस् व तमस् अशा तीन प्रकारचे असतात. प्रकृतीतील सर्व वस्तू– भौतिक वस्तू आणि मने– ह्या तीन प्रकारच्या गुणांच्या बनलेल्या असतात. प्रत्येक प्रकारचा गुण स्वतःचा एका विशिष्ट प्रकारे आविष्कार करतो. ज्या गुणांची मिळून एखादी वस्तू बनलेली असते त्यांच्या आविष्कारांच्या गोळाबेरजेतून त्या वस्तूचे स्वरूप सिद्ध होते. रजोगुणांचा आविष्कार गतीमध्ये होतो. जे, जे गतिमान असते, बदलत असते, स्थित्यंतर पावत असते ते त्याच्यात असलेल्या रजोगुणांमुळे तसे असते. पुरुषाच्या जाणिवेला (स्वाभाविकपणे) प्रकाशाची उपमा देण्यात येते. तमोगुण हे त्यांच्या नावाप्रमाणे काळोखी असतात; पुरुषाच्या प्रकाशाला विरोध करणारे असे ते असतात. ते रजोगुणालाही विरोध करतात. रजोगुणांमुळे गतीची जी प्रेरणा निर्माण होते तिला तमोगुण अटकाव करतात. घट-पटांसारख्या भौतिक वस्तू प्रामुख्याने तमोगुणांच्या बनलेल्या असतात. अर्थात् त्या बदलत असल्यामुळे त्यांच्यात रजोगुणही काही प्रमाणात असतात. तमोगुण हे पुरुषाच्या प्रकाशाच्या ( जाणिवेच्या ) विरोधी असतात ह्यामुळे प्रामुख्याने तमोगुणांच्या बनलेल्या भौतिक वस्तूंची साक्षात् जाणीव होऊ शकत नाही. काळोखाने माखलेली वस्तू जशी आपल्याला दिसू शकत नाही त्याप्रमाणे प्रामुख्याने तमोगुणांची बनलेली भौतिक वस्तू ज्ञानाचा साक्षात् विषय होऊ शकत नाही.

मग भौतिक वस्तूंचे ज्ञान आपल्याला कसे होऊ शकते ? प्रकृतीतील तिसऱ्या प्रकारचे गुण म्हणजे सत्त्वगुण. तमोगुण हे पुरुषाच्या प्रकाशाच्या विरोधी असतात तर सत्त्वगुण पुरुषाच्या प्रकाशाला अनुकूल असतात; पुरुषाच्या प्रकाशाने उजळून निघण्याची, उज्ज्वल बनण्याची क्षमता त्यांच्या ठिकाणी असते. भौतिक वस्तू ज्याप्रमाणे प्रामुख्याने तमोगुणांच्या बनलेल्या असतात त्याप्रमाणे मने

(चित्त) आणि मानसिक घटना ह्या प्राधान्याने सत्त्वगुणांच्या बनलेल्या असतात. ह्यामुळे मानसिक घटना पुरुषाच्या प्रकाशाने उजळू शकतात. अशा उज्ज्वल झालेल्या, प्रकाशित झालेल्या मानसिक अवस्था म्हणजे जाणिवेची वेगवेगळी रूपे होत. समजा मी एक फूल पहातो, ते मला आवडते, ते खुडण्याची इच्छा मला होते. हा माझा जो अनुभव आहे, जाणिवेचे हे जे रूप आहे त्याचे विश्लेषण सांख्यमताप्रमाणे कसे होईल ? फूल ही भौतिक, प्राधान्याने तामसिक असलेली वस्तू आहे. ती ज्ञानाचा साक्षात् विषय होऊ शकत नाही. पण माझे चित्त प्रामुख्याने सत्त्वगुणांचे बनलेले असते. आता सत्त्वगुणांमध्ये पुरुषाच्या प्रकाशाने उजळण्याची जशी क्षमता असते तशी भिन्न रूपे, आकार धारण करण्याचीही क्षमता असते. तमोगुण हे रजोगुणांपासून निष्पन्न होणाऱ्या गतीला अवरोध करणारे असतात तर सत्त्वगुण ह्या गतीला वाव देणारे, तिच्यापुढे लवणारे ('लघु') असतात. ह्यामुळे प्रामुख्याने सत्त्वगुणांची बनलेली जी वस्तू असते, म्हणजे चित्त, तिच्या अंगी नाना रूपे धारण करण्याची क्षमता असते. ह्यामुळे माझे चित्त फुलाचा आकार धारण करू शकते. फुलाचा आकार धारण करणारी ही जी चित्तवृत्ती आहे ती प्रामुख्याने सत्त्वगुणांची बनलेली असल्यामुळे पुरुषाच्या प्रकाशाने उजळू शकते. ही उजळलेली चित्तवृत्ती म्हणजे फुलाचे दर्शन किंवा प्रत्यक्षज्ञान. फुलाचे प्रत्यक्षज्ञान हे जाणिवेचे रूप आहे. चित्ताने धारण केलेला फुलाचा आकार हे प्रकृतीमध्ये उदयाला आलेले एक रूप, गुणांची एक रचना आहे. म्हणून ते जड आहे; तो अनुभव नाही. पण प्राधान्याने सत्त्वगुणांचे बनलेले असल्यामुळे पुरुषाच्या प्रकाशाने उज्ज्वल होते आणि असे उजळलेले हे रूप म्हणजे फुलाच्या दर्शनाचा अनुभव. हा अनुभव सुखद असतो. सुख (किंवा दुःख) ही सुद्धा एक चित्तवृत्ती आहे, ती स्वतः अचेतन, जड आहे, पण पुरुषाच्या प्रकाशाने ती उजळते तेव्हा तो सुखाचा अनुभव बनतो. ह्या अनुभवातून फूल खुडण्याची इच्छा हा अनुभव जन्माला येतो. ह्याचेही असेच विश्लेषण करावे लागेल.

इच्छेतून कर्म जन्माला येते; इच्छेचे साध्य सिद्ध करण्याचा प्रयत्न करणारी कृती. ही कृती चांगली किंवा वाईट असते. सामान्यपणे तिचे स्वरूप मिश्र असते. ती काही प्रमाणात चांगली आणि काही प्रमाणात वाईट अशी असते. अशा कोणत्याही कर्माचा किंवा कृतीचा दुहेरी परिणाम घडून येतो. एक तर ज्या प्रमाणात कृती चांगली असेल त्या प्रमाणात कर्त्याला सुख आणि ज्या प्रमाणात वाईट असेल त्या प्रमाणात दुःख अनिवार्यपणे लाभते. हा प्रसिद्ध कर्मसिद्धान्त होय. कर्मसिद्धान्त हा मूलतः सांख्य-योग (आणि बौद्ध इ.) श्रमणपंथांचा सिद्धान्त आहे. इच्छेचे समाधान करू पाहणाऱ्या कृतीमुळे जो दुसरा परिणाम घडून येतो तो असा की त्या इच्छेचा एक संस्कार कर्त्याच्या मनावर उमटतो. हा संस्कार म्हणजे अनुकूल परिस्थितीत ती इच्छा चित्तात परत जागृत होते आणि स्वतःचे समाधान करायला धडपडू लागते. संस्कार म्हणजे बीजरूप इच्छा, आणि अधिक सामान्यपणे बीजरूप अनुभव होय. इच्छेतून कृती निर्माण होते ह्याचा अर्थ असा की इच्छा काही प्रमाणात तरी राजसिक, जिच्यात रजोगुण आहेत अशी असते.

पुरुष अविद्येमुळे जो स्वतःहून भिन्न आहे आणि स्वतःशी असंबंधित आहे अशा प्रकृतीतील एका देह-चित्तात्मक व्यूहाशी स्वतःचे तादात्म्य मानीत असतो. हा व्यूह म्हणजे आपणच असे मानीत असतो हे आपण पाहिले. हे अज्ञान 'अनादी' असते- म्हणजे त्याला प्रारंभ झालेला नसतो. कालात कितीही मागे गेले तरी एखादा विशिष्ट पुरुष तेव्हा असे तादात्म्य मानीत होता असेच आढळून येईल. देह-चित्तात्मक जो व्यूह असतो त्याचे स्वरूप कसे असते ? देह ही अर्थात् भौतिक वस्तू आहे. चित्ताच्या अंगी ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये असतात. म्हणजे देहाच्या माध्यमातून वस्तू पाहण्याची, ऐकण्याची इ. तसेच विविध कृत्ये करण्याची शक्ती चित्ताच्या ठिकाणी असते, पण ह्याशिवाय चित्त अहंकारयुक्त असते. ह्याचा अर्थ असा : समजा चित्ताने फुलाचा आकार धारण केला आणि पुरुषाच्या प्रकाशाने हा आकार प्रज्वलित झाला की फूल पाहणे हा अनुभव सिद्ध होतो हे आपण पाहिले. आता चित्त अहंकारयुक्त असते. म्हणजे असे की चित्ताने फुलाचा जो आकार धारण केलेला असतो तो ते स्वतःकडे घेते, आपलासा करते, आपली स्थिती हे रूप त्याला देते. ही सबंध अवस्था जेव्हा पुरुषाच्या प्रकाशाने उजळून येते तेव्हा जो अनुभव सिद्ध होतो त्याचे स्वरूप फूल

पाहण्याचा अनुभव एवढेच असत नाही. तर फूल पाहण्याचा माझा अनुभव असे त्याचे स्वरूप होते. इच्छा ही अशीच चित्ताची एक अवस्था आहे. पण अहंकारयुक्त चित्ताची ती अवस्था असल्यामुळे ती जेव्हा अनुभव बनते तेव्हा माझी इच्छा असा तो अनुभव असतो. ह्यातून कृती जन्माला येते. समजा जर चित्त अहंकारयुक्त नसते तर तृप्तीसाठी धडपडणारी एक इच्छा आहे असाच अनुभव आला असता. अशा अनुभवाची परिणती कृतीत झाली नसती. पण चित्त अहंकारयुक्त असल्यामुळे माझी इच्छा असे अनुभवाचे स्वरूप असते आणि त्यातून कृती जन्माला येते. मग कर्मसिद्धान्ताप्रमाणे ती बरीवाईट असेल त्याप्रमाणे सुखदु:खाचा अनुभव येतो, त्यातून सुख चालू राहावे, दु:ख संपुष्टात यावे अशी इच्छा उद्‌भवते, त्यातून कृती घडून येते, मग सुखदु:ख... असे हे रहाटगाडगे चालू राहते. शिवाय प्रत्येक इच्छा आपला संस्कार –बीजरूप इच्छा– चित्तामध्ये ठेवून जाते.

सुखदु:ख, इच्छा, कृती, सुखदु:ख ही विशिष्ट व्यक्तीला येणारी अनुभवांची मालिका अनादी आहे. ही मालिका स्वरूपतः दु:खमय आहे. सुख प्रासंगिक असते, दु:ख स्थायी असते. ह्या दु:खमय मालिकेपासून– संसारापासून– सुटका करून घेणे म्हणजे मोक्ष साधणे. हा मोक्ष पुरुषाने साधायचा आहे; पुरुष हा मुक्त व्हायचा असतो. जे आपण नव्हे ते– प्रकृतीतील एक देह-इन्द्रिय-चित्तरूप रचना– आपणच आहोत असे पुरुष अज्ञानामुळे मानतो व म्हणून आपण सुखी आहोत, दु:खी आहोत, ही आपली इच्छा आहे, ती साधण्यासाठी आपण अमुक कृत्य केले पाहिजे ह्या स्वरूपाचे अनुभव त्याला येतात. आपले स्वत:चे प्रत्यक् स्वरूप काय आहे ह्याचे ज्ञान त्याला झाले की तो जे परके आहे त्याच्याशी तादात्म्य मानणार नाही. तो जसा आहे त्या स्वरूपात– जिला स्वत:चे विषय नाहीत अशी शुद्ध जाणीव ह्या स्वरूपात– तो (स्वस्थ) राहील. प्रकृतीपासून आणि इतर पुरुषांपासून तो स्वरूपतः असंबंधित आहे, आणि शुद्ध, इतर कशाशी असलेल्या किंवा मानलेल्या कोणत्याही संबंधापासून न डागळलेल्या अशा स्वरूपातील त्याचे असणे म्हणजे कैवल्याची अवस्था म्हणजेच मोक्ष. हा मोक्ष स्वत:च्या स्वरूपाच्या सम्यक् ज्ञानामुळे पुरुषाला प्राप्त होतो.

हे ज्ञान पुरुषाला कसे प्राप्त होईल ? पुरुष केवळ शुद्ध जाणिवेने युक्त असतो; ह्या जाणिवेचा स्वत:चा विषय असा नसतो. तेव्हा पुरुषाला स्वत:च्या स्वरूपाची साक्षात जाणीव असू शकत नाही. कारण मग स्वत:चे स्वरूप (किंवा तो स्वत: हा) त्याच्या जाणिवेचा विषय होईल आणि असे असणे अशक्य असते. पण पुरुषाची जाणीव, प्रकाश मानसिक घटितांना उजळून टाकतो आणि त्यांना अनुभव हे स्वरूप देतो ह्याचा अर्थ असा की प्रकाशमय पुरुषाचे प्रतिबिंब चित्तात पडलेले असते; चंद्राचे प्रतिबिंब एखाद्या तळ्यात पडावे आणि त्याने तळ्यातील पाणी उजळून निघावे तसे. पुरुषाचे प्रतिबिंब असे चित्तात पडू शकते कारण चित्त प्रामुख्याने सत्त्वगुणांचे बनलेले असते. पण चित्तात सत्त्वगुणांप्रमाणे तमोगुण आणि रजोगुणही असतात; सामान्यत: चित्त अशुद्ध असते. ह्यामुळे हे प्रतिबिंब काहीसे अस्पष्ट व अंधुक आणि विकृतही असते. (तमोगुण तळ्यातील चिखलासारखे मानावे आणि रजोगुण म्हणजे तळ्यात लहरी निर्माण करणाऱ्या वाऱ्यासारखे असतात असे मानावे.) त्यामुळे हा प्रतिबिंबित पुरुष चंचल– इच्छांच्या अधीन असणारा, कृत्ये करणारा–आणि अंधुक–अज्ञानी–असा भासतो. जर चित्तातून तमोगुण आणि रजोगुण पूर्णपणे निपटून काढण्यात आले तर चित्त केवळ सत्त्वगुणांचे बनलेले असेल, (तळ्यातील पाणी पूर्णपणे स्थिर आणि पारदर्शी बनलेले असेल) आणि त्यात पुरुषाचे पडलेले प्रतिबिंब अविकृत, शुद्ध प्रकाशमय असे असेल; पुरुषाला स्वत:च्या खऱ्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान होईल आणि तो मुक्त होईल. ज्या ज्ञानामुळे मोक्ष मिळतो त्या ज्ञानासाठी चित्त पूर्णपणे शुद्ध होणे आवश्यक आहे.

चित्त पूर्णपणे शुद्ध करणे हे योगमार्गाचे उद्दिष्ट आहे. कोणतीही विशिष्ट चित्तवृत्ती घेतली (उदा., फुलाचे दर्शन ही चित्तवृत्ती घेतली) तर तिच्यात तमोगुण असतात आणि इच्छा ह्या प्रकारच्या चित्तवृत्तीत रजोगुणही असतात. तेव्हा अंत:करणात कोणतीही चित्तवृत्ती उदयाला येणार नाही अशी स्थिती साधणे म्हणजे चित्त पूर्णपणे शुद्ध करणे होय असे म्हणता येईल. तेव्हा योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध साधण्याचा मार्ग आणि तंत्रे होय.



अनुक्रमणिका

विषयांचे होणारे ज्ञान, सुखदुःख, इच्छा, कर्म, सुखदुःख ... हे जे शारीरिक-मानसिक अवस्थांचे दुःखमय रहाटगाडगे आहे ते माणूस कर्मे करतो म्हणून चालू राहते असे कर्मसिद्धान्त सांगतो. केवळ इच्छेमुळे कर्म होत नाही तर अहंकारयुक्त इच्छेमुळे कर्म होते. तेव्हा अहंकाराचे पूर्ण विसर्जन करणे हे योगाचे एक साध्य आहे. ह्यासाठी अहिंसा, सत्य इ. यमनियम निष्ठेने पाळावे लागतात. पण एवढ्याने भागत नाही. अनंत पूर्वजन्मींच्या कर्मांनी मागे ठेवलेले संस्कार चित्तात वसत असतात. हे संस्कार म्हणजे बीजरूप वासना असतात; म्हणजे त्यांच्यात रजस् व तमस् हे घटक असतात. हे संस्कार चित्तातून निपटून काढले तरच चित्त पूर्णपणे शुद्ध होऊ शकेल. ह्यासाठी योगाची तंत्रे मुख्यतः वापरावी लागतात. माणूस जर एके ठिकाणी स्थिरपणे राहिला ( आसन ), त्याने इंद्रिये विषयापासून निवृत्त केली ( प्रत्याहार ), श्वासही कोंडून धरला (प्राणायाम) तर शारीरिक हालचाली स्तब्ध झाल्यामुळे मानसिक आंदोलने होणार नाहीत, नवीन अनुभव आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या इच्छा ह्यांची मालिका खंडित होईल. आता त्याने जर मन एकाग्र केले (ध्यान) तर चित्तात सुप्त असलेले संस्कार, त्यांचा इच्छा-कर्मात आविष्कार होण्याला अवसर नसल्यामुळे, क्षीण होत, होत विलयाला जातील. नवीन अनुभव येण्याचे थांबले, पूर्वसंस्कार विलयाला गेले, अहंकाराचे पूर्ण विसर्जन झाले की चित्तातून रजोगुण व तमोगुण निःशेषपणे निपटून काढले गेलेले असतील, चित्त केवळ सत्त्वगुणांचे बनलेले असेल, त्याच्यात पुरुषाचे अविकृत प्रतिबिंब पडेल, आपल्या खऱ्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान त्याला होईल व तो मुक्त होईल. आपली मूळची कैवल्यावस्था तो धारण करील.

जो योगमार्ग आणि त्याच्यात समाविष्ट असलेली ध्यानधारणा इ. तंत्रे आहेत त्यांच्यामागे सांख्य-दर्शन आहे. सांख्यसंकल्पनात्मक चौकटीच्या संदर्भातच योगमार्गाची उद्दिष्टे आणि पद्धती यांचे आकलन होऊ शकते. केवळ चिन्मय असलेला शुद्ध पुरुष त्याच्याहून भिन्न असलेली आणि त्यांच्याशी असंबंधित असलेली प्रकृती, ह्या प्रकृतीतील एका देहचित्तात्मक व्यूहाशी पुरुषाने आपले तादात्म्य मानणे ही त्याची मूळ अविद्या, ह्या अविद्येतून जन्माला येणारे संसाररूपी दुःखमय बंधन, विशुद्धीकृत अंतःकरणाद्वारा पुरुषाला होणारे आत्मज्ञान आणि ह्या आत्मज्ञानाद्वारा प्राप्त होणारा कैवल्यस्वरूपी मोक्ष ह्या संकल्पना ह्या चौकटीतील प्रमुख संकल्पना होत. आता ह्या संकल्पना-चौकटीत आणि रानड्यांनी स्वीकारलेल्या भक्ति-मार्गी, एकेश्वरवादी दर्शनात मूलभूत भेद आणि विरोध आहे. सांख्यदर्शनात ईश्वराला आणि ईश्वरभक्तीला स्थान नाही. ईश्वराचे अंश–अपत्ये–असलेले सर्व जीव एकमेकांची भावंडे आहेत ह्या कल्पनेला आणि भक्ताने सर्व माणसांशी, किंबहुना प्राणिमात्राशी बंधुभावाने वागले पाहिजे ह्या तिच्यावर आधारलेल्या मूल्यालाही– सांख्यदर्शनात अवकाश नाही. रानड्यांच्या भक्तिमार्गी मताप्रमाणे, माणसाने आपल्या स्वार्थाचा, पृथक् व्यक्तित्वाचा लोभ सोडून ईश्वराशी पूर्णपणे एकरूप होण्यात आपल्या व्यक्तित्वाचे, स्वतंत्र इच्छांचे त्याला समर्पण करण्यात, त्याची इच्छा असेल तीच स्वतःची इच्छा बनविण्यात, ( आणि म्हणून ) सर्व माणसांना स्वतःची भावंडे मानून प्रेमाने त्यांची सेवा करण्यात, अशा रीतीने ईश्वराची भक्ती करण्यात माणसाचे सर्वोच्च श्रेय असते. त्याची ‘ मुक्ती ’ असते. किंबहुना ‘ मुक्ती ’ ही संकल्पना तिला सांख्य-योग दर्शनांत आहे त्याहून पूर्णपणे वेगळा आशय दिल्याशिवाय भक्तिमार्गात ठीकपणे बसत नाही.

तेव्हा योगमार्ग आणि एकेश्वरवादी भक्तिपंथ ह्यांच्यामध्ये विसंवाद आहे. उलट योगमार्ग आणि अद्वैत दर्शन ह्यांत सुसंवाद आहे. किंबहुना एकाच साध्याकडे यशस्वीपणे नेणारे अनेक पर्यायी ‘ मार्ग ’ आहेत ही मूलतः अद्वैती संकल्पना आहे. सांख्यमतात काही बदल केले तर अद्वैतमत निष्पन्न होते. ( हे अर्थात् मूलगामी बदल आहेत.) ही मांडणी अशी करता येईल :

अनेक भिन्न पुरुष आहेत असे सांख्यमत मानते. त्याऐवजी एकच पुरुष आहे, असे मानू या. प्रत्येक पुरुष केवळ चिन्मय असतो असे सांख्य मानते. आनंद हा सुखाचा एक प्रकार आणि सुख हे प्रकृतीतील एक रूप आहे, ते पुरुषाचे लक्षण नाही असेही सांख्य मानते. ह्याऐवजी पुरुषाची जी जाणीव असते ती केवळ आनंदरूप असते असेही मानू या. चिन्मय, आनंदमय असलेला असा एक आणि एकच पुरुष आहे हे

पाहण्याचा अनुभव एवढेच असत नाही. तर फूल पाहण्याचा **माझा** अनुभव असे त्याचे स्वरूप होते. इच्छा ही अशीच चित्ताची एक अवस्था आहे. पण अहंकारयुक्त चित्ताची ती अवस्था असल्यामुळे ती जेव्हा अनुभव बनते तेव्हा **माझी** इच्छा असा तो अनुभव असतो. ह्यातून कृती जन्माला येते. समजा जर चित्त अहंकारयुक्त नसते तर तृप्तीसाठी धडपडणारी एक इच्छा आहे असाच अनुभव आला असता. अशा अनुभवाची परिणती कृतीत झाली नसती. पण चित्त अहंकारयुक्त असल्यामुळे माझी इच्छा असे अनुभवाचे स्वरूप असते आणि त्यातून कृती जन्माला येते. मग कर्मसिद्धान्ताप्रमाणे ती बरीवाईट असेल त्याप्रमाणे सुखदुःखाचा अनुभव येतो, त्यातून सुख चालू राहावे, दुःख संपुष्टात यावे अशी इच्छा उद्‌भवते, त्यातून कृती घडून येते, मग सुखदुःख... असे हे रहाटगाडगे चालू राहते. शिवाय प्रत्येक इच्छा आपला संस्कार –बीजरूप इच्छा– चित्तामध्ये ठेवून जाते.

सुखदुःख, इच्छा, कृती, सुखदुःख ही विशिष्ट व्यक्तीला येणारी अनुभवांची मालिका अनादी आहे. ही मालिका स्वरूपतः दुःखमय आहे. सुख प्रासंगिक असते, दुःख स्थायी असते. ह्या दुःखमय मालिकेपासून– संसारापासून– सुटका करून घेणे म्हणजे मोक्ष साधणे. हा मोक्ष पुरुषाने साधायचा आहे; पुरुष हा मुक्त व्हायचा असतो. जे आपण नव्हे ते– प्रकृतीतील एक देह-इन्द्रिय-चित्तरूप रचना– आपणच आहोत असे पुरुष अज्ञानामुळे मानतो व म्हणून आपण सुखी आहोत, दुःखी आहोत, ही आपली इच्छा आहे, ती साधण्यासाठी आपण अमुक कृत्य केले पाहिजे ह्या स्वरूपाचे अनुभव त्याला येतात. आपले स्वतःचे प्रत्यक् स्वरूप काय आहे ह्याचे ज्ञान त्याला झाले की तो जे परके आहे त्याच्याशी तादात्म्य मानणार नाही. तो जसा आहे त्या स्वरूपात– जिला स्वतःचे विषय नाहीत अशी शुद्ध जाणीव ह्या स्वरूपात– तो (स्वस्थ) राहील. प्रकृतीपासून आणि इतर पुरुषांपासून तो स्वरूपतः असंबंधित आहे, आणि शुद्ध, इतर कशाशी असलेल्या किंवा मानलेल्या कोणत्याही संबंधापासून न डागळलेल्या अशा स्वरूपातील त्याचे असणे म्हणजे कैवल्याची अवस्था म्हणजेच मोक्ष. हा मोक्ष स्वतःच्या स्वरूपाच्या सम्यक् ज्ञानामुळे पुरुषाला प्राप्त होतो.

हे ज्ञान पुरुषाला कसे प्राप्त होईल ? पुरुष केवळ शुद्ध जाणिवेने युक्त असतो; ह्या जाणिवेचा स्वतःचा विषय असा नसतो. तेव्हा पुरुषाला स्वतःच्या स्वरूपाची साक्षात जाणीव असू शकत नाही. कारण मग स्वतःचे स्वरूप (किंवा तो स्वतः हा) त्याच्या जाणिवेचा विषय होईल आणि असे असणे अशक्य असते. पण पुरुषाची जाणीव, प्रकाश मानसिक घटितांना उजळून टाकतो आणि त्यांना अनुभव हे स्वरूप देतो ह्याचा अर्थ असा की प्रकाशमय पुरुषाचे प्रतिबिंब चित्तात पडलेले असते; चंद्राचे प्रतिबिंब एखाद्या तळ्यात पडावे आणि त्याने तळ्यातील पाणी उजळून निघावे तसे. पुरुषाचे प्रतिबिंब असे चित्तात पडू शकते कारण चित्त प्रामुख्याने सत्त्वगुणांचे बनलेले असते. पण चित्तात सत्त्वगुणांप्रमाणे तमोगुण आणि रजोगुणही असतात; सामान्यतः चित्त अशुद्ध असते. ह्यामुळे हे प्रतिबिंब काहीसे अस्पष्ट व अंधुक आणि विकृतही असते. (तमोगुण तळ्यातील चिखलासारखे मानावे आणि रजोगुण म्हणजे तळ्यात लहरी निर्माण करणाऱ्या वाऱ्यासारखे असतात असे मानावे.) त्यामुळे हा प्रतिबिंबित पुरुष चंचल– इच्छांच्या अधीन असणारा, कृत्ये करणारा–आणि अंधुक–अज्ञानी–असा भासतो. जर चित्तातून तमोगुण आणि रजोगुण पूर्णपणे निपटून काढण्यात आले तर चित्त केवळ सत्त्वगुणांचे बनलेले असेल, (तळ्यातील पाणी पूर्णपणे स्थिर आणि पारदर्शी बनलेले असेल) आणि त्यात पुरुषाचे पडलेले प्रतिबिंब अविकृत, शुद्ध प्रकाशमय असे असेल; पुरुषाला स्वतःच्या खऱ्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान होईल आणि तो मुक्त होईल. ज्या ज्ञानामुळे मोक्ष मिळतो त्या ज्ञानासाठी चित्त पूर्णपणे शुद्ध होणे आवश्यक आहे.

चित्त पूर्णपणे शुद्ध करणे हे योगमार्गाचे उद्दिष्ट आहे. कोणतीही विशिष्ट चित्तवृत्ती घेतली (उदा., फुलाचे दर्शन ही चित्तवृत्ती घेतली ) तर तिच्यात तमोगुण असतात आणि इच्छा ह्या प्रकारच्या चित्तवृत्तीत रजोगुणही असतात. तेव्हा अंतःकरणात कोणतीही चित्तवृत्ती उदयाला येणार नाही अशी स्थिती साधणे म्हणजे चित्त पूर्णपणे शुद्ध करणे होय असे म्हणता येईल. तेव्हा योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध साधण्याचा मार्ग आणि तंत्रे होय.

अनुक्रमणिका

विषयांचे होणारे ज्ञान, सुखदु:ख, इच्छा, कर्म, सुखदु:ख ... हे जे शारीरिक-मानसिक अवस्थांचे दु:खमय रहाटगाडगे आहे ते माणूस कर्मे करतो म्हणून चालू राहते असे कर्मसिद्धान्त सांगतो. केवळ इच्छेमुळे कर्म होत नाही तर अहंकारयुक्त इच्छेमुळे कर्म होते. तेव्हा अहंकाराचे पूर्ण विसर्जन करणे हे योगाचे एक साध्य आहे. ह्यासाठी अहिंसा, सत्य इ. यमनियम निष्ठेने पाळावे लागतात. पण एवढ्याने भागत नाही. अनंत पूर्वजन्मींच्या कर्मांनी मागे ठेवलेले संस्कार चित्तात वसत असतात. हे संस्कार म्हणजे बीजरूप वासना असतात; म्हणजे त्यांच्यात रजस् व तमस् हे घटक असतात. हे संस्कार चित्तातून निपटून काढले तरच चित्त पूर्णपणे शुद्ध होऊ शकेल. ह्यासाठी योगाची तंत्रे मुख्यत: वापरावी लागतात. माणूस जर एके ठिकाणी स्थिरपणे राहिला ( आसन ), त्याने इंद्रिये विषयापासून निवृत्त केली ( प्रत्याहार ), श्वासही कोंडून धरला (प्राणायाम) तर शारीरिक हालचाली स्तब्ध झाल्यामुळे मानसिक आंदोलने होणार नाहीत, नवीन अनुभव आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या इच्छा ह्यांची मालिका खंडित होईल. आता त्याने जर मन एकाग्र केले (ध्यान) तर चित्तात सुप्त असलेले संस्कार, त्यांचा इच्छा-कर्मात आविष्कार होण्याला अवसर नसल्यामुळे, क्षीण होत, होत विलयाला जातील. नवीन अनुभव येण्याचे थांबले, पूर्वसंस्कार विलयाला गेले, अहंकाराचे पूर्ण विसर्जन झाले की चित्तातून रजोगुण व तमोगुण नि:शेषपणे निपटून काढले गेलेले असतील, चित्त केवळ सत्त्वगुणांचे बनलेले असेल, त्याच्यात पुरुषाचे अविकृत प्रतिबिंब पडेल, आपल्या खऱ्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान त्याला होईल व तो मुक्त होईल. आपली मूळची कैवल्यावस्था तो धारण करील.

जो योगमार्ग आणि त्याच्यात समाविष्ट असलेली ध्यानधारणा इ. तंत्रे आहेत त्यांच्यामागे सांख्य-दर्शन आहे. सांख्यसंकल्पनात्मक चौकटीच्या संदर्भातच योगमार्गाची उद्दिष्टे आणि पद्धती यांचे आकलन होऊ शकते. केवळ चिन्मय असलेला शुद्ध पुरुष त्याच्याहून भिन्न असलेली आणि त्यांच्याशी असंबंधित असलेली प्रकृती, ह्या प्रकृतीतील एका देहचित्तात्मक व्यूहाशी पुरुषाने आपले तादात्म्य मानणे ही त्याची मूळ अविद्या, ह्या अविद्येतून जन्माला येणारे संसाररूपी दु:खमय बंधन, विशुद्धीकृत अंत:करणाद्वारा पुरुषाला होणारे आत्मज्ञान आणि ह्या आत्मज्ञानाद्वारा प्राप्त होणारा कैवल्यस्वरूपी मोक्ष ह्या संकल्पना ह्या चौकटीतील प्रमुख संकल्पना होत. आता ह्या संकल्पना-चौकटीत आणि रानड्यांनी स्वीकारलेल्या भक्ति-मार्गी, एकेश्वरवादी दर्शनात मूलभूत भेद आणि विरोध आहे. सांख्यदर्शनात ईश्वराला आणि ईश्वरभक्तीला स्थान नाही. ईश्वराचे अंश–अपत्ये–असलेले सर्व जीव एकमेकांची भावंडे आहेत ह्या कल्पनेला आणि भक्ताने सर्व माणसांशी, किंबहुना प्राणिमात्राशी बंधुभावाने वागले पाहिजे ह्या तिच्यावर आधारलेल्या मूल्यालाही– सांख्यदर्शनात अवकाश नाही. रानड्यांच्या भक्तिमार्गी मताप्रमाणे, माणसाने आपल्या स्वार्थाचा, पृथक् व्यक्तित्वाचा लोभ सोडून ईश्वराशी पूर्णपणे एकरूप होण्यात आपल्या व्यक्तित्वाचे, स्वतंत्र इच्छांचे त्याला समर्पण करण्यात, त्याची इच्छा असेल तीच स्वत:ची इच्छा बनविण्यात, ( आणि म्हणून ) सर्व माणसांना स्वत:ची भावंडे मानून प्रेमाने त्यांची सेवा करण्यात, अशा रीतीने ईश्वराची भक्ती करण्यात माणसाचे सर्वोच्च श्रेय असते. त्याची 'मुक्ती' असते. किंबहुना 'मुक्ती' ही संकल्पना तिला सांख्य-योग दर्शनांत आहे त्याहून पूर्णपणे वेगळा आशय दिल्याशिवाय भक्तिमार्गात ठीकपणे बसत नाही.

तेव्हा योगमार्ग आणि एकेश्वरवादी भक्तिपंथ ह्यांच्यामध्ये विसंवाद आहे. उलट योगमार्ग आणि अद्वैत दर्शन ह्यांत सुसंवाद आहे. किंबहुना एकाच साध्याकडे यशस्वीपणे नेणारे अनेक पर्यायी 'मार्ग' आहेत ही मूलत: अद्वैती संकल्पना आहे. सांख्यमतात काही बदल केले तर अद्वैतमत निष्पन्न होते. ( हे अर्थात् मूलगामी बदल आहेत.) ही मांडणी अशी करता येईल :

अनेक भिन्न पुरुष आहेत असे सांख्यमत मानते. त्याऐवजी एकच पुरुष आहे, असे मानू या. प्रत्येक पुरुष केवळ चिन्मय असतो असे सांख्य मानते. आनंद हा सुखाचा एक प्रकार आणि सुख हे प्रकृतीतील एक रूप आहे, ते पुरुषाचे लक्षण नाही असेही सांख्य मानते. ह्याऐवजी पुरुषाची जी जाणीव असते ती केवळ आनंदरूप असते असेही मानू या. चिन्मय, आनंदमय असलेला असा एक आणि एकच पुरुष आहे हे

मत म्हणणे सांख्यापासून अद्वैत निष्पन्न करून घेण्याच्या प्रक्रियेतील पहिली पायरी. ह्या एकमेव पुरुषाचा निर्देश अद्वैतमतात अधिक रूढ असलेला 'आत्मन्' हा शब्द वापरून करू या. दुसरी पायरी अशी : सांख्य जी त्रिगुणात्मक प्रकृती मानतात, ती प्रकृती म्हणजे माया आहे असे मानू या. माया म्हणजे, जे आहे असे म्हणता येत नाही पण जे नाही असेही म्हणता येत नाही असे तत्त्व; 'सत्-असत्भ्याम् अनिर्वचनीय' असे तत्त्व. ह्या तत्त्वाला नेहमी जी उपमा देतात ती दोरीच्या जागी भासणाऱ्या सर्पाची. वस्तुतः तेथे दोरी असते पण दूरून, अंधुक प्रकाशात पाहिले असता तेथे साप दिसल्यासारखे वाटते. कुणीतरी दिवा आणते आणि त्याच्या स्वच्छ प्रकाशात दोरी दिसते आणि जो साप दिसल्यासारखे वाटत होते–जो साप दिसत होता– तो भास होता हे ज्ञान आपल्याला होते. तो साप आता नाही हे जेवढे खरे आहे तेवढेच तो दिसत असतानाही नव्हता, तो कधीच नव्हता व आताही नाही हे खरे आहे. पण जेव्हा तो भासमय साप दिसत नव्हता तेव्हा तो अजिबात नव्हताच असेही म्हणता येत नाही. तेथे काहीच दिसत नव्हते असे म्हणणे असत्य ठरेल. तेथे काहीतरी दिसत होते आणि जे दिसत होते त्याचे 'साप' असेच वर्णन यथार्थ ठरले असते. किंबहुना त्या अवस्थेत, 'तेथे काय आहे ?' ह्या प्रश्नाचे 'तेथे साप आहे' हेच सत्य उत्तर ठरले असते. त्या भासमय सापाच्या दर्शनाने माझी छाती धडधडू लागते, रक्तदाब वाढतो, इ. हा भासमय साप भौतिक परिणाम घडवून आणतो. तेव्हा हा भासमय साप नाहीच असेही म्हणता येत नाही. तो सत् नसतो आणि असत्‌ही नसतो. तेथे जे आहे त्याचे 'साप' असे दर्शन होणे हे ज्ञान आहे. त्याचे 'दोरी' असे दर्शन होणे हे अज्ञान आहे; अविद्या आहे. दोरीच्या जागी दिसणारा साप हे अविद्येचे एक रूप आहे. जे सत् असे नाही आणि जे असत् असेही नाही, आणि तेथे जे सत् आहे– दोरी – त्याचे ज्ञान झाल्यावर ज्याचे निरसन होते असे ते काहीतरी आहे. ते म्हणजे माया आहे.

मायेचे हे रूप दोन कार्ये करते. जे सत् आहे त्याचे खरे स्वरूप ते झाकते. त्याच्यावर आवरण घालते. दुसरे, ह्या स्वरूपाच्या जागी दुसरे एक रूप निर्माण करते; जे सत् आहे त्याच्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान झाल्यावर जे विलयाला जाते असे एक रूप त्या खऱ्या स्वरूपाच्या जागी निर्माण करते. हे विक्षेपाचे कार्य. आता अद्वैतांच्या मते सांख्यांची जी त्रिगुणात्मक प्रकृती आहे ती माया आहे; 'सदसद्भ्याम् अनिर्वचनीय' अशी माया आहे. (सांख्यमताप्रमाणे पुरुष जेवढे सत् आहेत तेवढीच प्रकृतीही सत् आहे; ती पूर्णपणे सत् आहे.) प्रकृती माया असल्यामुळे ती आनंदमय आत्म्याला झाकते; आणि त्याच्या जागी विक्षेपाने भासमान असे एक रूप बनविते. हे भासमान रूप म्हणजे आपल्याला नेहमी अनुभवाला येणारे जग. सांख्यमताप्रमाणे ह्या जगाचे जे स्वरूप आहे तेच स्वरूप अद्वैती मताप्रमाणेही आहे. म्हणजे प्रामुख्याने तमोगुणांच्या बनलेल्या भौतिक वस्तूंचे एक जग आहे; आणि ते स्वतःच्या कार्यकारणनियमांना अनुसरून चालत असते. ह्या जगात, १) भौतिक देह आणि २) त्याच्याशी संलग्न असलेले व ज्ञानेंद्रिये-कर्मेन्द्रियेअहंकार यांनी युक्त असलेले असे चित्त आणि ३) देह-चित्त ह्या जोडीचे अधिष्ठान असलेला विशिष्ट आत्मा (पुरुष) ह्या तीन घटकांचे मिळून बनलेले असंख्य जीव आहेत. यांतील कुणाही जीवाचा घटक असलेला जो विशिष्ट आत्मा असतो त्याला जीवात्मा म्हणू या. मायेने झाकला गेलेला जो एकमेव आनंदमय आत्मा आहे त्याच्याहून जीवात्मा (सकृद्दर्शनी) भिन्न आहे. हे जीवात्मे आपल्याशी संबंधित असलेल्या देह-चित्ताला आपले देह-चित्त असे मानतात, हे देह-चित्त म्हणजे आपणच असे मानतात (म्हणून '**मी** लठ्ठ आहे', '**मी** दुःखी आहे', अशी विधाने ते करतात), अहंकारयुक्त चित्तात उद्भवणाऱ्या इच्छा, सुख-दुःख ह्या आपल्या अवस्था आहेत, त्या आपल्या इच्छा, सुख-दुःखे आहेत असे मानतात, म्हणून कर्मे करतात, त्यांची बरेवाईट फळे भोगतात, ह्या कर्मांचे संस्कार मागे राहतात, ह्या फळांतून व संस्कारांतून नवीन कर्मे घडून येतात व हे संसाराचे रहाटगाडगे चालू राहते. ही सर्व सांख्य-प्रक्रिया अद्वैती स्वीकारतात.

पण सांख्यमत आणि अद्वैतमत ह्यांच्यामध्ये काही मूलगामी भेद आहेत. सांख्यमताप्रमाणे अज्ञान किंवा विद्या हिच्यामुळे दुःखमय संसाराचे चक्र चालू राहते. ह्या अविद्येचे स्वरूप काय आहे ? केवळ चित्स्वरूप असलेला पुरुष जो आपल्याहून भिन्न आहे अशा देह-चित्ताच्या व्यूहाशी स्वतःचे तादात्म्य मानतो







आणि जेव्हा शुद्ध अशा चित्तात पडलेले स्वतःचे अविकृत प्रतिबिंब पाहून स्वतःच्या वास्तव स्वरूपाचे ज्ञान त्याला होते तेव्हा ह्या अविद्येचे निरसन होते असे अविद्येचे एकंदर स्वरूप आहे हे आपण पाहिले. अद्वैतमताप्रमाणे अविद्येचे स्वरूप अधिक गुंतागुंतीचे आहे. 'सदसद्भ्याम् अनिर्वचनीया' माया ही अविद्या. ह्या अविद्येचे वैश्विक पातळीवरचे एक कार्य आहे. ते म्हणजे, जे सत् आहे, आनंदमय असा जो आत्मा आहे त्याचे स्वरूप झाकणे आणि त्याच्या जागी जगाची (आभासात्मक) निर्मिती करणे. पण अज्ञान किंवा अविद्या ह्यांचा कुणीतरी धारक असला पाहिजे. जर अज्ञान असेल तर कुणीतरी अज्ञानी असला पाहिजे; अविद्या असेल तर कुणीतरी अविद्वान् असला पाहिजे. अद्वैतमताप्रमाणे अविद्येचा धारक जो अज्ञानी असतो, तो म्हणजे जीवात्मा. जीवात्म्याचे अज्ञान दुहेरी असते. जे सत् नाही तर सदसद्भ्याम् अनिर्वचनीय आहे ते जग सत् आहे असे तो मानतो. दुसऱ्या बाजूने, जे सत् आहे त्याचे खरे स्वरूप, सत् म्हणजे आनंदमय आत्मा आहे हे त्याचे स्वरूप त्याला कळत नाही. पण जीवात्म्याचे अज्ञान जसे जगाच्या स्वरूपाविषयीचे अज्ञान असते तसे स्वतःच्या स्वरूपाविषयीचे पण असते. अद्वैताचा मूलभूत सिद्धान्त असा की हा जो जीवात्मा आहे तो म्हणजे मायेने झाकलेला जो आनंदमय आत्मा आहे तोच आहे. सत् ह्याला म्हणजे जो आनदमय आत्मा आहे, जो मायेने झाकला जातो, ज्याची जागा त्रिगुणात्मक जग घेते आणि म्हणून जो जगाचे अधिष्ठान आहे त्याला 'ब्रह्मन्' असेही म्हणतात. तेव्हा जीवात्मा म्हणजेच ब्रह्म होय, आनंदमय ब्रह्म हे जीवात्म्याचे स्वतःचे खरे स्वरूप आहे हा अद्वैताचा मूलभूत सिद्धान्त आहे. पण जीवात्मा असे मानतो की आपण देह-चित्त ह्यांनी विशिष्ट आहोत, अशा अनेक जीवात्म्यांतील एक आहोत, आपल्याला सुखःदुखे लाभतात, आपण कर्मे करतो, त्यांची फळे भोगतो, इ. असे मानणे ही अविद्या आहे. जेव्हा जीवात्म्याचे अंतःकरण पूर्णपणे शुद्ध होते तेव्हा त्याच्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान, आपण म्हणजे ब्रह्म आहोत हे ज्ञान त्याच्या अंतःकरणात स्फुरते, ह्या अविद्येचे निरसन होते आणि तो मुक्त होतो.

सांख्यमत आणि अद्वैतमत ह्यांमधील दुसरा भेद असा : सांख्यमताप्रमाणे पुरुष आणि प्रकृती ह्यांचे मिळून विश्व बनलेले आहे; त्यात ईश्वराला स्थान नाही. अद्वैतमताप्रमाणे मायेने झाकळलेला असा जो जीवात्मा आहे त्याला आनंदमय ब्रह्माच्या जागी (म्हणजेच स्वतःच्या जागी) जे जग दिसते त्यात अशा भौतिक वस्तू आहेत आणि जीवात्मे आहेत, तसाच ईश्वर किंवा परमात्माही आहे. ईश्वर किंवा परमात्मा हे भौतिक वस्तू आणि जीवात्मे ह्यांच्या मिळून बनलेल्या जगाचे कारण आहे. कुंभार ज्याप्रमाणे स्वतःहून भिन्न असलेल्या उपादानापासून– मातीच्या गोळ्यापासून– मडके बनवितो त्याप्रमाणे ईश्वर स्वतःहून भिन्न असलेली जी त्रिगुणात्मक प्रकृती आहे, त्या उपादानापासून जग बनवितो असे नसते. भौतिक वस्तू, देह आणि चित्ते ही त्रिगुणात्मक प्रकृतीची बनलेली असतात. ही त्रिगुणात्मक प्रकृती ईश्वरात अंतर्हित असते, तिरोभूत असते. कोळी जसा आपल्या शरीरापासून जाळे बाहेर काढतो त्याप्रमाणे ईश्वर आपल्या तिरोभूत असलेल्या ह्या प्रकृतीचा आविष्कार करतो, तिला बाह्य, स्थूल रूप देतो, व जग अस्तित्वात येते. जीवात्मे हे परमात्म्याचे अंश असतात आणि परमात्मा त्यांचा अंतर्यामी असतो; त्यांच्यात वसत असतो. ईश्वर हा दृश्य जगाच्या सीमेवर आहे असे म्हणता येईल. तो जगाचे कारण आहे, नियामक आहे, ह्या अर्थाने जगाशी संबंधित आहे व म्हणून जगात आहे. पण त्रिगुणात्मक प्रकृती आणि जीवात्मे हे त्याच्यात अंतर्भूत आहेत, त्याच्याहून वेगळे नाहीत. तेव्हा ईश्वर म्हणजे जे काही आहे ते सर्व आहे. त्याच्यापलीकडे काही नाही. मायेच्या आवरणात असलेले अस्तित्व मायेपलीकडे असलेल्या ब्रह्माच्या जितक्या जवळ असू शकेल तितका ईश्वर त्याच्या जवळ असतो. मायेच्या आवरणात परब्रह्माचा जितका परिपूर्ण अवतार होऊ शकेल तितका झालेला परिपूर्ण अवतार म्हणजे परमात्मा किंवा ईश्वर. जेव्हा अविद्येचे निरसन होते तेव्हा जीवात्मा जसा लुप्त होतो तसा परमात्माही लुप्त होतो आणि फक्त आनंदमय ब्रह्म उरते. पण जोपर्यंत जीवात्मा आहे तोपर्यंत परमात्माही आहे आणि म्हणून ज्याची भक्ती करावी असे तत्त्व संसारात आहे. सांख्यदर्शनात भक्तीला स्थान नाही; अद्वैत दर्शनात तिला महत्त्वाचे स्थान आहे.

आणखी एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. जीवात्म्याला जे जग दिसते आणि स्वतःचे जे स्वरूप










दिसते ते भ्रामक आहे, त्याच्या पलीकडची सद्‌वस्तू आहे आणि ती म्हणजे आनंदमय ब्रह्म आहे हे ज्ञान जीवात्म्याला कसे होऊ शकते. अनुभवाने आणि अनुभवावर आधारलेल्या अनुमानाने हे ज्ञान होऊ शकणार नाही हे उघड आहे. कारण जीवात्मा स्वतः मायेच्या आवरणात आहे आणि त्याला स्वतःचे जे स्वरूप दिसते ते मायानिर्मित आहे. त्याच्या अनुभवाला ज्या वस्तू येतात त्याही मायानिर्मित आहेत. जीवात्मा हे मायेचे वर्तुळ स्वतःच्या अनुभवाच्या जोरावर भेदू शकणार नाही. आपण स्वतःला चिमटा काढीत आहोत असे स्वप्न जर आपण पाहात असू तर स्वप्नातल्या त्या चिमटचाने आपण जागे होऊ शकणार नाही. बाहेरून कुणाला तरी चिमटा काढावा लागेल. अद्वैतमताप्रमाणे दृश्य जग भ्रमात्मक आहे आणि त्याच्या पलीकडची सद्‌वस्तू आहे हे ज्ञान श्रुतीमध्ये, उपनिषदांमध्ये प्रकट झाले आहे म्हणूनच केवळ आपल्याला होते. ते श्रद्धेने स्वीकारावे लागते. आता श्रुतीसुद्धा मायानिर्मित जगात आहेत. पण ईश्वराचा एक पाय जसा मायानिर्मित जगात आहे आणि एक पाय त्याच्या बाहेर आहे तसेच श्रुतीचेही आहे. जेव्हा ब्रह्मानुभव प्राप्त होतो तेव्हा ईश्वराचे जसे निरसन होते तसे श्रुतीचेही होते.

हे दृश्य जग आभासात्मक आहे, त्याच्या पलीकडची सद्‌वस्तू आहे, ब्रह्म हे तिचे स्वरूप आहे आणि हे ब्रह्म म्हणजे आपणच हे ज्ञान संकल्पनात्मक ज्ञान आहे; ही विधाने सत्य आहेत ह्या स्वरूपाचे हे ज्ञान आहे. सांख्यदर्शनात ज्याप्रमाणे पुरुषाला स्वतःचे स्वरूपाने होणारे विमोचक ज्ञान हे स्वतःचे यथार्थपणे, अविकृतपणे झालेले साक्षात दर्शन ह्या स्वरूपाचे असते त्याप्रमाणे अद्वैतात जीवात्म्याला होणारे विमोचक आत्मज्ञान हे आपण ब्रह्म आहोत ह्या साक्षात अनुभवाच्या स्वरूपाचे असते. जीवात्म्याचे अंतःकरण जेव्हा पूर्णपणे शुद्ध होते तेव्हा त्या अंतःकरणात हा साक्षात अनुभव आपोआप स्फुरतो. ह्या अनुभवाचे संकल्पनात्मक वर्णन करता येत नाही. हा जीवात्म्याला आलेला अनुभव असे म्हणता येत नाही. कारण हा अनुभव जेव्हा येतो तेव्हा जीवात्मा उरत नाही. 'यतो वाचो निवर्तन्ते...'

पण श्रुतीत जे ज्ञान प्रकट झाले आहे त्याचे प्रयोजन आहे, दुःखमय संसारात आपण अडकलो आहोत, आपण कर्मे करीत राहणार आणि त्यांची फळे अनिवार्यपणे भोगत राहणार, 'पुनरपि जननं, पुनरपि मरणं, पुनरपि जननीजठरे शयनम्' अशी आपली स्थिती आहे हे भान चिंतनशील जीवात्म्याला येऊ शकते. ह्या स्थितीचा उद्वेगही त्याला येईल. पण ह्यातून सुटका होऊ शकते आणि सुटका करून घेण्याचा मार्ग आहे हे ज्ञान त्याला सांसारिक अनुभवापासून होऊ शकणार नाही. हे ज्ञान त्याला श्रुती करून देते. ज्याची मनोभूमी ह्या ज्ञानाला अनुकूल आहे, म्हणजे जो संसाराविषयी उद्विग्न झाला आहे; कर्मे करून जी फळे माणसाला साधता येतात त्यांच्या उपभोगात माणसाचे खरे कल्याण नाही अशी ज्याची वृत्ती झाली आहे त्याला हे ज्ञान लाभल्यावर तो ब्रह्मसाक्षात्कार (किंवा आत्मसाक्षात्कार) साधण्याच्या मार्गाला लागतो. हा आध्यात्मिक जीवनाचा प्रारंभ होय. त्याची फलश्रुती साक्षात्कारात होते. केवळ श्रुतीपासून लाभणाऱ्या ह्या ज्ञानामुळे आध्यात्मिक साधना शक्य होते. एऱ्हवी माणूस फार तर विरागी होईल पण मोक्षप्रवण होणार नाही.

ब्रह्मसाक्षात्कार, आत्मसाक्षात्कार, ब्रह्मानुभव, जो साधणे म्हणजे मोक्षप्राप्ती होणे, तो अनुभव कसा साधता येतो. माणसाच्या चित्ताच्या अहंकाराचे जेव्हा पूर्ण विसर्जन होते आणि चित्त पूर्णपणे सत्त्वगुणमय, 'शुद्ध' बनते तेव्हा आणि तेव्हाच हा अनुभव त्याच्यात स्फुरतो. जे ज्ञान प्राप्त होणे म्हणजे मोक्ष प्राप्त होणे होय ते ज्ञान कोणत्याही तार्किक मार्गाने लाभत नाही. अंतःकरण शुद्ध करणे हाच ते प्राप्त करून घेण्याचा मार्ग होय. आता ही अंतःकरणाची परिपूर्ण शुद्धी अनेक पर्यायी मार्गांनी साधता येईल. योगमार्गाने ती कशी साधता येते हे आपण पाहिले. सांख्य-प्रणीत योग आणि अद्वैताच्या चौकटीतील योग ह्यांच्यात हा भेद राहील की श्रुतीपासून लाभलेले ब्रह्मविषयक आणि आत्मविषयक ज्ञान अद्वैती योगसाधनेला चालना देते आणि साधकाला ह्या कठीण मार्गावर स्थिर राखते. ह्या साधनेची परिणतीही ब्रह्मानुभवात होते तर सांख्य साधनेची परिणती चिन्मय पुरुषाच्या अविकृत प्रतिबिंबाच्या दर्शनात होते.

भक्तिमार्गही अद्वैताला उपलब्ध आहे. (एका विशिष्ट अर्थाने) जगाचे उत्पत्तीकारण, स्थिति-

अनुक्रमणिका

कारण आणि स्वत:मधील त्यांच्या उपसंहाराचे कारण असलेला परमात्मा, साधकाच्या दृष्टीने, अस्तित्वात आहे, सर्व जीवात्मे त्याचे अंश आहेत; तो सर्वांचा अंतर्यामी आहे, भक्तीचा, निष्ठेचा योग्य विषय आहे. त्याची भक्ती करणे, त्याच्यावर निष्ठा ठेवणे म्हणजे त्याने जी कर्मे विहित म्हणून घालून दिली आहेत ती, त्यांची फळे त्याला अर्पण करून, करीत राहणे; म्हणजे त्याच्याशी एकरूप होणे, त्याची इच्छा तीच आपली इच्छा बनविणे, त्याने जे करायला सांगितले आहे ते त्याने सांगितले आहे म्हणून, त्याच्याप्रीत्यर्थ, आनंदाने करणे, जे घडते ते त्याच्या इच्छेप्रमाणे घडते हे जाणून जे घडते त्यात आनंद मानणे. ह्यानेही अहंकाराचा पूर्ण लोप होईल, चित्त पूर्णपणे सात्त्विक बनेल आणि त्यात ब्रह्मानुभवाचा प्रादुर्भाव होईल. ह्या अवस्थेत अर्थात ईश्वर किंवा परमात्माही उरणार नाही, जीवात्मा उरणार नाही, केवळ आत्मा किंवा ब्रह्म राहील.

पारंपरिक अध्यात्मात मानण्यात आलेले आणखी दोन मार्ग म्हणजे कर्ममार्ग आणि ज्ञानमार्ग. धर्म श्रुतींनी प्रकट केला आहे आणि नेमून दिला आहे म्हणून तो माणसाला कळतो आणि त्याचे प्रामाण्य, तो बंधनकारक आहे ही गोष्ट माणूस स्वीकारतो. हा वैदिक धर्म दुहेरी आहे; त्याचे उद्दिष्ट, साध्य द्विविध आहे. माणसाचा अभ्युदय घडवून आणणे, धनधान्य, पुत्रपौत्र, सत्ता इ. सुखसाधने त्याला उपलब्ध करून देणे हे त्याचे एक साध्य आहे. हे सुख केवळ ऐहिक असते असे नाही. हा धर्म पाळल्याने माणूस स्वर्ग-सुखाचाही धनी होतो. अभ्युदयात ऐहिक–पारलौकिक असे दोन्ही प्रकारचे सुख समाविष्ट आहे. वेदांत व वेदांवर आधारलेल्या स्मृतिग्रंथांत यज्ञयागादी, संस्कारादी जी कर्मे सांगितली आहेत ती केल्याने त्यांचे फळ म्हणून हे सुख प्राप्त होते; अभ्युदय साध्य होतो. धर्माचा हा जो भाग आहे त्याचा आशय म्हणजे ही श्रौत–स्मार्त कर्मे. ही कर्मे दोन प्रकारची असतात. काम्य कर्मे आणि नित्य–नैमित्तिक कर्मे. ज्या गोष्टीं-विषयी माणसाला स्वाभाविक इच्छा असते– संपत्ती, पुत्र, स्वर्ग, इ. – त्या गोष्टी जी कर्मे करून तो मिळवू शकतो ती काम्य कर्मे होत. जर एखाद्या माणसाला स्वर्ग नको असेल – असे अर्थात सामान्यपणे असणार नाही– त्याने स्वर्ग प्राप्त करून देणारी कर्मे करायचे कारण नाही. नित्य–नैमित्तिक कर्मे अशी, विशिष्ट, इष्ट गोष्टी प्राप्त करून देणारी कर्मे नसतात. ती सदैव बंधनकारक म्हणून नेमून देण्यात आली आहेत. रोज योग्य वेळी संध्या केली पाहिजे. हे नित्य कर्म आहे. कर्त्याला अमुक एक गोष्ट साधायची असेल तर त्याने ते करावे असे नाही. योग्य तिथी जेव्हा जेव्हा येईल तेव्हा पितरांचे श्राद्ध केले पाहिजे. हे नैमित्तिक कर्म करावे. नित्यनैमित्तिक कर्मांपासून जर आपल्याला हव्या असलेल्या गोष्टी साधता येत नसतील तर ती का करावीत ह्या प्रश्नाचे उत्तर असे की ती केली नाहीत तर पाप लागते आणि पापा-पासून दुःख लाभते. तेव्हा काम्य आणि नित्य-नैमित्तिक कर्मे करून, सुख साधणे आणि दुःख टाळणे हे आपले इष्ट माणसाला साधता येते.

(नित्य-नैमित्तिक कर्मांविषयीचा एक वेगळा विचारही परंपरेत होता हे येथे नमूद केले पाहिजे. विचार असा की हे जे विश्वचक्र आहे, ज्याच्यात वैदिक देव, माणसे, प्राणी, वनस्पती जगतात त्याची धारणा ही नित्यकर्मे करीत राहिल्याने होत राहते. हे चक्र फिरत राहिल्याने त्याची शक्ती क्षीण होत जाते आणि नित्यकर्मे नेमाने केली गेल्याने ह्या शक्तीचे पोषण होत जाते. आपण ह्या विश्वात आनंदाने जगू शकतो हे ह्या विश्वाचे आपल्यावरील ऋण आहे. नित्यकर्मे करून ह्या विश्वाचे स्थैर्य राखायला साहाय्य करून हे ऋण आपण फेडतो. ते फेडणे हे आपले कर्तव्य आहे. ते जर आपण केले नाही तर आपण चोरासारखे जगतो असे होईल. अर्थात हे पाप आहे आणि पापापासून दुःख लाभेलही. पण हे दुःख टाळण्यासाठी म्हणून ऋण फेडले पाहिजे असे नाही. चोरासारखे जगणे माणसाला शोभत नाही, ते माणसाला साजेसे नाही असा हा विचार आहे.)

अभ्युदय हे जसे धर्माचे एक साध्य आहे तसे निःश्रेयस हे धर्माचे दुसरे साध्य आहे. निःश्रेयस म्हणजे माणसाचे सर्वश्रेष्ठ कल्याण. अभ्युदयात जी सुखे अंतर्भूत असतात त्यांनी माणसाचे पुरते समाधान होत नाही, ही सुखे अस्थिर, काही काळच टिकणारी असतात, ती दुःखाने मिश्रित असतात आणि मागे दुःख

ठेवून जातात. तेव्हा अभ्युदय हे माणसाचे अंतिम, परिपूर्ण साध्य नाही; त्याच्या पलीकडचे असे त्याचे साध्य आहे. हे साध्य म्हणजे मोक्ष. ब्रह्मतत्त्वात जीवात्म्याने विलीन होणे म्हणजे मोक्ष असे मोक्षाचे स्वरूप अद्वैत्यांनी स्वीकारले आहे हे आपण पाहिले. असे माणसाचे साध्य आहे ही गोष्ट श्रुतींनी प्रकट केली आहे म्हणूनच माणसाला कळते आणि मग तो हे साध्य प्राप्त करून घ्यायला उद्युक्त होतो. माणूस स्वाभाविकपणे आपले सुख शोधीत असतो, असे करण्यात काहीच गैर नाही, ते योग्यच आहे. माणसाच्या इच्छा तृप्त होण्यात आणि इच्छा तृप्त करण्याची साधने त्याला उपलब्ध असण्यात त्याचे सुख असते; म्हणजे काम आणि अर्थ हे पुरुषार्थ संपादन करण्यात त्याचे सुख असते. श्रुतींनी प्रकट केलेली श्रौत-स्मार्त कर्मे करून धर्माच्या चौकटीत, धर्माच्या साहाय्याने अर्थ-काम संपादन करणे—म्हणजे धर्म-अर्थ-काम हे तीन पुरुषार्थ संपादन करणे म्हणजे अभ्युदय साधणे. ह्याला कर्ममार्ग म्हणू या. तसेच श्रुतींनी प्रकट केलेला मोक्ष हा पुरुषार्थ संपादन करण्याची साधना करणे ह्याला मोक्षमार्ग म्हणू या.

आता एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. धर्म-अर्थ-काम ह्या पुरुषार्थाच्या त्रिकुटात मोक्ष ह्या पुरुषार्थाची भर घालून धर्म-अर्थ-काम-मोक्ष असे चौकुट बनविता येत नाही असे अद्वैताचे म्हणणे आहे. केवळ धर्म-अर्थ-काम माणसाचे संपूर्ण समाधान करू शकत नाही, माणसाचे परिपूर्ण साध्य म्हणजे धर्म-अर्थ-काम-मोक्ष हे चतुष्टय होय अशी स्थिती नाही. धर्म-अर्थ-काम हे अपुरे साध्य आहे हा त्याच्यावरचा खरा आक्षेप नाही, ते मूलतः सदोष आहे, ते आपले साध्य करण्यात फोलपणा आहे. ह्याची जाणीव झाली की तो विरक्त होतो. आणि धर्म-अर्थ-कामाहून भिन्न, माणसाचे खरे, परिपूर्ण समाधान करणारे साध्य आहे हे ज्ञान श्रुतीकडून झाले की तो मुमुक्षू होतो, मोक्षधर्मी होतो. धर्म-अर्थ-काम ह्या साध्यात मोक्षाची भर पडत नाही; धर्म-अर्थ-काम ह्या साध्याची जागा मोक्ष हे साध्य घेते. धर्म-अर्थ-काम हे माणसाचे स्वाभाविक साध्य आहे; ते सांसारिक साध्य आहे. मोक्ष हे माणसाचे आध्यात्मिक साध्य आहे. सांसारिक साध्याकडून निवृत्त होऊन माणूस आध्यात्मिक साध्याकडे वळतो. तो असे वळू शकतो ह्याचे कारण मोक्ष असे साध्य आहे ह्याचे ज्ञान त्याला श्रुतीकडून झालेले असते. तेव्हा मोक्षधर्माला ज्ञानमार्ग म्हणता येईल.

येथे एक मुद्दा ध्यानात घेतला पाहिजे. ह्या संदर्भात 'ज्ञान' ह्याचा अर्थ दोन प्रकारे लावता येईल आणि लावण्यात येतो. अहंकारयुक्त चित्त आणि त्याच्याशी संलग्न असलेला देह यांची युती म्हणजे आपण नव्हत, आपण म्हणजे ह्यांचा धारक असलेला अविनाशी आत्मा आहोत, हा आत्मा म्हणजे दृश्य विश्वाच्या मागे जे ब्रह्मतत्त्व आहे तेच आहे, आपले आणि जगाचे व्यवहारात दिसणारे स्वरूप म्हणजे माया आहे हे संकल्पनात्मक ज्ञान, आपण आणि विश्व ह्यांच्याविषयीची ही विधाने सत्य आहेत हे ज्ञान, हा 'ज्ञाना'चा एक अर्थ आहे. हे ज्ञान अवगत असणे म्हणजे मोक्ष प्राप्त झालेला असणे नव्हे. माणूस विरागी असेल तर ह्या ज्ञानामुळे तो मुमुक्षू, मोक्षमार्गी बनतो. दुसऱ्या अर्थाने ज्ञान म्हणजे, आपण म्हणजे केवळ आपला अविनाशी आत्मा आणि हा आत्मा म्हणजेच आनंदमय ब्रह्म हा साक्षात अनुभव. हे ज्ञान, हा अनुभव प्राप्त होणे म्हणजे मुक्त होणे. हे ज्ञान मोक्षाचे साधन नव्हे; हे ज्ञान प्राप्त झाले की मग त्याच्यामुळे मोक्ष मिळतो असे नव्हे. हे ज्ञान प्राप्त होणे, मायेचे निरसन होणे आणि मुक्त होणे ही एकच घटना आहे. (शिवाय मायेचे निरसन होणे म्हणजे माया जी पूर्वी होती ती आता विरून गेली आहे असे घडणे नव्हे. मायेचे निरसन होण्यात माया कधीच नव्हती, संसारी, बद्ध असा जीवात्मा कधीच नव्हता व म्हणून तो मुक्त होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही हे ज्ञान अभिप्रेत आहे. ह्यामुळे मोक्ष ही प्रत्यक्षात घडणारी घटना नव्हे. येथे शब्दांनी जे सांगता येते त्याची मर्यादा ओलांडली जाते.) तेव्हा हे जे दुसरे ज्ञान आहे, ज्ञान$_2$, त्याच्यावर मार्ग आधारता येत नाही. ज्ञान$_2$ हा मार्गाचा शेवट आहे; प्रारंभ नव्हे. उलट, पहिल्या ज्ञानावर, ज्ञान$_1$ ह्याच्यावर मार्ग आधारता येतो. त्याला ज्ञानमार्ग म्हणू या. ह्या ज्ञानमार्गाचा आणि कर्ममार्गाचा काय संबंध असेल ?

अभ्युदयासाठी, धर्म-अर्थ-कामासाठी श्रौत-स्मार्त कर्मे करीत राहणे हा कर्ममार्ग ठरेल खरा पण तो आध्यात्मिक मार्ग नव्हे; मोक्षमार्ग नव्हे. मोक्षमार्ग म्हणून कर्ममार्गाचे स्वरूप असे राहील : एक तर

व्यक्तीच्या ठिकाणी वैराग्य असले पाहिजे; सांसारिक सुखांतील फोलपणा तिला पटलेला असला पाहिजे. मग ती काम्यकर्मे सोडून देईल. आता अशी व्यक्ती, जी कर्मे नित्य-नैमित्तिक आहेत ती केल्याने लाभणाऱ्या फळांची इच्छा न धरता, ती केवळ विहित आहेत म्हणून करीत राहिली तर कर्ममार्ग अनुसरते असे होईल. कारण असे करीत राहिल्याने तिचा अहंकार क्षीण होत जाईल आणि चित्त अधिकाधिक शुद्ध होत जाईल. अद्वैत वेदान्ताच्या चौकटीत, विहित कर्मे, त्यांच्यापासून जी फळे लाभणे शक्य आहे त्यांची इच्छा न धरता निष्कामपणे करीत राहणे, म्हणजे ती फळे ईश्वराला समर्पण करणे असे होईल. कारण जे घडते ते ईश्वराच्या किंवा परमात्म्याच्या इच्छेप्रमाणे घडते, मी अमुक कर्मे करावी असा त्याचा आदेश आहे, हा त्याचा आदेश आहे म्हणून मी ती केली पाहिजेत, त्यांच्यापासून जे परिणाम घडून येतील, जी फळे निष्पन्न होतील ती त्याची तशी इच्छा आहे म्हणून घडून येतील, ती फळे त्याचीच आहेत, मला काही हवे आहे म्हणून मी काहीच करीत नाही अशी साधकाची वृत्ती असेल. म्हणजे कर्ममार्ग भक्तिमार्गाशी जोडला जातो.

ज्ञानमार्ग म्हणजे काय ? आपण हे पाहिले की ज्ञान$_2$, ब्रह्मानुभव ह्या स्वरूपाचे ज्ञान हे अंतिम साध्य आहे, त्याच्यावर मार्ग आधारता येत नाही तर सर्व मार्ग त्या मुक्कामावर पोचवितात. उलट, ज्ञान$_1$, संकल्पनात्मक ज्ञान हे सर्व मार्गांना आधारभूत आहे. ते नसले, जीवात्मा म्हणजे ब्रह्मच आहे, दृश्य स्वरूपातील जीवात्मा आणि जग ही माया आहे अशी स्थिर दृष्टी नसली तर माणूस मुमुक्षू होणारच नाही; तो मोक्षासाठी कोणत्याही मार्गाने मोक्षाच्या दिशेने वाटचाल करणार नाही. सर्वच मोक्षमार्ग ह्या ज्ञानावर आधारलेले असल्यामुळे ते सर्व ज्ञानमार्गच आहेत. मग एक विशिष्ट मार्ग म्हणून ज्ञानमार्गाचे स्वरूप काय राहील ? चित्त पूर्णपणे शुद्ध झाले की ज्ञान$_2$, ब्रह्मानुभव त्याच्यात स्फुरतो असे असल्यामुळे ज्ञानमार्ग म्हणून जो काही असेल त्याचेही (निकटचे) साध्य चित्तशुद्धी हेच असेल. ज्ञानाने चित्तशुद्धी कशी होईल ?

ह्याचे उत्तर असे की मी एक विशिष्ट कर्ता आणि भोक्ता आहे, माझ्या अमुक अमुक इच्छा आहेत, माझी अशी परिस्थिती आहे ही माझी समजूत केवळ भ्रमात्मक आहे आणि मी साक्षात परब्रह्म आहे ही श्रुतींनी सांगितलेली सत्ये मला कळली म्हणून ती वळतातच असे नाही. स्वतःविषयीच्या आणि जगाविषयीच्या ज्या दृष्टीवर सांसारिक जीवन आधारलेले आहे ती अनंत पूर्वजन्मांच्या संस्कारांनी पुष्ट झालेली अतिशय चिवट अशी दृष्टी आहे. तेव्हा ही सत्ये कळली आणि पटली तरी ती निःसत्त्वपणे आपल्या मनात पडून राहतील आणि सर्व व्यवहार रूढ सांसारिक दृष्टीप्रमाणे होत राहतील. तेव्हा त्यांचे सतत मनन, चिंतन करून ती सातत्याने मनाच्या केंद्रस्थानी राहतील, आपल्या मनात मुरत जातील, स्वतःकडे आणि जगात जे काही घडते त्याच्याकडे पाहण्याची आपली दृष्टी– आपली जीवनदृष्टी- ह्या सत्यांनी आकारलेली असेल असे प्रयत्न करीत राहिले पाहिजे. हा ज्ञानमार्ग होय. ह्या मार्गाने चालणाऱ्याची जीवनदृष्टी अशी घडत जाईल की केवळ स्वतःसाठी म्हणून काही साधण्याचा प्रयत्न करण्यात त्याला स्वारस्य राहणार नाही. म्हणजे त्याचा अहंकार क्षीण होत जाईल.

येथे ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग ह्यांच्यामध्ये शंकराचार्य जो विरोध कल्पितात त्याचे काहीसे विवरण करणे आवश्यक आहे. मुमुक्षूने सर्व श्रौतस्मार्त कर्मांचा, म्हणजे काम्य, त्याप्रमाणेच नित्य-नैमित्तिक कर्मांचा त्याग करून, ही कर्मे करण्याचे सोडून देऊन ज्ञानमार्गाचा अवलंब केला पाहिजे अशी शंकराचार्यांची भूमिका आहे. ज्ञानोत्तर कर्मे उरतात की नाहीत, म्हणजे ज्ञानी माणसाने करावी अशी कर्मे असतात की नाही अशा स्वरूपात हा प्रश्न अनेकदा उपस्थित केला जातो. आता ज्ञानी माणूस म्हणजे ज्याला ज्ञान$_2$, ब्रह्मानुभव प्राप्त झाला आहे त्याला कर्मे उरत नाहीत हे स्पष्ट आहे. कारण तो जीवात्मा, एक विशिष्ट कर्ता म्हणून उरतच नसतो. जे अजून मायेत आहेत त्यांच्या दृष्टीने तो असेलही; आणि त्याने अमुक केले, अमुक केले नाही असे ते म्हणू शकतील. पण तो स्वतःच्या दृष्टीने नसतोच; केवळ साक्षी म्हणूनही नसतो.

पण ज्याला जीवात्मा, ब्रह्म आणि जग ह्यांच्याविषयीचे संकल्पनात्मक ज्ञान, (ज्ञान$_1$) आहे त्याचे काय ? असा माणूस मुमुक्षू असतो, मुक्त नसतो, तो अजून जगात वावरत असतो; आणि तो ज्ञानमार्गावर

अनुक्रमणिका

आरूढ झालेला असतो. असा माणूस अर्थात काम्य कर्मे करण्याचे सोडून देईल. पण श्रुतिस्मृतींनी विहित म्हणून नेमून दिलेली नित्य-नैमित्तिक कर्मे त्याने मुक्त होईपर्यंत केली पाहिजेत हा एक पक्ष आहे. जिवंत असेपर्यंत अग्निहोत्र इ. नित्यकर्मे केली पाहिजेत असे श्रुतीने सांगितले आहे हा ह्या पक्षाचा आधार होय. शंकराचार्य ह्या मताला विरोध करतात. त्यांचे म्हणणे थोडक्यात असे की सर्व श्रौतस्मार्त कर्मे, काम्य कर्मे, त्याप्रमाणे नित्यकर्मे, अभ्युदयाशी जोडलेली आहेत. अभ्युदय साधणे, अर्थ-काम प्राप्त करून देणे हे त्यांचे प्रयोजन आहे. नित्यकर्म केले नाही तर पाप लागते आणि पापामुळे दुःख भोगावे लागते. हे नित्यकर्म करण्याचे प्रयोजन असेल. किंवा क्षत्रियाने आवश्यक तर लढून समाजाचे संरक्षण करावे, वैश्याने शेती इ. करून समाजाचे पोषण करावे ह्यासारखे स्मार्तधर्म-स्मृतींनी सांगितलेली कर्मे समाजधारणेसाठी, लोकयात्रेसाठी आवश्यक आहेत. लोकयात्रा म्हणजे जिच्यात लोकांना आपापला अर्थ-काम साधता येतो अशी रहाटी. आता जो मुमुक्षू आहे त्याने अंतःकरणपूर्वक मोक्ष हे साध्य स्वीकारलेले असते. हे साध्य गाठून देणारा जीवनमार्ग म्हणजे मोक्षधर्म होय. मोक्ष ह्या साध्याचा कर्ममार्गाने जे साध्य होते त्याच्याशी काहीही संबंध नाही. कर्ममार्गाचे पालन केल्याने, म्हणजे श्रौतस्मार्त कर्मे सातत्याने करीत राहिल्याने कर्त्याचा स्वतःचा अभ्युदय (धर्म-अर्थ-काम) साध्य होतो, तसेच जिच्यात समाजातील इतर व्यक्तींना आपापला अभ्युदय साधता येतो अशी सामाजिक घडी, लोकयात्रा, स्थिर होते हे आपण पाहिले. मोक्ष ह्या साध्याचा अभ्युदय ह्या साध्याशी काही संबंध नाही ह्या म्हणण्याचा अर्थ असा की अभ्युदय हे मोक्षाचे साधन नाही किंवा मानवी जीवनाचे परिपूर्ण असे जे साध्य आहे त्याचा अभ्युदय हा एक घटक आहे आणि मोक्ष हा दुसरा घटक आहे असेही नाही. अभ्युदय आणि मोक्ष ह्यांच्यात साधनसाध्य असा संबंध नाही किंवा एकाच पूर्णाचे दोन सह-अवयव हा संबंधही नाही. अभ्युदय आणि मोक्ष हे परस्परविरोधी आहेत. त्यांच्यात समन्वय साधता येत नाही. मुमुक्षू हा अभ्युदयापासून आणि अभ्युदय प्राप्त करून देणाऱ्या कर्ममार्गापासून निवृत्त होऊन मोक्षसाधनेकडे वळलेला असतो. तो श्रौतस्मार्त कर्मांच्या पलीकडे गेलेला असतो.

येथे प्रश्न उपस्थित होईल तो असा की मुमुक्षू कोणतीच कर्मे करीत नाही काय ? ह्याचे उत्तर असे की तो कर्मे करतो पण श्रुतिस्मृतींनी अमुक कर्मे नेमून दिली आहेत ह्या कारणासाठी ती कर्मे तो करीत नाही. कर्मांच्या बाबतीत तो श्रुतिस्मृतींच्या नियमनापलीकडे गेलेला असतो. जिवंत असेपर्यंत देहधारणा होण्यासाठी आवश्यक असलेली कर्मे तो करील. भिक्षा मागून जगेल. पण आपण वैश्य असल्या-मुळे कृषी, गोरक्ष, वाणिज्य असे काही तरी करून आपली जीविका साधली पाहिजे असे बंधन त्याच्यावर नाही. परिपूर्ण अशी अंतःकरणशुद्धी साधण्यासाठी, अहंकाराचे पूर्ण विसर्जन करण्यासाठी अहिंसा, सत्य, अस्तेय इ. 'यमांचे' तो पालन करील. सारांश, ज्ञानी किंवा मुमुक्षू हा श्रुति-स्मृति-प्रणीत कर्ममार्गाच्या पलीकडे गेलेला असतो; तो श्रुतिप्रणीत ज्ञानमार्गावर आरूढ झालेला असतो.

वैदिक परंपरेप्रमाणे मुमुक्षू हा ज्ञानी असतोच. ज्याला ज्ञान, प्राप्त झाले आहे असा तो असतोच. साधनेसाठी तो ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग, योगमार्ग हे पर्यायी किंवा परस्परपूरक मार्ग म्हणून स्वीकारील. भक्तही ज्ञानी असतोच. कारण जगाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचे कारण असणारा परमात्मा आहे आणि तो सर्वांचा अंतर्यामी आहे, व म्हणून भक्तीचा योग्य विषय आहे हे ज्ञान त्याला नसते तर तो ज्ञानी झाला नसता. आणि श्रुतींनी प्रकट केले आहे म्हणूनच हे ज्ञान माणसांना उपलब्ध आहे. (एकदा श्रुतींनी हे ज्ञान प्रकट केले की ज्यांना श्रुतींचा अधिकार नाही अशा शूद्रादिकांनाही पुराणे इ. ग्रंथांपासून किंवा गुरूकडून ते प्राप्त होऊ शकते व ते भक्त बनू शकतात.)

ह्या पार्श्वभूमीवर रानड्यांनी हिंदू परंपरेत जे आध्यात्मिक मार्ग रूढ होते त्यांचे केलेले परीक्षण समजून घेतले पाहिजे. ह्या परीक्षणासाठी एकनाथ महाराजांनी भागवतात ह्या मार्गांचे जे तौलनिक दृष्टया विवेचन केले आहे ते रानडे आधारादाखल घेतात. पण रानडे एकनाथांचा केवळ अनुवाद करीत नाहीत. एकनाथांचा निष्कर्ष असा आहे की भक्तिमार्ग हा इतर सर्व मार्गांहून श्रेष्ठ आहे. रानड्यांचेही, त्यांनी स्वतंत्रपणे बनविलेले, असेच मत आहे. आपल्या निष्कर्षासाठी एकनाथांनी ज्या

युक्तिवादांचा आधार घेतला आहे त्यांतील काही रानडयांना मान्य आहेत. पण रानडयांनी काही स्वतंत्र युक्तिवादही पुढे केले आहेत. पारंपरिक भागवतधर्म आणि रानडयांचा 'नवभागवतधर्म' ह्यातील भेद ह्या स्वतंत्र युक्तिवादात प्रतिबिंबित झाले आहेत.

रानडे म्हणतात, "... भागवतधर्म, अथवा भक्तिमार्ग, योगधर्माहून श्रेष्ठ आहे असें त्यांनी ( एकनाथांनी ) ज्या ओव्यांत सिद्ध करून दाखविलें आहे त्या पाहूं या :

इंद्रियें कोंडितां न कोंडती ।। विषय सांडतां न सांडती ।। पुढतपुढतीं बाधों येती ।। ह्यालागीं हरिभक्ति द्योतिली वेदें ।। १ ।। इंद्रियें कोंडावीं न लागती ।। सहज राहे विषयासक्ती ।। एवढें सामर्थ्य हरिभक्तीं ।। जाण निश्चितीं नृपवर्रा ।। २ ।। योगी इंद्रियें कोंडिती ।। ते भक्त लाविती भगवद्‌भक्तीं ।। योगी विषय जे त्यागिती ।। ते भक्त अर्पिती भगवंतीं ।। ३ ।। योगी विषय त्यागिती ।। त्यागितां देहदुःखी होती ।। भक्त भगवंतीं अर्पिती ।। तेणें होती नित्यमुक्त ।। ४ ।। दारा सुत गृह प्राण ।। करावे भगवंतासी अर्पण ।। हे भागवतधर्म पूर्ण ।। मुख्यत्वे भजन या नांव ।। ५ ।।

ह्या ओव्यांत योगमार्ग हा मोक्षाचा खरा मार्गच नव्हे आणि म्हणून तो निषिद्ध आहे असे एकनाथांनी प्रतिपादन केलेले नाही. तो मोक्षप्राप्तीचा खरा मार्ग असला तरी भक्तिमार्ग त्याच्याहून अधिक सोपा व सुलभ आहे, व म्हणून सामान्य लोकांनी त्याचा अवलंब करणे हितकर आहे हा मुद्दा त्यांनी मांडला आहे. एकनाथांच्या ह्या मताचा रानडे अनुवाद करतात. "योगमार्ग किंवा तपाचा मार्ग म्हणजे ह्या संसाररूपी महासागरातून स्वतःच्या सामर्थ्यानें व कौशल्याने पोहून जाण्याचा मार्ग; तो ज्यांस साध्य असेल असे क्वचित दैवशाली पुरुष असतील, तर त्यांची निंदा क़िंवा अवहेलना करणें हा आमचा उद्देश नाहीं. परंतु त्यांचा आमचा वाद इतकाच कीं तुमचा मार्ग सामान्य जनांस अत्यंत दुर्गम आहे. भगवत्प्राप्तीचा मार्ग सर्वांस सुलभ असला पाहिजे." ( पृ. ८ )

पण रानडयांना येथे भक्तिमार्ग हा योगमार्गापेक्षा सोपा आहे किंवा कितीतरी सोपा आहे आणि म्हणून तो अनुसरणे शहाणपणाचे आहे एवढाच तारतम्यपर विचार मांडायचा आहे असे मला वाटत नाही. खरा मुद्दा आहे तो असा की रानडयांसारख्या ईश्वरवाद्याच्या दृष्टीने भक्तिमार्ग हा एकमेव प्रमाण असा मार्ग आहे. "ईश्वर सर्व माणसांचा परमकारुणिक असा पिता आहे" आणि "ईश्वरप्राप्ती हे प्रत्येक माणसाचे परमश्रेय आहे" ह्या दोन विधानांपासून असे निष्पन्न होते की ईश्वरप्राप्तीचा जो मार्ग ईश्वराने नेमून दिला असेल तो कुणाही माणसाला आचरता यावा असा असला पाहिजे. जर काही माणसांना तो अशक्यप्राय म्हणावा इतका दुर्घट असेल तर ईश्वर त्यांना परमश्रेयापासून वंचित करतो असे होईल. आणि त्याने असे करणे हे त्याच्या करुणेशी आणि न्यायबुद्धीशी सुसंगत ठरणार नाही. तेव्हा मोक्षप्राप्तीचा मार्ग हा सर्व माणसांना, माणूस म्हणून, उपलब्ध असला पाहिजे ही कोणताही मोक्षमार्ग प्रमाण असण्याची आवश्यक अशी अट आहे. भक्तिमार्ग ही अट पुरी करतो, योगमार्ग नाही हा रानडयांचा खरा मुद्दा आहे.

आणखी एका मुद्द्याकडे प्रस्तुत संदर्भात लक्ष दिले पाहिजे. योगमार्ग ज्या सांख्यदर्शनावर आधारला आहे त्याच्याप्रमाणे इंद्रियांचे आणि बुद्धीचे जे विषय आहेत ते कितीही सुंदर, सात्त्विक, रमणीय इ. असले तरी त्यांचा आस्वाद घेणे, त्यांच्यात गुंतणे हा मोह आहे. कारण हे विषय म्हणजे त्रिगुणांच्या रचना आहेत, आपण म्हणजे जो शुद्ध चिन्मय पुरुष आहे त्याच्याहून भिन्न, त्याला परके असलेले असे ते आहेत आणि त्यांच्या अनुभवांशी तादात्म्य मानणे, हे अनुभव म्हणजे आपल्या अवस्था आहेत असे मानणे हा भ्रम आहे, अविद्या आहे. थोडक्यात पुरुष हा शुद्ध आहे, जग आणि त्याचा अनुभव अशुद्ध आहे आणि ह्या जगाशी असलेल्या ( म्हणजे मानलेल्या ) संबंधाचे पूर्ण निराकरण करणे हा मोक्ष आहे. ईश्वरवाद्यांच्या मते जग ही ईश्वराची निर्मिती आहे आणि म्हणून ते मूलतः अशुद्ध नाही, ते शुद्ध, शुभ, सुंदर आहे. रानडे म्हणतात, "ईश्वराने निर्माण केलेल्या अतिसुंदर सृष्टींतील सर्व पदार्थांकडे ते आपणांस संसारबद्ध करतील म्हणून डोळे घट्ट झांकून न पाहणे, अथवा मुळींच त्यांचे सेवन न करणें, हा भगवत्प्राप्तीचा मार्ग नव्हे; तर अत्यंत रम्य व सुखकारक असा जो परमेश्वर तोच युक्तिप्रयुक्तीनें आपल्या इंद्रियांचा मुख्य विषय होईल

अनुक्रमणिका

असें करणें; म्हणजे कानांनी त्याचे स्तवन ऐकणें, डोळ्यांनी अगणित तारागण, अफाट महासागर, उंच पर्वत, स्वच्छ व विस्तृत उदकप्रवाह, खोल दऱ्या वगैरे पाहून त्याच्या अपार सामर्थ्याचें व अगाध लीलेचे प्रतिबिंब आपल्या मनावर चांगलें ठसवून घेणें, तोंडानें त्याचे गुणानुवाद गाणें, पायांनीं देवालयांत जाणें, हे करण्यांत इंद्रियें रममाण झालीं, म्हणजे त्यांचे खरें दमन व वशीकरण होतें. ईश्वराच्या पवित्र इच्छेस अनुसरून निर्मिलेल्या पदार्थांचा मितपणानें उपभोग घेऊन त्यांचा दाता व उत्पन्नकर्ता जो परमेश्वर त्याची विस्मृती पडण्याइतकें त्याच्या भोगांत गढून न जाणें, त्याच्या पलीकडे विषयत्यागाचीही जरुरी नाहीं." (पृ. ८–९. अधोरेखन मुळात नाही.)

सारांश, संसारी जीवनापासून मुक्तावस्थेपर्यंतचा जो प्रवास आहे त्याचे स्वरूप, जगात गुंतलेलो असण्याच्या अवस्थेपासून प्रारंभ करून जगापासून पूर्णपणे निवृत्त असण्याची आणि कैवल्याची अवस्था गाठणे असे नसते. (कैवल्याची अवस्था म्हणजे इतर कशाशीही संबंधित न राहता केवळ स्वतःच्या शुद्ध स्वरूपात असणे.) तर ईश्वरनिर्मित वस्तूंत पूर्णपणे गढलेला असण्याच्या अवस्थेपासून प्रारंभ करून त्यांच्या निर्मात्याकडे वळणे, त्याच्याशी एकरूप होणे आणि त्याच्या सार्वभौम इच्छेप्रमाणे त्याच्या निर्मितीचे सेवन करणे, आस्वाद घेणे अशा अवस्थेपर्यंत पोचणे असे ह्या प्रवासाचे स्वरूप, रानडयांच्या मते आहे. "हेंच मूळ संस्कृतांत ऋषभदेवांनी जनकराजास आणि महाराष्ट्र भाषेंत आपणां सर्वांस एकनाथ महाराजांनीं सांगितले आहे" असा रानडयांचा दावा आहे. तो कितपत समर्थनीय आहे ह्या प्रश्नात आता शिरता येणार नाही.

ज्ञानमार्गावर रानडयांनी घेतलेले आक्षेप ह्याच स्वरूपाचे आहेत. ह्या संदर्भात रानडयांनी एकनाथांच्या उद्‌धृत केलेल्या ओव्या अशा :

न करिता वेदशास्त्रव्युत्पत्ति ।। ऐशिया अज्ञाना निजात्मप्राप्ति ।। सुगम जोडे ब्रह्मस्थिति ।। यालागी हरिभक्ति प्रकाशिली देवें ।। १ ।। तें हे राया भागवत जाण ।। मुख्यत्वे भक्ति प्रमाण ।। भावें करितां भगवद्‌भजन ।। अज्ञानजन उद्धरती ।।२।। स्त्रीशूद्रादि अघवे ।। घालूनियां ये नावें ।। एकेच खेपे स्वयें न्यावे ।। भजनभावें परतीरा ।। ३ ।। येथे पोहणेयाविण उतरणें ।। प्रवासेंविण प्राप्ति घेणें ।। सुखोपायें ब्रह्म पावणें ।। यालागीं नारायणें प्रकाशिली भक्ती ।।४।। भागवतधर्माची स्थिति ।। भाळीभोळीं भवाब्धि तरती ।। सुखोपायें ब्रह्मप्राप्ति ।। तेचि श्लोकार्थी विशद सांगे ।। ५ ।।

ह्या उताऱ्यात एकनाथांनी मांडलेला दुहेरी मुद्दा असा की भक्तिमार्ग ज्ञानमार्गापेक्षा सोपा आहे, वेद-शास्त्रव्युत्पत्ति न करता सुगमपणे ब्रह्मस्थिती प्राप्त करून देणारा आहे, आणि विशेष म्हणजे तो सर्वांसाठी आहे, स्त्रीशूद्रादी अवघे, अज्ञानजनसुद्धा भक्तिमार्गाने उद्धरिले जातात. रानडे हे दोन्ही मुद्दे अर्थात मान्य करतात पण त्यात आणखी एका मुद्‌द्याची भर घालतात असे दिसते. त्यांचा युक्तिवाद असा की एक तर ज्ञानमार्ग कठीण आहे. "आपल्या लोकांच्या जुन्या समजुतीप्रमाणे ज्ञान संपादण्यास वेदपठन व शास्त्राध्यायन केले पाहिजे. चार वेद, सहा शास्त्रे व द्वैतमताची व अद्वैतमताची भाष्यें अवलोकन केली पाहिजेत. इतक्यानें सांप्रतच्या काळी ज्ञान-प्राप्ति पूर्ण होत नाहीं; कारण इंग्रजी, लॅटिन, ग्रीक वगैरे पाश्चि-मात्य भाषांची चांगली माहिती करून घेऊन त्यांतील तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ वाचल्याशिवाय तत्त्वज्ञानाची पूर्णता होत नाहीं. इतकें करतां करतां मध्येंच आयुष्याची मर्यादा पूर्ण होते, व ब्रह्मप्राप्ति दूरच राहते" (पृ. ११) तेव्हा ज्ञानमार्ग अतिशय कठीण आहे.

पण खरा मुद्दा असा आहे की पारंपरिक मताप्रमाणे ज्ञानमार्ग सर्वांसाठी उपलब्ध नाही. "त्यांतून मुख्य (अडचण) ही कीं, तो (ज्ञानमार्ग) सर्वांस साध्य नाही; कारण, शूद्र व स्त्रिया यांस वेदशास्त्रा-ध्ययनाचा अधिकार नाहीं अशी समजूत असल्यामुळे, त्यांस ब्रह्मप्राप्ति होणें शक्य नाही... ब्राह्मणवर्णात येऊन पुरुषजन्म घ्यावा तेव्हां पुढे ज्ञानप्राप्ति व ब्रह्मस्थिति मिळणार असे समज आहेत." (पृ. १२) "ज्ञान व योग या दोहोंपेक्षा भक्तिमार्ग अथवा भागवतधर्म श्रेष्ठ मानण्याचें मुख्य कारण हेंच कीं तो सर्वांस मोकळा व साध्य आहे; मग तो पुरुष असो वा स्त्री असो, ब्राह्मण असो वा शूद्र असो." (पृ. १३)

पण रानडयांनी पुढे केलेला आणखी एक मुद्दा असा की " पूर्ण ज्ञान मनुष्यास साध्यच नाही " (पृ. २०) हे तर झालेच पण " एकपरी ज्ञान निष्फल आहे " (पृ.२०). कारण असे की " जिज्ञासाबुद्धीचा भाग आपल्यात फार थोडा असतो व वृत्तींला वश होऊनच आपलें वर्तन पुष्कळ अंशीं होत असतें; म्हणून वृत्तींला जर नीट वळण दिलें नाहीं, तर ज्ञान केवळ दुर्बल व व्यर्थ होतें; तें पोकळ नव्हे, शुष्क होय. तसेंच, ब्रह्म, सत्य, आणि जग केवळ माया, अतएव मिथ्या आहे, असे म्हणणारेही व्यर्थ बडबड करितात असें म्हटलें असतां चालेल; कारण तें व्यवहारास मुळींच जुळत नसतें. असें प्रतिपादन करणाऱ्या एखाद्या शास्त्रीबाबांच्या पायास एका लहानशा मुंगीनें चावा घेतांच ते आपलें मत व ज्ञान सर्व गुंडाळून ठेवून त्या मुंगीस मारण्यास प्रवृत्त होतात." ( पृ. २० ) " लहान बालक न बोलतां, न ओळखतां ज्याप्रमाणे आईकडे जातें त्याचप्रमाणें भक्तीचें वळण इंद्रियांस व बुद्धीस लागले असतां तीं भगवंताकडेस वळतात." (पृ. २१)

ह्या विवेचनात रानडे प्रकटन (रेव्हीलेशन) ह्या संकल्पनेला एक वेगळा अर्थ देऊ पाहात आहेत. पारंपरिक वैदिक दृष्टी अशी की मोक्षप्राप्तीला आवश्यक असलेले ज्ञान वेदामध्ये किंवा श्रुतीमध्ये प्रकट झालेले आहे. आणि ह्या ज्ञानाचा अधिकार फक्त त्रैवर्णिक पुरुषांना आहे, स्त्रीशूद्रांना नाही. ह्यापासून असे निष्पन्न होते की स्त्रीशूद्रांना मोक्षाचा अधिकार नाही. जे सर्वांना उपलब्ध नाही असे प्रकटन, अर्थात, रानडे स्वीकारणार नाहीत. पण रानडे येथे उपस्थित करीत असलेला प्रश्न असा की 'ह्या प्रकटनाचा ज्ञानाचा आशय किंवा स्वरूप काय असते ?' विश्व आणि माणूस ह्यांच्याविषयीची काही सत्य विधाने, उदा., ईश्वराने विश्व निर्माण केले आहे, माणसाचा अमर आत्मा असतो इ. सत्ये ह्या प्रकटनात सामावलेली असतात एवढाच ह्या प्रकटनाचा आशय नसतो असे रानडयांचे म्हणणे आहे. ह्या प्रकारची प्रकट झालेली सत्य विधाने आणि सूर्य पृथ्वीपासून अमुक अंतरावर आहे ह्यासारखी विधाने ह्यांत फरक एवढाच राहील की पहिली विधाने मानवी ज्ञानशक्तीच्या आवाक्यापलीकडची आहेत व ती केवळ प्रकट झाल्यामुळेच माणसाला ज्ञात होतात, तर दुसऱ्या प्रकारची विधाने अनुभव आणि तर्क ह्यांच्या साहाय्याने माणूस सिद्ध करू शकतो. पण अशी प्रकट झालेली विधाने, विधाने म्हणून, 'कोरडी'च असतात. ती धर्माचरणाचा आधार होऊ शकत नाहीत. धर्माचरणाचा आधार असलेले ज्ञान केवळ तार्किक, संकल्पनात्मक असत नाही; माणसाच्या वृत्तींशी किंवा भावना-आकांक्षांशी निगडित असलेले असे ते ज्ञान असते. उदा., ईश्वर जगाचा कर्ता आहे असे केवळ कार्यकारणात्मक ज्ञान धर्माचरणाचा आधार होऊ शकत नाही; ज्याची अनन्यभावेकरून भक्ती करावी असा ईश्वर आहे ह्या स्वरूपात ईश्वर आपल्या समोर आला पाहिजे. " परमेश्वरप्राप्त्यर्थ भक्ति होण्यापूर्वी त्याच्या स्वरूपाचें आपल्या शक्तीप्रमाणे ज्ञान झाले पाहिजे. हे जरी खरें आहे तरी तें ज्ञान केवळ बुद्धीनें कांहीं प्राप्त होणारें नाहीं. कारण, परमेश्वर हृदयगम्य अथवा हृदयांतर्गत ज्या वृत्ति तद्‌गम्य आहे यांत संशय नाहीं. ...वृत्तींस अथवा हृदयास खरें समाधान होईल व त्यांस चांगलें वळण लागेल असें करण्यासाठीं भगवंताला वृत्तींच्या आंत आणावयास प्रयत्न करणें आवश्यक आहे." ( पृ. २२-२३ ) ह्याचा मतलब असा की माणसाच्या अंतःकरणात भक्ती अशी एक वृत्ती किंवा भावना प्रथमपासूनच आरोपित असते आणि ह्या भावनेचा योग्य विषय ह्या स्वरूपातच ईश्वर माणसाला प्रतीत होतो. सर्व माणसांच्या अंतःकरणात वसत असलेली अशी ही भावना आहे व तिचा विषय ह्या स्वरूपात ईश्वराचे सर्व माणसांना ज्ञान असते.

सारांश असा की योगमार्ग आणि ज्ञानमार्ग हे प्रमाण मोक्षमार्ग असले तरी भक्तिमार्ग त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहे ह्या एकनाथांच्या भूमिकेचा रानडे औपचारिकपणे अनुवाद करीत असले तरी त्यांची खरी भूमिका वेगळी आहे. योगमार्ग हा योग्य मार्गच नव्हे, विश्वाविषयीच्या गैर दर्शनावर तो आधारला आहे; आणि ज्ञानमार्ग त्याच्या शुद्ध स्वरूपात निष्फल ठरणारा मार्ग आहे, भक्तीच्या भावनेशी निगडित असलेले आणि तिचे पोषण करणारे ज्ञान मोक्षाचे साधन असते अशी त्यांची खरी भूमिका आहे.

आता कर्ममार्गाकडे वळू या. कर्ममार्ग म्हणजे श्रुति व स्मृति ह्यांनी नेमून दिलेली नित्यनैमित्तिक कर्मे करीत राहण्याचा मार्ग. ह्या विहित कर्मांत पुढे देवपूजा, उपासतापास, वेगवेगळी व्रते, तीर्थयात्रा इ.

अनुक्रमणिका

पुराणांत सांगितलेल्या कर्मांची भर पडली. हे कर्मकांड जो निष्ठेने, कसोशीने आचरतो तो धार्मिक असतो, त्याच्यामुळे त्याला पुण्य लागते, देव त्याच्यावर प्रसन्न होतो, त्याला भगवंताची प्राप्ती होते अशी सर्वसाधारण समजूत असते. रानडे असे दाखवून देतात की योगमार्ग आणि ज्ञानमार्ग ह्यांच्याकडे पाहण्याची एकनाथ-महाराजांची जी दृष्टी आहे तिच्याहून कर्ममार्गाकडे पाहण्याची त्यांची दृष्टी अगदीच वेगळी आहे. योगमार्ग आणि ज्ञानमार्ग ह्यांचे प्रामाण्य ते मान्य करतात. पण ते आचरण्यास अत्यंत कठीण आहेत आणि सर्वांस उपलब्ध नाहीत. हे दोष त्यांच्यात असल्यामुळे भक्तिमार्ग त्यांच्याहून श्रेष्ठ आहे असे प्रतिपादन करतात. पण कर्ममार्गाचा एकनाथ धिक्कार करतात. रानडे म्हणतात, "या मार्गाचा (कर्ममार्गाचा) फैलाव फार, म्हणून भागवतधर्माशी तुलना केली असतां 'ज्यासी भगवद्भजनीं विश्वासू । विधिनिषेध त्याचा दासू ।।' असे म्हणून त्याचे दैन्य दाखविले आहे, व 'स्वधर्मकर्मा ऐसें दंडणे ।। वर्णाश्रमाचा ठाव पुसणे ।। होळी करणे कर्मांची ।।' या वचनात त्याचा ठाव पुसून टाकावा, म्हणजे मागमूस नाहींसा करावा व जाळून भस्म करावा अशा कडक शब्दांची योजना केली आहे." (पृ. २७)

कर्ममार्ग हा वर्णाश्रमधर्माशी, म्हणजे चार वर्ण आणि चार आश्रम अशी जी व्यवस्था आहे तिच्याशी निगडित आहे. हा वर्णाश्रमधर्म आणि त्यात अंतर्भूत असलेली कर्मे श्रुतिस्मृतींनी प्रकट केली आहेत ही पारंपरिक श्रद्धा होती. रानड्यांचे म्हणणे असे आहे की श्रुति-स्मृतींचे प्रामाण्य, त्यांनी नेमून दिलेली सामाजिक वर्णव्यवस्था आणि तिच्यात अंतर्भूत असलेली कर्मे हे सर्व भक्तिमार्गामुळे बाजूला सारण्यात आले आहे, भक्तिमार्ग ह्या व्यवस्थेचे प्रामाण्य नाकारतो अशी एकनाथांची शिकवण आहे. रानडे एकनाथांच्या पुढील ओव्या उद्धृत करतात :

जो श्रुतिस्मृति नेणता । भावे भजे भगवत्पथा ।। त्यासि विधिनिषेधबाधकता । स्वप्नींही सर्वथा प्रमाद न घडे ।। १ ।। श्रुतिस्मृति दोन्ही डोळे । तेणेंविण जे आंधळें ।। तेही हरिभजनीं धावतां भावबळें । पडेना आडखुळे सप्रेमयोगें ।। २ ।। ऐसे आचरितां भागवतधर्म । बांधूं न शके कदा कर्म ।। कर्मासि ज्याची आज्ञा नेम । तो पुरुषोत्तम भजनामाजी ।। ३ ।। एवं भागवतधर्मे जे सेवक । स्वधर्मकर्म त्यांचे रंक ।। तें राहों न शके त्यां सन्मुख । मा केंवि बाधक हों शकेल ।। ४ ।।

ह्यावर रानड्यांचे भाष्य असे : "या शेवटच्या दोन ओव्यांमध्ये ज्या भगवंताच्या आज्ञा वेदांस व तन्नियुक्त कर्मांस शिरसावंद्य तोच ज्यांच्या सप्रेम भजनामध्ये उभा असतो अशा भक्तांपुढें वर्णाश्रमधर्मकर्में केवळ रंक होतात, असें एकनाथ महाराज म्हणतात. या शेवटच्या ओवींत 'रंक' हा शब्द मुद्दाम योजिला असावा असें मला वाटतें. रंक शब्दाचा अर्थ सेवक असा नव्हे. रंक म्हणजे साधारण सेवकापेक्षां कमी दर्जाचा नोकर– सेवकाचा सेवक. अमेरिकेंत वगैरे ज्याप्रमाणें सेवक निराळे व गुलाम अथवा दास निराळे, तशाच प्रकारचा भेद सेवक व रंक यांत आहे. प्रसंगीं सेवक आपल्यापुढें उभे राहूं शकतात, परंतु रंकांस समोर राहण्याचाही अधिकार नाहीं. अशा रंकांच्या स्थितीस वर्णाश्रमधर्मकर्में पोहोंचलीं म्हणजे त्यांच्या-पासून भवसागर तरण्याला, अथवा भगवत्प्राप्तीला अडथळा कसचा होणार ? या सर्व वचनांवरून व वर्णाश्रमधर्माचा ठाव पुसा, स्वधर्मकर्माला दंडा, म्हणजे आपल्या हुकुमांत ठेवा, कर्मांची होळी, रांगोळी करा, असें सांगण्यावरून आमची तुमची तर काय, परंतु एकनाथमहाराजांची स्वतःची या वर्णाश्रमधर्मांतील विधिनिषेधरूप कर्ममार्गाविषयीं अश्रद्धा व तिटकारा हीं दिसून येतात." (पृ. २७–२८)

योगमार्ग आणि ज्ञानमार्ग ह्यांचे प्रामाण्य, मग ते कनिष्ठ दर्जाचे का होईना, एकनाथ मान्य करतात पण कर्ममार्ग सर्वस्वी त्याज्य मानतात, असा भेद ते का करतात ? रानडे ह्याचे स्पष्टीकरण करतात ते असे : योगमार्ग किंवा ज्ञानमार्ग यांचा अवलंब केल्याने 'जडता कमी होते', उलट, कर्ममार्गामुळे 'जडता' वाढते, ह्या कारणावरून हा भेद करण्यात आला आहे. जडता म्हणजे देह-इंद्रियांशी निगडित असलेले अनुभव-वासना ह्यांच्यात गुंतून राहिलेले असणे. ही आपली नेहमीची, स्वाभाविक, प्राकृतिक अशी जगण्याची रीत आहे. ह्या जडतेकडून वळून ईश्वराकडे वळणे, ईश्वराचा अंश असलेले आपण चित्स्वरूप आहोत ह्याचे भान सातत्याने, उत्कटतेने राखणे म्हणजे आध्यात्मिक जीवन जगणे, मोक्षमार्गाने वाटचाल



अनुक्रमणिका

करणे होय. योगमार्गाने आणि ज्ञानमार्गाने जडता कमी होतें तर कर्ममार्गामुळे ती वाढते; दृढ होते असा रानडयांचा युक्तिवाद आहे. ते म्हणतात, "योगमार्गामुळे जडता कमी होते. ... आम्हा सर्वांना त्याचे अनुष्ठान थोडेंबहुत करावें लागतें. कारण आपण इंद्रियांच्या अगदींच स्वाधीन झालों व त्यांस वाटेल तसें करूं दिलें; तर आपण केवळ पशु बनून जाऊं, ... ज्ञानमार्गांत आपली जिज्ञासा व बुद्धि यांचा विकास होऊन आपण ज्ञान संपादन करितों व तेणेंकरून मतीचा विभ्रम दूर होऊन आपण चित्स्वरूप आहों असें कळूं लागतें व अर्थात् जडता कमी होते." (पृ. २९) पण कर्ममार्गाची गोष्ट वेगळी आहे. "...येथचें पाणी तेथें नेलें, तिकडची वाळू इकडे आणली, यांतच कृतकृत्यता वाटून अभिमान वाढतो. ... जप, तप, होम, हवनें यांची तरी हीच दशा. म्हणे छप्पन्न लक्ष जप झाला. पहावें तर इतके वेळ मणि ओढण्याखेरीज दुसरें काहीं झाले नाहीं. ... एकंदरीत या कर्ममार्गाच्या प्रकारांपासून जडता वाढतें;... अहंपणा ... प्रबळ होतो. ..." (पृ. ३०-३१)

जडापासून चैतन्याकडे वळणे हे आध्यात्मिकतेचे सार आहे ही पारंपरिक भारतीय शिकवण आहे. उदा., त्रिगुणात्मक प्रकृती जड आहे, पुरुष चिन्मय आहे आणि प्रकृतीपासून परावृत्त होऊन पुरुषाची कैवल्यस्थिती प्राप्त करून घेणे हे आध्यात्मिक जीवनाचे साध्य आहे. तेव्हा रानडे जो मुद्दा मांडताहेत तो भारतीय आध्यात्मिक परंपरेशी सुसंगत आहे. पण शिवाय येथे ईश्वराची आराधना करायची ती चैतन्य-रूपात करायची ( वर्शिपिंग गॉड इन् स्पिरिट ), म्हणजे त्याला जे वाहायचे असते ते स्वतःचे शुद्ध चित्त, बाह्य विधी नव्हत ह्या प्रॉटेस्टंट शिकवणीचाही प्रभाव आहे असे मला वाटते.

ह्या विविध मार्गांची चिकित्सा करून भक्तिमार्गाच्या स्वरूपाविषयी रानडयांनी जो निष्कर्ष काढला आहे तो असा : देवाविषयीचे आणि माणसाविषयीचे उत्कट प्रेम, भक्ती हे भागवतधर्माचे सार आहे. भक्त सदैव देवाच्या सान्निध्यात असतो; देव त्याच्या समोर असतो. "आम्ही जेवढें कांहीं डोळयांनीं पाहतों त्या सर्व दृश्य विषयांत देव आहे, माता म्हणून आहे, पिता म्हणून आहे, कर्ता म्हणून आहे असें आम्ही (भागवतपंथी) पाहतो. मोठया नदीच्या तीरीं, उच्च पर्वतावर, अथवा इतर ठिकाणीं गेलों असतां परमेश्वराच्या दयेचा, चातुर्याचा व शक्तीचा भास आम्हांस असा झाला पाहिजे कीं जो जो विषय आपल्या दृष्टींत गोचर होतो त्यांत देव आहे अशी मनाची वृत्ती होऊन जावी, व प्रत्येक डोळयाचें पाहणें देवमय होऊन जावें." (पृ. ४९) तेव्हा मोक्षासाठी जगापासून किंवा कर्मांपासून निवृत्त होण्याचे कारण नाही. ज्याप्रमाणे अनुभवाचा प्रत्येक विषय हे देवाचे रूप असते त्याप्रमाणे प्रत्येक कर्म ही ईश्वराची सेवा असते असे त्याच्याकडे पाहिले पाहिजे.

"हेतु धरून जीं जीं कर्मे तुम्ही करतां, अथवा कोणत्याही फलप्राप्तीचा हेतु मनांत नसतां जी कर्मे करितां, इतकेंच नव्हे, तर वैदिक, म्हणजे श्रुतिस्मृति आदिकरून कर्ममार्गात सांगितलेली; लौकिक, म्हणजे लोकाचाराची कर्मे, किंवा खाणें, पिणें वगैरे जी स्वाभाविक कर्मे तुम्ही करितां ती सर्व तुम्ही करा. मात्र ही कर्मे सहेतुक असोत वा हेतुरहित असोत तीं सर्व तुम्ही परमेश्वराला अर्पण करा असा उपदेश आहे." (पृ. ४८) हे सर्व, रानडयांनीच उद्धृत केलेल्या एकनाथांच्या पुढील ओव्यांचे विवरण आहे :

जंव दृष्टी देखे दृश्यातें । तंव देवोचि देखे तेथें ॥
यापरी दर्शनाते । अर्पी भजन सत्ते दृष्टीचा विषयो ॥
हैतुक अथवा अहैतुक । वैदिक लौकिक स्वाभाविक ॥
भगवंतीं अर्पे सकळिक । या नांव देख भागवतधर्म ॥

भागवतधर्माचे आणखी एक वैशिष्टय आहे असे रानडे सांगतात. माणसाचे अखेरचे प्राप्तव्य काय तर सुख असे इतर सर्व धर्मपंथ मानतात. भागवतधर्म असे मानीत नाही. "त्या (भागवत) धर्माचे मुख्य भाग्य, वैलक्षण्य, अथवा रहस्य हें आहे कीं, जशी प्रचलित सांप्रदायी धर्मांची जीवात्म्याला प्राप्तव्य काय ती या लोकीं नाही तर परलोकीं, अखंड सुखप्राप्ती अशी समजूत आहे, तशी या धर्माची नाहीं. इतर सर्व धर्मांची वृत्ती सुखाकडेच असते व तदर्थ उद्योग चालू असतो. भागवतधर्म मात्र असें सांगतो कीं केवळ सुख-

अनुक्रमणिका






प्राप्तीकडे लक्ष दिलें असतां ह्या धर्माचें रहस्य कळणार नाही." (पृ. ६४)

मग भागवतधर्माप्रमाणे माणसाचे प्राप्तव्य काय आहे ? माणसाच्या व्यक्तित्वाचा विकास हे माणसाचे खरे प्राप्तव्य असते, सुख हे नसते. आणि हेच भागवतधर्माचे साध्य आहे. "नीच वृत्तींचा उच्च वृत्तींना व्यत्यय येऊ नये व उन्नत भावांचा विकास व्हावा हाच मनुष्यांचा साधारण हेतु असतो. ..." (पृ. ७०) रानटी लोक आणि सुसंस्कृत लोक यांत काय फरक असतो ? हा प्रश्न उपस्थित करून रानडे उत्तर देतात, "... ज्यांस इंग्रजी भाषेमध्ये civilized असे म्हणतात व त्याच अर्थानें ज्यांस ज्ञानेश्वरीमध्यें उत्तमगुण नागरिक असें म्हटलें आहे; ज्यांच्या अंगीं चांगल्या गुणांचा अतिशय आहे असे शहरांत राहणारे लोक व रानटी लोक ह्याच्यामध्यें अंतर काय याचा आपण विचार करूं लागलों तर नागरिकता, अथवा सामर्थ्याचा अत्यंत विकास यानेंच लोकसमुच्चयाचे हे विभाग झाले आहेत असें दिसून येईल." (पृ. ६७) " सारांश, विकास अधिक होणे आणि क्षमता अधिक येणें हाच नागरिकतेचा मुख्य हेतु, हेंच नागरिकतेचे मुख्य लक्षण आहे ... धर्माचाही ... हेतु असाच आहे ..." (पृ. ७१)

माणसाच्या ठिकाणी ज्या शक्ती असतात त्यांचा विकास होणे आणि त्यांची क्षमता वाढणे हे मानवी जीवनाचे साध्य आहे, सुखप्राप्ती हे नव्हे, आणि धर्माचरण म्हणजे हे साध्य सिद्ध करण्याचा मार्ग आहे असा जर भागवत पंथाचा सिद्धान्त असेल तर माणसाच्या प्राप्तव्याविषयीचा एक वेगळा विचार भारतीय तत्त्वज्ञानात प्रविष्ट केला असे म्हणावे लागेल. कारण बहुमान्य, जवळजवळ सर्वमान्य असलेला पारंपरिक विचार असा की माणसाचे प्राप्तव्य म्हणजे पुरुषार्थ संपादन करणे होय. पुरुषार्थ माणसाला जे हवे असते ते. धर्म-अर्थ-काम आणि मोक्ष हे पुरुषार्थ आहेत ही परिचित गोष्ट आहे. काम म्हणजे माणसाच्या स्वाभाविक किंवा मूळ इच्छांची तृप्ती. 'मूळ इच्छा' ह्याचा अर्थ असा स्पष्ट करता येईल : मला जर तहान लागली असली तर पाणी प्यावे अशी मला इच्छा असते. तहान ही जी शारीरिक-मानसिक अवस्था आहे तिच्यात पाणी पिण्याची इच्छा अंतर्भूत आहे. पण समजा मला तहान लागलेली नाही पण वाळवंटा-तून दूरपर्यंत उन्हातून चालायचे आहे, तेव्हा पोटात पुरेसा पाण्याचा साठा असावा नाही तर शारीरिक त्रास, अपाय होईल असा विचार करून मी पाणी पिण्याचे ठरविले. ह्या प्रसंगी मला पाणी पिण्याची इच्छा आहे की नाही असा जर प्रश्न उपस्थित झाला तर ही इच्छा आहे असा निर्णय करावा लागेल. ह्या स्थितीत मी पाणी शोधीत राहीन, पाणी मिळाले नाही तर निराश होईन, इत्यादी. पण पुढे त्रास होऊ नये ह्या इच्छेचे समाधान करण्यासाठी मी पाणी पिण्याची इच्छा मनात धरली आहे. जी गोष्ट इतर इच्छांचे समाधान करण्यासाठी म्हणून हवी असते तिची इच्छा मूळ इच्छा नव्हे. जी गोष्ट, बरी-वाईट, क्षुल्लक-महत्त्वाची कशीही असो, स्वतःसाठी हवी असते तिची इच्छा म्हणजे मूळ इच्छा. अशा इच्छांचे समाधान होणे म्हणजे काम ह्या पुरुषार्थाची प्राप्ती होणे. आता आपल्या इच्छांची तृप्ती करण्यासाठी वेगवेगळी साधने आवश्यक असतात हे माणसाला माहीत असते. ही साधने (थोडक्यात संपत्ती) प्राप्त करून घेतलेली असणे म्हणजे अर्थ हा पुरुषार्थ संपादन केलेला असणे. धर्म हा पुरुषार्थ अधिक गुंतागुंतीचा आहे. येथे थोडक्यात एवढेच म्हणता येईल की जी जी कृत्ये केली असता समाजाची ( आणि विश्वाचीही ) चौकट स्थिर राहते आणि मग तिच्यात सर्वांना आपापला ( धर्माशी सुसंगत असलेला ) अर्थ-काम साधता येतो ती कृत्ये सातत्याने करणे म्हणजे धर्म हा पुरुषार्थ साधणे. धर्म हा जर पुरुषार्थ असेल तर धार्मिक कृत्ये करणे माणसांना हवेसे असले पाहिजे. धर्म पाळण्याची इच्छा माणसाला का असू शकते ? ह्याचे एक उत्तर असे की धर्म पाळला तर पुण्य लागते व पुण्यापासून सुख लाभते, आणि धर्म पाळला नाही तर पाप लागते व पापापासून दुःख लाभते. आणि माणसाला सुख हवे असते आणि दुःख नको असते. दुसरे उत्तर असे की अर्था-विषयी जशी माणसांना इच्छा असते तशी धर्माविषयीही असते. सर्वांनी धर्म पाळला तर सामाजिक चौकट, लोकयात्रा, स्थिर राहील आणि त्यात आपल्याला ( इतरांप्रमाणे ) अर्थ-काम साधता येईल हे माणसांना समजते. मोक्ष ह्या पुरुषार्थाचे स्वरूप वेगळे आहे. धर्म-अर्थ-काम ह्या त्रयीशी, त्रिवर्गाशी, मोक्षाची सांगड घालणे कठीण आहे. तो प्रयत्न येथे करण्याचे कारणही नाही. प्रत्येक माणसाला

मोक्षाची स्वाभाविकपणे ओढ असते, कधी ना कधी त्याला धर्म-अर्थ-काम ह्यांतील फोलपणा उमजून येतो आणि मग तो मोक्षाकडे वळतो असे मानण्यात येते. प्रस्तुत मुद्दा असा आहे की धर्म-अर्थ-काम किंवा मोक्ष हे जे माणसाचे प्राप्तव्य आहे त्याच्या स्वरूपाविषयीच्या पारंपरिक कल्पनेप्रमाणे त्याच्यात, रानडयांनी निर्देश केलेल्या 'विकास', 'क्षमता' इ. संकल्पनांना स्थान दिसत नाही.

माणसाचे इष्ट, म्हणजे त्याला जे हवे असते, साधायचे असते, ते सुख, दुःखपरिहार, सुखसाधन आणि दुःखपरिहारसाधन ह्या चारांतील कोणत्या तरी एका किंवा अधिक प्रकारात मोडते असे पारंपरिक भारतीय मत आहे. सुख ह्याची अनुकूलवेदनीय, जी आपल्याला रुचते अशा स्वरूपाची संवेदना असेही करण्यात आले आहे. पण धर्म-अर्थ-कामाची प्राप्ती असे जेव्हा माणसाच्या प्राप्तव्याचे वर्णन करण्यात येते तेव्हा हे जे माणसाचे इष्ट आहे त्याचे अनुकूल-वेदनांची मालिका एवढेच स्वरूप नसते. धर्म-अर्थ-काम साधलेला असण्याची जी अवस्था आहे तिच्यात अनुकूल-वेदनांपलीकडे जाणारा असा आशय आहे. तिच्यात धर्माचरण आहे, अर्थार्जन करणे— शेती करणे, मडकी बनविणे— अशा व्यवहारांना स्थान आहे, अपत्यांशी खेळणे, त्यांचे संगोपन करणे इत्यादी म्हणजे माणूस ज्यांत स्वाभाविकपणे रमतो अशा कृत्यांनाही स्थान आहे. तेव्हा धर्म-अर्थ-कामप्राप्ती, किंवा अभ्युदय ही खरे पाहता अवस्था नाही. मानवी जीवनाचे ते एक रूप आहे. त्याच्यात अर्थात प्रासंगिक अनुकूल-वेदनांना जरूर स्थान आहे. पण अनुकूल-वेदनांची भरगच्च आणि प्रदीर्घ परंपरा अनुभविण्यात माणसाचा अभ्युदय आहे असे नाही. एका विशिष्ट प्रकारे जगण्यात माणसाचा अभ्युदय सामावलेला असतो असा हा विचार आहे. (मोक्ष ही सांख्यमता-प्रमाणे सुखदुःखाच्या पलीकडे असलेली अवस्था आहे तर अद्वैताप्रमाणे तो नित्य, ज्ञानमय, आनंदमय असा अनुभव आहे.)

पण एका प्रकारे जगणे— ज्यात धर्म-अर्थ-काम साधलेला आहे अशा प्रकारे जगणे— हे माणसाचे प्राप्तव्य आहे हे मान्य करूनही, प्राप्तव्याची ही संकल्पना मानवी शक्तींचा विकास आणि त्यांचा आविष्कार ह्या संकल्पनांवर आधारलेली नाही हे स्पष्ट आहे. ह्या ॲरिस्टॉटलप्रणीत संकल्पना आहेत. माणसाचे हित, कल्याण, सुख (युडेमोनिया) ह्याविषयीची ॲरिस्टॉटलची कल्पना अशी विशद करता येईल : एखादे झाड सुस्थितीत आहे, चांगल्या अवस्थेत आहे असे कधी म्हणता येईल ? जेव्हा त्याला जमीन, पाणी, सूर्यप्रकाश इ. उपलब्ध असतील, त्यापासून ते जीवनद्रव्ये व्यवस्थितपणे शोषून घेत असेल, त्याचा जीवनरस त्याच्या सर्व अवयवांकडे जात असेल आणि त्याचा लाभ ते योग्य प्रकारे घेऊ शकत असतील, पाने तजेलदार असतील, त्याला यावी तशी फुले, फळे योग्य ऋतूत येत असतील तर ते झाड चांगल्या अवस्थेत असते. झाड सुस्थितीत असणे म्हणजे ते चांगल्या प्रकारे जगत असणे. ते कोणत्या प्रकारचे झाड आहे यावरून त्याचे चांगल्या प्रकारचे जगणे कसे असते हे ठरते. त्याचे जगणे ही एक प्रक्रिया आहे— अवस्था नाही; किंवा ती त्याची 'ॲक्टिव्हिटी' आहे. (ॲक्टिव्हिटीला समर्पक मराठी शब्द अजून रूढ झाला नाही. 'प्रवृत्ती' हा शब्द ॲक्टिव्हिटीसाठी कधी कधी वापरण्यात येतो. पण 'टेन्डन्सी'साठीही मराठीत 'प्रवृत्ती' वापरण्यात येतो. ह्या लेखात ॲक्टिव्हिटीसाठी 'प्रवर्तना' हा शब्द मी वापरणार आहे.)

सजीव वस्तू ज्या प्रकारची असते त्या प्रकाराला साजेसे जीवन जर ती जगत असेल तर ती चांगल्या स्थितीत असते. ह्या जगण्यात तिच्या अंगभूत क्षमतांचा आविष्कार झालेला असतो. झाड पाळा-मुळांच्या द्वारा जमिनीतून पोषक द्रव्ये शोषून घेऊ शकते. बिळात राहणारा साप किंवा वारुळात राहणाऱ्या मुंग्या ते करू शकत नाहीत. झाडाच्या ठिकाणी ही अंगभूत क्षमता असते; साप किंवा मुंग्या ह्यांच्या ठिकाणी ती नसते. ह्याचप्रमाणे माणसाची अशी एक प्रकृती आहे आणि तिच्यात काही क्षमता अंतर्भूत आहेत. उदा., बुद्धी ही माणसाच्या ठिकाणाची एक क्षमता आहे. एखाद्या प्रश्नाशी प्रस्तुत किंवा संबंधित काय आहे आणि अप्रस्तुत काय आहे ह्यात भेद करण्याची, प्रस्तुत असा पुरावा गोळा करण्याची, त्यांच्या-पासून अनुमानांच्या साहाय्याने निष्कर्ष काढण्याची अशी ही अनेकांगी क्षमता आहे. ह्या क्षमतेचा

अनुक्रमणिका

आविष्कार ज्ञानसंपादनाच्या प्रवर्तनेत होतो. तसेच आपल्याला काय काय साधायचे आहे, ते साधण्यासाठी कोणती साधने वापरावी लागतील, आपल्यापाशी जी मर्यादित साधनसामग्री आहे तिच्यातील जो भाग एखादे साध्य साधण्यासाठी खर्ची पडेल तो मग आपली इतर साध्ये साधण्यासाठी वापरता येणार नाही, ती साध्ये सोडून द्यावी लागतील ह्या स्वरूपाचा विचार करण्याची क्षमता माणसात आहे. तिचा आविष्कार एखाद्या व्यवहाराचे व्यवस्थितपणे नियोजन करून तो पार पाडण्यात, उदा., कुटुंबाचे किंवा नगराचे व्यवस्थापन करण्याच्या प्रवर्तनेत होईल. तेव्हा माणसाचे हित किंवा कल्याण किंवा सुख म्हणजे जिच्यात त्याच्या क्षमतांचा यथायोग्य आविष्कार झाला आहे, होत आहे अशी प्रवर्तना होय. अशी प्रवर्तना म्हणजे त्याचे चांगल्या प्रकारे जगले जात असलेले जीवन असते. यथायोग्य आविष्कार म्हणजे सुसंवादी आविष्कार. ज्याच्यात शक्य तितक्या अधिक इच्छांचे समाधान झालेले असते असे जीवन म्हणजे सुखी जीवन अशीही एक कल्पना आहे. ॲरिस्टॉटलची कल्पना तिच्याहून भिन्न आहे. ज्या स्वरूपाची प्रवर्तना हे यशस्वी, चांगले मानवी जीवन असते तिच्यात संतोष, तृप्ती अर्थात असते. पण अनेक विशिष्ट इच्छांच्या समाधानांची बेरीज असे ह्या संतोषाचे स्वरूप नसते.

रानडे ' विकास अधिक होणे, आणि क्षमता अधिक येणे, हाच नागरिकतेचा मुख्य हेतु (आहे) ' असे म्हणतात. विकासाचा क्षमतेशी काय संबंध आहे? एखादा माणूस सुरेल गाऊ शकतो. म्हणजे सुरेलपणे गाण्याची क्षमता त्याच्या अंगी असते. तो जेव्हा गात असतो तेव्हाच ह्या क्षमतेचा आविष्कार होत असतो. क्षमतेचा आविष्कार प्रवर्तनेत होतो पण जेव्हा असा आविष्कार होत नसतो तेव्हाही ती क्षमता असतेच. आता सुरेल गाण्याच्या क्षमतेला एक नैसर्गिक बैठक असते. त्या माणसाचा गळा स्वाभाविकपणे गोड असतो, त्याला सूर ओळखण्याची व गळ्यातून काढण्याची एक उपजत कुवत, जी इतर अनेकांना नसते अशी उपजत कुवत असते, इ. पण ह्या उपजत शक्तींना प्रशिक्षण देऊन, गाणे म्हणण्याचा सराव करून, इ. सुरेलपणे गाण्याची क्षमता संपादन करावी लागते. हा विकास होय. माणसांच्या अंगी ज्या नैसर्गिक शक्ती असतात त्यांचा अशा रीतीने विकास करून त्यांना वेगवेगळ्या क्षमता प्राप्त करून घ्याव्या लागतात. असा विकास घडवून आणण्याच्या पद्धतीला थोडक्यात शिक्षण किंवा प्रशिक्षण म्हणता येईल. अनेक प्राण्यांना प्रारंभी बाल्यावस्था असते आणि काही कालानंतर त्यांना प्रौढावस्था प्राप्त होते. बाल्यावस्थेपासून प्रौढावस्थेपर्यंतचे जे स्थित्यंतर असते त्याच्यात त्याच्या अंगी असलेल्या शक्तींचा नैसर्गिकपणे विकास झालेला असतो. पण माणसाचे वैशिष्ट्य असे की प्रौढ अवस्थेत त्याच्या अंगी ज्या नैसर्गिक शक्ती असतात त्यांचा शिक्षण-प्रशिक्षणाने विकास घडवून आणून हरतऱ्हेच्या क्षमता तो संपादन करू शकतो. उदा., उच्च गणितात संशोधन करण्याची, रुचकर पदार्थ बनविण्याची, उंच पर्वतांवर चढण्याची इत्यादी.

ह्या विकासाला नैतिक अंगही असते. उदा., संयम हा गुण ही एक क्षमता आहे. एखाद्या इच्छेचा विषय अत्यंत मोहक असला तरी एका मर्यादेपलीकडे त्याचे सेवन आपण करणार नाही असा निग्रह करण्याची, मनाला आवर घालण्याची ती क्षमता आहे. ज्याच्यात आंतरिक सुसंवाद आहे, स्थिरपणे काही साध्ये साधण्यात जे गढलेले आहे असे जीवन संयमावर आधारलेले असते. जीवनाचा तोल आणि दिशा सांभाळली जाण्यात संयमाचा आविष्कार होत असतो. ही क्षमताही व्यक्तीला प्रयत्नाने अंगी बाणवावी लागते. इतर नैतिक सद्‌गुणांचेही– उदा., धैर्य, न्यायी वृत्ती, इ.– असेच आहे. सारांश, आपल्या अंगी ज्या नैसर्गिक शक्ती असतील त्यांचा विकास माणसाला करता येतो आणि करावा लागतो. अनुभव, चिंतन, इतरांची शिकवण आणि त्यांनी घालून दिलेली उदाहरणे, स्वत: केलेला सराव इत्यादींच्या आधारे हा विकास घडून येतो आणि घडविला जातो. आणि अशा विकसित क्षमतांचा आविष्कार व्यक्ती जे चांगले जीवन जगत असते त्याच्यात होत असतो. व्यक्तीचा हा आंतरिक विकास, आणि त्याच्यातून साधलेले तिच्या जीवनाचे उन्नयन ह्या प्रक्रिया चांगल्या जीवनात सतत चालूच असतात. त्या खुंटणे किंवा क्षीण होणे म्हणजे व्यक्तीचा नैतिक ऱ्हास होणे.

मानवी कल्याणाविषयीची ही ॲरिस्टॉटलप्रणीत संकल्पना ही इहवादी ( सेक्युलर ) संकल्पना

आहे. माणसाचे कल्याण ह्या दृश्य विश्वाच्या संदर्भात निःशेष साधले जाते; ह्या कल्याणात पारलौकिक घटक नाही. विश्वाविषयीचे विवेकाधिष्ठित ज्ञान, सौंदर्याची निर्मिती आणि आस्वाद, न्याय्य आणि सुखी अशा समाजाचे व्यवस्थापन, प्रशासन, इ. हे ह्या कल्याणाचे घटक आहेत. पण मानवी कल्याणाविषयीच्या ह्या संकल्पनेला धार्मिक रूप आणि आशय देता येईल. ईश्वराने माणसाला काही शक्ती, क्षमता ह्यांचे वरदान दिले आहे आणि माणसाने त्यांचा विकास आणि योग्य मार्गाने आविष्कार करावा अशी ईश्वराची इच्छा आहे. ह्या ईश्वरी इच्छेचे समाधान करण्यासाठी माणसाने आपल्या संपूर्ण सामर्थ्यानिशी झटावे ही माणसाची नैतिक जबाबदारी आहे. ज्या मानसिक व शारीरिक शक्तींची देणगी ईश्वराकडून मानवी व्यक्तीला लाभलेली असते तो एक न्यास (ट्रस्ट) आहे, व्यक्ती त्याचा विश्वस्त आहे आणि ह्या न्यासाचा विनियोग आपण कसा केला ह्याचा हिशोब ईश्वराला सादर करायला व्यक्ती बांधलेली आहे. ही प्रॉटेस्टंट, (एका वळणाची प्रॉटेस्टंट) कल्पना आहे. उदा., मिल्टनने स्वतःच्या आंधळेपणावर लिहिलेल्या सुनीतात मांडलेले विचार पहावे : " माझे आयुष्य अर्ध्यावर आले असतानाच माझ्या जीवनातील प्रकाश कसा आटून गेला... आणि मला लाभलेली एक शक्ती, जरी तिचा उपयोग करून माझ्या निर्मात्याची सेवा करावी आणि त्याला माझा खरा हिशोब सादर करावा असा माझा निर्धार होता तरी, निरुपयोगी ठरून माझ्याजवळ कशी पडून राहिली आहे ह्याचा विचार जेव्हा मी करतो तेव्हा मला असा खुळा प्रश्न पडतो : प्रकाश नाकारलेला असतानाही ईश्वर दिवसभराच्या श्रमांची वसुली करीत असतो का ? " आणि ह्या प्रश्नाचे मिल्टनला उत्तर सुचते ते असे की ईश्वराच्या इच्छेप्रमाणे जे शांतपणे उभे राहून त्याच्या भावी आदेशाची वाट पहात असतात, (त्यांनी बाह्यतः काही श्रम केले नसले तरी) तेही ईश्वराची सेवाच करीत असतात. " तेव्हा माणसाच्या सर्व शक्ती आणि सामर्थ्ये ही ईश्वराच्या सेवेसाठीच आहेत. ह्या ईश्वरदत्त शक्तींचे पोषण, संगोपन करणे आणि त्यांचा योग्य तऱ्हेने उपयोग, आविष्कार करणे म्हणजे ईश्वराचे जे देणे आपण लागतो ते त्याला पोहचविणे असते. ही ईश्वराची चैतन्याच्या मार्गाने केलेली पूजाच असते. अशा रीतीने जगण्यात माणसाला साफल्याचा अनुभव येतो खरा. पण ह्या शक्तींचा विकास आणि आविष्कार झाला ह्याच्यात केवळ हे साफल्य वाटता कामा नये. ती साफल्याविषयीची ग्रीक संकल्पना होईल. ह्या विकास-आविष्कारातून ईश्वराची सेवा घडली असा भाव ह्या साफल्यात असला पाहिजे ही ख्रिश्चन संकल्पना आहे आणि ती रानड्यांनी स्वीकारली आहे.

माणसाने काही नियमांचे, नैतिक नियमांचे, पालन केले तर त्याला इहलोकी सुख लाभेल असे ह्या जगाचे स्वरूप आहे आणि जर माणसाने खरा धर्म पाळला तर परलोकात त्याला चिरंतन सुख लाभेल असे परलोकाचे स्वरूप आहे असे मानणे चूक आहे. रानडे म्हणतात " हे जग म्हणजे ईश्वराची एक शाळा आहे आणि हीच दृश्य विश्वासंबंधीची भावना अत्यंत खोल आणि यथार्थ आहे. " (पृ. ४१३) ह्या शाळेत स्त्रीपुरुषांचे नैतिक शील घडविण्यात येते; त्यांच्या क्षमतांचा योग्य व्यवहारात आविष्कार व्हावा ह्या उद्देशाने ह्या क्षमतांचा विकास साधण्यात येतो.

माणसाचे कल्याण कशात असते ह्याविषयीची जी पारंपरिक भारतीय संकल्पना होती तिला हे एक नवीन रूप रानडे देऊ पाहात आहेत. ह्या रूपाला पारंपरिक धार्मिक साहित्यात अधिष्ठान देण्याचा प्रयत्न ते करतात. उदा. पहा : " ज्ञानमार्गी लोक आम्हांस जन्ममरण नको, यांतून सुटका व्हावी म्हणून प्रयत्न करीत असतात; पण तुकोबासारखे भागवतधर्माचे अनुयायी साधु देवापाशी प्रार्थना करितात ती अशी :

हेंचि दान दे गा देवा। तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी। हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥
नलगे मुक्ति धन संपदा। संत संग देईं सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे गर्भवासी। सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥

ते मागतात कीं देवा, मृत्युलोकीं आम्हांस जन्म दे; परंतु तुझी सेवा व संतसंग घडेल असें कर. या एका

जन्मांत सर्व कर्मे देवाला अर्पण व्हावीं तशीं होत नाहींत; म्हणून तसें करण्याची क्षमता अंगीं येण्यासाठीं पुन:पुन्हा मृत्युलोकीं जन्म झाला तरी हरकत नाहीं, असें तें सांगतात. सुखस्पृहा व दु:खत्यागाची इच्छा नको. गीताशास्त्राच्या पायावर हा सिद्धान्त रचलेला आहे व त्याचें बारकाईनें मनन करण्यासारखें आहे. **एकंदरीनें विकास, प्रभाव व क्षमता हीं साध्यें हेंच खरें आहे.** तें कोणत्या मार्गानें होईल ह्याविषयीं मतभेद असूं शकेल. परंतु साध्य अथवा प्राप्तव्य काय, याविषयीं शंका नसावी." (पृ. ७८, अधोरेखन माझे.)

थोडक्यात असे म्हणता येईल की मानवी श्रेयाविषयी जी संकल्पना रानडे मांडीत आहेत तिला तुकारामांच्या वरील अभंगात काहीसा आधार मिळतो. मुक्ती म्हणजे सांख्य किंवा अद्वैत यांनी ज्या मोक्षाचा पुरस्कार केला आहे तो मोक्ष, ते माणसाचे सर्वश्रेष्ठ प्राप्तव्य नाही असे तुकाराम स्पष्टपणे म्हणतो. मग हे प्राप्तव्य काय आहे. देवाच्या सान्निध्याची सतत जाणीव असावी, त्याच्या स्वरूपाचे यथार्थ भान असावे, संतांचा संग असावा, असे जीवन जगणे मग ते इहलोकी किंवा परलोकी जगले जात असो, हे अंतिम प्राप्तव्य आहे आणि असे जीवन जर इहलोकीच शक्य असेल तर गर्भवास होत राहावा असा ह्या अभंगाचा आशय आहे. देवाशी माणसाचे जे भक्तीचे नाते आहे, त्याचा विकास होत जावा, ते अधिकाधिक शुद्ध होत जावे आणि त्याचा आविष्कार जीवनात व्हावा हे प्राप्तव्य आहे. माणसाच्या अंगी असलेल्या सर्व क्षमतांचा विकास व्हावा आणि त्यांचा अधिकाधिक शुद्ध आविष्कार त्याच्या सबंध जीवनात, वैयक्तिक आणि सामाजिक जीवनात व्हावा, असे ह्या प्राप्तव्यात स्पष्टपणे अभिप्रेत नाही. आणि असे त्यात अभिप्रेत असले तरी त्याचा विसर त्या वेळच्या हिंदू समाजाला पडला होता आणि ख्रिस्ती समाजाकडून ते हिंदू समाजाकडून शिकणे आवश्यक होते असे रानडचांचे मत होते. "... आतां ख्रिस्ताच्या धर्माचे संस्कार आपल्या मनावर होत आहेत. एकत्र जमून काम करण्याचे सामर्थ्य, पापाविषयीं तिरस्कार, अन्याय वगैरे हे चालावयाचे, अशा प्रकारें औदासीन्य जाऊन अन्यायाचा द्वेष, स्त्री-पुरुषांच्या वास्तविक योग्यतेचे ज्ञान, औदार्य आणि बंधुप्रेम, आचारविचार-स्वातंत्र्य– हे सारे जे ख्रिस्ताच्या धर्माचे गुण आहेत ते आपल्या राष्ट्रांच्या अगस्वभावांत सामील करणें, हें सध्याच्या कालचें आपले कर्तव्य आहे." (पृ. ४१५) वास्तविक, हे गुण, ख्रिस्ती धर्माचे गुण नव्हत. परंपरेने ख्रिस्ती असलेल्या युरोपीय समाजात जो आधुनिक समाज विकसित झाला होता त्याचे हे अंगभूत गुण आहेत. हा समाज घडविण्यात जसा ख्रिस्ती परंपरेचा भाग होता त्याप्रमाणे रेनेसान्समधून ग्रीक मूल्यांचे युरोपात जे पुनरुज्जीवन झाले त्यांचाही महत्त्वाचा वाटा होता.

माणसाच्या सर्व शारीरिक-मानसिक शक्तींचा विकास आणि आविष्कार हा नैतिक-आध्यात्मिक जीवनाचा आशय आहे आणि ईश्वराचे आणि ईश्वराने निर्माण केलेल्या जीवांचे प्रेम हे ह्या जीवनाचे रूप, त्याचा आकार आहे, अशी रानडचांची भूमिका मांडता येईल. नीती आणि धार्मिकता (किंवा आध्यात्मिकता) ह्यांच्यात भेदरेषा काढता येणार नाही. विश्वाविषयीच्या आध्यात्मिक दर्शनावरच नीती आणि नैतिक कर्तव्ये ह्यांची पर्याप्त संकल्पना आधारता येते. रानडचांचे आणखी एक म्हणणे आहे. ईश्वर, जग आणि मानवी आत्मा ह्यांना सामावून घेणारे एकात्म आणि सुसंवादी दर्शन कोणत्यातरी एका विशिष्ट श्रुतीत किंवा प्रकटनात उपलब्ध असते असे नाही. आणि असे दर्शन श्रद्धेने स्वीकारावे लागते, विवेकशक्तीला (रीझन) त्याचा आशय ग्रहण करता येत नाही, त्याचे समर्थन करता येत नाही असेही नाही. रानडे म्हणतात, "धर्माच्या क्षेत्रात विवेकाचा प्रांत आणि श्रद्धेचा प्रांत असा भेद ईश्वरवादी (थिइस्ट) मान्य करीत नाही. श्रद्धा म्हणजे आचरणात उत्कट गंभीरपणें व्यक्त होणारी विवेकशक्ती होय. (फेथ इज प्रॅक्टिकल अँड अर्नेस्ट रीझन.) (पृ. २७८) निसर्गाची घडण, मानवजातीचा इतिहास आणि ह्या दोघांइतकीच महत्त्वाची गोष्ट म्हणजे माणसाच्या सदसद्विवेक बुद्धीला प्रतीत होणारी सत्ये ह्यांच्यापासून लाभणाऱ्या पुराव्याचे सयुक्तिकपणे आणि निर्विकारपणे केलेले चिंतन-मनन हे ह्या आध्यात्मिक दर्शनाचे अधिष्ठान आहे. " ईश्वर स्वत:ला बाह्य निसर्गात, आपल्या मनाच्या आंतरिक जगात आणि इतिहासात प्रकट करतो असे ईश्वरवादी मानतो." (पृ. २७२)

ईश्वराने निर्मिलेल्या जीवांवरचे प्रेम त्यांच्या कल्याणाविषयीच्या आस्थेमध्ये व्यक्त झाले पाहिजे

आणि ही आस्था त्यांचे कल्याण वृद्धिगत करण्याच्या प्रयत्नांतून प्रकट झाली पाहिजे. अर्थात ज्या जीवाचे कल्याण आपण साधू किंवा वाढवू पाहात आहो त्याचे खरे हित कशात आहे ह्याचे यथार्थ आकलन आपल्याला असेल तरच हा प्रयत्न अर्थपूर्ण ठरेल हे उघड आहे. माणसाच्या बाबतीत रानड्यांची भूमिका अशी की एक स्वतंत्र, स्वायत्त कर्ता म्हणून त्याचा विकास होण्यात त्याचे खरे कल्याण असते. "इतर प्राण्यांहून मनुष्याचें विशेष लक्षण हेंच कीं, त्याला विज्ञान आहे, आणि एखादी गोष्ट करावी कीं न करावी, ह्याविषयी कांहीं निश्चित मर्यादांच्या आंत त्याला पूर्ण इच्छास्वातंत्र्य आहे. तसें इच्छास्वातंत्र्य पशुकोटींत नाही.... सुष्ट दुष्ट, ह्यांपैकीं एकाची निवड करण्याची स्वतंत्रता मनुष्यालाच ईश्वरानें दिलेली आहे. स्वतःहोऊन निश्चय करावा आणि क्रिया घडवून आणावी, हें सामर्थ्य फक्त मनुष्यालाच तेवढें आहे. हीं जीं मनुष्याचीं विशेष लक्षणें आहेत त्यांत त्याचे थोर वैभव व मोठी जबाबदारी आहे. ह्या लक्षणांमुळे कायदा आणि राज्यव्यवस्था, आचारनियम आणि चालीरीती, सामाजिक आणि कुटुंबाच्या संस्था, वाङ्मयात्मक आणि शास्त्रीय शिक्षण व धर्म आणि उपासना– ह्या सर्वांचा उदय होतो." ( पृ. ४११ ) तेव्हा माणसाचे कल्याण साधण्याचा प्रयत्न करणे म्हणजे माणसाच्या क्षमतांच्या आविष्कारातून हे जे सामाजिक– सांस्कृतिक जग निर्माण झालेले आहे आणि त्यात एक स्वायत्त कर्ता म्हणून सहभाग घेण्याच्या त्याच्या क्षमतेचा परिपोष करणे होय. सर्व माणसांना असा सहभाग घेता यावा ह्यासाठी अनुकूल अशी आर्थिक-सामाजिक परिस्थिती निर्माण करणे हे अशा प्रयत्नाचे एक महत्त्वाचे उद्दिष्ट राहील.

सारांश, रानड्यांचा नवभागवतपंथ हा जीवनव्यापी धर्म आहे. ईश्वराच्या एकांतात केलेल्या चिंतनाला आणि भजनपूजनाला जसे त्यात महत्त्वाचे स्थान आहे तसेच एक नागरिक म्हणून, मानवजातीचा एक घटक म्हणून आपली सर्व कर्तव्ये, जबाबदाऱ्या ओळखून त्या पार पाडण्यालाही तितकेच महत्त्वाचे स्थान आहे. हे सर्व ईश्वराची आणि जीवांची सेवा म्हणून करावयाचे आहे. पारंपरिक भाषेत बोलायचे तर रानड्यांनी धर्म-अर्थ-कामाला नवीन आशय दिला आणि धर्म-अर्थ-काम व मोक्ष ह्यांची नव्याने सांगड घातली.

[ ह्या लेखात दिलेले पृष्ठक्रमांक 'न्या. मू. महादेव गोविंद रानडे ह्यांचीं धर्मपर व्याख्यानें', निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९०२ ह्या पुस्तकातील आहेत. –संपादक ]

## संदर्भ व टीपा

१. उदा., ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "गीतार्थाचे सामर्थ्य मोक्षाचे साधन प्राप्त करून देण्याचे आहे, हा त्यात चांगुलपणा आहे. दुसरी शास्त्रे प्रमाणसिद्ध मोक्षोपाय नाहीत... सर्व शास्त्रांना आधारभूत जी शास्त्रश्रेष्ठ गीता, तिच्या योगाने शास्त्रे सनाथ झाली आहेत."

"जे गीतार्थाचें चांगावें । मोक्षोपायपर आघवे ॥
आन शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध ॥ (१८) १२३० ॥
... तैसी शास्त्रेश्वरा गीता या । सनाथें शास्त्र ॥ (१८) १२३५ ॥

(ब्रह्मीभूत नानामहाराज साखरेप्रणीत
सार्थ ज्ञानेश्वरी, आवृत्ती बारावी, पृ. ९५६)

अनुक्रमणिका

२. आगम म्हणजे परंपरेने चालत आलेले धर्मग्रंथ. ह्यांत मंदिरे कशी बांधावी, पूजाअर्चा कशी करावी ही जशी माहिती दिलेली असते त्याप्रमाणे दार्शनिक किंवा तत्त्वज्ञानात्मक सिद्धान्तांचे व संकल्पनांचे विवेचनही केलेले असते. साधारणत: 'आगम' हे नाव शैव परंपरेतील ग्रंथांसाठी वापरतात. शाक्त आगमांसाठी 'तंत्र' हे नाव अधिक प्रचलित आहे, तर वैष्णव परंपरेतील अशा ग्रंथांसाठी अनेकदा 'संहिता' हे नाव वापरण्यात येते. (पहा : J. Gonda Medieval Religious Literature in Sanskrit, पृ. २)

३. मोक्ष, अविद्या, कर्मसिद्धान्त, जन्ममरणाचा फेरा, अहंकाराच्या विसर्जनात जिची परिणती होते अशी अंत:करणशुद्धी मोक्षासाठी आवश्यक असते, इ. संकल्पना जैन, बौद्ध हे अवैदिक व अद्वैत इ. वैदिक संप्रदायांना समान आहेत.

४. ह्या संदर्भात, "वैदिक संस्कृतीचा विकास" (लेखक : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी) ह्या ग्रंथाचे प्रकरण (व्याख्यान) दुसरे, 'वेदांची तार्किक प्रज्ञेत परिणती', हे प्रकरण पहावे.

* * *

# प्रस्तावना

या धर्मपर व्याख्यानांचा संग्रह करण्याचा हेतु, त्या परम पूज्य, अत्यंत शुद्ध पायांची सेवा प्रत्यक्ष नाहीं, तर या रूपानें तरी घडावी हा आहे.

मुंबईस प्रार्थनामंदिरांत उपासना चालविण्याचे जेव्हां जेव्हां प्रसंग येत त्या त्या वेळीं, एकदा त्या प्रेममय रसाळ वाणीचा ओघ सुरू झाला कीं, हृदय उचंबळून यावें, मन तल्लीन व्हावें, क्षणांत प्रापंचिक दुःखांचा विसर पडावा, आशा व आस्था यांचा हृदयांत प्रवेश व्हावा; इतकेंच नाहीं, तर आपण कधीं कधीं साक्षात् स्वर्गसुखच अनुभवीत आहों असें वाटावें. हा प्रकार उपासना सुरू झाल्यापासून तों ती संपेपर्यंत चालत असे; एवढेंच नव्हे, तर तेथून घरीं आल्यावर सुद्धां, त्या प्रेमळ, पण मनावर पूर्णपणें संस्कार करणाऱ्या शब्दांनीं जागृत केलेले धर्मविचार पुढें एकसारखे तासांचेतास मनांत घोळत राहात; व आपल्याला आज कांहीं जास्त अधिकार प्राप्त झाला आहे, आपली योग्यता जास्त झाली आहे असें वाटून आनंद होई.

ती प्रेमळ, शांत व गंभीर वाणी प्रत्यक्ष ऐकण्याचें जरी आतां माझें भाग्य राहिलें नाहीं, तरी पण माझ्या हृदयस्थ असलेल्या मूर्तीच्या मुखांतून निघालेल्या अमृतवाणीचा– त्या पवित्र गंगेचा– आश्रय केला, तर अशा दुःखांतही कांहीं समाधानाला जागा होईल व मनाला स्थैर्य व शांति येण्याला तीच प्रसादवाणी सर्वांशीं कारणीभूत होईल, असा मला पूर्ण भरंवसा वाटत आहे. आपल्याला नंदादीप लावण्याचें सामर्थ्य नसेल, तर तेवत असलेल्या नंदादीपाची नुसती वात सारली, तरी पुण्य घडतें, असें वाडवडील सांगत आले आहेत. दुसऱ्यानें लाविलेल्या नंदादीपाची वात सारण्याचें श्रेय इतकें आहे; आणि हा जो उपदेशरूपी उज्ज्वल ज्ञानदीप स्वत:च लावून ठेवण्यांत आला आहे, त्याची वात सारण्याचें काम माझेंच आहे, हें जाणून मी आज उपलब्ध असलेलीं धर्मपर व्याख्यानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करीत आहें. हीं मजप्रमाणें इतर वाचकांसही कल्याणप्रद व्हावीं, हेंच देवाजवळ अनन्यभावानें मागणें आहे.

ह्यांपैकीं पुष्कळ व्याख्यानें रा. रा. दिनानाथ विष्णु माडगांवकर, बी. ए. व **सुबोधपत्रिके**च्या मराठी बाजूचे संपादक रा. रा. द्वारकानाथ गोविंद वैद्य ह्यांनीं लिहून काढिलीं व **सुबोधपत्रिकेंत** प्रसिद्ध केलीं आहेत. त्याचप्रमाणें यांतील कांहीं व्याख्यानें **सुधारक, मुंबईवैभव** व **ज्ञानप्रकाश** या पत्रांतूनही घेतलीं आहेत, हें येथें सांगितलें पाहिजे.

अनुक्रमणिका

हा संग्रह करण्याचे व पुस्तक छापवून प्रसिद्ध करण्याचे कामीं रा. द्वा. गो. वैद्य ह्यांचें मला जें साह्य मिळालें त्याबद्दल मी त्यांची फार आभारी आहें. रा. रा. वैद्य यांच्या मदतीशिवाय हें काम इतक्या लौकर तडीस गेलें नसतें, इतकें सांगितलें, म्हणजे त्यांनीं आस्थापूर्वक व एकनिष्ठपणें केलेल्या श्रमांची वाचकांस कल्पना होईल.

**रमाबाई रानडे**

लोणावळें, ता. २५
जानुआरी सन १९०२.

* * *

# उपोद्‌घात

प्रार्थनासमाजाची स्थापना झाली त्या वेळेस धर्माचीं सहा मूळ तत्त्वें कल्पून तीं ज्यास मान्य तो समाजांत प्रविष्ट होण्यास अधिकारी होईल, असा निर्बन्ध करण्यांत आला. परंतु प्रपंचांतील बिकट प्रसंगीं अंतःकरणांत चिंता, क्षुब्धता आणि भीति उत्पन्न होतात, त्या निरस्त होऊन त्या धर्माच्यायोगें समाधान, शांति, आणि धैर्य उदित व्हावीं आणि एकंदरींत अंतःकरणांत सद्‌वृत्ति स्थिर होऊन सदाचरणाची प्रवृत्ति व्हावी, असें स्वरूप त्या धर्मास येण्यास भिन्न भिन्न प्रकारांनीं त्या सहा तत्त्वांचा विकास व्हावा ही गोष्ट आवश्यक होती. हा विकास समाजासंबंधानें जे थोडे उपदेशक झाले त्यांणीं बऱ्याच अंशीं केला आहे. परंतु त्यांणीं दिलेलीं व्याख्यानें समग्र कोणीं लिहून काढलीं नाहींत. कांहींचा सारांश **सुबोधपत्रिका** म्हणून समाजाचें जें साप्ताहिक पत्र आहे त्यांत छापून प्रसिद्ध झाला आहे. त्याशिवाय निबंधही थोडेसे त्या पत्रिकेंत छापले आहेत, आणि स्वतंत्र छापलेले असेही कांहीं मराठी व इंग्रजी लहानसे ग्रंथ आहेत. परंतु वर्तमान-पत्रांत छापलेल्या निबंधास किंवा उपदेशास स्थायिकपणा येत नाहीं, तो पाहिजे त्या वेळीं सांपडत नाहीं आणि सर्वच वाचावयाचे, तर भिन्न भिन्न ठिकाणीं तें असल्यामुळें ती गोष्ट दुष्कर होते. शिवाय वर्तमान पत्रांचें सर्व अंक जपून ठेवणारे गृहस्थ फारच थोडे. यास्तव धर्मविकासाचें आजपर्यंत जें उपदेशकांकडून काम झालें तें बहुतेक व्यर्थच गेलें असें म्हणावयाचें. या उपदेशांचा आणि निबंधांचा संग्रह करून स्वतंत्र पुस्तकरूपानें ते जर कोणी छापते, तर असा परिणाम झाला नसता. असा संग्रह करण्यापुर्ती ह्या कामीं आस्थाच कोणाच्या मनामध्यें उत्पन्न झाली नाहीं. परंतु धर्मसंबंधी आस्थेनें जें काम व्हावयाचें तें अकाळीं लोकांतरीं गेलेले जे आपले मित्र **रा. ब. माधवराव रानडे** त्यांच्याविषयीं त्यांची पत्नी "गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिङ्गं न च वयः" या न्यायानें परिचित वर्गांस मान्य अशा **रमाबाई** यांची असीम जी भक्ति तिच्यायोगें आतां होत आहे. रमाबाईंनीं लिहिलेली जी प्रस्तावना ती वाचली असतांना त्यांची पती-विषयीं परम पूज्य बुद्धि आणि प्रेम आणि तत्पूर्वक त्यांच्या गुणांचें सतत अनुध्यान अशा रीतीनें सुव्यक्त होतात कीं, वाचणाराचें मन सद्‌गदित झाल्याशिवाय राहात नाहीं. पुष्कळ परिश्रम करून पतीनें केलेले उपदेश तपासून हें पुस्तक त्यांनीं तयार केलें आहे, यामुळें धर्माची अभिवृद्धि इच्छिणारे जे त्यांच्यावरही या बाईंचे फारच उपकार झाले आहेत.

**रा. ब. रानडे** यांच्या उपदेशामध्यें नेहमीं कांहीं तरी मार्मिक अंश असे, आणि कोणत्या तरी एका तत्त्वाचा विकास केलेला असे. पुण्यामध्यें त्यांचा मुक्काम असतांना त्यांच्या उपदेशाचें मला श्रवण नित्य होई, त्या उपदेशांपैकीं या पुस्तकांत फारसे नाहींत. मुंबईस गेल्यानंतर त्यांनी केलेल्या उपदेशांचा बहुतकरून संग्रह आहे; तथापि दोन्ही ठिकाणीं झालेल्या उपदेशांची सरणी एकच. एकनाथस्वामींचीं वचनें घेऊन भागवतधर्माचें त्यांनीं जें उपपादन केलें त्यांतील सारांश असा आहे कीं, ज्ञानमार्ग आणि योगमार्ग हेच दोन खरे मानिले, तर पुष्कळ साध्या मनुष्यांस उन्नतीची आशा नाहीं असें होऊं लागेल.

कारण कीं, ते मार्ग अत्यंत दुष्कर, एखाददुसऱ्यासच साध्य. केवळ कर्ममार्गाचें अवलंबन केलें असतां जडता प्राप्त होते, अंतरात्मा विकसित होत नाहीं; परंतु भागवतमार्ग सर्वांस– साळचाभोळचांसुद्धां साध्य आणि त्याच्या योगें प्रेमळता, दया, क्षमा इत्यादि गुण अंतरात्म्याच्या ठायीं विकसित होतात. शिवाय हा मार्ग सर्व जातींच्या पुरुषांस आणि स्त्रियांस मोकळा आहे; त्याप्रमाणें वरील तीन नाहींत. म्हणून भागवतमार्ग म्हणजें देवाच्या ठायीं शुद्ध भावानें अनुराग आणि तत्पूर्वक त्याचें भजन आणि पूजन हाच श्रेष्ठमार्ग. शिवाय इतर मार्गांमध्यें केवळ सुख हाच उद्देश असतो. धर्माचें अवलंबन कां करावें याचें उत्तर सुख होईल म्हणून. विषयोपभोगानेंही सुख होतें, मग त्याचा त्याग कां करावा, याचें उत्तर त्यानें सुख अल्प व धर्मानें होणारें मोठें. तेव्हां हें तत्व स्वीकारिलें असतां अशी मति होण्याचा संभव असतो कीं, सध्या डोळचांपुढें सुख होत आहे तें टाका आणि ज्याच्याविषयीं आपणांस प्रत्यक्ष ज्ञान नाहीं तें मेल्यावरती होईल असा भरंवसा ठेवून धर्माचरणाचे कष्ट सोसा, इतका वेडेपणा कोणीं करावा ! तेव्हां डोळचांपुढचें सुख तेंच खुशाल भोगावें अशा मतीच्या योगानें धर्मभ्रष्टता होण्याचा संभव आहे. म्हणून धर्मानें साध्य सुख या मताचा परित्याग करून आपल्या स्वभावाचा जो दिव्य अंश त्याचा विकास करणें आणि दया, क्षमा, शांति इत्यादि जी दैवी संपद् ती संपादन करणें हें धर्माचें साध्य असेंच घेऊन चाललें पाहिजे; आणि हे मत भागवतधर्मामध्यें मुख्य मानिलें आहे. आलीकडील इंग्रजी ग्रंथांमध्यें धर्माचें साध्य happiness नव्हे, तर, blessedness हें आहे, हेंच मत **रा. ब. माधवरावांनी** आपल्या व्याख्यानांत विशदपणानें आणिलें आहे. तें सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. दुसऱ्या एका व्याख्यानामध्यें साध्य, सिद्ध आणि साधक हा त्रिवर्ग त्यांनीं प्रतिपादिला आहे. साध्य म्हणजे कर्ममार्गी, सिद्ध म्हणजे ज्ञानमार्गी व योगमार्गी आणि साधक म्हणजे भक्तिमार्गी आणि त्यांच्याही संबंधानें वरील विचारांचें उपपादन केलें आहे. दुसऱ्या कांहीं व्याख्यानांमध्यें "अवघें देखें जन ब्रह्मरूप" हें तुकोबांचें वचन घेऊन सर्व मनुष्यांमध्यें दिव्य भाव म्हणजे देवाचा अंश जो आहे त्यांचेंच अवलोकन आपण करावें हा उपदेश आहे. परंतु आपणांस अशी वाईट खोड लागली आहे कीं, दुसऱ्यांचे दोषच आम्ही पाहतों आणि कधीं कधीं बहुतकरून "पुढिलांचे मना आणी गुणदोष। पूज्य आपणास करावया" या तुकोबांच्या उक्तीप्रमाणें आपली महती व्हावी हा उद्देश गर्भित असतो. हा प्रकार अत्यंत निंद्य, सर्वप्रकारें अधमपणाचा. तेव्हां यापासून आपण नेहमीं फार दूर राहण्याविषयीं सावध असावें हा विषय **रा. ब. माधवरावजीं**च्या उपदेशामध्यें त्यांच्या नैसर्गिक सौजन्याच्यायोगें वारंवार येत असे. तो उपदेश सर्वथा ग्राह्य आहे; परंतु सर्व प्रसंगीं प्रसिद्धपणें पापें करणारे जे आहेत त्यांची आणि सतत पुण्यशील जे त्यांची एक कोटि होऊन पुण्यपापाचा भेद समाजांत नष्ट झाला असा परिणाम होऊं नये याविषयीं सावधानता असली पाहिजे. आपल्या समाजामध्यें पूर्वींपासून चालत आलेले जे धर्मपंथ त्यांतील ग्राह्यांशाचा आपण अवश्य संग्रह करावा असा कटाक्ष ठेवूनही **रा. ब. माधवरावांनीं** कांहीं व्याख्यानें दिलीं होतीं आणि या पुस्तकांतही त्या प्रकारचीं व्याख्यानें आहेत. विचारी पुरुषांस हें मत पूर्णपणें मान्य आहे.

एकंदरीनें पूज्य **रमाबाईंनीं** तयार करून छापविलेलें हें पुस्तक सत्यधर्मान्वेषणपर जे त्यांना आणि विशेषत: प्रार्थनासमाजाचे सभासदांना फार उपयोगाचें होईल. कांहीं व्याख्यानें तुटकशीं दिसतात, याचें कारण बोलत असतांना त्यांचे विचार टिपून घेणारा जो त्याला त्या सर्व विषयाचें ग्रहण न झाल्यामुळें, किंवा विस्मरण झाल्यामुळें, तीं तशाप्रकारचीं झालीं. शिवाय पुस्तक सांवत्सरिक तिथीच्या दिवशीं प्रसिद्ध करावें हा उद्देश होता, म्हणून घाई करावी लागली, त्यामुळें कांहीं दोष राहिले आहेत. ते पुढील आवृतींत निघून जातील.

पुणें, संगमाश्रम.<br>ता. २८।१।१९०२.

**रामकृष्ण गोपाळ भांडारकर**

* * *









# न्या. मू. महादेव गोविंद रानडे ह्यांचीं धर्मपर व्याख्यानें

# भागवतधर्म

## व्याख्यान पहिलें

मला कांहीं महिन्यांमागें अन्यत्र एकनाथमहाराजांच्या पुण्यतिथीनिमित्त भाषण करण्याचा प्रसंग आला होता. तेव्हां त्या साधुपुरुषाच्या चरित्रांतील विशेष म्हणजे भागवतधर्मप्रतिपादन हेंच होय, असें मीं म्हटलें होतें. त्यासंबंधानें महाराजांचा सुप्रसिद्ध ग्रंथ एकनाथी भागवत यांतून कांहीं वेंचे काढून भागवतधर्माचें स्वरूप व भक्तिमार्गाची योग, ज्ञान व कर्म, या तिन्ही मार्गांपेक्षां श्रेष्ठता एकनाथमहाराजांनीं कशी उत्तम रीतीनें दाखविली आहे तें समजून घेणें आपल्या समाजांतील बंधूंस इष्ट आहे असें वाटून एक रविवार आड टाकून त्या वेंच्यांच्या आधारानें भाषण करण्याचा माझा विचार आहे. आतां प्रथमारंभीं एक-दोन शंका निघण्यासारख्या आहेत. पहिली शंका ही कीं, एकनाथमहाराज होऊन गेले त्याला तीन शतकें झालीं. आपण एकुणिसाव्या शतकांत आहोंत, तर त्यांच्या वेळच्या स्थितीच्या व मतांच्या संबंधानें ज्या त्यांच्या उक्ति त्यांचा सांप्रतच्या काळीं काय उपयोग आहे ? सकृद्दर्शनीं, म्हणजे फक्त कालांतराकडे दृष्टि दिली असतां, या शंकेंत बराच अर्थ आहे असें वाटेल. सांप्रत इतर देशांत जी प्रगति होत आहे तशीच आपल्या देशांत होत आहे, अशा समजुतीनें हा आक्षेप घेण्यांत येतो. खरें पाहिलें तर आपण एकुणिसाव्या शतकांतील नसून त्याहून फार प्राचीन काळचे आहोंत असें म्हणावें लागेल; एकुणिसावें शतक वगैरे शब्द ज्या लोकांच्या बोलण्यांतील आहेत त्या पाश्चिमात्यांची व आपली तुलना केली असतां, आपण निदान पांच-सहा शतकें तरी त्यांच्या मागें आहोंत, असें प्रांजलपणें कबूल करावें लागेल. निरनिराळ्या ऋतूंमध्यें एकाच प्रवाहाचें पाणी कधीं स्वच्छ, कधीं गढूळ, कधीं कमी, कधीं अधिक असें असतें; तसेंच धर्मसंबंधानेंही आपल्या देशाच्या स्थितींत जें थोडें अंतर पडलें आहे त्यामुळें देशाची स्थिती निरनिराळ्या काळीं अनेक कारणांनीं निरनिराळ्या तऱ्हेची होते, हें जरी खरें आहे, तरी एकनाथबावा सोळाव्या शतकांत होऊन गेले त्या वेळची आपल्या भाषेची व समाजाची स्थिति पाहतां आपणही हल्लीं त्यांच्याच काळांतील आहोंत, असे म्हटले असतां प्रमाद होणार नाहीं. अलीकडे राजकीय प्रकरणांत जसा उद्योग व चळवळ दिसत आहे, तितकीच, किंबहुना अधिक, धर्मसंबंधानें निराशा व उदासीनता दिसून येते; त्यामुळें धर्माच्या खऱ्या स्वरूपाची समजूत लोकांस करून देण्याविषयीं व्हावा तसा यत्न होत नाहीं, म्हणून आपणां सर्वांस मान्य अशा साधु पुरुषांचे या अत्यंत महत्त्वाच्या बाबतींत काय विचार होते, हें माहीत करून घेणें आवश्यक आहे. दुसरे कोणी शंका घेतील कीं, तुकाराम, रामदास, ज्ञानदेव, एकनाथ इत्यादि महापुरुषांचीं वचनें व विचार तुम्हांस पसंत आहेत, तर तुम्ही त्यांचीं सर्व मतें व सर्व वचनें कबूल न करितां कांहीं निवडक वेंचे कां घेतां ? ही शंका चोहोंकडून ऐकूं येते. नाथांचे ग्रंथ वाचले असतां ते अद्वैतवादी होते व त्यांचे आचारविचार मूर्तिपूजकाचे होते, म्हणून प्रार्थनासमाजासारख्या द्वैतवादी मंडळीनें त्यांच्या वचनांचा आदर करावा असें म्हणणें कित्येकांस विपरीत दिसण्यासारखें आहे. परंतु खरा प्रकार असा आहे कीं, कसेही थोर पुरुष असले, तरी ते सर्व प्रकारें स्वतःसिद्ध असतात असें घडत नाहीं. ज्या काळांत त्यांचा जन्म होतो त्या वेळच्या आचारविचारांचा त्यांजवर परिणाम सहजीं घडतो. ते जरी सामर्थ्यानें व बुद्धिप्रभावानें इतर लोकांहून श्रेष्ठ असतात, तरी ज्याप्रमाणें पाण्याच्या प्रवाहाच्या उलट दिशेस जाणें कठीण असतें, त्याचप्रमाणें कालरूपी प्रवाहाच्या सर्वथा विरुद्ध जाणें फारच दुरापास्त आहे. या गोष्टीची सत्यता येशू ख्रिस्त, महंमद, तुकाराम आदिकरून साधु

अनुक्रमणिका

पुरुषांचीं चरित्रें पाहिली असतां चांगलीं कळून येईल. त्यांच्या ग्रंथांत त्या काळच्या आचारविचारांची पुष्कळ झांक असली, तरी त्या योगानें त्यांतील आध्यात्मिक संबंधाच्या ज्या विशेष उक्ति असतात त्यांची किंमत मुळीच कमी होत नाहीं. तसेंच, ते थोर पुरुष व आपण सर्व उदकाच्या प्रवाहाप्रमाणें एकसारख्या चालत आलेल्या कालप्रवाहाचे व कर्मपरंपरेचे परिणाम आहोंत; यामुळें त्यांचा व आपणां सर्वांचा निकट संबंध आहे, हें लक्षांत ठेवून त्यांच्या ग्रंथांत त्या वेळचीं कांहीं मतें आढळलीं, तरी त्यांतील विशेष गुणदर्शक शुद्ध, सरळ व सुविचाराचा जो भाग असेल त्याची योग्यता कमी न मानतां तो प्रांजल बुद्धीनें व आदरानें स्वीकारण्यास आपण तयार असावें, हेंच आपणां सर्वांस उचित होय. म्हणून वेदव्यासांनीं शुकाचार्यांस, शुकाचार्यांनीं परिक्षितीला, आणि ऋषभदेवांनीं जनकराजाला सांगितलेला जो संस्कृतभाषाबद्ध भागवतधर्म, ज्याचें निरूपण महाराष्ट्र भाषेंत एकनाथमहाराजांनीं फारच सुंदर रीतीनें केलें आहे, त्या भागवतधर्माचें, अथवा भक्तिमार्गाचें, ज्ञान करून घेणें अत्यंत श्रेयस्कर आहे.

केवळ योगमार्ग, अगर ज्ञानमार्ग, अथवा कर्ममार्ग स्वीकारून चालण्याचें मनांत आलें, तरी व्यवहारांत तदनुरूप वर्तन करणें थोडक्यांसच साधतें; म्हणून ईश्वरकृपेनें भक्तिमार्गाचे उपदेशक व आचार्य प्रत्येक युगांत होऊन गेले. शुकाचार्य, नारद व प्रल्हादादि वैष्णव साधूंनीं उपदिष्ट जो भागवतधर्म, अथवा भक्तिमार्ग, हा सर्व कालांची व सर्व देशांची एकवाक्यता करणारा धर्म आहे. त्याच्या स्वरूपाच्या मुख्य तत्त्वांचें एकनाथमहाराजांनीं केलेलें उत्तम वर्णन वाचण्यापूर्वी भागवतधर्म, अथवा भक्तिमार्ग, योगमार्गाहून श्रेष्ठ आहे असें त्यांनीं ज्या ओव्यांत सिद्ध करून दाखविलें आहे त्या पाहूं या.

> **इंद्रियें कोंडितां न कोंडती ।। विषय सांडतां न सांडती ।। पुढतपुढतीं बाधों येती ।। यालागीं हरिभक्ति द्योतिली वेदें ।। १ ।। इंद्रियें कोंडावीं न लागती ।। सहज राहे विषयासक्ती ।। एवढें सामर्थ्य हरिभक्तीं ।। जाण निश्चितीं नृपवर्या ।। २ ।। योगी इंद्रियें कोंडिती ।। ते भक्त लाविती भगवद्भक्तीं ।। योगी विषय जे त्यागिती ।। ते भक्त अर्पिती भगवंतीं ।। ३ ।। योगी विषय त्यागिती ।। त्यागितां देहदुःखी होती ।। भक्त भगवंतीं अर्पिती ।। तेणें होती नित्य मुक्त ।। ४ ।। दारा सुत गृह प्राण ।। करावे भगवंतासी अर्पण ।। हे भागवतधर्म पूर्ण ।। मुख्यत्वें भजन या नांव ।। ५ ।।**

वर लिहिलेल्या ओव्यांत "इंद्रियें कोंडितां न कोंडती" या ओवींत योगमार्ग, म्हणजे इंद्रियांचें संपूर्ण रीतीनें दमन करून त्यांचा नाश करणें, हा परमेश्वरप्राप्तीचा मार्ग असला, तरी तो दुःसाध्य आहे, म्हणून वेदांनीं हरिभक्तीचा उपदेश केला आहे, असें सांगून इंद्रियें व विषय हीं दोन्हीं दुर्जय आहेत, तरी त्यांस हरिभक्तीकडेस वळवून परमेश्वराला अर्पण केलें असतां अल्पायासानें भक्तांस भगवत्प्राप्ति कशी होते, त्याचें निरूपण थोडक्यांत महाराजांनीं केलें आहे. इंद्रियें आपणांस आडमार्गानें नेतात, तर त्यांस मार्गावर आणण्याच्या ऐवजीं त्यांस कृश व लंगडीं करून टाकण्याचा प्रयत्न करणें केवळ साहस आहे; व त्यापासून अंतीं त्रासाच्या व खटपटीच्या मानानें फायदा होणें कठीण आहे, असें मोठमोठ्या साधूंचें मत आहे. कृष्णार्जुनसंवादांत अर्जुनानेंही श्रीकृष्णास असाच आपला अनुभव कळविला आहे. त्याचप्रमाणें बौद्धावताराचीही एक कथा ऐकण्यासारखी आहे. शाक्यमुनीचें मन योगमार्गांतून कसें निघालें याबद्दल एक आख्यायिका अशी आहे कीं, सर्वसंगपरित्याग करून व राज्यपद झुगारून देऊन शाक्यसिंह तपश्चर्येनें कृश होऊन अरण्यांत फिरत असतां थकून एका झाडाखालीं बसले होते. इतक्यांत जवळच्या नगरांत जाण्याकरितां निघालेली एक नायकीण आपल्या साजिंद्याबरोबर शेजारच्या एका झाडाखालीं येऊन उतरली. स्वयंपाक तयार होण्यास अवकाश होता व रिकामें बसून वेळ जातां जाईना, म्हणून तिनें गायन करण्याच्या उद्देशानें साजिंद्याला सारंगी लावावयास सांगितलें. तारा चढवून पाहतां पाहतां सारंगी बरोबर लागेना, म्हणून त्यानें आणखी चढवितांच त्यांतून बऱ्याच तारा तुटून गेल्या. तें पाहून नायकीण साजिंद्यास म्हणाली, "काय रे ? तुला पलीकडल्या बैराग्याप्रमाणें वेड लागलें आहे काय ? ताणावें ताणावें तरी किती ? तुटेपर्यंत ताणावें कीं काय ? ताणणें युक्तीनेंच केलें पाहिजे." हे शब्द कानीं पडतांच शाक्यसिंहास आपल्या तपश्चरणाचा कंटाळा येऊन, ही मला चांगलीच गुरू मिळाली असें समजून, त्यांनीं योगाचें अनुष्ठान सोडून दिलें; व आत्मोन्नतीचा मार्ग शोधून काढण्यासाठीं ते स्वतंत्र

करावयास प्रवृत्त झाले. ढोंगी पोटभरू लोकांचा उपदेश सत्य मानून केवळ तन्निर्दिष्ट मार्गाचें अविचारानें ग्रहण अथवा अनुसरण करणें, धर्मप्रकरणीं अनिष्ट होय; तर आपण आपल्या ठिकाणीं स्वतः विचार केला पाहिजे. भगवद्गीतेमध्यें कांहीं ठिकाणीं संन्यासयोगाची प्रशंसा आहे. तरी एकंदरीनें पाहिलें असतां ज्ञानयोगाची योग्यता गीतेंत अधिक मानिली आहे; व ज्ञानयोगाहूनही कर्मयोगाची, म्हणजे कर्मफलत्याग करून भक्तिपुरस्सर देवावर विश्वास ठेवणें हा जो भक्तिमार्ग त्याची, योग्यता सर्वांहून श्रेष्ठ वर्णिली आहे. केवळ कर्मठपणाची योग्यता मुळींच मानिली नाहीं असें दिसून येतें. ऐन थंडीच्या वेळीं गार पाण्यांत बुडी मारून एकसारखें तासांचेतास बसणें, अथवा प्रखर उन्हाळघामध्यें ऐन दुपारीं चोहोंबाजूंस अग्नि पेटवून पंचाग्निसाधन करणें, अगर आसन घालून समाधि लावणें वगैरे जे तपाचे मार्ग आहेत त्यांनीं इंद्रियांची हेलना मात्र होते. अशा प्रकारच्या तीव्र तपानें इंद्रियदमन न होतां प्रसंगविशेषीं गडबड उडून जाते, ह्या गोष्टीचीं अनेक उदाहरणें विश्वामित्राच्या उग्र तपाचा भंग करण्यास इंद्रानें मेनका पाठविली असतां त्या ऋषीची कशी दशा झाली वगैरे पुराणांतरीं वाचलेल्या व ऐकलेल्या कथांवरून आपणां सर्वांस अवगत असतीलच. तर अशा दुष्कर भानगडींत न पडतां आपलें पापहरण होण्यास परमेश्वराची एकनिष्ठेनें व मनोभावानें प्रार्थना करणें, हाच मार्ग सुगम असून हल्लीं चालू असलेल्या सर्व धर्मांतील लोकांस मान्य होण्यासारखा आहे. योगमार्ग किंवा तपाचा मार्ग, म्हणजे ह्या संसाररूपी महासागरांतून स्वतःच्या सामर्थ्यानें व कौशल्यानें पोहून जाण्याचा मार्ग; तो ज्यांस साध्य असेल असे क्वचित दैवशाली पुरुष असतील, तर त्यांची निंदा किंवा अवहेलना करणें हा आमचा उद्देश नाहीं; परंतु त्यांचा-आमचा वाद इतकाच कीं, तुमचा मार्ग सामान्य जनांस अत्यंत दुर्गम आहे. भगवत्प्राप्तीचा मार्ग सर्वांस सुलभ असला पाहिजे. भगवत्प्राप्तीच्या संबंधानें इंद्रियनिरोध मुळींच नको, असें आमचें म्हणणें नाहीं. ईश्वरानें निर्माण केलेल्या अतिसुंदर सृष्टींतील सर्व पदार्थांकडे ते आपणांस संसारबद्ध करतील म्हणून डोळे घट्ट झांकून न पाहणें, अथवा मुळींच त्यांचें सेवन न करणें, हा भगवत्प्राप्तीचा मार्ग नव्हे; तर अत्यंत रम्य व सुखकारक असा जो परमेश्वर तोच युक्तिप्रयुक्तीनें आपल्या इंद्रियांचा मुख्य विषय होईल असें करणें; म्हणजे कानांनीं त्याचें स्तवन ऐकणें, डोळ्यांनीं अगणित तारागण, अफाट महासागर, उंच पर्वत, स्वच्छ व विस्तृत उदकप्रवाह, खोल दऱ्या वगैरे पाहून त्याच्या अपार सामर्थ्याचें व अगाध लीलेचें प्रतिबिंब आपल्या मनावर चांगलें ठसवून घेणें, तोंडानें त्याचे गुणानुवाद गाणें, पायांनीं देवालयांत जाणें, हें करण्यांत इंद्रियें रममाण झालीं, म्हणजे त्यांचें खरें दमन व वशीकरण होतें. ईश्वराच्या पवित्र इच्छेस अनुसरून निर्मिलेल्या पदार्थांचा मितपणानें उपभोग घेऊन त्यांचा दाता व उत्पन्नकर्ता जो परमेश्वर त्याची विस्मृति पडण्याइतकें त्यांच्या भोगांत गढून न जाणें, याच्या पलीकडे विषयत्यागाचीही जरूरी नाहीं. हें लक्षांत ठेवून इंद्रियांस चांगलें वळण देणें व त्यांस परमेश्वरसेवेस लावणें, हेंच इंद्रियांचें खरें वशीकरण व हीच भागवत-धर्माची पहिली पायरी होय, व हेंच मूळ संस्कृतांत ऋषभदेवांनीं जनकराजास आणि महाराष्ट्र भाषेंत आपणां सर्वांस एकनाथमहाराजांनीं सांगितलें आहे व त्याचें चांगलें मनन करणें आपणांस इष्ट व श्रेयस्कर आहे.

## व्याख्यान दुसरें

मागील खेपेस योगमार्गापेक्षां भक्तिमार्ग श्रेष्ठ आहे हें दाखविलें होतें. आतां ज्ञानमार्गापेक्षांही भक्तिमार्गाची योग्यता अधिक आहे हें साधु एकनाथ यांच्या वचनांनीं सिद्ध करून दाखवावयाचें आहे. त्यांच्या भागवतांतून मीं पांच ओव्या वेंचून काढिल्या आहेत. त्या ओव्या येणेंप्रमाणें :—

**न करितां वेदशास्त्रव्युत्पत्ति ।। ऐशिया अज्ञाना निजात्मप्राप्ति ।। सुगम जोडे ब्रह्मस्थिति ।। यालागीं हरिभक्ति प्रकाशिली देवें ।। १ ।। तें हें राया भागवत जाण ।। मुख्यत्वें भक्ति प्रमाण ।। भावें करितां भगवद्भजन ।। अज्ञान जन उद्धरती ।। २ ।। स्त्रीशूद्रादि अधवे ।। घालूनियां**

**ये नावे ।। एकेच खेपे स्वयें न्यावे ।। भजनभावें परतीरा ।। ३ ।। येथें पोहणेंयाविण उतरणें ।। प्रयासेंविण प्राप्ति घेणें ।। सुखोपायें ब्रह्म पावणें ।। यालागीं नारायणें प्रकाशिली भक्ति ।। ४ ।। भागवतधर्माची स्थिति ।। भाळींभोळीं भवाब्धि तरती ।। सुखोपायें ब्रह्मप्राप्ति ।। तेचि श्लोकार्थी विशद सांगे ।। ५ ।।**

जसे योगमार्गी प्राचीन काळीं होते, आतां नाहींत असें नाहीं, तसेच ज्ञानमार्गी पूर्वीप्रमाणेंच प्रस्तुतही आहेत. योग हाच केवळ परमेश्वरप्राप्तीचा मार्ग आहे, असें जरी आपणांस मान्य नाहीं, तथापि योगाचें मुख्य साधन जें तप त्याचें अवलंबन केल्यानें जीं कांहीं फळें प्राप्त होतात त्यांकडे सर्वथैव दुर्लक्ष करतां येत नाहीं. परंतु तीं फळें योगमार्गापेक्षां सौम्य उपायांनीं साध्य आहेत व तद्वारा प्राप्त करून घेणें इष्ट आहे, एवढेंच सांगण्याचा माझा उद्देश होता. योगमार्ग दुष्कर आहे, म्हणून इंद्रियांस सर्वस्वीं मोकळें सोडतां नये. त्यांचा योग्य प्रसंगीं निरोध केला पाहिजे. त्यांस यथेच्छ वागण्यास मोकळीक दिली असतां आपण पशुवत् होतों. त्यांचा समूळ नाश करणें शक्य नाहीं; त्यांस युक्तिप्रयुक्तीनें चांगलें वळण लावून वश करून घेतलें पाहिजे. त्याचप्रमाणें ज्ञानाची गोष्ट आहे. ईश्वराची भक्ति करण्यास ज्ञानाची जरूरी आहे, तरी जसा योगमार्ग दुष्कर, अतएव सर्वांस साध्य नाहीं, तसाच प्रकार ज्ञानमार्गाचा आहे. आपल्या लोकांच्या जुन्या समजुतीप्रमाणें ज्ञान संपादण्यास वेदपठन व शास्त्राध्ययन केलें पाहिजे. चार वेद, सहा शास्त्रें व द्वैतमताचीं व अद्वैतमताचीं भाष्यें अवलोकन केलीं पाहिजेत. इतक्यानें सांप्रतच्या काळीं ज्ञानप्राप्ति पूर्ण होत नाहीं; कारण, इंग्रजी, ल्याटिन, ग्रीक वगैरे पाश्चिमात्य भाषांची चांगली माहिती करून घेऊन त्यांतील तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ वाचल्याशिवाय तत्त्वज्ञानाची पूर्णता होत नाहीं. इतकें करतां करतां मध्येंच आयुष्याची मर्यादा पूर्ण होते, व ब्रह्मप्राप्ति दूरच राहते.

योगमार्गात इंद्रियांचें सर्वथैव दमन करून विषयांचा सर्वथैव त्याग करणें, हा मुख्य भाग असल्यामुळें तो साधारण जनांस दुष्कर आहे; तसाच प्रकार ज्ञानमार्गाचा आहे. त्यांतही वर सांगितलेल्या अमित ग्रंथावलोकनाशिवाय दुसऱ्या अडचणी आहेत. त्यांतून मुख्य ही कीं, तो सर्वांस साध्य नाहीं; कारण, शूद्र व स्त्रिया यांस वेदशास्त्राध्ययनाचा अधिकार नाहीं अशी समजूत असल्यामुळें, त्यांस ब्रह्मप्राप्ति होणें शक्य नाहीं. शूद्र व स्त्रिया हे केवळ अज्ञानदर्शक शब्द आहेत, व त्यांमध्यें आपल्यासारख्या बहुतेकांची गणना होते. शूद्रांचें कसेंही आचरण असलें, तरी तो एकदम ब्राह्मण होत नाहीं; तो कनिष्ठ प्रतीचा शूद्र असल्यास श्रेष्ठ प्रतीचा होतो; पुढें वैश्य होतो; असा क्रमोपक्रमानें उंच वर्णांत जातो. परंतु तेंही त्याच्या हातून दोष न घडतील तर; नाहींतर पुनः अधःपात होतो. ब्राह्मणवर्णांत येऊन पुरुषजन्म घ्यावा तेव्हां पुढें ज्ञानप्राप्ति व ब्रह्मस्थिति मिळणार, असे समज आहेत. जे कोणी दैवशाली पुरुष योगमार्गानें मोक्षप्राप्ति करून घेण्यास समर्थ असतील त्यांच्याशीं, म्हणजे त्यांच्या शुद्धबुद्धीविषयीं, किंवा त्यांच्या मार्गाच्या सत्यासत्यतेविषयीं, आमचा मुळींच वाद नाहीं. आमचें म्हणणें इतकेंच कीं, जरी योगमार्ग व ज्ञानमार्ग हे दोन्ही खरे असले, तरी त्यांचा उपयोग फक्त फार थोडक्या निवडक लोकांस मात्र होण्याचा संभव आहे; परंतु आमच्यासारख्या अज्ञान, लंगड्या, थोटया, पांगळ्या व अंधळ्या लोकांची वाट काय? आम्हांला भगवत्प्राप्तीला मार्ग आहे कीं नाहीं ? वरील पांच ओव्यांत एकनाथबाबांनीं आमच्यासारख्यांस तरणोपायाचा मार्ग आहे असें सांगून, ज्ञानमार्गापेक्षां भक्तिमार्गाची श्रेष्ठता कशांत आहे, तें तिसऱ्या व पांचव्या ओवींत प्रतिपादिलें आहे, व ज्ञानमार्गी लोकांचा समज किती कोता व चुकीचा आहे, हें दाखविलें आहे. तिसऱ्या ओवींतील स्त्रीशूद्र व पांचव्या ओवींतील भोळेभाळे हे एकाच अर्थाचे शब्द आहेत; व ते केवळ अज्ञानदर्शक व दुर्बलतासूचक आहेत. ज्ञानप्राप्ति किंवा योगसाधन या दोन्ही लाभांस शूद्र व स्त्रिया अधिकारी नाहींत, अर्थात् त्यांस भगवत्प्राप्ति पुनःपुनः जन्म घेऊन पायरीपायरीनें शूद्रांनीं ब्राह्मण झाल्याविना, अथवा स्त्रियांनीं पुरुष झाल्याविना साध्य नाहीं, असें ज्ञानमार्गी व योगमार्गी यांचें मत आहे. हें माझ्या पदरचें मी सांगतों, अथवा आमचा प्रार्थनासमाज, किंवा ब्राह्मसमाज सांगतो असें नाहीं, तर साधु एकनाथ सांगतात कीं, परमेश्वरप्राप्त्यर्थ दुष्कर योगाची, अथवा दुर्लभ ज्ञानाची, बिलकूल जरूरी नाहीं. ज्ञान व योग या दोहोंपेक्षां भक्तिमार्ग अथवा भागवतधर्म श्रेष्ठ मानण्याचें मुख्य कारण हेंच कीं, तो सर्वांस मोकळा व साध्य आहे; मग तो पुरुष असो वा स्त्री असो, ब्राह्मण असो वा शूद्र असो. अशीं ज्या धर्माचीं, अगर मार्गाचीं, तत्त्वें

उदार आहेत तोच सामान्य जनांस उपयोगी व साध्य व त्यालाच भागवतधर्म म्हणावें. नाहींतर स्त्रियांना भगवत्प्राप्ति नाहीं व शूद्रांनाही नाहीं; त्यांनीं खुशाल बुचकुळचा मारीत रहावें, असें म्हणणें म्हणजे मानव-प्राण्यांपैकीं बहुतेकांस परमार्थ दुष्प्राप्य आहे, असें म्हणण्यासारखें होतें. ज्ञानमार्गानें ब्रह्मप्राप्ति करून घेण्यास शंभर वर्षांचें आयुष्य पुरेल किंवा नाहीं, याचा संशयच आहे. शिवाय मी शंभर वर्षे खास वांचेन व चार वेद, सहा शास्त्रें व सर्व मतांचीं भाष्यें वाचून पारंगत होईन व मला ब्रह्मप्राप्ति होईल असें कोण म्हणू शकेल ? वस्तुस्थिति पाहूं गेलें असतां सर्व प्रकार उलटच आहे. आज आहे, तो उद्यां नाहीं, व बहुतेकांची पन्नास वर्षांच्या आंतच या लोकींची वस्ती संपते. तर असे जे आम्ही अल्पायुषी, लंगडे, थोटे, अंधळे त्यांनीं योगसाधन व ज्ञानप्राप्ति कशी करावी ? आम्हांला सुगम, धोपट व सर्वांस सारखा अनुसरतां येईल असा मार्ग पाहिजे. आणखी दुसरी गोष्ट अशी कीं, आम्हां पंगु जनांला भवरूप दुस्तर सागरांतून एकाच खेपेस पैलतीरास नेऊन सोडणारी नौका पाहिजे. या दोन्ही सामान्य जनांच्या गरजा पुरविणारा असा एकनाथस्वामींनीं प्रतिपादन केलेला भागवतधर्मच आहे. ज्याप्रमाणें वर्षाकाळीं पंढरपुरीं चंद्रभागेस पूर आला असतां पैलतीरीं जाण्यास नावा असतात व अलीकडच्या कांठावरील लोक कसेंही करून पलीकडे नावेंतून जाण्यास उत्सुक असतात, तद्वत् आमची स्थिति आहे, व आम्हांस भवनदी पार होण्यास एकनाथबाबांनीं निरूपित जो भागवतधर्म, अथवा ब्राह्मधर्म, तोच सर्वांस सारखी उपयोगी पडणारी धर्मनौका आहे.

जे जुन्या समजुतीचे शास्त्री, पंडित लोक, चार वेद, सहा शास्त्रें वगैरे पढल्याशिवाय खरें ज्ञान होत नाहीं असें म्हणतात, अगर नवीन विद्वान लोक संस्कृत, ल्याटिन, ग्रीक व इंग्रजी ह्या भाषांत तत्त्वज्ञान्यांनीं रचलेल्या समग्र ग्रंथांचें आलोडन केल्याशिवाय परमेश्वर-स्वरूप समजणार नाहीं असा आग्रह धरून बसतात, त्यांस एकनाथबाबा पहिल्याच ओवींत असें उत्तर देतात कीं, संस्कृत वगैरे भाषा ज्यांस अवगत नाहींत, अथवा असल्या, तरी वेदादि गहन ग्रंथ समजण्याची शक्ति ज्यांस नाहीं, अशा अज्ञ जनांस तरणोपाय नाहींच म्हणतां, तर वस्तुतः तसें नाहीं; त्यांच्यासाठी देवानें भक्तिमार्ग सांगितला आहे. त्या भक्तिमार्गाचें स्वरूप दुसऱ्या ओवींत वर्णन करून भावानें भजन केलें असतां तेंच भवाब्धिपार होण्यास बरें आहे, व वेदशास्त्रपठनाची अथवा लेखन-वाचन येण्याची भाव व भक्ति यांच्याइतकी आवश्यकता नाहीं, अशा रीतीनें प्रतिपादन करितात. योगसाधनानें, अथवा ज्ञानप्राप्तीनें, परमेश्वरप्राप्ति करून घेण्याचें ज्यांच्या अंगीं सामर्थ्य असेल त्या धन्य पुरुषांची गोष्ट वेगळी; परंतु आमच्यासारख्या भाळचाभोळचांनीं आम्हांस तें उपलब्ध नाहीं म्हणून तिष्ठत कां बसावें ? त्यांनीं एकनाथबाबांनीं उपदिष्ट जो सोपा मार्ग तोच स्वीकारणें योग्य व इष्ट आहे. शिवाय ब्रह्मप्राप्ती म्हणजे काय ? केवळ ईश्वरप्राप्ति. तर साध्य विषय हा; आणि साधनोपाय कोणता ? तर म्हणतात संस्कृत शिका, चार वेद पढा, इंग्रजीचा अभ्यास करा, अमुक शिका, तमुक शिका ! परमेश्वरप्राप्तीला जर एवढे आयास व खटपट, तर तुमची आमची गति काय ? आपणांस प्राणवायू अर्धा तास तरी कोंडून धरतां येतो काय ? तर मग योगसाधनाची व तद्वारा ईश्वरप्राप्तीची गोष्ट कशाला ! दुसरे सांगतात, तुम्ही या जन्मांत थोडें पुण्य करा, इच्छा ठेवा, कशाची ? तर पुनः जन्म घेऊन पुण्य करण्याची. असें लक्षादि वेळ करा, मग ब्रह्मप्राप्ति होईल. परंतु असे उपाय सांगणारांस आमची नड काय आहे याचें ज्ञान नाहीं असें म्हटलें पाहिजे. आमचें घर परतीरास आहे; मध्यें नदीला मोठा पूर आला आहे; आतां आम्हांस एकदम घरीं पोहोंचण्याची उत्कट इच्छा असून उतावीळ करूं नका, धीर धरा, सात जन्म घ्या, मग कदाचित् घरास पोहोंचण्याची व्यवस्था होईल, असें योगमार्गी व ज्ञानमार्गी सांगतात. बरें, हे सांगतात त्याप्रमाणें इच्छा ठेवून पुण्यार्जनासाठीं– तो घेणें आपल्याच हातचें आहे असें घटकाभर मानून– पुनर्जन्म घेतला, तर त्यांत चूक होणार नाहीं, याची खात्री काय ? दोष घडला कीं, पुनः अधःपात ! अशा रीतीनें ब्राह्मणजन्म पावण्यास हजारों अडथळे व विघ्नें, व तो आल्याविना ज्ञान-प्राप्तीला अधिकारच नाहीं, मग ब्रह्मप्राप्ति दूरच. म्हणून तो त्रास आम्हांला नको; धीर धरवत असेल त्यांनीं खुशाल धरावा; रोग सहन करवेल त्यांनीं करावा; परंतु आमच्या पोटांत अतिशय दुखतें, त्याला कांहीं सत्वर गुण आणणारा औषधोपचार असेल, तर कृपा करून सांगा, असें मागणें असतें. या आमच्या व्याधीस एकनाथमहाराजांनीं दिव्य औषध वरील पांच ओव्यांत

सांगितलें आहे.

एके खेपेस पैलतीरास जाण्याच्या उत्सुकतेचा अनुभव बाहेरगांवच्या लोकांस असतो तसा मुंबापुरस्थांस नसतो. आषाढी एकादशीच्या यात्रेच्या संबंधानें चंद्रभागेवर मनुष्यांची दाट गर्दी असते. त्यांतून प्रत्येकाची इच्छा व ओरड असते कीं, एका खेपेस पैलतीरास न्या; परंतु माणसांच्या मानानें नावा थोडया असल्यामुळें तसें करणें मुष्किलीचें असतें. सकाळीं येऊन बसलेल्यांस संध्याकाळपर्यंत नाव मिळाली तर महद्भाग्य. परंतु भवसागर चंद्रभागेहून अनंतपटीनें दुस्तर आहे. आणि आम्हांस तर पोहतां येत नाहीं. पलीकडे एका खेपेंत जाणें आहे, पुनःपुनः फेरे नकोत; त्यांतून प्रत्येकांस एकदम आणि एकाच खेपेस पार पडून परमेश्वरप्राप्ति करून घेण्याची जी उत्कट इच्छा, ती सफल होण्यास व कोळीमाळी, स्त्रीपुरुष, लहानथोर, या सर्वांचा सुगम रीतीनें उद्धार होण्यास एक भक्तिमार्गच आहे व त्याचें अवलंबन केल्यानें ईश्वरप्राप्ति होते. भक्तिमार्गाचें अवलंबन जे करितात त्यांचाच भागवतसमाज; आणि त्या समाजाचा जो धर्म तो भागवतधर्म.

योगमार्गी व ज्ञानमार्गी यांस आमचें म्हणणें असें आहे कीं, ज्यांचें ज्ञान पाहूं गेलें असतां भोंपळ्याएवढें आणि योगसाधनास अधिकार व सामर्थ्य अति अल्प असे जे आम्ही, त्यांना गति काय ती सांगा. आम्हां थोटयालुळयांना देवदर्शन घेण्याची इच्छा आहे; परंतु हातांपायांस सामर्थ्य नाहीं, तर देवदर्शन कसें व्हावें ? विशेष इंद्रियनिरोध, विशेष योगसामर्थ्य, विशेष ज्ञान हें फार दुर्घट, अर्थात् भागवतधर्माचें यांतून कोणतेंही खरें स्वरूप नव्हे. ज्ञानमार्ग व योगमार्ग खरा किंवा खोटा याचा निर्णय करण्यासाठीं वाद वाढविण्यांत कांहीं अर्थ नाहीं; तरी ते आम्हांसारख्या भाळयाभोळयांस साध्य असे मार्ग नाहींत, यांत संशय नाहीं. कारण, ब्राह्मणांस विचारलें असतां ते सांगतील कीं, स्त्रियांस व शूद्रांस तर एका जन्मांत उद्धार करून घेण्यास मार्गच नाहीं. यावरूनच ज्ञानमार्ग थोडया निवडक मंडळीपुरता आहे असें उघड होतें. मग बाकीचे राहिले त्यांनीं काय करावें ? शिवाय ज्ञानदेवमहाराजांच्या चार भावंडांत त्यांची बहीण मुक्ताबाई हिची योग्यता जास्त होती, व तिचे बंधु तिजकडून ज्ञानप्राप्ति करून घेत वगैरे चरित्र पुष्कळांनीं वाचलेंच असेल. त्यावरून व पुराणादिकांत जीं स्त्रियांचीं अनेक विलक्षण उदाहरणें आढळतात आणि भक्तमाहात्म्यांत शूद्रांच्या आणि अतिशूद्रांच्या ज्ञानविशिष्टतेविषयीं व भगवत्प्राप्तीविषयीं जीं चरित्रें आहेत त्या सर्वांवरून ब्राह्मणांच्या वरील म्हणण्यास विरोध येतो.

दुसरा एक विचार आहे तो असा : आम्हीं कबूल केलें कीं, आतांपासून ज्ञानमार्गाच्या पाठीमागें लागणार. बारा वर्षे संस्कृताचा सतत अभ्यास करून पाहण्यास लागावें तों कित्येक प्रश्न करतात कीं, तुम्हीं सूत्रें व भाष्यें पाहिलीं काय ? त्या सर्वांचें अध्ययन करावयास आणखी बारा वर्षे घालविलीं; मग इतक्यानें तरी आटोपतें काय ? नाहीं. त्यांच्या संबंधानें पुनः अद्वैतसिद्धान्त पाहिला, अथवा द्वैतसिद्धान्तही पाहिला काय ? असा सवाल निघतोच ! बरें, द्वैत व अद्वैत दोन्ही पाहिले व दहा-वीस वर्षे घालविलीं, तरी कपाळाची कटकट सुटते काय ? नाहीं ! आणखी एक येऊन म्हणतो, द्वैताद्वैतानेंच ज्ञानाची पूर्णता होत नाहीं; विशिष्टाद्वैत पाहिलें पाहिजे. बरें, द्वैत, अद्वैत व विशिष्टाद्वैत या तिन्ही मतांचे ग्रंथ पाहिल्यावर त्यांतून आपण कोणतें स्वीकारावें, किंवा काय करावें हा विचार राहिलाच ! पाश्चिमात्य विद्येकडे पाहावें, तर तेथेंही असाच प्रकार. व्यक्तिमात्र जसा जसा विचार करतो तसें तसें त्यास शेवटीं असें अनुभवास येतें कीं, आपणास कांहींएक समजलें नाहीं, एवढेंच काय तें समजलें. आपणांमध्यें, तसेंच पाश्चिमात्य लोकांत, तत्त्ववेत्त्यांचा अखेरचा निकाल वास्तविकपणें असा आहे कीं, आपणास कळलें आहे असें जो समजतो त्याला कांहींएक कळलें नाहीं; व जो आपणास कळलें नाहीं असें समजतो त्यालाच थोडेंबहुत समजलें. शेवटीं एवढेंच कीं एका मनुष्याचें ज्ञान दुसऱ्यापेक्षां जास्त, त्याच्यापेक्षां तिसऱ्याचें जास्त; मिळून जास्त ज्ञान किंवा कमी ज्ञान, हें मनुष्यामनुष्यासंबंधानें निव्वळ सापेक्ष म्हणणें आहे. परंतु अत्यंत श्रेष्ठ मानवी ज्ञानाची ईश्वरज्ञानाशी तुलना केली असतां, एका पाश्चिमात्य पंडिताच्या म्हणण्याप्रमाणें, कांहीं एक कळलें नाहीं, हेंच खरें असें कबूल करावें लागेल. कारण, पूर्ण ज्ञान मनुष्यास साध्यच नाहीं, व एकपरी ज्ञान निष्फल आहे. कां ? तर असें पाहा कीं, आमच्यांतील महाविद्वान् अशा शास्त्र्यांची एक सभा भरविली. तर त्यांत कोणी द्वैतसिद्धान्ती, कोणी अद्वैतसिद्धान्ती, आणि कोणी विशिष्टाद्वैतवादी असतात, व ते एकमेकांचें मत

खोटें व व्यर्थ आहे असें आग्रहानें प्रतिपादन करितात; आणि वस्तुतः तिघांच्याही म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं असें आम्ही म्हणतों, इतकेंच नव्हे, तर महान् साधु पुरुषांचेंही असेंच मत आहे. कारण, जिज्ञासाबुद्धीचा भाग आपल्यांत फार थोडा असतो व वृत्तींला वश होऊनच आपलें वर्तन पुष्कळ अंशीं होत असतें; म्हणून वृत्तींला जर नीट वळण दिलें नाहीं, तर ज्ञान केवळ दुर्बल व व्यर्थ होतें; तें पोकळ नव्हे, शुष्क होय. तसेंच ब्रह्म सत्य, आणि जग केवळ माया, अतएव मिथ्या आहे, असें म्हणणारेही व्यर्थ बडबड करितात असें म्हटलें असतां चालेल; कारण, तें व्यवहारास मुळींच जुळत नसतें. असें प्रतिपादन करणाऱ्या एखाद्या शास्त्रीबावांच्या पायास एका लहानशा मुंगीनें चावा घेतांच ते आपलें मत व ज्ञान सर्व गुंडाळून ठेवून त्या मुंगीस मारण्यास प्रवृत्त होतात !

ज्ञानमार्गी व योगमार्गी भवनदींतून पोहून जाण्यास समर्थ असतील. आम्हांस तसें पोहतां येत नाहीं; त्याप्रमाणें इंद्रियनिग्रह आमच्यानें होणार नाहीं, व योगसाधन दुरापास्तच. म्हणून वृत्तींना, इंद्रियांना व संवयींना योग्य वळण लागेल असा सोपा मार्ग आम्हां भाळ्याभोळ्यांस पाहिजे. हें भक्तीपासून होणें शक्य आहे, तसें दुसऱ्या कशापासून होणें नाहीं. भगवद्भक्तीचा महिमाच असा आहे कीं, ती वाढतां वाढतां तिचा परमावधि झाला म्हणजे भगवंताचा हेतु तो सद्धेतु, त्याची इच्छा ती सदिच्छा असें होऊन त्याची इच्छा तीच आपली इच्छा बनून जाते. लहान बालक न बोलतां, न ओळखतां ज्याप्रमाणें आईकडे जातें त्याचप्रमाणें भक्तीचें वळण इंद्रियांस व बुद्धीस लागलें असतां तीं भगवंताकडेस वळतात. भागवतधर्म फक्त जाणून कांहीं उपयोग नाहीं, तर तें ज्ञान वृत्तींतच आलें पाहिजे. याप्रमाणें ज्ञानापेक्षां भक्तीचा महिमा अधिक कां हें एकनाथमहाराजांनीं वरील तिसऱ्या वचनाच्या ओव्यांत सांगितलें आहे, व त्याचें निरूपण मीं आजच्या प्रसंगीं यथामति केलें आहे; व प्रार्थनासमाजास हाच मार्ग श्रेयस्कर आहे.

## व्याख्यान तिसरें

मागचा प्रसंग झाल्यानंतर श्रोतृमंडळीपैकीं कोणीएकानें मला पत्र पाठविलें; त्यांतील मुख्य मुद्दा हा होता कीं, तुम्ही निरूपण करितां तें ठीकच आहे; परंतु निरूपणाच्या आद्यंतीं प्रार्थना करितां त्याची मात्र आवश्यकता काय, तें समजत नाहीं. हा प्रश्न प्रांजलबुद्धीनें व शुद्धभावानें केला आहे असें समजून त्याच्या संबंधानें चार शब्द बोलून मग आज निरूपण करीन.

परमेश्वर संपूर्णपणें ज्ञानगम्य आहे, असें जें ज्ञानमार्गानुयायी लोकांचें म्हणणें आहे त्यांत वादास बरीच जागा आहे, तें आपण गृहीत धरून चाललों तरी ' केवळ ज्ञानविषय जें ब्रह्म त्यापासून आपल्या जिज्ञासेचें समाधान होईल आणि प्रेमभक्ति बसण्यापूर्वी कोणत्याही विषयाचें ज्ञान होणें आवश्यक आहे,' ह्या म्हणण्यांत सर्व सत्य येत नाहीं. कारण ज्ञानसंपादन करण्याची इच्छा व बुद्धि यांचा आपण जीं कृत्यें करतों त्यांच्याशीं किती संबंध असतो हें तपासून पाहिलें, तर जिज्ञासा व बुद्धि यांच्या तृप्तीनें मनास शांति होत नाहीं असें आढळेल. परमेश्वरप्राप्त्यर्थ भक्ति होण्यापूर्वी त्याच्या स्वरूपाचें आपल्या शक्तीप्रमाणें ज्ञान झालें पाहिजे. हें जरी खरें आहे, तरी तें ज्ञान केवळ बुद्धीनें कांहीं प्राप्त होणारें नाहीं. कारण, परमेश्वर हृदयगम्य अथवा हृदयांतर्गत ज्या वृत्ति तद्गम्य आहे यांत संशय नाहीं. वृत्तींवर बहुधा आपलें आचरण अवलंबून असतें, म्हणून वृत्तींस अथवा हृदयास खरें समाधान होईल व त्यांस चांगलें वळण लागेल असें करण्यासाठीं भगवंताला वृत्तींच्या आंत आणावयास प्रयत्न करणें आवश्यक आहे. तसें होण्यास आपल्या अंतःकरणाची सिद्धता पाहिजे. ही होण्यास कांहीं बाह्य उपायांची योजना लागते. जसें सुस्नान, सुस्थल, रम्य एकान्त जागा वगैरे. सुस्नान केलें असतां चमत्कारिक प्रकारची मनाची प्रसन्नता असते; तसेंच उंच पर्वत, खोल दरी, शांत व विस्तृत नदी, अफाट समुद्र, यांमध्यें दिसणारी परमेश्वराची अगाध लीला पाहून त्याच्याविषयीं पूज्यबुद्धि व भक्ति विशेष रीतीनें जागृत होते. एकान्त स्थळीं बसलें असतां अन्यविषयव्यावृत्ति होऊन एकाग्रता होण्यास ठीक पडतें. तथापि या साधनांनीं परिपूर्ति होत नाहीं. इंद्रियें व मनोवृत्ति

अनुक्रमणिका

परमेश्वराकडे वळवून त्याच्यामध्येंच रममाण होतील व वृत्ति व हृदय ईश्वरमय होईल असें करण्यास सर्वोत्तम साधन प्रार्थना होय. उपासनेंत प्रार्थनेला मुख्य जागा देण्याच्या संबंधानें सर्व धर्मसंस्थापकांची एकवाक्यता आहे. ह्यावरून ईश्वरप्राप्तीच्या व ईश्वर-भजनाच्या सर्व साधनांत प्रार्थना प्रधान आहे असें सिद्ध होतें. उपासना म्हणजे ओतप्रोत प्रार्थनेनें युक्त असते. आदीं व मध्यें तर प्रार्थना असतेच व मध्यें जरी निरूपण अथवा उपदेश असतो, तरी प्रारंभीं प्रार्थना, मध्यंतरीं प्रार्थना, व शेवटास प्रार्थना केली, तर वावगें नाहीं, इतकेंच नाहीं, तर योग्यच होईल. निरूपण अथवा उपदेश हा उपासनेचा गौण भाग व प्रार्थना हेंच तिचें खरें स्वरूप म्हटलें असतां चालेल. असो.

मागील दोन प्रसंगीं योगमार्ग व ज्ञानमार्ग यांच्या-पेक्षां भागवतधर्म, अथवा भक्ति, थोर कशी हें अनुक्रमें दाखविलें. आज या दोहोंपेक्षां आपणांमध्यें व इतर पंथानुयायी लोकांमध्यें प्रचलित असलेला जो कर्ममार्ग त्याच्यापेक्षां भक्तिमार्ग थोर कसा, याविषयीं एकनाथ-महाराजांच्या वचनांचा विचार, त्यासंबंधाचे वेंचे आधारभूत घेऊन करूं या.

सृष्टींतून सर्व धर्मानुयायी लोकांमध्यें कर्ममार्ग असतो. व तो सर्वत्र विधिनिषेधरूपी म्हणजे शास्त्र-विहित कर्मे करणें व तन्निषिद्ध जीं त्यांचा त्याग करणें अशा प्रकारचा असतो. तो महंमदी धर्मांत आहे व ख्रिस्ती धर्मांत नाहीं. किंवा वेदोक्त धर्मांत आहे व झरतुस्ती धर्मांत नाहीं, असा प्रकार नाहीं. आपल्या या आर्यभूमींत त्याचें विशेष लक्षण जें आहे तें हेंच, कीं तो वर्णाश्रमधर्माशीं संबद्ध आहे. हें कर्ममार्गाचें स्वरूप व त्याचा वर्णाश्रमधर्माशीं अत्यंत निकट संबंध हीं दोन्हीं

**ज्यासी भगवद्भजनीं विश्‍वासू ।**
**विधिनिषेध त्याचा दासू ॥**
**देवोनि निजभजनविलासू ।**
**स्वयें जगन्निवासू सुखावे ॥ १ ॥**
**भजनप्रताप संतलक्षणें ।**
**स्वधर्मकर्मा ऐसें दंडणें ॥**
**वर्णाश्रमाचा ठाव पुसणें ।**
**होळी करणें कर्माची ॥ २ ॥**

या दोन ओव्यांत एकनाथमहाराजांनीं थोडक्यांतच अशा सुंदर रीतीनें व स्पष्टपणें सांगितलीं आहेत कीं, त्यांचा विस्तार करणें नलगे. एकनाथमहाराज सांगतात कीं, भगवंताच्या भक्तींत तल्लीन असून तद्द्वारा परमेश्वर-प्राप्ति होईल असा ज्या पुरुषाचा दृढ विश्वास आहे त्याचा विधिनिषेधरूपी कर्ममार्ग केवळ दास बनतो; म्हणजे त्या पुरुषावर इतर लोकांप्रमाणें कर्ममार्गाचा अंमल चालणें एकीकडेसच राहून, तो अशा महात्म्यापुढें हात जोडून दूर उभा राहतो व त्याला भक्तिजन्य आनंद होतो, इतकेंच नाहीं, तर परमात्म्यालाही त्याची भक्ति व भाव पाहून सुख होतें. हा वर्णाश्रमधर्मरूपी विधिनिषेधात्मक जो कर्ममार्ग त्याचें बंड या देशांत योग-मार्ग व ज्ञानमार्ग या दोहोंपेक्षां फारच अधिक असल्या-मुळें एकनाथमहाराजांचा त्यावर कटाक्षही अधिक आहे. योगमार्ग व ज्ञानमार्ग यांच्यापेक्षां भक्तिमार्गाची श्रेष्ठता सिद्ध करितांना ते कठीण, दुष्कर, व सर्वांस गम्य नाहींत एवढीच उणीव दाखविली आहे. योगमार्गी असें म्हणतात कीं, आसन, प्राणायाम, ध्यान वगैरे साधून इंद्रियांचा समूळ नाश अथवा मोड झाला पाहिजे, तरच भगवत्प्राप्ति होण्याची शक्यता; नाहीं तर नाहीं. या मार्गाचें काठिण्य आपणांस मी लक्षणानें दाखवितों, म्हणजे सहज खात्री होईल. योगमार्ग म्हणजे नदीस प्रचंड पूर आला असतां, सांगड वगैरे न घेतां व कोणाच्याही मदतीची अपेक्षा न करितां, बुडी मारून स्वतःच्या सामर्थ्यानें पोहून जाऊन अचानक पैलतीरास जाण्यासारखें आहे. असें ज्या भाग्यशाली पुरुषाच्या अंगीं महदभ्यासानें सामर्थ्य आलें असेल त्यानें काचा मारून, इंद्रियांचा निरोध करून, त्या मार्गाचें खुशाल अवलंबन करावें; त्यानें तसें करूं नये असें नाथांचें अथवा आमचें म्हणणें नाहीं. ज्ञानमार्गाकडे दृष्टि वळविली, तर तोही महा-पुरांतून कांहीं अंशीं स्वतःच्या सामर्थ्यानेंच, परंतु क्रमाक्रमानें पैलतीरास जाण्याविषयीं प्रयत्न करण्या-सारखा आहे. त्यांत धडपड करून पोहत पोहत निम्मीशिम्मी मजल झेंपावी; मध्येंच कांहीं चूक झाली असतां एखाद्या भोंवऱ्यांत सांपडून घोटाळावें व पुनः मागें, पुनः पुढें, याप्रमाणें पुढें जाण्यास प्रयत्न करावा, म्हणजे सुदैवानें कदाचित परतीर लाभेल असा हा मार्ग आहे. या दोन्ही मार्गांमध्यें भावाची मदत अथवा संतसमागमांचें साहाय्य यांचा अभाव असल्यामुळें तद्द्वारा भगवत्प्राप्ति दुर्घट, अतएव सामान्य जन त्यांच्या खटपटीस पडत नाहींत. परंतु कर्ममार्गाचा प्रकार कांहीं वेगळा आहे. त्याचे अनुयायी म्हणतात की, आम्हांस महापुरांतून पार जावयाचें आहे, परंतु

अनुक्रमणिका

तें नावेंत बसून जाऊं. या नौका, दानें, तीर्थयात्रा वगैरे अनेक प्रकारच्या आहेत. कोणी म्हणतो, मी सहस्र गोदानें करीन; कोणी म्हणतो, मी ब्राह्मण-भोजनें घालीन; कोणी म्हणतो, मी तीर्थयात्रा करीन; गंगेची कावड रामेश्वरास नेईन; रामेश्वराची वाळू विश्वेश्वरास वाहीन; काशीस जाईन; प्रयागास जाईन; जगन्नाथापासून द्वारकेस जाईन; पृथ्वीप्रदक्षिणा करीन; पुरश्चरणें करीन. या शेवटल्या दोहोंचा अंशतः योगमार्गांतही समावेश होतो. या मार्गाचा फैलाव फार, म्हणून भागवतधर्माशीं तुलना केली असतां "**ज्यासी भगवद्भजनीं विश्वासू। विधिनिषेध त्याचा दासू ॥**" असें म्हणून त्याचें दैन्य दाखविलें आहे, व "**स्वधर्म-कर्मा ऐसें दंडणें ॥ वर्णाश्रमाचा ठाव पुसणें । होळी करणें कर्माची ॥**" या वचनांत त्याचा ठाव पुसून टाकावा, म्हणजे मागमूस नाहींसा करावा व जाळून भस्म करावा अशा कडक शब्दांची योजना केली आहे. आणखी, योग, ज्ञान व कर्म या तिन्ही मार्गांत ज्या वेदशास्त्रांची मातब्बरी मान्य केली आहे त्यांचें मुळींच ज्ञान नसतांही भक्तिमार्गानें उद्धार होतो असें

> **जो श्रुतिस्मृति नेणता। भावें भजे भगवत्पथा॥ त्यासि विधिनिषेधबाधकता। स्वप्नींही सर्वथा प्रमाद न घडे॥ १॥ श्रुतिस्मृति दोन्ही डोळे। तेणेंविण जे आंधळे॥ तेही हरिभजनीं धांवतां भावबळें। पडेना आडखुळे सप्रेमयोगें ॥ २॥ ऐसे आचरितां भागवतधर्म। बाधूं न शके कदा कर्म॥ कर्मासि ज्याची आज्ञा नेम। तो पुरुषोत्तम भजनामाजी॥ ३॥ एवं भागवतधर्मे जे सेवक। स्वधर्मकर्म त्यांचे रंक॥ तें राहों न शके त्यां सन्मुख। मा कैंचि बाधक हों शकेल॥ ४॥**

या शेवटच्या दोन ओव्यांमध्यें ज्या भगवंताच्या आज्ञा वेदांस व तन्नियुक्त कर्मांस शिरसावंद्य तोच ज्यांच्या सप्रेम भजनामध्यें उभा असतो अशा भक्तांपुढें वर्णाश्रम-धर्मकर्में केवळ रंक होतात, असें एकनाथमहाराज म्हणतात. या शेवटच्या ओवींत "रंक" हा शब्द मुद्दाम योजिला असावा असें मला वाटतें. रंक शब्दाचा अर्थ सेवक असा नव्हे. रंक म्हणजे साधारण सेवका-पेक्षां कमी दर्जाचा नोकर – सेवकाचा सेवक. अमेरिकेंत वगैरे ज्याप्रमाणें सेवक निराळे व गुलाम अथवा दास निराळे, तशाच प्रकारचा भेद सेवक व रंक यांत आहे. प्रसंगीं सेवक आपल्या पुढें उभे राहूं शकतात,



परंतु रंकांस समोर राहण्याचाही अधिकार नाहीं. अशा रंकांच्या स्थितीस वर्णाश्रमधर्मकर्में पोहोंचलीं म्हणजे त्यांच्यापासून भवसागर तरण्याला, अथवा भगवत्प्राप्तीला अडथळा कसचा होणार? या सर्व वचनांवरून व वर्णाश्रमधर्माचा ठाव पुसा, स्वधर्म-कर्माला दंडा, म्हणजे आपल्या हुकुमांत ठेवा, कर्माची होळी, रांगोळी करा, असें सांगण्यावरून आमची तुमची तर काय, परंतु एकनाथमहाराजांची स्वतःची या वर्णाश्रमधर्मांतील विधिनिषेधरूप कर्ममार्गाविषयीं अश्रद्धा व तिटकारा हीं दिसून येतात.

आतां योगमार्गाविषयीं, किंवा ज्ञानमार्गाविषयीं इतकी अश्रद्धा एकनाथमहाराजांनीं दाखविली नाहीं आणि कर्ममार्गाविषयीं दाखविली याला एक सबळ कारण आहे. योगमार्गानें जडता कमी होते, निदान वाढत तरी नाहीं. आम्हां सर्वांना त्याचें अनुष्ठान थोडें-बहुत करावें लागतें. कारण, आपण इंद्रियांच्या अगदींच स्वाधीन झालों व त्यांस वाटेल तसें करूं दिलें, तर आपण केवळ पशु बनून जाऊं; म्हणून प्रत्येक व्यक्तीनें कांहीं अंशीं तरी इंद्रियनिग्रह केलाच पाहिजे. ज्ञानमार्गांत आपली जिज्ञासा व बुद्धि यांचा विकास होऊन आपण ज्ञान संपादन करितों व तेणेंकरून मतीचा विभ्रम दूर होऊन आपण चित्स्वरूप आहों असें कळूं लागतें व अर्थात् जडता कमी होते. योगमार्गांतील स्वतःच्या सामर्थ्यानें पोहून जाणें व ज्ञानमार्गांतील वरचेवर येणारे भोंवरे व चौऱ्यायशीं लक्ष फेऱ्यांतून पार पडणें हीं आम्हां-सारख्या भोळ्याभोळ्यांस दुःसाध्य असल्यामुळें नकोत. आम्हांस सोप्यांतसोपा सुलभ मार्ग पाहिजे. त्याचें दुसऱ्या एका वेंच्यांत एकनाथमहाराजांनीं वर्णन केलें आहे, त्याविषयीं पुढें मला विस्तारानें बोलावयाचें आहे म्हणून आजच्या प्रसंगीं निरूपण करीत नाहीं. या योगमार्गांतील व ज्ञानमार्गांतील अडचणी टाळण्या-साठीं कर्ममार्गाचें अनुष्ठान केलें, तर जडता अधिक वाढते व जे आपण चित्स्वरूप असतों ते जड बनतों. आपण चित्स्वरूप आहों, तरी शरीराचा संबंध असल्यामुळें जडता नैसर्गिकच आहे. याचें उदाहरण पाहिजे तर लहान बालकाकडे पाहावें; त्याला कांहीं वेळपर्यंत ऐकूं येत नाहीं, बोलवत नाहीं, मुळींच समजत नाहीं, अशी अगदीं जड स्थिति असते. नंतर जसजसें ज्ञान वाढत जातें तसतसें मनुष्य ज्ञानस्वरूप होऊन परिणामीं त्याला आपलें खरें स्वरूप कळूं लागतें. तसेंच

अनुक्रमणिका

आपलें ज्ञान वाढत जाऊन चित्स्वरूपतेचा लाभ झाला तरी जडता राहतेच. रात्रीचे दहा वाजले कीं, आपले डोळे मिटूं लागतात; क्वचित् झोंप वेळेवर तर काय, परंतु मुळींच येत नाहीं, असें होतें. परंतु ती रोगाची दशा– ती विकृत स्थिति– तो भाग निराळा. आम्हांस भूक, तहान लागावयाची ती लागते, हे सर्व जडतेचेच प्रकार आहेत. म्हणून ही जडता वाढविणारा जो कर्ममार्ग त्यावर एकनाथमहाराजांनीं विशेष कटाक्ष धरिला आहे, तो यथार्थ आहे. आजन्म तीर्थयात्रा करणारांच्या अंगीं पहावें तर जडता व अभिमान हीं मात्र वाढलेलीं दिसतात. सुक्षेत्रीं व सुस्थळीं जाण्याचे मुख्य उद्देश, परमेश्वराची अगाध लीला व चातुर्य पाहून त्याच्याकडेस मन वळावें, साधुसंतांचा समागम होऊन आपल्या अंगीं सद्‌गुणांची वृद्धि व्हावी हा आहे. तें अतिपरिचयामुळें एकीकडेसच राहून येथचें पाणी तेथें नेलें, तिकडची वाळू इकडे आणिली, यांतच कृतकृत्यता वाटून अभिमान वाढतो. यापलीकडे कांहीं खरा लाभ होत असेल असें दिसत नाहीं. जप, तप, होम, हवनें यांची तरी हीच दशा. म्हणे छप्पन्न लक्ष जप झाला. पहावें तर इतके वेळ मणी ओढण्याखेरीज दुसरें कांहीं झालें नाहीं ! लक्ष आवर्तनें झालीं; मनावर संस्कार पाहावा तर भोंपळ्याएवढें पूज्य ! एकंदरीनें या कर्ममार्गाच्या प्रकारांपासून जडता वाढते; व तितक्यानेंच भागतें असें नाहीं. तर अहंपणा इतका प्रबळ होतो कीं, आपल्याप्रमाणें कोणी केलें नाहीं, अथवा आपण जें कांहीं करतों त्याच्या उपयुक्ततेविषयीं कोणीं शंका काढली कीं, पायांची तिडीक डोक्यास चढून त्याची निर्भर्त्सना करावयास प्रवृत्त होतों. जप, तप, तीर्थें, व्रतें करून तामसीपणा व अभिमान कमी अथवा नाहीसा होण्याबद्दल सहनशीलतेवर पाणी पडलें, तर जडता वाढली नाहीं तर दुसरें काय म्हणावयाचें ? हा कर्माभिमान वाढत जाऊन आपल्या देशांत असा कांहीं विलक्षण प्रकार झाला कीं, देव अथवा देवता एकीकडेस राहून मंत्रासच देव मानूं लागले, आणि मंत्रयुक्त आहुति दिल्या असतां देवता खेंचून आणितां येतात इतकें सामर्थ्य मंत्रावर आरोपूं लागले !

गेल्या आठ-पंधरा दिवसांत, म्हणजे चातुर्मास्याला प्रारंभ झाल्यापासून, जिकडे पहावें तिकडे कर्ममार्गाचें बंड उचंबळलेलें आपल्या लोकांत फार दिसण्यांत येतें. चहूंकडे व्रतें, उपोषणें यांचेंच माहात्म्य दृष्टीस पडतें. तीं केल्यापासून ज्ञानप्राप्ति म्हणाल तर मुळींच नाहीं. मीं अमुक व्रतें व उद्यापनें केलीं, त्याच्या हातून तीं झालीं नाहींत, म्हणून मी थोर, मी पुण्यशील, तो लहान, तो पापी, मी आडवा, तुम्ही उभे, मी समोर, तुम्ही वांकडे वगैरे टिळ्यासारख्या यःकश्चित् गोष्टीच्या संबंधानें हाणामार होईपर्यंत वाद मात्र होतात. मुख्य भाग एकीकडेसच राहतो. केवळ कोणतेंही कर्म बाडवडील करीत आले, अथवा एखाद्या शास्त्रग्रंथांत सांगितलें आहे म्हणून करणारांचा प्रकार निराळा असतो. त्यांच्या संबंधानें एकनाथ महाराजांचें म्हणणें नाहीं. त्यांचा कटाक्ष कर्माभिमानी लोकांवर आहे; जडता आणणाऱ्या कर्माची होळी झाली नाहीं, हीं कोठें होतीं कीं नव्हतीं, याचा पत्ता नाहींसा केला नाहीं, व कर्माभिमान जाळून भस्म केला नाहीं, तोंपर्यंत भगवद्भक्तीच्या मार्गांत आपली प्रगति होणार नाहीं; म्हणूनच या मार्गावर महाराजांची करडी नजर आहे. कर्माभिमान व जडता हीं नाहींशीं करण्याचें, यांची होळी रांगोळी करण्याचें सामर्थ्य कोणाच्या अंगीं आहे म्हणाल, तर फक्त एका देवाच्याच आहे, हेंच

**ऐसे आचरितां भागवतधर्म ।**
**बाधूं न शके कदा कर्म ॥**
**कर्मासि ज्याची आज्ञा नेम ।**
**तो पुरुषोत्तम भजनामाजी ॥ १ ॥**

ह्या ओवींत सांगितलें आहे. कर्ममार्ग म्हणजे विधिनिषेध मुळींच पाळूं नये, असें महाराजांचें म्हणणें नसून, विधिनिषेधास आपला स्वामी होऊं देऊं नका; त्यास रंक करून ठेवा, हेंच ह्या ओव्यांचें तात्पर्य आहे. तुम्ही रस्त्यांत भेटलां तर नम्रतादर्शक नमस्कार, किंवा रामराम करावा, इत्यादि विहित आहे; तें करूं नये असें कोणीही म्हणणार नाहीं. परंतु फलाण्यानें नुस्ता नमस्कार केला, कीं रामराम केला, किंवा सलाम केला, कीं जयगोपाळ म्हटलें, इत्यादि पोकळ व द्वेष वाढविणारे वितंडवाद कर्ममार्गापासून उत्पन्न होतात, ते मात्र नकोत. त्यांच्यायोगें नम्रता वाढण्याचा उद्देश एका बाजूस राहून आपण जड होतों व अभिमानाचे दास बनतों. म्हणूनच कर्ममार्गाची नव्हे, तर तज्जन्य जडतेची, अभिमानाची, दुराग्रहाची व वैरभावाची होळी करा, त्यांचा ठाव पुसून टाका, मागमूस नाहींसा करा, असें महाराजांचें आग्रहपूर्वक सांगणें आहे. त्यांनीं म्हटलें आहे कीं :

अनुक्रमणिका

**भागवतधर्मे जे सेवक। स्वधर्मकर्म त्यांचे रंक॥**
यावरून वर्णाश्रमधर्म समूळ नाहींतसे करावे असें त्यांचें मत नसून. त्यांस रंक करावें, असें त्यांचें म्हणणें दिसतें. एखादा सधन मनुष्य पडत्या दशेंत आला व दरिद्री झाला म्हणजे त्यांच्याशीं जे पूर्वी अदबीनें वागणारे सेवक असतात तेच त्याच्या डोक्यावर बसावयास तयार होतात, तसें होऊं देतां नये. स्वधर्मकर्मांच्या व त्यांपासून होणाऱ्या जडतेच्या आणि अभिमानाच्या सर्वथा आधीन न होतां, त्यांस आपल्या दाबांत ठेवावें. स्वधर्मकर्माचरण बेतावेतानें केलें असतां त्यांत वाईट नाहीं, परंतु कर्मांचा व कर्मठपणाचा अभिमान वाढूं दिला, म्हणजे त्यापासून लढाया, मारामाऱ्या व रक्तस्राव होऊन धर्माची वृद्धि न होतां, उलट द्वेष व प्राणहानि निष्पन्न होतात, व शहरांचींशहरें ओस पडतात. असे अनर्थ होतात म्हणूनच कर्ममार्गावर, म्हणजे तज्जन्य अभिमानावर व जडतेवर, एकनाथमहाराजांचा विशेष रोंख आहे, व त्यांस आपले रंक म्हणजे त्यांनीं हात जोडून एका कोनांत उभें राहावें व आज्ञा होईल तेव्हां पुढें यावें असें करा, म्हणून त्यांनीं उपदेश केला आहे. व

**हैतुक अथवा अहैतुक।**
**वैदिक लौकिक स्वाभाविक॥**
**भगवंतीं अर्पे सकळिक।**
**या नांव देख भागवतधर्म॥१॥**

अशी एका स्थलीं भागवतधर्माची व्याख्या केली आहे. यासंबंधानें पुढें पुष्कळ बोलावयाचें आहे म्हणून आज येथेंच भाषण पुरें करतों.

## व्याख्यान चौथें

मागच्या तीन प्रसंगीं योगमार्ग, ज्ञानमार्ग व कर्ममार्ग या तिन्हीपेक्षां भागवतधर्म, अथवा भक्तिमार्ग, याची योग्यता अधिक कशी तें एकनाथस्वामीच्या भागवतांतील वेंच्यांच्या आधारानें मीं सांगितलें. आज ज्या तीन ओव्यांच्या वेंच्यांचा आधार घेऊन मी बोलणार आहें त्या केवळ मागें सांगितलयांचा उपसंहार आहेत; पूर्वीच्या तीन वेंच्यांमध्यें जें प्रतिपादन केलें होतें त्याचेंच थोडक्यांत पुनरुच्चारण आहे. एकनाथमहाराज सांगतात कीं :

**जो श्रुतिस्मृति नेणता।**
**भावें भजे भगवत्पथा॥**
**त्यासि विधिनिषेधबाधकता।**
**स्वप्नींही सर्वथा प्रमाद न घडे॥**

श्रुति म्हणजे वेद व स्मृति म्हणजे शास्त्रें, यांचें अध्ययन झालें असलेला पुरुष भगवद्भक्त असेल, तर ज्ञानाचें भक्तीला पुष्टीकरण होईल व तो मोठाच अधिकारी झाला; परंतु तशी स्थिती नसली व वर्णाश्रमधर्माप्रमाणें अधिकारी असो वा नसो, वेदशास्त्रें मुळींच जाणत नसला, तरी जर तो भावानें, एकनिष्ठेनें भक्तिमार्गास, अथवा भजनमार्गास अनुसरणारा असेल, तर त्याला विधिनिषेधरूपी वर्णाश्रमधर्माची बाधा, पीडा, किंवा प्रत्यवाय जागृतावस्थेत तर काय, परंतु स्वप्नांत तरी होईल अशी चुकी कधीं होणार नाहीं. वेदशास्त्रें न जाणणारे तुम्हांआम्हांसारखे अज्ञान जन जर भावानें भगवद्भक्ति करितील, तर त्यांस विधिनिषेधाची बाधा होणार नाहीं, असें एकनाथमहाराज प्रतिज्ञापूर्वक सांगतात. याच अर्थाचा विस्तार पुढल्या

**श्रुतिस्मृति दोन्ही डोळे। तेणेंविण जे आंधळे। तेही हरिभजनीं धावतां भावबळें। पडेना आडखुळे सप्रेमयोगें॥१॥ ऐसे आचरितां भागवतधर्म। बाधूं न शके कदा कर्म। कर्मासि ज्याची आज्ञा नेम। तो पुरुषोत्तम भजनामाजी॥२॥**

या दोन ओव्यांत फार मार्मिक रीतीनें केला आहे. श्रुतिस्मृतिरूप डोळे ज्यांस नाहींत (चर्मचक्षु बहुतेकांस असतात, परंतु ज्ञानचक्षु अथवा ज्ञानदृष्टि फारच विरळा) असे हरिभजनीं धावूं शकतात व अडखळून पडत नाहींत. ज्ञानमार्गानें ब्रह्मप्राप्ति करून घेण्यास जाणारांची फार त्रेधा उडते, त्यांस मुळींच धावावयास येत नाहीं; कारण, त्यांचें मन कधीं शंकारहित नसतें. त्यांस भगवंताची भेट होण्याचें एकीकडेसच राहून ते ब्रह्म निराकार, निर्गुण आहे, तेंच सत्य, इतर सर्व माया आहे; जग मिथ्या आहे वगैरे नाना प्रकारच्या शंकांत व वादांत पडून इतके घोटाळून जातात कीं, जसें पायघोळ धोतर नेसलेला मनुष्य जलदीनें चालावयास लागला असतां तें त्याच्या पायांत येतें व तो अडखळून पडतो, त्याचप्रमाणें त्यांची स्थिती होते. सदैव

अनुक्रमणिका

साशंक असल्यामुळें ते घोटाळतात. परंतु तुमच्या-आमच्यासारखे साळेभोळे अडाणी गरीब लोक जर भावानें, निष्ठेनें हरिभजन करितील, तर त्यांस तसे अडथळे येणार नाहींत. ज्ञानमार्ग्यांप्रमाणेंच योग्यांचा व कर्ममार्ग्यांचा प्रकार. कर्ममार्गांतील व्रतें, उद्यापनें करणारांस माहीत आहेच कीं, त्यांत किती हरकती येतात. साधारण सोवळेंओवळें मानण्याची रीति पाहूं गेल्यास तिजमध्यें किती तरी अडाणीपणा व विनाकारण त्रास असतो. पल्लिपतन म्हणून जो याच मार्गांतला अत्यंत अडाणी प्रकार आहे त्यांतच हातावर पाल पडली तर काय होतें; मनगटावर पडली तर काय होतें; बोटावर पडली तर काय होतें; पायांवर पडली तर काय होतें; उजव्या खांद्यावर पडली तर काय होतें; अशा शेंकडो असमंजस समजुती आहेत. अशा जडतेमुळें मनुष्याची प्रगती होत नाहीं. तो पुनःपुनः भोंवऱ्यांत सांपडून अडखळतो आणि पडतो. योगमार्गांत पाहूं गेल्यास तप, इंद्रियनिरोध इत्यादिकांत आपल्या हातून घडणारे दोष व चुक्या आड येतात, इतकेंच नव्हे, तर आपले जुने ग्रंथ वाचले असतां योग्यांस योगसाधनाचे वेळीं विघ्न करण्यासाठीं इंद्रादि देवता-सुद्धां अप्सरादि पाठवितात व त्यांमुळें त्यांचा योगभ्रष्ट होण्याचा संभव बराच असतो, असें तेथें आढळतें. परंतु भक्तिमार्गाची गोष्ट तशी नाहीं व त्या मार्गानें

**हरिभजनीं धावतां भावबळें ।**
**पडेना आडखुळे सप्रेमयोगें ।।**

असे सांगून एकनाथमहाराज प्रेम म्हणून जो त्याचा विशेष गुण त्याचें गौरव करितात. आपण योगमार्गाचा विचार केला, तर त्यांत कठोरपणाचें प्राधान्य आहे, असें दृष्टोत्पत्तीस येईल. घोर तप काय, किंवा इंद्रियें निर्विषय करून टाकण्याचा प्रयत्न काय, सर्वत्र कोमलता, सदयता वगैरे ज्या अंतःकरणाच्या चांगल्या वृत्ति त्यांचा विकास होण्याऐवजीं त्या नाहींतशा करण्याकडेच त्यांचें धोरण असतें. शांडिल्यांनीं भक्ति म्हणजे 'आत्यंतिकारक्तिः' अशी व्याख्या केली आहे; तिजवरूनही कोमलता, सदयता, मार्दव वगैरे सद्वृत्ति भक्तीमध्यें आहेत, असें सिद्ध होतें. प्रीति (परमेश्वरावर व मानवबंधूंवर) हेंच भक्तीचें मुख्य लक्षण, हाच तिचा मुख्य अधिकार आहे. योग, ज्ञान व कर्म या तिन्ही मार्गांमध्यें प्रीतीचा अभाव असतो. गोसांवी, बैरागी वगैरे योगमार्गाचे अनुयायी पाहिले, तर त्यांच्या अंगीं प्रीतीचा कांहींच भाग दिसत नाहीं; जो स्वतःविषयीं निष्ठुर व बेपर्वा असतो, तो दुसऱ्यांशीं कृपाळू कसा होईल ? ज्ञानमार्गांतही प्रेमाचा भाग नसतो. मनुष्याच्या मनामध्यें जी कोमलता अथवा मधुरता असते, जिच्या योगानें त्यास प्रसन्नता, समाधान व संतोष हीं प्राप्त होतात, तिचा संबंध ज्ञानमार्गाशीं मुळींच नाहीं. उलट ह्यांत अभिमानाची वृद्धि असते. पूर्वींची एक एक गोष्ट ऐकिली, तर या अभिमानाचें प्रस्थ अतिशय वाढलेलें दिसतें. काशीस जाऊन अध्ययन पुरें झालें, म्हणजे आपलें पांडित्य मिरविण्यासाठीं यज्ञोपवीतास एक वस्तरा बांधून शहरोशहरीं फिरावयाचें : व ज्या कोणास आपणाशीं वाद करावयास सामर्थ्य असेल त्यानें पुढें यावें; तो जिंकला गेला, तर त्यानें आपणास अजिंक्यपत्र द्यावें व आपण हरल्यास जिव्हा वस्तऱ्यानें कापून टाकावयाची, अशी कठीण प्रतिज्ञा करावयाची चाल होती. ज्ञानमार्गास अनुसरण्यांमध्यें वाढणारा अभिमान आपल्या लोकांतच असतो, व इंग्रजी, फारशी, मुसलमानी वगैरे विद्येंत व शास्त्रांत प्रवीण झालेल्या पंडितांत नसतो असें नाहीं. त्यांच्यामध्येंही आपापल्या मतांविषयीं व दुसरे सर्व पक्ष खोटे, आपला खरा, असें समर्थन करण्याविषयीं बराच आग्रह दिसण्यांत येतो. कारण, एकंदर ज्ञानमार्गाची गतच तशी आहे. आग्रह, म्हणजे ओढून घेणें, व प्रेम, म्हणजे सोडून देणें, पाझरणें; अर्थात् जेथें आग्रह असेल तेथें प्रेमाला स्थान नाहीं. यावरून असें होतें कीं, ज्ञानमार्गाचा योग म्हणजे अधिकार अथवा साधन, प्रेमरहित आहे. ज्ञानमार्ग्यांस परमेश्वरप्राप्ति होत असेल; नाहींच असें आपण कशास मानावें ? व त्यांस खरोखरच ती होणार असली, तर आमच्या न मानण्यानें थोडाच फेरबदल होणार आहे ! परंतु साधारण अनुभव असा आहे कीं, त्यांस अभिमानांधतेमुळें दुसऱ्यांविषयीं यत्किंचित् कळकळ नसते.

कर्ममार्गाचाही प्रकार असाच. जशी योगमार्गांत निष्ठुरता, कठोरपणा अधिक व ज्ञानमार्गांत अभिमान प्रबल; तशीच कर्ममार्गांत जडता विशेष असते. कर्ममार्गांत मनुष्य एकदा गढून गेला म्हणजे सारा जन्म ह्यांतच गुंतून असतो. या जडतेची मजल एथपर्यंत ठेपली आहे कीं, मागें वर्ष वर्षपर्यंत एक यज्ञ चालत असे. इतकी कर्माशीं एकरूपता व जडता झाली म्हणजे त्यापासून फायदा काय ? कारण, जडता व प्रेम हीं एके ठिकाणीं नांदत नाहींत. आपण चैतन्यस्वरूपी

अनुक्रमणिका

असतां जडतेच्या आधीन झालों, तर आपण प्रेमरहित होतों हाच काय तो संस्कार होतो. वीरवैष्णवादिकांचा जडतेचा प्रकार असाच असतो. एक जण एकादशीच्या दिवशीं निराहार राहतो; इतकेंच नाहीं, तर पोटांत पाण्याचा थेंबही जाऊं देत नाहीं. दुसरा कडक शैव असला, तर त्या दिवशी हटकून निदान दोनदा जेवतो! एक कपाळभर आडवें भस्म व गंध लावितो; तर दुसरा नाकाच्या मध्यापासून तों शेंडीपर्यंत उभी रेघ कोरितो! या सर्व कृतींत जडतेचें आधिक्य असून प्रेमाचा अंश फारच थोडा असतो. या मार्गास अनुसरणारे कोणी महात्मे प्रेमयुक्त वत्सल असतील, नाहींच असें म्हणणें योग्य नाहीं; परंतु साधारण भाग जडतेचा, ह्यांत संशय नाहीं. भक्तिमार्गाचा विचार केला, तर त्यांत मात्र मुख्य योग अथवा साधन व अधिकार कशाचा, तर प्रेमाचा. त्याच्यापुढें सर्व गौण. म्हणूनच एकनाथमहाराजांनीं म्हटलें आहे :

**ऐसें आचरितां भागवतधर्म ।**
**बाधूं न शके कदा कर्म ॥**
**कर्मासि ज्याची आज्ञा नेम ।**
**तो पुरुषोत्तम भजनामाजी ॥ १ ॥**

व या मार्गाचें गौरव केलें आहे.

परमेश्वर प्रेमस्वरूप व प्रेमाचें अधिष्ठान असल्यामुळें व त्यानें आपल्या अंतःकरणांत तें ठेविल्यामुळें ज्या मार्गाचा मुख्य अधिकार व साधन प्रेम तोच सुगम व त्याकडेस आपली प्रवृत्ति होणें साहजिक होय. कर्ममार्गानें जडतेचे पर्वत मध्यें आड येतात. ज्ञानमार्गानें अभिमान आड येतो, योगमार्गाचा कडकपणा व निष्ठुरता या मोठ्याच अडचणी आहेत; परंतु भक्तिमार्गांत तशी कांहींच आडकाठी नाहीं.

परमेश्वरापाशीं जावयाचें असलें म्हणजे राजवाड्यांत प्रवेश करूं इच्छिणारास जशा चौक्या लागतात तशा तीन चौक्या लागतात. पहिली निर्दय आरब पहारेकऱ्यांसारख्या योगमार्ग्यांची. तेथें गेलें म्हणजे चौकीदार विचारूं लागतात 'तुम्ही इकडे कशाला आलां? तुम्हीं तप वगैरे करून अधिकार मिळविला आहे काय? नसेल तर तें करा, नंतर इकडे या.' यांस चुकवून एकदा कसेंहीकरून पुढें मजल मारिली, तों दुसरी चौकी मुत्सद्यांसारख्या ज्ञानमार्ग्यांची लागते. तेथें प्राप्त झालें असतां 'तुम्ही काय वैद्य आहां; कीं पंडित आहां, किंवा कवि आहां?' अशी चौकीदारांकडून विचारपूस होते. तेथून सायासानें सुटून पुढे गमन केलें तों तिसरी, दरबारांत कसें जावें, कसें चालावें वगैरे सूचना देणाऱ्या कर्ममार्ग्यांची चौकी लागते. तेथें महाराजांच्या भेटीस जावयाचें तर कांहीं तरी नजराणा न्यावा लागतो; 'रिक्तहस्त आलां, कीं कांहीं भेट घेऊन आलां' वगैरे तपास तेथे होतो. या तीन चौक्या ओलांडून ज्याचें दर्शन व्हावें या उद्देशानें सर्व खटपट होते तो आंत असलेला राजा पाहावा, तर त्याच्या ठायीं क्रूरता नाहीं, अभिमान नाहीं; व निवळ प्रेमाखेरीज दुसऱ्या नजराण्याची अपेक्षा नाहीं असा तो असतो. या भक्तिमार्गाचा, अथवा प्रेममार्गाचा दरबार असा असतो कीं, तेथें आरब पाहरेकरी नाहींत; जज्ज, मुनसफ वगैरेंचा अटकाव नाहीं; तेथें नाण्यांचा नजराणा, किंवा फळेंफुलें कांहीं नकोत. फक्त प्रेमयुक्त भावाच्या द्वारें देवाचें दर्शन होतें. तो देव कसा आहे तें तुकारामबाबांनीं पुढील अभंगांत उत्तम रीतीने सांगितलें आहे—

**जो भक्तांचा विसांवा ।**
**उभा पाचारितो धांवा ॥**
**हातीं प्रेमाचें भातुकें ।**
**मुखीं घाली कवतुकें ॥ १ ॥**

भक्तांनी खटपट करून यावें; मग आपण भेट देऊं, म्हणून तो वाट पहात नाहीं. तर उलट उभा राहून हाका मारितो व तुमच्यावर माझें प्रेम आहे व तुम्हांमध्यें प्रेम ठेविलेंच आहे तें वाढेल असें करीन; मात्र तुम्ही मला ओळखा, असें सांगतो.

रामेश्वराकडे वगैरे दक्षिण हिंदुस्थानांत ज्यांनीं प्रवास केला आहे त्यांच्या पाहण्यांत शहराप्रमाणें एक एक मोठें देऊळ आलेंच असेल. त्या देवळांच्या सभोंवार एक एक तट असून त्याला दरवाजे असतात. तटाच्या आंत दुकाने, बाजार इत्यादि असतात. पुनः आंत तट व प्रत्येक दोन तटांच्या मधल्या जागेंत मनुष्यांची वस्ती अशी स्थिति असते. मुख्य द्वारीं कर्ममार्गाचे अनुयायी बसलेले असतात. त्यांचा हात ओला केल्याविना आंत गति होत नाहीं. आम्ही दक्षिण हिंदुस्थानांत फिरत असतां कांचीपुरास गेलों. तेथें शिव व विष्णु या दोन्ही देवांस मान असल्यामुळें एका बाजूस शिवाचें व दुसऱ्या बाजूस सुमारें तीन कोसांवर विष्णूचें स्थान आहे. शिवालय पाहावयास गेलों तेव्हां तेथचा एक वैष्णव मित्र आमच्याबरोबर

भिडेनें आला होता. आम्हांपैकीं कोणाच्या कपाळास भस्म नसल्यामुळें आम्हांस अटकाव झाला. स्थल पाहण्याची उत्कंठा फार होती, म्हणून जवळच भस्म पडलें होतें त्यांतून आम्ही कपाळास भस्माचे पट्टे ओढून, आंत जाण्यास सिद्ध झालों. परंतु या गोष्टीस आमचा वैष्णव मित्र कबूल होईना; व आपले टिळेनाम यांनींच आपला आंत प्रवेश होण्याची तजवीज करा असें म्हणाला. तें पाहून तेथील अधिकाऱ्यांनीं, 'ही ज्ञानवापी आहे; तुमचें एथें काम नाहीं; तुम्ही विष्णुपुरीस खुशाल निघून जावें,' असें आमच्या मित्रास निक्षून सांगितलें. ही गोष्ट कोणाची निंदा करण्याच्या, किंवा कोणास दोष लावण्याच्या उद्देशानें मी सांगत नाही. तर कर्ममार्गापासून होणाऱ्या जडतेचें व अभिमानाचें उदाहरण म्हणून सांगतों.

बरें. सर्व मार्गांचें अनुसंधान कोणीकडे, त्यांपासून साध्य काय, हें पाहूं गेल्यास पापापासून मुक्तता व भगवत्प्राप्ति व्हावी हेंच. होमहवने, जपतप, स्नानसंध्या या सर्वांच्या आद्यंतीं जो संकल्प असतो तो या व मागल्या जन्मजन्मांतरी झालेल्या पापक्षालनार्थ व परमेश्वरप्रीत्यर्थ आपण जें कांहीं कर्म करितों तें परमेश्वरास अर्पण करितों, असाच असतो. फरक इतकाच कीं, योगमार्ग, ज्ञानमार्ग व कर्ममार्ग या तिहींमध्यें सायास, त्रास, धोके व अडचणी भरपूर असून त्यांनीं निष्ठुरता, अभिमान व जडता अनुक्रमें वाढण्याचा बराच संभव असतो, व भक्तिमार्गांत खटपट, त्रास मुळींच नाहींत व फक्त प्रेमळ भावानें सर्व कार्यभाग होतो. या दरबारांतला राजा उठून आपण होऊन भक्ताच्या दारीं चालत येतो, म्हणूनच

**श्रुतिस्मृति दोनी डोळे । तेणेंवीण जे आंधळे ।।**

असे जे तुम्हांआम्हांसारखे साळेभोळे त्यांस सुलभ असा हा भजनमार्ग दाखवून त्याचें एकनाथमहाराजांनीं गौरव केलें आहे.

या भक्तिमार्गाची विशेष थोरवी यांत आहे कीं, ह्यांत जातिभेद, स्त्रीपुरुषादि भेद यांस जागा नाहीं व आवड-निवड नाहीं. माळी, कोळी, सोनार, कुंभार, चांभार, महार या सर्वांची संतमालिकेंत गणना आहे; तिजमधून मुसलमानसुद्धां वगळलेले नाहींत. भजनाच्या प्रारंभीं साधूंस नमन करण्याची चाल आहे. त्या वेळीं ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम वगैरे साधूंस नमनें झाल्यावर कबीर व शेखमहंमद यांसही नमन करितात. संतमालिकेंत गोरा कुंभार व चोखामेळा महार यांचा समावेश आहे. मुक्ताबाई, मिराबाई व कान्होपात्रा या स्त्रिया तिजमध्यें आहेत. अर्थात् वर्णाश्रमधर्माची या मार्गाला आडकाठी नाहीं; तो सर्वांस सारखा मोकळा आहे. शिवाय भक्तिमार्गाचें मुख्य साधन अथवा अधिकार, मनुष्यमात्रास साधारण जे प्रेम तें असल्यामुळें तो अधिक सुगम आहे.

रामोशी, भिल्ल वगैरे दरोडेखोर क्रूर लोक दुसऱ्यांचा अत्यंत निष्ठुरपणे खून करून द्रव्य हरण करितात. तरी त्यांच्या अंतःकरणांत आपल्या पोरांबाळांविषयीं ममता असते. व त्यांच्या उदरभरणार्थ ते निंद्य व घोर कर्में करितात. यावरून सर्वांस प्रेम असतें व त्याची गरजही असते, हें उघड आहे. प्रेमाची गरज कोणास नाहीं असें होणार नाहीं. या सुलभ भक्तिमार्गानें, अथवा प्रेममार्गानें, परमेश्वर जो प्रेमस्वरूप आहे व ज्याला प्रेमासारखी कशाची आवड नाहीं तो उठून चालत घरीं येतो. योग्यांच्या घोर तपश्चर्येनंतर समाधिदृष्टीनें दिसणारा, किंवा ज्ञान्यांच्या सर्व प्रकारच्या शंका दूर झाल्यावर भेटणारा, किंवा कर्ममार्ग्यांच्या शेंकडो यागहवनांनीं अथवा व्रतवैकल्यांनीं प्राप्त होणारा ईश्वर आपणांस नको व तो प्राप्त होण्यास आवश्यक जे आयास ते आपल्यास होणार नाहींत. फार खटपट व त्रास केल्याशिवाय प्राप्य असा ईश्वर आपणांस हवा. वेदशास्त्रांचा परमेश्वर दूर व दुःसाध्य. आपणांस संतचरित्रांतील संनिध असणारा व हाक मारतांच येणारा ईश्वर पाहिजे. पोटांत कळ येतांच आपण जसें 'आई आई' म्हणतों व ती वत्सल माता धावून येते, तसें 'राम राम' 'देवा देवा' म्हणतांच कनवाळूपणानें येणारा देव पाहिजे. देवानें भक्ताचे घोडे धुतले, सारथ्य केलें, त्याच्या यज्ञांत उष्टया पत्रावळी काढल्या वगैरे ज्या पुराणांतील कथा आहेत त्या वाचून अथवा ऐकून देवास हलकेपणा आणण्याचा कवीचा उद्देश होता अशी कुकल्पना मनांत न आणितां तो केवळ कवित्वाचा दोष, अगर कविलाघवाचा प्रकार असेंच मानणें चांगलें. व या गोष्टी ईश्वर भक्तांसाठीं स्वतः करण्याऐवजीं दुसऱ्याकडून करवितो असें म्हटल्यानें कांहीं कमी होत नाहीं. ख्रिस्ती लोकांचा जीवंत देव आपणांस पुरेसा नाहीं. तो जागृत व नेहमीं भक्तांच्या धांव्यास उभा पाहिजे. या अफाट सृष्टिरूपी घड्याळास एक वेळ किल्ली देऊन निद्रित झालेला अशा अलीकडील

ज्ञान्यांचा परमेश्वर आम्हांस नको; तर प्रसंग असेल त्याप्रमाणें वरचेवर चावी देणारा व भक्तांच्या साह्यार्थ उभा असल्याची साक्ष देणारा देव पाहिजे.

एकनाथमहाराजांनीं उपसंहाररूपी या वरील ओव्यांत प्रेम हाच ज्याचा मुख्य योग अथवा अधिकार, अशा भागवतधर्माचें माहात्म्य गर्भित रीतीनें वर्णन केलें आहे, तेंच मीं विस्तार करून आपणांपुढें यथामति ठेविलें, त्याचा आपण विचार करालच.

## व्याख्यान पांचवें

जुन्या शास्त्रीय रीतीप्रमाणें कोणत्याही विषयांचें स्वरूप कथन करावयाचें म्हटलें म्हणजे तें अन्वय-व्यतिरेकाच्या दृष्टीनें केलें पाहिजे. म्हणजे त्या विषयाचें इतर तशाच प्रकारच्या विषयांशीं कोणत्या गोष्टींत साम्य अथवा सादृश्य आहे आणि कोणत्या गोष्टींत असाम्य, किंवा भेद आहे हें सांगितलें पाहिजे. यासारखा कोणत्याही विषयांचें स्वरूप समजण्यास चांगला मार्ग नाहीं; म्हणून याच रीतीस अनुसरून गेल्या चार व्याख्यानांत ज्या एकनाथी भागवतांतील चार वेंच्यांच्या आधारानें भाषण केलें त्यांमध्यें भक्तिमार्गाचें योग, ज्ञान व कर्म या तीन मार्गांशीं साम्य किती आहे आणि भेद कोठें आणि कोणत्या प्रकारचा आहे हें सांगितलें.

भावानें भक्ति करावी आणि कर्मानें भक्ति करावी, अथवा योगानेंच भक्ति होते असें मानणारे लोक सर्व देशांत आणि सर्व धर्मांत आहेत; परंतु इतर देशांत एकाच तऱ्हेची मोडणी आहे आणि या देशांत सर्व तऱ्हेची मोडणी आहे. म्हणून भागवतधर्मामध्यें, म्हणजे भक्तिमार्गामध्यें, आणि इतर मार्गांमध्यें जो भेद आहे तो मागें निरूपण केला. आतां भागवतधर्मामध्यें जें भजन सांगितलें आहे तें कोणतें व ह्याचें खरें लक्षण काय हा प्रश्न निघतो, त्याचा एकनाथमहाराजांनीं ज्या ओव्यांत उलगडा केला आहे त्यांचा आज विचार करूं या.

**हैतुक अथवा अहैतुक ।**
**वैदिक लौकिक स्वाभाविक ।।**
**भगवंतीं अर्पे सकळिक ।**
**या नांव देख भागवतधर्म ।। १ ।।**

हेतु धरून जीं जीं कर्मे तुम्ही करितां, अथवा कोणत्याही फलप्राप्तीचा हेतु मनांत नसतां जीं कर्मे करितां, इतकेंच नव्हे, तर वैदिक, म्हणजे श्रुतिस्मृति-आदिकरून कर्ममार्गांत सांगितलेलीं; लौकिक, म्हणजे लोकाचारांचीं कर्मे, किंवा खाणें, पिणें वगैरे जीं स्वाभाविक कर्मे तुम्ही करितां, तीं सर्व तुम्ही करा. मात्र हीं कर्मे सहेतुक असोत वा हेतुरहित असोत, तीं सर्व तुम्ही परमेश्वराला अर्पण करा असा उपदेश आहे.

याच्या पुढच्या

**बाधूं न शके स्वधर्मकर्म ।**
**ऐक राया त्याचें वर्म ।।**
**मनीं प्रगटला पुरुषोत्तम ।**
**अतिनिःसीम निजबोधें ।। १ ।।**

या ओवींत पहिल्या ओवीचाच विस्तार आहे व भक्तिमार्गाचा अधिकार सर्वांस आहे हें प्रतिपादन ज्या ओव्यांत एकनाथमहाराजांनीं केलें आहे त्यांपैकीं तिसरीचें पुनरुच्चारण आहे.

आतां कोणी असा आक्षेप घेतील कीं, कर्ममार्गांत जितकीं म्हणून कांहीं कर्मे सांगितलीं आहेत तीं सर्व परमेश्वरालाच अर्पण करण्यांत येतात; कारण, त्यांच्या प्रारंभीं परमेश्वरालाच उद्देशून संकल्प होत असतो आणि समाप्ति झाली म्हणजे मग तीं जनार्दनस्वरूपी वासुदेवालाच अर्पण करण्यांत येतात. तर मग अर्पण करावयाचें तें आणखी काय राहिलें? त्यावर भक्ति-मार्गांतील अर्पण निराळ्या प्रकारचें आहे असें दाखविण्यासाठीं एकनाथमहाराज म्हणतात :

**जंव दृष्टी देखे दृश्यातें ।**
**तंव देवोचि देखे तेथें ।।**
**यापरी दर्शनातें ।**
**अर्पी भजन सत्ते दृष्टीचा विषयो ।। १ ।।**

आम्ही जेवढें कांहीं डोळ्यांनीं पाहतों त्या सर्व दृश्य विषयांत देव आहे, माता म्हणून आहे, पिता म्हणून आहे, कर्ता म्हणून आहे असें आम्ही पाहतों. मोठ्या नदीच्या तीरीं, उच्च पर्वतावर, अथवा इतर ठिकाणीं गेलों असतां परमेश्वराच्या दयेचा, चातुर्याचा आणि शक्तीचा भास आम्हांस असा झाला पाहिजे कीं, जो जो विषय आपल्या दृष्टीस गोचर होतो त्यांत देव

अनुक्रमणिका

आहे अशी मनाची वृत्ति होऊन जावी, व प्रत्येक डोळ्याचें पहाणें देवमय होऊन जावें.

हें भागवतधर्माचें अनुशासन दृष्टीला झालें. आणि हेंच भागवतधर्मानुयायांचें दृष्टीच्या संबंधानें कर्तव्य होय.

हें दृष्टीच्या संबंधानें सांगितलें. तद्वतच श्रवणाचाही प्रकार आहे.

**श्रवणेंचि यापरी श्रवण।**
**करितां उठिलें ब्रह्मार्पण ॥**
**हेतुरहित भगवद्भजन।**
**स्वभावें जाण स्वयें होतें ॥ १ ॥**

ध्वनि कानांत पडला असतां, ज्याप्रमाणें दृष्टीनें देवाचा बोध होतो, त्याप्रमाणें ध्वनींतसुद्धां ब्रह्मार्पण उठावें, म्हणजे तो ध्वनि ब्रह्मार्पण होत आहे, अथवा भगवंताची साक्ष आहे असें वाटावें. कीर्तनाचे व भजनाचे प्रसंगीं सारंगी, मृदंग इत्यादि वाजविण्यांत जें चित्त, ज्या मनोवृत्ति सैरावैरा धावत असतात त्यांची एकाग्रता करण्याचा हेतु असतो; म्हणजे इतर गोष्टींकडे लक्ष न जातां तें भजनाकडे लागावें, हाच मुख्य हेतु असतो. परंतु भजनाविषयीं एकतानता व्हावी तें एकीकडेस राहून नाद व ताल यांतच पुष्कळ वेळ मनुष्य गढून जातो म्हणून सर्वांत उत्तम उपाय म्हटला म्हणजे कानाला सर्व ध्वनींत ब्रह्मबोधाची सवय लावावी हा होय. कीर्तनांत रंग उठत नाहीं असें पुष्कळ लोक म्हणतांना आपण ऐकतों. यांत कांहीं दोष श्रोत्याचा आहे आणि कांहीं दोष वक्त्याचा आहे. कीर्तनकारास सारंगी, मृदंग इत्यादि साहित्याची आवश्यकता वाटावी, आणि श्रोत्यास कीर्तनांत रंग उठला नाहीं असें वाटावें, यावरून दोघांच्याही श्रवणांस ब्रह्मबोधाची सवय नाहीं असेंच अनुमान होतें. श्रवणाला ब्रह्मबोधाची सवय लागली म्हणजे सर्वत्र एकाग्रता होते. व प्रत्येक ध्वनि परमेश्वराची आठवण देतो. तसाच प्रकार घ्राणेंद्रियाचाही असला पाहिजे, हें पुढील ओवीवरून दिसून येईल.

**जो सुमना सुमनपण जोडी।**
**तो घ्राणाचें घ्राण होय आवडी ॥**
**मग नाना सुवास परवडी।**
**ब्रह्मार्पण मोडी निजभोग अर्पी ॥ १ ॥**

पूजेच्या ठिकाणीं दीप, घंटा, कापूर, धूप वगैरे कां असतात ? चक्षूंना, श्रवणांना, घ्राणाला संतोष वाटून परमेश्वराच्या ठिकाणीं तल्लीनता यावी म्हणून. परंतु कर्ममार्गामध्यें वरील उपकरणांसच प्राधान्य प्राप्त झाल्यामुळें व त्यांवरच सर्व लक्ष जात असल्यामुळें जडता उत्पन्न होऊन मूळचा हेतु व्यर्थ जातो. ज्या परमेश्वराच्या कृपेनें पुष्पास सुगंध प्राप्त झाला त्याची सूचना जर प्रत्येक गंधापासून घ्राणास होऊं लागली, तरच ते घ्राणाच्या संबंधानें भागवतधर्माचें कर्तव्य झालें.

आतां चौथें इंद्रिय जी रसना तिचा विचार करूं.

**रसना रस घेऊं जाय।**
**तंव रसास्वाद देवचि होय ॥**
**मग रसनेमाजी येऊनि राहे।**
**ब्रह्मार्पण पाहे रसभोगवृत्ती ॥ १ ॥**

रसना म्हणजे जिव्हा, प्रत्येक रसाचा स्वाद घेत असतां परमेश्वराच्या कृपेनें हा स्वाद मिळाला अशी जर रसनेस सूचना होऊं लागली, तर रसोपभोगाची लोलुपता नाहींशी होऊन भगवच्चिंतनाविषयीं एकाग्रता प्राप्त होते. रसास्वाद घ्या; श्रवण करा; दृष्टिसुख घ्या; परंतु त्या त्या इंद्रियाचा विषय देव करून घ्या. त्या त्या इंद्रियानें दृष्टिसुखाचा, श्रवणसुखाचा व रसस्वादाचा दाता जो परमेश्वर त्याला ओळखा, म्हणजे तुम्ही इंद्रियांचे स्वामी व्हाल, इंद्रियें तुमच्यावर स्वामित्व मिरवूं शकणार नाहींत. नाहीं तर वासनांचें निर्मूलन होणार नाहीं व पुनः विषय दृष्टीस पडला म्हणजे उपभोगेच्छा प्रबळ होऊन तुम्ही तद्वश व्हाल. चातुर्मास्यांत कित्येक लोक मीठ वर्ज करितात; परंतु त्यामुळें मिठावरील अभिरुचि कमी न होतां, केव्हां चातुर्मास एकदाचा संपेल आणि केव्हां मीठ खाईन अशी एकसारखी लालसा उत्पन्न होते ! दृष्टीचा किंवा श्रवणाचा, अथवा घ्राणाचा विषय देवालयांत आणण्याचा हेतु असतो एक, आणि परिणाम होतो भलताच. मशीदींत अथवा प्रार्थनेच्या स्थलीं रंग, वाद्य वगैरे उपकरणें कांहींच असतां कामा नये, असा महंमदी धर्माचा या संबंधानें कटाक्ष आहे. म्हणूनच मशीदीच्या भिंती, सभामंडप वगैरे पहावे तर सर्वत्र सफेत; रंग अथवा चित्रे दृष्टीस पडावयाचीं नाहींत. ख्रिस्ती देवळांत तीं जितक्यास तितकीं अगदीं बेताबातानें असतात. हिंदूंच्या देवळांत मात्र उपकरणांच्या संबंधानें पराकाष्ठा होऊन गेलेली असते. जितकीं असतील तितकीं थोडींच; सर्व प्राधान्य त्यांसच मिळत आहे. व भजन, कीर्तन यांच्याकडे दुर्लक्ष. हें पाहिलें

म्हणजे, एकपरी उपकरणें अगदींच नसलेलीं पत्करलीं असें वाटतें. असो. आतां स्पर्शाचा प्रकारही असाच आहे :

**स्पर्श घेईजे निजदेहीं ।**
**तंव देहींच प्रगटे विदेही ।।**
**मग स्पर्शी जें जें कांहीं ।**
**तो तो भोगूं पाही ब्रम्हार्पणें उठी ।।**

सुखोपभोगाची आशा आहे, परंतु तो येतो कोठून, त्याचा निर्माणकर्ता कोण याचा बोध आपणांस प्रत्येक वेळीं झाला पाहिजे. अशा रीतीनें स्पर्शसुख घेतलें, तर त्यापासून अपव्यय न होतां प्रत्येक स्पर्शाच्या वेळीं विदेही जो परमेश्वर त्याची आपणांस आठवण होते आणि अशा रीतीनें सर्व सुख ब्रह्मार्पण होते आणि मग

**जेउतें जेउतें चालवी पाये ।**
**तों तों मार्गु देवोची होये ।।**
**मग पाउलांपाउलीं पाहे ।**
**निजभजन होये ब्रह्मार्पणाशीं ।। १ ।।**

चालतांना आपण परमेश्वराच्या कृपेनें चालत आहों आणि जितका मार्ग आपण क्रमण केला तो परमेश्वराच्या कृपेनें केला असें समजावें. सर्व मार्गच आपला आहे व तो सर्व स्वपराक्रमानें क्रमितों, असें मानणें मोठी चुकी होय. सर्व सुखें आपलीं आहेत असें समजूं नये, तर जें सुख आपणास मिळालें तें परमेश्वराच्या कृपेनें आपणांस मिळालें असें मानून त्याचा सदुपयोग आपण करावा. आपण आगगाडींतून प्रवास करीत असलों, तर आपल्या तिकीटापुरता प्रवास करावा. तिकीटाबाहेर प्रवास करणें, किंवा सर्व आगगाडीच आपली आहे असें म्हणणें बरोबर होणार नाहीं; तद्वत् या सर्व विषयोपभोगांचा प्रकार आहे. दृष्टीचा काय, घ्राणाचा काय, कर्णाचा काय, जिव्हेचा काय, स्पर्शाचा काय, अगर गतीचा काय विषय पुढें आला असतां सर्वसमर्थ सृष्टिनियंत्यानें जे नियम घालून दिले आहेत त्यांप्रमाणें त्यांचा मितपणानें उपभोग घ्यावा; व तो घेतांना त्यांचा उत्पन्नकर्ता व दाता याचें चिंतन करावें, हाच आपला अधिकार, हेंच आपलें कर्तव्य. सारांश, नुसते टाळ वाजविले, रंग केले आणि जर देवाची भावना होत नाहीं, तर मग तो शुष्क कोरडा कर्ममार्ग झाला. त्यांत भजनाचें व भक्तिमार्गाचें स्वारस्य मुळींच राहिलें नाहीं. योगमार्गांत योगी विषय त्यागितात; परंतु देहाला अत्यंत क्लेश व दुःख करून घेतात. इतकें करूनही मनोवृत्तींचा धर्म झिटकारून टाकतां येत नाहीं. अगर त्यांचें उन्मूलन होत नाहीं. क्वचित् त्यांचा अंमल कमी करितां येतो; परंतु शरीरास व मनास क्लेश व दुःख न होतां तो कमी करण्याचें सामर्थ्य भक्तिमार्गाच्या अंगीं आहे, तसें दुसऱ्या तिन्हीं मार्गांत नाहीं. भक्त विषयोपभोग घेतात, सर्वत्याग करून बसत नाहींत. पण खुबी ही कीं, ते देवाला सर्व अर्पण करितात. आतां, खरा भागवतधर्म आपणास साधल्याची खात्रीलायक खूण म्हटली म्हणजे, इंद्रियाचा प्रत्येक व्यापार होत असतांना परमेश्वराचा आपणास बोध होतो कीं नाहीं, विषयांचें प्राधान्य – विषयांचा अंमल – नाहींसा होऊन आमच्या मनांत परमेश्वरास प्राधान्य मिळालें आहे कीं नाहीं याचा शोध बारकाईनें आपण केला, म्हणजे आपणास मिळतो. वृत्ति दंडून सिद्धि होणार नाहीं; झालीच तर वृत्तींस चांगलें वळण लावून त्यांचा क्षोभ कमी करून होणार आहे; हाच भागवतधर्माचा विशेष भेद; हेंच भागवतधर्माचें खरें स्वरूप होय.

## व्याख्यान सहावें

मागील प्रसंगीं जीं जीं कांहीं कर्में आम्ही करूं तीं भगवंताला अर्पण करावीं; मग तीं कर्में हैतुक असोत, वा अहैतुक असोत, असें सांगण्यांत आलें. म्हणजे कर्म करावें; परंतु फलाचें समर्पण परमेश्वरास करावें, हें भागवतधर्माचें मुख्य लक्षण व हें ज्याचें लक्षण तोच धर्म सर्व धर्मांत श्रेष्ठ होय असें सांगितलें.

ह्या म्हणण्यावर साधारणपणें एक असा आक्षेप घेण्यांत येतो कीं, संसार करावा म्हणून तर तुम्ही सांगतां; पण, संसार करीत असतां, नानाप्रकारचे व्यापार करावे लागणार. त्यांत फलाविषयीं आसक्ति, स्वतःविषयीं अभिमान, तसेंच फलप्राप्ति झाली नाहीं तर उद्वेग आणि विषाद हीं सहज उत्पन्न होणार. तर आसक्ति, अभिमान, उद्वेग, विषाद इत्यादिक असूं नयेत अशा रीतीनें उद्योगधंदे व इतर सर्व व्यवसाय कसे करावे ?



अनुक्रमणिका

**कर्माचरणीं समाधी ।**
**एक म्हणती न घडे कधीं ॥**
**ते पावले नाहीं निजात्मबोधीं ।**
**जाण त्रिशुद्धी विदेहा ॥ १ ॥**

प्रपंचांतील कर्माचरणें होत असतां त्यांत समाधि कशी लागेल? कारण, समाधि म्हणजे विषय मेल्यासारखे असावेत, व कर्माचरण करणें म्हणजे नानाविध व्यवसाय, व्यापार करणें. अशा रीतीनें मन जेथें सदा व्यावृत्त होणार तेथें कर्माचरणीं समाधि व्हावी तरी कशी? असा आक्षेपकांचा सवाल असतो.

ह्यावर एकनाथमहाराज म्हणतात :

**तटस्था नाहीं समाधी ।**
**म्हणे त्याची ठकली बुद्धी ॥**
**ते समाधी नव्हे त्रिशुद्धी ।**
**जाण नुसती मूर्छा आली ॥ २ ॥**

योग्याची जी समाधि आहे ती तटस्थपणाची आहे. ती खरी समाधि नव्हे. ती केवळ मोहभ्रमरूप असून एकदेशी आहे. ती केव्हांनाकेव्हां तरी बिघडणारी आहे. कारण, केव्हांनाकेव्हां तरी देहधर्माची इच्छा, प्रेरणा, चोदना होते व आघातामुळें, किंवा रागाच्या व्याप्तीमुळें समाधीचा भंग होतो. परंतु भागवतधर्माची जी समाधि आहे ती एकदेशी नाहीं. तिचा संबंध सर्वत्र आहे. भगवद्भक्तांच्या समाधीचा अधिकार असा संकुचित नाहीं. योगमार्गाच्या समाधींत मनुष्य कांहीं वेळपर्यंत तटस्थ असतो. परंतु अशा तटस्थपणाच्या ठिकाणीं खरी समाधि आहे असें जे म्हणत असतील, त्यांची बुद्धि ठकली, ते फसले. कारण, ही असली समाधि खरी समाधीच नव्हे. ती एक क्षणैक मूर्च्छा होय. ही क्रियावान् पुरुषाची समाधि नसून, मूर्च्छावान्, म्हणजे ज्याला मोह प्राप्त झाला आहे त्याची, एककाली, एकदेशी समाधि होय. कारण तिजपासून कांहीं क्रिया उत्पन्न होत नाहीं, हें एकनाथमहाराजांनीं दुसऱ्या ओवींत विशेष रीतीनें सांगितलें आहे. जे मंद म्हणजे मूर्ख आहेत ते ही योग्यांची समाधि एकदेशी व क्षणिक आहे ही गोष्ट सत्य मानीत नाहींत, हें

**ताटस्थ्यापासूनि उठिला ।**
**तैं तो समाधीस मुकला ॥**
**तेव्हां एकदेशी भावो आला ।**
**मंद या बोला न मानिती सत्य ॥ ३ ॥**

ह्या तिसऱ्या ओवींत सांगण्यांत आलें आहे.

**बुद्धी आकळिलें परब्रह्म ।**
**तें अहेतुक चाले कर्म ॥**
**हेंचि बुद्धीचें अर्पण परम ।**
**इतर तो भ्रम अनुमान ज्ञान ॥ ४ ॥**

बुद्धीचा लय देवाच्या ठिकाणीं होऊन, फलप्राप्तीची आसक्ति सोडून जें कांहीं कर्म मनुष्य करितो, तें सर्व परमेश्वराला अर्पण होतें. आणि अशा प्रकारें बुद्धीच्या योगानें जें फळाचें अर्पण करणें तेंच खरें अर्पण, त्यावांचून इतर सर्व भ्रम व अज्ञान आहे. आणखी

**ते स्वरूपीं निरवधी ।**
**भजनशील जहाली बुद्धी ॥**
**ते सफळ कर्मी समाधी ।**
**निजार्पणविधि स्वयें जाहली ॥ ५ ॥**

परमेश्वराच्या ठायीं बुद्धीचा लय झाला पाहिजे. अनन्यभाव झाला पाहिजे. हा लय इतका होणें अवश्य आहे कीं, परमेश्वराच्या व आपल्या इच्छेंत कांहींच अंतर राहतां कामा नये; म्हणजे परमेश्वराची इच्छा तीच आपली इच्छा होऊन राहिली पाहिजे. आणि जेथें परमेश्वराच्या भक्तीविषयीं प्रीति उत्पन्न झाली, व माता, पिता, शास्ता वगैरे जे आपल्याशीं परमेश्वराचे संबंध ते लक्षांत ठेवून त्याचे हेतु आपणाकडून सिद्ध व्हावे हीच आपली इतिकर्तव्यता असें वाटलें, तेथें सर्व कर्मांची समाधि झाली असें समजलें पाहिजे. अशा बुद्धीनें भजनशील होऊन जें अहैतुक कर्म करणें तीच कर्माचरणीं खरी समाधि. योगमार्गी लोकांना हें उत्तर आहे. खऱ्या समाधीला मुख्यत: दोन गोष्टी लागतात. एक निरवधित्व आणि दुसरी भजनशीलता. मी परमेश्वराचा सेवक आहें, दास आहें, अशाच बुद्धीनें जो कर्मांत, व्यवहारांत प्रवेश करितो, त्याची समाधि एकदेशी नसून सार्वत्रिक असते. ती अंगाचें प्रतिअंग होते; व अंगाच्या कवचासारखी राहते. मोहाच्या मूर्च्छेंत आणि योग्यांच्या समाधींत फारसें अंतर नसतें. आणि ह्याविषयीं अनुभवही असाच आहे. जो क्रियावान् पुरुष परमेश्वराच्या ठायीं बुद्धीचा लय करितो त्याची समाधि कल्याणप्रद व शांति आणि प्रसन्नता उत्पन्न करणारी असते. या मनुष्याला विषाद, उद्वेग होत नाहीं. तो सदा उल्हासवृत्ति असून, आनंद मानून, कर्म करीतच असतो. परंतु योगाधिष्ठ कोपिष्ठ असतात. समाधीच्या वेळीं त्यांस एकतानता असून आनंद होतो असें म्हणतात; परंतु समाधि उतरल्यानंतर शरीराला रूक्षता आणि

अनुक्रमणिका

कृशता प्राप्त होते. एकदा समाधि सोडली म्हणजे परत धरावयास मध्यें दोन-चार दिवस विसावा घ्यावा लागतो. समाधि घेऊन उतरली, म्हणजे पुनः रूक्ष व ज्वरित वाटतें व योगी कांहीं दिवस हल्लक असतो असें म्हणतात. पौष्टिक पदार्थांचा मिताहार करून कांहीं वर्षेपर्यंत असा प्रकार चालतो, परंतु शरीराच्या बलाबरोबर शरीरावर उलटसुलट व्यापार होतात व नंतर हा समाधि लावण्याचा उद्योग सोडून द्यावा लागतो. ही असली समाधि लावणारी मंडळी बहुधा रागीट असते. त्यांस अंतरंगीं शांति व बाह्यतः प्रसन्नता नसते. ही साधारणतः योगमार्गाची समाधि धारण करणारांची गोष्ट झाली. त्या योग्यांमध्यें वृत्ति सुप्रसन्न राहून शांतपणानें समाहित असणारे हरीचे लाल मुळींच नसतात, असें म्हणण्याचा भाग नाहीं. परंतु साधारण स्थिति ही अशी आहे.

परंतु भक्तिमार्गांतील कर्माचरणाच्या समाधीची गोष्ट तशी नाहीं. ती जितक्या अंशानें साधते, तितक्या अंशानें सुद्धां, म्हणजे एकच कर्म कां होईना, तें जर परमेश्वराला सर्वभावें अर्पण करून केलें, तर असें कर्म करणाराला जी समाधि प्राप्त होते, जो उल्हास प्राप्त होतो, तो निरवधि असतो व त्यायोगें त्याच्या मनाला अखंड शांति असते. ह्याप्रमाणें भगवंताला अर्पण करण्याच्या हेतूनें कर्म करीत असतां लोकांच्या प्रशंसे-पासून हर्ष, किंवा निंदेपासून विषाद होत नाहीं, व प्रत्येक कर्माच्या सभोंवतीं भक्तीचें कवच बनत जात असतें. हें कवच बनण्यापासून जितका फायदा, तितकेंच तें बनणें कठीण असतें; परंतु एकदा बनलें, म्हणजे मग त्यायोगें प्रसन्नता, अनुराग, शांति व एका प्रकारचें धैर्य उत्पन्न होतें. भक्तिमार्गांतील कर्माचरणाच्या समाधीची कला वेगळीच आहे; व इतिहासापासूनही या भागवत-धर्मांतील कर्माचरणाच्या समाधीची प्रतिष्ठा प्रत्ययास येईल.

## व्याख्यान सातवें

भागवतधर्माचें दैवत काय, त्याचे उपासक कोण, त्याची मुक्ति कोणती, हें निरनिराळ्या प्रसंगीं मागें एकनाथी भागवतांतील वेंच्यांच्या आधारानें सांगण्यांत आलें. आतां भागवतधर्माचें एक लक्षण सांगावयाचें राहिलें आहे, त्याचें विवेचन करून मीं ज्या व्याख्यान-मालिकेस प्रारंभ केला होता तिची परिसमाप्ति करा-वयाची आहे. परंतु हें विशेष लक्षण कोणतें आहे ह्याचा विचार करितांना विशेषेंकरून दोन गोष्टी सुचतात. धर्मशोधन, धर्मसंस्था, धर्माचे संप्रदाय व आचारशुद्धि यांचा उद्देश, या सर्वांचें रहस्य, काय तें सुखप्राप्ति, अशी साधारण समजूत आहे. सर्व धर्मांचा शोध सुख-प्राप्त्यर्थ असून कालतः व देशतः अखंड सुख मिळावें याचेकडे त्यांचा रोंख असतो. धर्माचें अनुसरण करा-वयाचें तें आपल्या या देशांत वैदिककालापासून प्रेय, म्हणजे ऐहिक सुख, व श्रेय, म्हणजे स्वर्गांत मिळणारें श्रेष्ठ सुख, यांची अखंड प्राप्ति व्हावी म्हणून करा-वयाचें, असा समज आहे. दानधर्म केला असतां दान करणाराला अन्य लोकीं मोबदला मिळतो, आणि धर्माचें पर्यवसान सुखप्राप्ति व त्या सुखाचा मृत्युलोकीं, किंवा स्वर्गलोकीं, खंड नसावा ही जशी आपल्या लोकांची कल्पना, तशी अन्य देशांतही सर्वत्र आढळ-ण्यांत येते. या समजुतींत सत्याचा कांहीं अंश नाहीं असें नाहीं, परंतु भागवतधर्माचें ह्या गोष्टींत जें विशेष लक्षण आहे– तें मी पुढें सांगेन– तें वैदिक व पौराणिक धर्मांत नव्हतें व उपनिषद्कालांतलेंही नाहीं. मूलतः व तत्त्वतः पाहिलें असतां धर्मानें साध्य सुख नाहीं, किंवा दुःखही नाहीं. हीं साधनें खरीं; तीं घोड्याच्या लगामाच्या दोन दोऱ्यांप्रमाणें आहेत. जसा सारथी दोन दोऱ्यांच्या तंत्रानें घोडे चालवितो, तसा ह्या दोन साधनांनीं मनुष्य परावृत्त अथवा प्रवृत्त होतो. धर्मानें प्राप्य अन्य कांहीं आहे. धर्ममार्गांत सुखाची रीति आहे व दुःखाची रीति आहे. केव्हां केव्हां दुःखाच्या साधनानें मनुष्याची चांगल्या मार्गांत प्रगति होते असेंही दिसण्यांत येतें. धर्माचा मुख्य उद्देश सुख, असाच सामान्यतः बोलण्याचा परिपाठ आहे; परंतु भागवतधर्माचा मथितार्थ अथवा उपदेश, त्यांचें प्रमेय, सुख मिळावें, किंवा दुःख टळावें हा नव्हे हें ज्यास समजलें नाहीं, त्यानें भागवतधर्माचें रहस्य जाणलें नाहीं, असे म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. वर सांगितलेल्या साधारण समजुतीमुळें धर्मबुद्धीला एकदेशी वळण

अनुक्रमणिका

मिळून वारंवार पतनाचे प्रसंग येतात, व मनाचे ठायीं खेद, उद्विग्नता, निराशा, उपद्व्याप व संशय हीं उत्पन्न होतात. अनेक प्रसंगीं असा अनुभव येतो कीं, धर्मास अनुसरून चालत असतां दुःख दुणावतें व सुख नाहींसें होतें, आणि मनाची स्थायिकता नष्ट होते. त्याचप्रमाणें मनुष्यमात्राचे व्यवहार पाहिले असतां अन्य प्रमेयावर, किंवा अन्य साध्यावर दृष्टि असते असेंही दिसतें. केवळ सुखाकडे दृष्टि न दिल्यानें शुद्ध मार्गावर असतांना संसाररूपसमुद्रांत हेलकावे बसतात, तेव्हां योजकानें अशी विलक्षण योजना कां केली आहे अशा कुतर्कांनीं व संशयांनीं आपलें मन डगमगत नाहीं. चांगल्या आचरणामध्यें फक्त आपल्या सुखावरच नजर नसते, याचीं अनेक उदाहरणें आढळतात व त्यांवरून सुखदुःख हेच हेतु नसतात, हें उघड होतें. मातेचें प्रेम घ्या. माता कष्ट कां करिते ? तर मुलाचें कल्याण व्हावें म्हणून. ती आपल्या सुखाकरितां झटते असें असतें, तर रात्रंदिवस जागरण व रक्ताचें पाणी करून मुलाच्या शरीररक्षणार्थ तिनें जोपासना केली नसती. परमेश्वराचें प्रेम कसें असतें तें उपमेनें दाखवितां येण्यासारखें नाहीं; तरी मातेचें प्रेम त्या अपार प्रेमाची किंचित् छाया आहे. बालकावर प्रीति करीत असतां, माता स्वतःच्या सुखाच्या आशेच्या मुळाशीं कुऱ्हाड घालते अशी त्या परमेश्वराच्या धर्माच्या छायेची व्यवस्था नीट लावावी तें सोडून, मुलानें पुढें आपणास उपयोगीं पडावें अशी स्वार्थबुद्धी मातेला आरोपून तिच्या निवळ प्रेमाला आपण शाई लावितों. त्याचप्रमाणें पवित्र आनंद कोणता ? तर मुलाचें हास्य पाहून मातेला होणारा आनंद, हें आपणांस सहज वाटतें. मातेला परिपाकानें परिणामीं मुलापासून सुखप्राप्ति होवो; परंतु तिचा तोच हेतु, अथवा उद्देश असतो, असें म्हणण्यानें मतीला भ्रंश मात्र होतो. या उदाहरणावरून धर्माचरणानें साध्य काय, याची थोडीबहुत कल्पना करितां येईल. बरें, पित्याचें वात्सल्य घ्या. पित्याची दगदग कां असते ? तो शेतीभाती, व्यापार-उदीम वगैरे अश्रांत खटपट करीत असतो व मुलाच्या पोषणाविषयीं व त्यास शिक्षादीक्षा देण्याविषयीं कळकळ बाळगितो तें केवळ मुलापासून आपणास पुढें म्हातारपणीं सुख व्हावें म्हणून नव्हे. ही बुद्धि कोठून आली ? तर ही पित्याची वत्सलताही परमेश्वराच्या धर्माची छाया आहे. या लोकीं सुखप्राप्तीच्या व स्वर्गीत वतनवाडी मिळण्याच्या इच्छेनें पित्याचे उद्योग होत नसतात. मित्राचा स्नेह घ्या. स्त्रीपुरुषांचें प्रेम घ्या. बंधुभगिनींचें सख्य घ्या. एकंदरीनें पहातां संसार धर्माची संस्था, अथवा रचना आहे व परमेश्वराचे वरिष्ठ धर्म ह्या ठिकाणीं अवतरलेले आहेत. कनिष्ठ दर्जाचे रामोशी, मांगसुद्धां पाहिले, तर तेही एकमेकांसाठीं झटतात, रडतात व हळहळतात असें दिसून येईल. सारांश, संसारयात्रा धर्मच आहे व तिजमध्यें परमेश्वराची कृपा एकसारखी वर्षत असते. राष्ट्रहितकर्ता जिवाचा बळि देतो– फाशीं जाण्यास तयार असतो –तोही स्वतःच्या सुखाकरितां नव्हे. सुखप्राप्त्यर्थ सर्व होतें ही कल्पना शुद्ध नव्हे. धर्माचा व सदाचरणाचा साध्य, प्राप्य हेतु सुख, किंवा दुःख, हीं दोन्हीं नाहींत. परमेश्वराच्या राज्यव्यवस्थेंत या दोहोंचें मिश्रण आहे. सिद्धान्ताची एक गोष्ट मनांत धरिली पाहिजे, ती ही कीं, सुखप्राप्ति अथवा दुःखनाश, ह्या केवळ धर्माच्या दोऱ्या आहेत व आपणांस घोड्याच्या ठिकाणीं विशेष योग्यता आणावयाची आहे.

## व्याख्यान आठवें

आज पंधरा दिवसांमागें भागवतधर्माचें मुख्य भूषण अथवा रहस्य काय हें सांगण्यास उपक्रम केला होता. त्या धर्माचें मुख्य भाग्य, वैलक्षण्य, अथवा रहस्य हें आहे कीं, जशी प्रचलित सांप्रदायी धर्मांची जीवात्म्याला प्राप्तव्य काय ती या लोकीं नाहीं, तर परलोकीं, अखंड सुखप्राप्ति अशी समजूत आहे, तशी या धर्माची नाहीं. इतर सर्व धर्मांची वृत्ति सुखाकडेच असते व तदर्थ उद्योग चालू असतो. भागवतधर्म मात्र असें सांगतो कीं, केवळ सुखप्राप्तीकडे लक्ष दिलें असतां या धर्माचें रहस्य कोणाला कळणार नाहीं. सुख मिळण्यासाठीं व्यापारउद्योग पाहिजे असल्यास करा, परंतु खरें प्राप्तव्य सुखदुःखाशिवाय कांहीं अन्य आहे. तें साध्य काय हें आज सांगावयाचें होतें; परंतु मागच्या प्रसंगीं मातेचें प्रेम, पित्याची वत्सलता, मित्राचा स्नेह,



अनुक्रमणिका

स्त्रीपुरुषांचे प्रेम वगैरे जे दृष्टान्त घेतले होते त्यांत मातेचें प्रेम पुढें होणाऱ्या सुखासाठीं नसून अहैतुक असतें, व अशा प्रकारचे जे संबंध असतात त्यांत नेहमीं स्वतःचेंच हित व्हावें हा हेतु नसतो. माता आपल्या स्वतःस कष्टविते व दिवसाची रात्र करिते तें स्वतःच्या सुखहेतूस्तव नसतें; आणि आपल्या मुलाचें कल्याण व्हावें, त्याचें सामर्थ्य व ज्ञान वाढावें यासाठींच पिता झटत असतो व धन्यता मानितो असें म्हटलें होतें. आणि धर्मसंस्थेचा हेतु काय याचा विचार करितांना वर सांगितलेल्या संसारसंबंधांमध्यें अमूर्त परमेश्वराचीं मूर्तिमंत ओतलेलीं लक्षणें आढळ-तात; आणि अत्यंत दुर्भाग्य, चांडाल, चोर, रामोशी वगैरे लोकांमध्येंही प्रत्येक मनुष्यास आपणास प्रिय असें कांहीं तरी असतें– मग तें मनुष्य असो वा वस्तु असो– यावरून सुखाकडेच दृष्टि देऊन मनुष्य कष्ट सोसतो हें म्हणणें, अगर अशी कल्पना करणें, वस्तुस्थितीला जुळत नाहीं, असें प्रतिपादन केलें होतें. यावर श्रोतृसमूहापैकीं एका विचारी गृहस्थानें अशी शंका घेतली कीं, 'प्राकृत जनांत असे पुष्कळ आहेत कीं, जे आपणांस दुःख झालें तरी बेहत्तर, पण दुसऱ्याचें नुकसान करितात. दुसऱ्याचे दोन डोळे फोडण्यासाठीं आपला एक डोळा फोडून घेतात. दुसऱ्यास अपशकुन व्हावा म्हणून आपलें नाक कापून घेतात. अशा प्रकारें सृष्टीमध्यें सर्व तऱ्हेचे लोक आढळतात, म्हणून तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें कांहींच सिद्ध होत नाहीं, व तुम्हीं सांगितलेलें लक्षण जुळत नाहीं.' अशा रीतीनें धर्माचा घोटाळा करण्याचें कारण नाहीं, असें त्यांना मीं उत्तर दिलें. कारण, तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें वाईट वर्तन करणारांस राजदंड आहे व न्याय होऊन त्यांस देशो-धडीस लाविलें नाहीं, तोंच आपण त्यांस लोकांतून उठवून देतों. आणि राजदंड होण्यापूर्वींच आपण अशा दुर्जनांस निंदादि शासनें करितों; तसेंच, उलट चांगल्या मार्गानें चालणारांशीं आपण प्रेमानें वागतों. यावरून नियमबद्ध कोणतें व अपवादसूचक कोणतें, हें समजण्यास कठीण नाहीं. व तुम्हीं सांगितलेले प्रकार अपवादाचे आहेत, हें उघड दिसतें. पित्यापुत्राचा संबंध अत्यंत द्वेषाचा, बंधूबंधूंमध्यें अत्यंत वैरभाव, आईच्या आज्ञेचें उल्लंघन करणें हेंच मुलाचें व्रत, असे अतिशय दैन्याचे– पापाचे प्रकार क्वचित् आढळण्यांत येतात खरे; परंतु सामान्य स्थिती पाहिली, तर नियम कोणता व अपवाद कोणता याची खात्री होईल. यावर दुसरींही प्रमाणें देतां येतात. मनुष्य नेहमीं आपण सुखांत असावें, आपणास त्रास होऊं नये, अशा हेतूनें खटपट करितो व दुःखाला भितो, असें त्याच्या वर्तनावरून दिसत नसतें; तर संसारांतील सर्व प्रकारचे संबंध यथास्थित राहावे, हेंच मुख्य धोरण असतें.

कौरव माझे आप्त त्यांच्या सैन्यांत माझे गुरुजी वगैरे आहेत, तर मग त्यांस युद्ध करून मारावें कसें, असें अर्जुनानें म्हटलें, तेव्हां हा व्यामोह अन्यथा आहे, असा व्यावहारिक उपदेश श्रीकृष्णानें त्याला केला, असें ज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या अध्यायांत वर्णन केलें आहे. परंतु अर्जुनानें तो मान्य केला नाहीं, तेव्हां श्रीकृष्णानें पुनः बोध केला, तो या गोष्टीचा विचार करणारांनीं अवश्य पाहावा. कारण, त्यामध्यें सुखदुःखाची खरी योग्यता काय आहे; हर्ष, शोक हीं केवळ रस्ता समजण्या-साठीं रस्त्यांत ज्याप्रमाणें पाट्या लावलेल्या असतात त्याप्रकारचीं मार्गदर्शक चिन्हें होत; व सूचना होण्या-पुरता काय तो त्यांचा उपयोग आहे; तीं स्वतः प्राप्तव्य नाहींत; आणि हर्ष, शोक अथवा सुखदुःखाची स्थिति यांचा जीवात्म्याशीं काय संबंध आहे, तें मना-वर ठसण्यासारख्या रीतीनें दाखविलें आहे. यावर कोणी म्हणेल कीं, हें शाब्दप्रमाण झालें. अशा विचारांस अनुभवाचें प्रमाण द्यावें लागतें तें कोठें आहे ? हा सवाल यथार्थ आहे. आतां आपण अनुभविक प्रमाण पाहूं या. प्रथमतः ज्यांस इंग्रजी भाषेमध्यें civilized असें म्हणतात व त्याच अर्थानें ज्यांस ज्ञानेश्वरीमध्यें उत्तम गुण नागरिक असें म्हटलें आहे; ज्यांच्या अंगीं चांगल्या गुणांचा अतिशय आहे असे शहरांत राहणारे लोक व रानटी लोक ह्यांच्यामध्यें अंतर काय याचा आपण विचार करूं लागलों, तर नागरिकता, अथवा सामर्थ्याचा अत्यंत विकास यानेंच लोकसमुच्चयाचे हे विभाग झाले आहेत, असें दिसून येईल. शहरांतल्या लोकांस ज्या गोष्टी कराव्या लागतात, अथवा ज्यांचे-विषयीं विचार कर्तव्य असतो त्यांचा समुच्चय खेडे-गांवांतल्या लोकांपेक्षां जास्त असणें, हाच मुख्य फरक होय. खेडेगांवांतले लोक स्वस्थ बसून राहतात, अथवा त्यांस सुखाची इच्छा नसते असें नाहीं. नागरिकांचा नेहमींचा सराव व वहिवाट हीं पाहिलीं असतां त्यांच्यामध्यें अनुभवाचा समुच्चय अधिक असतो. नागरिकांस काळजी अगर श्रम कमी असतात असें

मिळून वारंवार पतनाचे प्रसंग येतात, व मनाचे ठायीं खेद, उद्विग्नता, निराशा, उपद्व्याप व संशय हीं उत्पन्न होतात. अनेक प्रसंगीं असा अनुभव येतो कीं, धर्मास अनुसरून चालत असतां दुःख दुणावतें व सुख नाहींसें होतें, आणि मनाची स्थायिकता नष्ट होते. त्याचप्रमाणें मनुष्यमात्राचे व्यवहार पाहिले असतां अन्य प्रमेयावर, किंवा अन्य साध्यावर दृष्टि असते असेंही दिसतें. केवळ सुखाकडे दृष्टि न दिल्यानें शुद्ध मार्गावर असतांना संसाररूपसमुद्रांत हेलकावे बसतात, तेव्हां योजकानें अशी विलक्षण योजना कां केली आहे अशा कुतर्कांनी व संशयांनीं आपलें मन डगमगत नाहीं. चांगल्या आचरणामध्यें फक्त आपल्या सुखावरच नजर नसते, याचीं अनेक उदाहरणें आढळतात व त्यांवरून सुखदुःख हेच हेतु नसतात, हें उघड होतें. मातेचें प्रेम घ्या. माता कष्ट कां करिते ? तर मुलाचें कल्याण व्हावें म्हणून. ती आपल्या सुखाकरितां झटते असें असतें, तर रात्रंदिवस जागरण व रक्ताचें पाणी करून मुलाच्या शरीररक्षणार्थ तिनें जोपासना केली नसती. परमेश्वराचें प्रेम कसें असतें तें उपमेनें दाखवितां येण्यासारखें नाहीं; तरी मातेचें प्रेम त्या अपार प्रेमाची किंचित् छाया आहे. बालकावर प्रीति करीत असतां, माता स्वतःच्या सुखाच्या आशेच्या मुळाशीं कुऱ्हाड घालते अशी त्या परमेश्वराच्या धर्माच्या छायेची व्यवस्था नीट लावावी तें सोडून, मुलानें पुढें आपणास उपयोगीं पडावें अशी स्वार्थबुद्धी मातेला आरोपून तिच्या निवळ प्रेमाला आपण शाई लावितों. त्याचप्रमाणें पवित्र आनंद कोणता ? तर मुलाचें हास्य पाहून मातेला होणारा आनंद, हें आपणांस सहज वाटतें. मातेला परिपाकानें परिणामीं मुलापासून सुखप्राप्ति होवो; परंतु तिचा तोच हेतु, अथवा उद्देश असतो, असें म्हणण्यानें मतीला भ्रंश मात्र होतो. या उदाहरणावरून धर्माचरणानें साध्य काय, याची थोडीबहुत कल्पना करितां येईल. बरें, पित्याचें वात्सल्य घ्या. पित्याची दगदग कां असते ? तो शेतीभाती, व्यापार-उदीम वगैरे अश्रांत खटपट करीत असतो व मुलाच्या पोषणाविषयीं व त्यास शिक्षादीक्षा देण्याविषयीं कळकळ बाळगितो तें केवळ मुलापासून आपणास पुढें म्हातारपणीं सुख व्हावें म्हणून नव्हे. ही बुद्धि कोठून आली ? तर ही पित्याची वत्सलताही परमेश्वराच्या धर्माची छाया आहे. या लोकीं सुखप्राप्तीच्या व स्वर्गांत वतनवाडी मिळण्याच्या इच्छेनें पित्याचे उद्योग होत नसतात. मित्राचा स्नेह घ्या. स्त्रीपुरुषांचें प्रेम घ्या. बंधुभगिनींचें सख्य घ्या. एकंदरीनें पहातां संसार धर्माची संस्था, अथवा रचना आहे व परमेश्वराचे वरिष्ठ धर्म ह्या ठिकाणीं अवतरलेले आहेत. कनिष्ठ दर्जाचे रामोशी, मांगसुद्धां पाहिले, तर तेही एकमेकांसाठीं झटतात, रडतात व हळहळतात असें दिसून येईल. सारांश, संसारयात्रा धर्मच आहे व तिजमध्यें परमेश्वराची कृपा एकसारखी वर्षत असते. राष्ट्रहितकर्ता जिवाचा बळि देतो– फाशीं जाण्यास तयार असतो —तोही स्वतःच्या सुखाकरितां नव्हे. सुखप्राप्त्यर्थ सर्व होतें ही कल्पना शुद्ध नव्हे. धर्माचा व सदाचरणाचा साध्य, प्राप्य हेतु सुख, किंवा दुःख, हीं दोन्हीं नाहींत. परमेश्वराच्या राज्यव्यवस्थेंत या दोहोंचें मिश्रण आहे. सिद्धान्ताची एक गोष्ट मनांत धरिली पाहिजे, ती ही कीं, सुखप्राप्ति अथवा दुःखनाश, ह्या केवळ धर्माच्या दोऱ्या आहेत व आपणांस घोड्याच्या ठिकाणीं विशेष योग्यता आणावयाची आहे.

## व्याख्यान आठवें

आज पंधरा दिवसांमागें भागवतधर्माचें मुख्य भूषण अथवा रहस्य काय हें सांगण्यास उपक्रम केला होता. त्या धर्माचें मुख्य भाग्य, वैलक्षण्य, अथवा रहस्य हें आहे कीं, जशी प्रचलित सांप्रदायी धर्मांची जीवात्म्याला प्राप्तव्य काय ती या लोकीं नाहीं, तर परलोकीं, अखंड सुखप्राप्ति अशी समजूत आहे, तशी या धर्माची नाहीं. इतर सर्व धर्मांची वृत्ति सुखाकडेच असते व तदर्थ उद्योग चालू असतो. भागवतधर्म मात्र असें सांगतो कीं, केवळ सुखप्राप्तीकडे लक्ष दिलें असतां या धर्माचें रहस्य कोणाला कळणार नाहीं. सुख मिळण्यासाठीं व्यापारउद्योग पाहिजे असल्यास करा, परंतु खरें प्राप्तव्य सुखदुःखाशिवाय कांहीं अन्य आहे. तें साध्य काय हें आज सांगावयाचें होतें; परंतु मागच्या प्रसंगीं मातेचें प्रेम, पित्याची वत्सलता, मित्राचा स्नेह,

अनुक्रमणिका

स्त्रीपुरुषांचे प्रेम वगैरे जे दृष्टान्त घेतले होते त्यांत मातेचें प्रेम पुढें होणाऱ्या सुखासाठीं नसून अहैतुक असतें, व अशा प्रकारचे जे संबंध असतात त्यांत नेहमीं स्वतःचेंच हित व्हावें हा हेतु नसतो. माता आपल्या स्वतःस कष्टविते व दिवसाची रात्र करिते तें स्वतःच्या सुखहेतूस्तव नसतें; आणि आपल्या मुलाचें कल्याण व्हावें, त्याचें सामर्थ्य व ज्ञान वाढावें यासाठींच पिता झटत असतो व धन्यता मानितो असें म्हटलें होतें. आणि धर्मसंस्थेचा हेतु काय याचा विचार करितांना वर सांगितलेल्या संसारसंबंधांमध्यें अमूर्त परमेश्वराचीं मूर्तिमंत ओतलेलीं लक्षणें आढळतात; आणि अत्यंत दुर्भाग्य, चांडाल, चोर, रामोशी वगैरे लोकांमध्येंही प्रत्येक मनुष्यास आपणास प्रिय असें कांहीं तरी असतें– मग तें मनुष्य असो वा वस्तु असो– यावरून सुखाकडेच दृष्टि देऊन मनुष्य कष्ट सोसतो हें म्हणणें, अगर अशी कल्पना करणें, वस्तुस्थितीला जुळत नाहीं, असें प्रतिपादन केलें होतें. यावर श्रोतृसमूहापैकीं एका विचारी गृहस्थानें अशी शंका घेतली कीं, ‘प्राकृत जनांत असे पुष्कळ आहेत कीं, जे आपणांस दुःख झालें तरी बेहत्तर, पण दुसऱ्याचें नुकसान करितात. दुसऱ्याचे दोन डोळे फोडण्यासाठीं आपला एक डोळा फोडून घेतात. दुसऱ्यास अपशकुन व्हावा म्हणून आपलें नाक कापून घेतात. अशा प्रकारें सृष्टीमध्यें सर्व तऱ्हेचे लोक आढळतात, म्हणून तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें कांहींच सिद्ध होत नाहीं, व तुम्हीं सांगितलेलें लक्षण जुळत नाहीं.’ अशा रीतीनें धर्माचा घोटाळा करण्याचें कारण नाहीं, असें त्यांना मीं उत्तर दिलें. कारण, तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें वाईट वर्तन करणारांस राजदंड आहे व न्याय होऊन त्यांस देशोधडीस लाविलें नाहीं, तोंच आपण त्यांस लोकांतून उठवून देतों. आणि राजदंड होण्यापूर्वींच आपण अशा दुर्जनांस निंदादि शासनें करितों; तसेंच, उलट चांगल्या मार्गानें चालणारांशीं आपण प्रेमानें वागतों. यावरून नियमबद्ध कोणतें व अपवादसूचक कोणतें, हें समजण्यास कठीण नाहीं. व तुम्हीं सांगितलेले प्रकार अपवादाचे आहेत, हें उघड दिसतें. पित्यापुत्राचा संबंध अत्यंत द्वेषाचा, बंधूबंधूंमध्यें अत्यंत वैरभाव, आईच्या आज्ञेचें उल्लंघन करणें हेंच मुलाचें व्रत, असे अतिशय दैन्याचे– पापाचे प्रकार क्वचित् आढळण्यांत येतात खरे; परंतु सामान्य स्थिती पाहिली, तर नियम कोणता व अपवाद कोणता याची खात्री होईल. यावर दुसरींही प्रमाणें देतां येतात. मनुष्य नेहमीं आपण सुखांत असावें, आपणास त्रास होऊं नये, अशा हेतूनें खटपट करितो व दुःखाला भितो, असें त्याच्या वर्तनावरून दिसत नसतें; तर संसारांतील सर्व प्रकारचे संबंध यथास्थित राहावे, हेंच मुख्य धोरण असतें.

कौरव माझे आप्त त्यांच्या सैन्यांत माझे गुरुजी वगैरे आहेत, तर मग त्यांस युद्ध करून मारावें कसें, असें अर्जुनानें म्हटलें, तेव्हां हा व्यामोह अन्यथा आहे, असा व्यावहारिक उपदेश श्रीकृष्णानें त्याला केला, असें ज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या अध्यायांत वर्णन केलें आहे. परंतु अर्जुनानें तो मान्य केला नाहीं, तेव्हां श्रीकृष्णानें पुनः बोध केला, तो या गोष्टीचा विचार करणारांनीं अवश्य पाहावा. कारण, त्यामध्यें सुखदुःखाची खरी योग्यता काय आहे; हर्ष, शोक हीं केवळ रस्ता समजण्यासाठीं रस्त्यांत ज्याप्रमाणें पाट्या लावलेल्या असतात त्याप्रकारचीं मार्गदर्शक चिन्हें होत; व सूचना होण्यापुरता काय तो त्यांचा उपयोग आहे; तीं स्वतः प्राप्तव्य नाहींत; आणि हर्ष, शोक अथवा सुखदुःखाची स्थिति यांचा जीवात्म्याशीं काय संबंध आहे, तें मनावर ठसण्यासारख्या रीतीनें दाखविलें आहे. यावर कोणी म्हणेल कीं, हें शाब्दप्रमाण झालें. अशा विचारांस अनुभवाचें प्रमाण द्यावें लागतें तें कोठें आहे ? हा सवाल यथार्थ आहे. आतां आपण अनुभविक प्रमाण पाहूं या. प्रथमतः ज्यांस इंग्रजी भाषेमध्यें civilized असें म्हणतात व त्याच अर्थानें ज्यांस ज्ञानेश्वरीमध्यें उत्तम गुण नागरिक असें म्हटलें आहे; ज्यांच्या अंगीं चांगल्या गुणांचा अतिशय आहे असे शहरांत राहणारे लोक व रानटी लोक ह्यांच्यामध्यें अंतर काय याचा आपण विचार करूं लागलों, तर नागरिकता, अथवा सामर्थ्याचा अत्यंत विकास यानेंच लोकसमुच्चयाचे हे विभाग झाले आहेत, असें दिसून येईल. शहरांतल्या लोकांस ज्या गोष्टी कराव्या लागतात, अथवा ज्यांचेविषयीं विचार कर्तव्य असतो त्यांचा समुच्चय खेडेगांवांतल्या लोकांपेक्षां जास्त असणें, हाच मुख्य फरक होय. खेडेगांवांतले लोक स्वस्थ बसून राहतात, अथवा त्यांस सुखाची इच्छा नसते असें नाहीं. नागरिकांचा नेहमींचा सराव व वहिवाट हीं पाहिलीं असतां त्यांच्यामध्यें अनुभवाचा समुच्चय अधिक असतो. नागरिकांस काळजी अगर श्रम कमी असतात असें

नसून सामर्थ्य अधिक असतें. नागरिकांतही चार-सहा महिन्यांची गोष्ट राहूं द्या; पण उद्यां चरितार्थ कसा व्हावयाचा याची मुळींच चिंता नसते असे हरीचे लाल असतात. परंतु कैंकाडी, वडेर, वैदू, कातकरी व भिल्ल इत्यादि रानटी स्थितींतील लोकांपेक्षां नागरिकांत कांहीं अधिक आहे व तें चांगलेपणाचें आहे. तसेंच युरोपिअन लोक व आपले लोक घ्या. युरोपिअन लोकांत ज्ञानाविषयीं औत्सुक्य, नेटानें काम करणें, हव्यास, विवेचना व आत्मसंयमन ह्यांचा विकास झाला आहे, तितका आपणांमध्यें नाहीं. एकंदरीनें नागरिकपणा अथवा सुधारणा, आणि चांगल्या तऱ्हेचा भेद असणें, ह्याच नियम असतो. भिल्ल व कोळी ह्यांच्या-मध्यें शरीरसामर्थ्य आहे, परंतु त्यांच्यांत जाण्याची आपल्याला इच्छा नसते. हा नागरिक व रानटी लोकां-मधील भेद कोठून आला म्हणून पाहूं लागल्यास, नागरिकांस सापेक्ष सुख जास्ती होतें असें नाहीं, तर क्षमता अथवा एका जातीचें सामर्थ्य अधिक आहे, यामुळें तो भेद होतो, असें दृष्टोत्पत्तीस येईल. नागरिकांत शरीराचे व मनाचे परिश्रम करण्याची उच्च प्रतीची योग्यता अधिक असते. त्यांच्या ज्ञानाचा परिघ मोठा असतो. त्यांच्यावर प्रतिक्षणीं चांगले संस्कार अधिक होत असल्यामुळें चांगल्या वृत्तींचा विकास जास्त होतो. ते शरीरानें दुर्बळ असले, तरी एक क्षमता अधिक व विकास अधिक असल्यामुळें पुष्कळ कार्यभाग होतो. निदान वर्षसहामहिन्यांची घरांत सामुग्री असावी, पुत्रपौत्रांची व्यवस्था आपल्या हयातीमध्यें व आपल्या पश्चात् चांगली असावी, अशी इच्छा नागरिकांमध्यें अधिक असून प्रयत्नही त्याच मानानें होत असतो, आणि वेळेनुसार दुःख, किंवा त्रास अधिक होतो. त्यांस निर्भयता अधिक असते, परंतु काळजीही अधिक असते; इतकेंच कीं, परस्परविरोध व पोटाला जाळणारी दाहक काळजी नसते. ज्ञान व मानसिक शक्ति वाढविण्याची चिंता असते. यावरून सुख व दुःख हीं केवळ साधनें अथवा मार्गदर्शक चिन्हें आहेत, हें सिद्ध होतें. मानसिक शक्तींचा विकास आयासानें झाला तरी पाहिजेच. दुसरीं उदाहरणें घ्या. एखाद्या श्रीमंताचा मुलगा विद्येच्या व्यासंगानें जीवापाड मेहनत करितो, तो काय पोट भरून शरीरसुख होण्या-साठीं ? नाहीं. तर केवळ ज्ञानौत्सुक्यानें. मातेचें प्रेम जसें तिला ओढून मुलासाठीं कष्ट करावयास लावितें, तशीच जिज्ञासा ह्याच्याकडून परिश्रम करविते. अत्यंत हानि आहे असे उद्योग नागरिक अथवा सुधारलेले लोक का करितात ? प्रतिवर्षीं जहाजांचींजहाजें भरून ध्रुवांकडे जाणें, हें युरोपांतील प्रत्येक देशांत भूषण समजतात, तें कां ? तिकडे गेल्यानें हजारों माणसें बर्फांत सांपडून मरतात; तरी त्या अगम्य वाटलेल्या प्रदेशाचा शोध लागावा म्हणून अव्याहत प्रयत्न चालू आहेत. अशी जिज्ञासा, असा विकास, आपल्या लोकांतही नाहीं. या उद्योगांत अतिशय कष्ट सोसून शेंकडो मनुष्यें जीवाचा बळि देतात तें केवळ जिज्ञासेनें. कारण, नांव मिळविण्यासाठीं म्हटलें, तर जे आजपावेतों गेले व मेले त्या सर्वांचें नांवगांव राहिलें आहेच असें नाहीं.

यावरून हे दुःखाकरितां बळि जातात व यांस दुःखाची पर्वा नाहीं, आणि सुखाचा विचार नाहीं, हें उघड आहे. वरील दृष्टान्तांवरून सुखप्राप्तीसाठीं, अथवा दुःख टाळण्यासाठीं सर्व कांहीं होतें, हें म्हणणें जुळत नाहीं. व सुखप्राप्त्यर्थ असे उद्योग होतात हा आरोप, मातेच्या प्रेमावर आणलेल्या आरोपासारखाच आहे. अपवादाच्या रीतीनें कांहीं गोष्टी असतील, तरी भाग्य-वान्, क्षम जो मनुष्य त्याच्या ठिकाणीं विकास व क्षमता अधिक असेल. आणि नीच वृत्तींचा उच्च वृत्तींना व्यत्यय येऊं नये व उन्नत भावांचा विकास व्हावा, हाच मनुष्यांचा साधारण हेतु असतो, हेंच सत्य आहे. जसा माळी फुलांचें सौंदर्य, त्यांचा सुगंध व त्यांचें माधुर्य यांचा बिघाड होऊं नये, कळी करपूं नये, म्हणून मुळांस पाण्याचें सिंचन करीत असतो, तसे तुम्ही आम्ही प्रत्येक-जण फुलें आहों, व आपल्या अंगच्या सद्‌वृत्ति विकसित व्हाव्या ह्या हेतूनें सुधारलेल्या अथवा नागरिक अशा बहुतेक लोकांचे संसारांतील व्यवहार होत असतात. असें नसून केवळ सुखदुःखावर दृष्टि ठेवून आपण प्रयत्न करीतों असतों, तर ते फारच शिथिल झाले असते. अनेक वेळां दुःखाच्या मार्गानेंच मनुष्याचा उदय होतो, आणि भाग्य उघडतें असेंही होतें. जो शिपाई लढाईत जाण्यास तयार होतो त्याच्या ठिकाणीं एका जातीचा विकास आहे, म्हणूनच तो धारातीर्थीं पडावयास प्रवृत्त होतो, व त्याला पाहून मन सुप्रसन्न होतें. रणांगणा-वरून जगून आला, तर त्याला बहादुरी मिळते. पोटापाण्याची निश्चिती व्हावी म्हणून त्याला पगार ठरविलेला असतो, हा भाग निराळा. परंतु इतक्या-वरून तो केवळ नांवलौकिकासाठीं, अथवा पगाराच्या

लोभानें आपल्या जिवावर उदार होतो असें म्हणणें बरोबर नाहीं. पोट भरण्याविषयींची चिंता ही इंगळीच्या, म्हणजे मोठ्या विंचवाच्या, आगीसारखी आहे, व तिच्यामुळें मनुष्य अगदीं बेहोष होऊन त्याचें विकासाचें सामर्थ्य नाहींसें होतें; म्हणूनच तिच्यापासून शिपाई मुक्त असावा ह्या उद्देशानें पगाराची योजना असते. ह्या सर्व अनुभवाच्या गोष्टींवरून उन्नत गुणांचा प्रभव आणि उत्कर्ष व्हावा व त्यांवर जडाचें दडपण पडूं नये, हेंच व्यवहाराचें खरें स्वरूप आहे, हें सिद्ध होतें. असें नसतें तर संसारसंबंधाचीं जीं अनेक बंधनें दृढ बसतात, तीं तशीं झालीं नसतीं. काळजी नसावी, अथवा विचाराचा त्रास नसावा, असें नागरिकतेचें लक्षण नाहीं. ती केवळ पोटापाण्याची नसावी– आपल्या उन्नत अंशाच्या विकासाची असावी व आपल्याहून इतरांची असावी. यांतही पायऱ्या आहेत. सारांश, विकास अधिक होणें आणि क्षमता अधिक येणें, हाच नागरिकतेचा मुख्य हेतु, हेंच नागरिकतेचें मुख्य लक्षण आहे. व्यवहारामध्यें धर्माचाही प्रकार व हेतु असाच आहे, हें अन्य वेळेस विचाराकरितां आपल्यापुढें सादर करीन.

## व्याख्यान नववें.

पूर्वीं दोन प्रसंगीं सुखदुःख साध्य किंवा त्याज्य विषय नव्हत याचा विचार व्यावहारिकदृष्टया सांगितला. कर्ममार्गानुयायी सर्व धर्म व संप्रदाय, सुख साध्य व दुःख त्याज्य याच धोरणानें चालणारे असतात; परंतु प्रत्येकानें आपला मार्ग खरा व इतर सर्व खोटे असा अभिमान बाळगण्यानें अतिदिशा होते, तें फार वाईट आहे. खरोखर पाहिलें, तर मनुष्यजन्माचे साध्य सुखप्राप्ति आणि दुःखत्याग नव्हे, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. आणि आपल्या एकट्याच्या बुद्धीला प्रशस्त वाटला तितक्यानेंच तो मार्ग प्रशस्त झाला, अथवा आपणास कांहीं युक्त वा अयुक्त वाटतें म्हणून तें योग्य किंवा अयोग्य, असा अभिमान बाळगूं नये. शब्दप्रमाण लक्षांत आणून, अथवा मनुष्य जातीचे आप्त जे साधु-संत, ज्ञानी, थोर पुरुष होऊन गेले त्यांचे विचार काय आहेत ते पाहून आपल्या मताच्या खरेपणाविषयीं अधिक समजूत करून घ्यावी; आणि कोणत्याही बाबतींत आग्रह धरण्यापूर्वी आपणापेक्षां अनंतपट जे श्रेष्ठ जन त्यांचें तिच्यासंबंधानें काय म्हणणें आहे तें पाहून आपण आपल्या बुद्धीची स्थिरता करून घेतली पाहिजे. व्यवहारामध्यें सुद्धां सुखच काय तें साध्य अशी समजूत नाहीं, व आपल्या ठिकाणीं जें गुणसामर्थ्य आहे त्याचा पूर्ण विकास व्हावा आणि बीजरूपी सामर्थ्याची समता वाढावी याच हेतूनें वर्तन होत असतें, हें मागील प्रसंगीं दाखवून दिलें. आपल्या अंगांत जीं उपयुक्ततेचीं लक्षणें असतात त्यांच्या समुच्चयाचा विकास व्हावा आणि क्षमता वृद्धिंगत होत जावी, हेंच एक साध्य आहे; सुखदुःख हीं केवळ साधनें आहेत; सुखाच्या उपायांनीं तें साधत असेल, तर ठीकच; परंतु दुःखाच्या उपायांनीच साधत असेल, तर दुःख सोसलें पाहिजे व तें आपण सोशीतही असतों, हें उघड आहे. प्रेमाचे संबंध व तज्जन्य व्यवहार घ्या, किंवा देवघेवीचे व्यवहार घ्या, त्यांचें शुद्ध स्वरूप अथवा त्यांचा पाया हाच आहे; हा सर्वत्र लागू नियम. अन्य केवळ अपवाद अथवा प्रमाद होत. अवयवांच्या संपूर्ततेच्या संबंधानें तोच नियम लागू आहे. आई बालकाविषयीं निष्ठुर; मातेची आज्ञा उल्लंघन करण्याचा निश्चय असणारा मुलगा; पतीला पाहून कपाळास आंठ्या पडणारी बायको व पत्नीशीं कठोरपणानें वागणारा पति अशी स्थिति कधीं कधीं दृष्टीस पडते; परंतु ते प्रमादच म्हणावयाचे. आपलें जीवित दुसऱ्याच्या उपयोगी पडावें, हीच मनाची धाव व व्यवहारांत योजना दिसते, तशीच योजना अध्यात्मांत दिसते. व्यवहारांत अध्यात्मज्ञान येत नाहीं व चांगला अभ्यास होत नाहीं, तर तो व्यवहारच खरा नव्हे. श्रीकृष्णानें अर्जुनाला जो भगवद्गीतेंत उपदेश केला आहे त्यांत कर्मफलत्यागाची मातब्बरी सर्वांत अधिक सांगितली आहे. कर्मफलत्यागाचा अर्थ वामनांनीं सुखस्पृहात्याग, म्हणजे सुखाच्या इच्छेचा त्याग, असा केला आहे गीतेमध्यें कर्मयोग व कर्मत्याग, म्हणजे संन्यास, या दोन गोष्टींचें प्रतिपादन केलें आहे. आप्तवर्ग, इष्टमित्र, गुरु व गुरुपुत्र अशांचा प्राणनाश आपल्या हातून ज्या युद्धांत होणार त्याला श्रीकृष्ण आपणास उद्युक्त करूं पहातो असें वाटून ज्यास आपण

स्मशानवैराग्य म्हणतों तशा प्रकारचा उद्वेग अर्जुनाच्या अंत:करणांत उत्पन्न झाला. त्याची चित्तवृत्ति करपली; परंतु बुद्धि स्थिरावून करपली नव्हती तोंपर्यंत तो खरा कर्मसंन्यास नव्हे. कर्मयोग व कर्मसंन्यास यांची सांगड घालून द्यावी याच हेतूनें गीताशास्त्राची उत्पत्ति झाली. श्रीकृष्णानें ज्ञानापेक्षां अभ्यास अधिक, अभ्यासाहून ध्यान अधिक व सर्वांत कर्मफलत्याग उत्तम योग्यतेचा असें सांगितलें. या उपदेशांत कर्म म्हणजे जें कर्मठपणानें केलें जातें त्याला जागाच नाहीं, हें ध्यानांत ठेवण्यासारखे आहे. परमेश्वराच्या अनंत गुणांतून एकेकास धरून त्यालाच प्राधान्य देण्याकडे सांप्रदायी धर्मांचा कल असतो. आपणास जें अपूर्ण ज्ञान झालें असतें त्यांतच मग्न होऊन एका दुबळयानें दुसऱ्या दुबळयास नांव ठेवावें अशी गत त्यांच्यामध्यें परस्परांविषयीं होत असते. ज्ञान कितीही प्राप्त झालें, तरी तें अभ्यासाशिवाय स्थिरावत नाहीं; यावरून अभ्यासाची श्रेष्ठता सिद्ध होते. अभ्यासाचा लय कोठें तरी आणि कधीं तरी लागलाच पाहिजे व तो ध्यानांत झाला पाहिजे. तसेंच ध्यान सर्वत्र सर्वकाळ राहत नाहीं; तें वृत्तींत स्थिर राहिलें पाहिजे व तें कर्मफलत्यागाशिवाय होत नाहीं. म्हणूनच कर्मफलत्यागाची योग्यता जास्ती सांगितली आहे. गीतेंतील उपदेशाचा उपसंहार अठराव्या अध्यायांत केला आहे व त्यांत सिद्धान्त हा आहे कीं, कर्मयोग व कर्मसंन्यास यांची सांगड घातली पाहिजे आहे– ते दोन्ही साधले पाहिजेत असा बोध केला आहे. कर्म तर करावयाचें आणि तें करीत असतां सुखस्पृहतेचा त्याग करावयाचा, हें कसें होईल ? तर श्रीकृष्णानें अर्जुनास उपदेशिल्याप्रमाणें माझ्यामध्यें, म्हणजे परमेश्वराच्या ठायीं, सर्व कांहीं कर्मे अर्पण केल्यानें. प्रत्येक कर्म देवाला अर्पण करावयाचें असें झालें म्हणजे कर्मयोगाचा व कर्मत्यागाचा अथवा कर्मफलत्यागाचा, एकवटपणा अथवा सांगड झाली. हाच गीताशास्त्राचा व भागवतधर्माचा अमोलिक प्रसाद होय. इतर सांप्रदायी धर्मांत व धर्मपुस्तकांत चांगल्या आज्ञा, उपदेश, अथवा वाक्यें असलीं तरी त्यांची योग्यता या उपदेशाच्या मानानें पुष्कळ कमी. सुखाची इच्छा सोडून दे आणि सर्व कर्मांचें पर्यवसान परमेश्वराच्या ठिकाणीं कर या श्रीकृष्णवाणीची महती अप्रतिम आहे. हें प्रमाणभूत घेतलें, तर शाब्दप्रमाणांमध्यें, म्हणजे आप्तवाक्यांमध्यें याहून श्रेयस्कर दुसरें मिळण्यासारखें नाहीं. इतर धर्ममार्गांविषयीं कोणीही व्यक्तीनें अश्रद्धाळू असावें, अथवा त्यांची निर्भर्त्सना करावी असें नाहीं; उलट खरा मार्ग आपणासच समजला असा अभिमान आपल्या ठायीं बाळगूं नये, असाच श्रीकृष्णाचा बोध आहे; व हें त्या महात्म्याचें प्रमाणवाक्य आहे. आध्यात्मिक दिशेविषयीं विचार करितांना सुखाच्याच इच्छेनें कर्म करण्याकडे प्रवृत्ति आहे तोंपर्यंत आपण या मार्गांतच नाहीं, व आपल्या ठायीं धर्मबीज असतां अधर्माचें वितान झालें आहे, असेंच समजलें पाहिजे. सुखप्राप्त्यर्थ पुण्य कर्म करावें, मग तें सुख ह्या लोकचें असो, किंवा स्वर्गलोकींचें असो, असें म्हटलें म्हणजे जे भगवद्गीता प्रमाण मानितात ते म्हणतील कीं, हें सर्व अन्यथा प्रतिपादन आहे. अग्निष्टोम वगैरे केल्यानें स्वर्गसुख मिळावें अशी जर इच्छा असेल, तर भगवद्गीता प्रमाण धरितात ते म्हणतील की, हें आम्हांस पसंत नाहीं. सुखाची कसोटी लावली म्हणजे प्रत्यक्ष सुखाला, किंवा शाब्दप्रमाणें सांगितलेल्या सुखाला थोर मानावें असा विचार सहज मनांत येतो; व तो आला कीं, पापवासनेला आंत शिरावयास अवकाश मिळतो, आणि अधिकारमदानें, द्रव्यमदानें, अथवा सामर्थ्यमदानें विषयभोगाची महती वाटूं लागते. ऐहिक सुख मोठें, किंवा स्वर्गसुख मोठें, हा विचार मनांत आला म्हणजे तराजू धरून पारडयांमध्यें वजन घालण्याचा प्रकार होतो, व स्वर्गसुखाच्या बाजूला कापसाचें हलकें वजन पडून ऐहिक सुखाच्या पारडयांतलें लोखंडाचें भारी तोल आम्हांस आपल्याकडे वळवून खालीं दडपून टाकतें. एतावता, सुख साध्य म्हणून चालण्यानें दिशाच चुकते. मनुष्याची दिशा सुखप्राप्त्यर्थ सर्व कांहीं करावयाचें अशी झाली कीं, नुकतेच वर सांगितलेले प्रमाद व्हावयाचे. ज्यानें शुद्ध वर्तन व्हावयाचें नाहीं तें ज्ञानही अशुद्धच म्हणण्यास हरकत नाहीं. सुखप्राप्तीचीच इच्छा धरून चालणाऱ्याच्या हातून सदाचरण घडो, अथवा औषध गोड करून दिलें असतां तें पथ्यकारी होवो, तो भाग निराळा; परंतु जोंपर्यंत सुखच प्राप्तव्य असा समज आहे, तोंपर्यंत सुखाच्या सापेक्षतेचा विचार येऊन अंत:करणाची शुद्धता व्हावी तशी होत नाहीं. कर्ममार्गानें चंद्रलोक, सूर्यलोक सांगितल्याप्रमाणें मिळत असले, तरी तें कांहीं खरें प्राप्तव्य नाहीं. भगवद्गीतेत सांगितलेल्या ज्ञान, अभ्यास व ध्यान या एकावरएक पायऱ्या चढून गेलें असतां शेवटली पायरी, कर्म करीत

असतां कर्मफलाची, म्हणजे सुखाची, इच्छा सोडली पाहिजे, ही आहे. म्हणून कर्मफलत्यागाविषयीं जो बोध केला आहे त्यांतच भागवतधर्माचें मुख्य रहस्य आहे; आणि सर्व लोकांस दिशा दाखविण्याचा, अथवा उपदेश करण्याचा, जो थोर अधिकार भागवतधर्माला आहे तो याच रहस्यानें येतो. तें रहस्य हेंच कीं, 'कर्म कर, परंतु मदर्पण म्हणजे परमेश्वरार्पण कर.' आपल्यापैकीं कर्मठपणानें चालणारेही 'न मम' असें श्रौतस्मार्तकर्म करितांना म्हणतात; परंतु असें करण्यानें गीताशास्त्रानें सांगितलेल्या दिशेचा तोंडानें उच्चार मात्र होतो. सुख व दुःख यांतून जें येईल तें मला मान्य आहे, तुला (परमात्म्याला) अर्पण असें कर्म होऊं दे, अशी अंतःकरणाची वृत्ति नसते. ज्ञानमार्गी लोक आम्हांला जन्ममरण नको, यांतून सुटका व्हावी म्हणून प्रयत्न करीत असतात; परंतु तुकोबासारखे भागवतधर्माचे अनुयायी साधु देवापाशीं प्रार्थना करितात ती अशी :

**हेंचि दान दे गा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥**
**गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥**
**नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देई सदा ॥ ३ ॥**
**तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥४॥**

ते मागतात कीं, देवा, मृत्युलोकीं आम्हांस जन्म दे; परंतु तुझी सेवा व सतसंग घडेल असें कर. या एका जन्मांत सर्व कर्मे देवाला अर्पण व्हावीं तशीं होत नाहींत; म्हणून तसें करण्याची क्षमता अंगीं येण्यासाठीं पुनःपुनः मृत्युलोकीं जन्म झाला तरी हरकत नाहीं, असें ते सांगतात. सुखस्पृहा व दुःखत्यागाची इच्छा नको. गीताशास्त्राच्या पायावर हा सिद्धान्त रचलेला आहे व त्याचें बारकाईनें मनन करण्यासारखें आहे. एकंदरीनें विकास, प्रभाव व क्षमता हीं साध्य हेंच खरें आहे. तें कोणत्या मार्गानें होईल ह्याविषयीं मतभेद असूं शकेल. परंतु साध्य अथवा प्राप्तव्य काय, याविषयीं शंका नसावी. कोणताही संप्रदाय असला, तरी त्याचेपासून आग्रह, द्वेष व आसक्ति हीं दूर झालीं नाहींत, तोंपर्यंत त्यामुळें मनाची खरी उन्नति व धर्मसंबंधानें प्रगति झाली नाहीं, असेंच समजलें पाहिजे. चांगल्या गुणांचा विकास, शुद्धपणा, मंगलपणा, हे वाढून परिमल सुटेल, छाया होईल, असेंच धर्मरहस्य असलें पाहिजे; सांप्रदायी धर्मापासून हा भाग सिद्ध होत नाही. सुखप्राप्त्यर्थ धर्माचरण करावें, अशी ज्या धर्मांत अथवा धर्मपंथांत समजूत असेल, तो धर्म अशुद्धच व केव्हांनाकेव्हां तरी नाश पावणार. सुखप्राप्तीसाठीं सर्व कर्मप्रवृत्ति असणें हीच खरी अडचण आहे. प्रत्येक कर्म देवाकरितां आहे; 'न मम', माझें अथवा मज-प्रीत्यर्थ नव्हे, हा गीताशास्त्राचा व भागवतधर्माचा उपदेश निरंतर लक्षांत वागविला असतां परमात्म्याशीं होणारें ऐक्य खरें; वेदांत्यांचें ऐक्य केवळ तत्वैक्य. सारांश, धर्मपथाचें अनुसरण परमेश्वराच्या कांहीं गुणांचें ज्ञान झालें, तरी खरें प्राप्तव्य हातास आलेंच नाहीं, असें म्हटलें पाहिजे. वहिवाटीप्रमाणें साधनें अनुकूल असतील तदनुरूप मधुरता, क्षमता, वगैरे सद्‌गुणांचा विकास तसाच फैलाव होणें, हेंच खरें प्राप्तव्य. या सिद्धान्ताचें दिग्दर्शन मीं ह्या प्रसंगीं आध्यात्मिक गोष्टींस अनुलक्षून केलें आहे, त्याचें आपण सर्वांनीं अवश्य मनन करावें अशी विनंति करून मी रजा घेतों.

* *

# सनातन आर्यधर्माचीं लक्षणें

[भागवतधर्मावरील व्याख्यानें सुरू असतां एके दिवशीं न्यायमूर्तींकडे दोघे आस्थेवाईक तरुण व होतकरू गृहस्थ गेले. व "तुम्ही प्रार्थनामंदिरांतील व्यासपीठावर बसून आर्यधर्माप्रमाणें चालणाऱ्या एकनाथ-स्वामींच्या ओव्या मूळ घेऊन उपदेश करितां हें काय, असें करण्यास तुम्हांस अधिकार काय, व हें तुम्हांस आमचा हिंदूंचा जो आर्यधर्म त्यास आधार घेऊन बोलणें जमतें कसें ?" अशा त्यांनी शंका घेतल्या. वास्तविक पहातां अशा प्रकारच्या शंकांचें निरसन न्यायमूर्तींनी आधींच केलें होतें. परंतु तें निरनिराळ्या वेळीं केलेलें असल्यामुळें ह्या गृहस्थांच्या शंकांच्या निरसनार्थ त्यांनीं पुढील भाषण केलें. **—संपादक**]

भागवतधर्म हा सनातन चालत आलेल्या हिंदुधर्म-रूप प्रवाहांत अवगाहन करणारी जी ह्या तरुण गृहस्थां-सारखी मंडळी तिचाच असून, प्रार्थनासमाज हिंदुधर्माचा फांटा नसल्यामुळें, या मंदिरांत भागवतधर्माचें निरूपण करणें हा प्रमाद होय, ह्या आक्षेपाला विशेष स्थान आहे असें नाहीं. तरी त्याचें निराकरण करितांना सनातन

आर्यधर्म म्हणजे काय, त्याचीं विशेष लक्षणें कोणतीं, त्यांच्यापैकीं भागवतधर्मांत किती आढळतात व प्रार्थनासमाजानें जो संप्रदाय अंगिकारिला आहे त्यांत त्या लक्षणांपैकीं कितींचा समावेश होतो, ह्याचा विचार अवश्य कर्तव्य आहे. या गोष्टींचा आस्थेवाईकपणानें विचार केला असतां भ्रमाचें निरसन होईल व मनाला शंकेमुळें बाधा होणार नाहीं. यास्तव आर्यधर्माचीं विशेष लक्षणें, ज्यांच्या योगानें त्यांस आर्यपण आलें आहे, तीं कोणतीं याचा विचार ह्या ठिकाणीं करणें अन्यथा होणार नाहीं.

परंतु एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, जसें आपण एखाद्या थोर पुरुषाचा सहवास अगर ओळख करून घेण्याचा हेतु धरिला, आणि आपण त्याच्या घराभोंवतीं घिरटया घालीत राहिलों, अथवा पहारेकऱ्यांचें अगर रक्षकांचें आर्जव करून जेथें तो गृहस्थ बसला असेल तेथें जाऊन फक्त त्याच्या चेहऱ्याकडे, पोशाखाकडे व राहाण्याच्या वहिवाटीकडे पाहिलें, तर त्याचा कांहीं विचित्रच प्रकार दिसतो. तो आर्य लोकांप्रमाणें राहात नाहीं, आपल्यामध्यें व त्याच्यामध्यें अंतर पडलेलें आहे असें, त्याच्याबरोबर बसून बोलणें, चालणें वगैरे जे खऱ्या स्वरूपाच्या ओळखीचे उपाय त्यांचा लाभ न झाल्यामुळें आपणास वाटतें. तसाच प्रकार ह्या समाजाच्या भोंवतीं घिरटया घालणारास, अथवा सभासदांचे तरतऱ्हेचे पोशाक, खुर्च्यांवर बसणें, फक्त रविवारीं ख्रिस्ती लोकांप्रमाणें उपासनेस जमणें वगैरे वरवरचे प्रकार पहाणारास होऊन या संस्थेच्या खऱ्या स्वरूपाची त्यास ओळख होत नाहीं. तर तुम्ही हिच्या संबंधानें ओळख म्हणून जो विशेष भाग आहे त्याचा लाभ करून घ्या. जसें, उदाहरणार्थ घेतलेल्या थोर गृहस्थाची चांगली ओळख पटल्यानंतर त्याच्या पोशाकावरून अवहेलना करणें सुटून तो सन्मान्य, तो खरा आर्य असें वाटतें आणि त्याची न्यायबुद्धि, सभ्यता, विद्वत्ता वगैरे सद्गुण आपणास समजून येतात; तसेंच या आमच्या संप्रदायाच्या संबंधानें उपकरणांकडेसच पाहणारांस सहवासाशिवाय खरी ओळख होणार नाहीं. म्हणून सांगणें हेंच की, सहवास करा, म्हणजे तुम्हांस ह्या संस्थेचें खरें स्वरूप कळेल. आणि प्रार्थनासमाज आर्यधर्माच्या अंतर्गत होतो, किंवा अन्य धर्मांशीं याचें साहचर्य आहे तें समजेल. पोशाक, आचार, बसण्याची तऱ्हा इत्यादि बाह्य स्वरूपावरून अंतर्गुणांविषयीं तर्क बांधणें बरोबर होणार नाहीं.

इतकें बोलून त्या तरुण गृहस्थांस त्यांच्या समजुतीप्रमाणें आर्यधर्माचीं लक्षणें कोणतीं म्हणून पुसलें; तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें कीं, जातिबंधन व मूर्तिपूजा हीं ज्यांत आहेत तो सनातन आर्यधर्म. हें ऐकतांच सहजच दुसरा प्रश्न निघाला कीं, प्रस्तुत वेंच्यांचे कर्मे एकनाथस्वामी आर्यधर्मी होते कीं नाहीं ? किंवा ते वेडे आणि तुम्ही शहाणे ? यावर ह्या गृहस्थांनीं आर्यधर्माभोंवतीं घिरटया घालणारांतले आपण असून आपली चुकी झाली असें कबूल केलें व आर्यधर्माचीं खरीं लक्षणें सांगावयास विनंति केली. याप्रमाणें पूर्वभूमिका तयार झाल्यावर संतोष वाटून तीं येणेंप्रमाणें सांगण्यांत आलीं :

परमेश्वराचा व भक्ताचा साक्षात् संबंध, हें आर्यधर्माचें पहिलें व अत्यंत महत्वाचें लक्षण होय. भक्त किती हीन, दीन, पतित, अज्ञान, कंगाल असो, त्याचें मन कळवळलेलें असलें व तो खरोखर दुःखी असला, तर त्याचें देव प्रत्यक्ष संबोखन करितो, व तें आपल्या हातानें प्रेमानें स्वतः करितो. त्याला मध्यस्थाची गरज लागत नाहीं, भट पुजारी कांहीं नको. त्याच्यामध्यें कितीही शाखा व संप्रदाय असले, त्यावर कितीही पटलें अगर मातीचा लेप बसलेला असो, भक्त अधिकारी, ज्ञानवान्, उच्च जातीचा पाहिजे असें नाहीं. जितका तो अनाथ, त्रस्त असेल, तितकें त्याला देव प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याचा उद्धार करितो. कधीं कधीं भक्त मागतो एक, आणि देव देतो दुसरेंच. परंतु परिणामीं भक्ताचें कल्याणच होतें. अन्य धर्मांत ह्या संबंधानें गोम असते; दैवताच्या आणि उपासकाच्या मध्यें पडदे असतात, तसे यांत नाहींत, व देवाची आणि भक्ताची प्रत्यक्ष सांगड असते. भक्त विव्हल झाला, कासाविस झाला म्हणजे पुरे; मध्यस्थ पुरुषाची कृपा नलगे.

आर्यधर्माचें अंगभूत, सर्वव्यापी, व सर्व शाखांला लागू असें दुसरें लक्षण हें की, तो ऐतिहासिक धर्म नव्हे. अमुक एका कालीं, अथवा देशीं, अमुक एका व्यक्तीला परमेश्वरानें रूप धारण करून खरा धर्म सांगितला; अन्यत्र सर्व अंधार ठेविला, हा विचार यांत नाहीं. याच्यामध्यें संप्रदाय अनेक आहेत, तरी त्यांतून अमक्या एका पुरुषानें उपदेशिला तोच आर्यधर्म, असें कोठें आढळावयाचें नाहीं. अमुक एकच ग्रंथाची महती आहे असें नाहीं. सोईचा व गैरसोईचा हा प्रश्न वेगळा;

परंतु यांत अमुक ग्रंथ अथवा पंथ पहिला, अमुक दुसरा; एक अधिष्ठाता, एक अधिकरण असें नाहीं. सर्वांची योग्यता सारखी. हा ऐतिहासिक नाहीं यावरूनच याच्या तिसऱ्या लक्षणाची प्राप्ति होते. कोणताही धर्म ऐतिहासिक असला म्हणजे त्याची वाढ खुंटते. एकदा इतिहाससिद्ध ठरलें तेंच सत्य, त्यांत अंतर पडावयाचें नाहीं असें झालें, म्हणजे अर्थात् वाढीला अटकाव झाला.

आर्यधर्माचें तिसरें लक्षण हें कीं, हा इतर धर्मांप्रमाणें स्थायिक नसून याला वाढ आहे. एकाद्या झाडांस कधीं वाढ, कधीं उतरती कळा, कधीं जरा अशा अवस्था प्राप्त झाल्या तरी खच्ची करून खत मसाला घातला, म्हणजे वाढीची शक्यता असते; तशी ह्या धर्माची खुबी आहे. याचीं पूर्वरूपें पुष्कळ झालीं व उत्तररूपें व्हावयाचीं आहेत. याला अनंतकालपर्यंत वाढ आहे; तिला अवधि नाहीं. यांत नवे संप्रदाय, नवीन रूपांतरें, नवीन मिश्रण होत जाणार आहे. याला ऐतिहासिक रूप नाहीं म्हटलें म्हणजे वेदादि ग्रंथ तुमच्यांत नाहींत व असल्यास ते तुम्हांस पूज्य नाहींत काय, असा प्रश्न निघतो. होय. तीं धर्म[1]पुस्तकें खरीं व तीं मान्यही आहेत; परंतु प्रथम वेदांचें बंधन होतें. तरी तितक्यानें समाधान होईना, तेव्हां उपनिषद्रूप आवरण झालें. पुढें पुराणें झालीं. परंतु त्यांतील बाष्कळपणा न रुचल्यामुळें साधु पुरुषांनी भक्तिमार्ग, वारकरीपंथ वगैरे स्थापित केले. अशीं अनेक रूपांतरें होत होत स्तिमितपणा, तटस्थपणा, जरा हीं अनुभवीत असतांही एखादा खच्ची केलेला खुंट वाढतो त्याप्रमाणें आपण येथवर आलों आहों; तरी वाढ चालूच आहे.

आर्यधर्माचें चौथें लक्षण हें कीं, या वाढीला एक विशेष दिशा आहे व ती प्रेमाची आहे. जसें झाड सूर्याच्या उजेडाच्या बाजूला वाढ घेतें, त्याचप्रमाणें ह्या धर्माची वाढ तेजोरूपी प्रेमाच्या बाजूला आहे. कधीं कधीं यावर पांघरुणें पडतात, सत्याचा अपघातही होतो, परंतु वाढ खुंटत नाहीं. दोन हजार वर्षांमागें अग्निहोत्रादि यज्ञासाठीं पशुवध होत असत; परंतु प्रेमभावाचें आधिक्य होऊन ती चाल लोकांनीं सोडून दिली. प्रेमबंधन वाढावें, मनाला दुःख होऊं नये, हींच सार्वत्रिक प्रवृत्ति. जो मनुष्य सदाचरणानें वागतो त्यास देव पावतो, असें सेंट पॉलनेंही म्हटलें आहे; परंतु मनुष्याच्या उद्धाराच्या संबंधानें आर्यधर्मांत उदार कल्पना आहेत, तशा इतर कोठें नाहींत. जातिबंधन वगैरे निर्बंध व अडचणीचे प्रकार असतां प्रेमाची वाढ आहे, अधिकार वाढत आहे, व वाढीचा व्याप होत आहे. कर्मठपणा व जातिनिर्बंध असतां ही स्थिति व परस्परांविषयीं वैमनस्य नाहींसें व्हावें हीच इच्छा; तर मग तीं शिथिल होतील तेव्हां काय प्रकार होईल कोण जाणे. छाप मारून दुसरा छाप धर्माच्या बाबतींत उठवूं म्हटल्यास जमत नाहीं. परमेश्वराच्या पायांपासून वाहात असलेल्या ह्या धर्मगंगेचा ओघ प्रेमाचा असून त्यानें प्रफुल्लित झालेल्या ज्ञानावरील **भागवतधर्म** हें अत्यंत सुवासिक फूल व मधुर फल आहे, असें आपणांस दिसून येईल; व बारकाईनें विचार करून पहाणारास प्रार्थनासमाजाचें व भागवतधर्माचें लक्षणांच्या संबंधानें साहचर्य अत्यंत आहे, हें त्यांतील सभासदांचे पोशाक, बसणें, उठणें कसेंही असलें तरी, सहज समजेल. आपल्या देशांतील महापुरुषांनीं आपल्या प्रसादरूपी वाणीनें व प्रसादरूपी वर्तनानें ज्यांत कोणतेही पर्वत आड घातलेले नाहींत, असा भक्तीचा मार्ग खुला करून दिला आहे. मात्र सत्संग करून व सद्ग्रंथ वाचून गैरसमजुतीचे भाग असतात त्यांविषयीं आपल्या भ्रमाचें निरसन करून घेतलें पाहिजे. कोणी म्हणेल तुमच्या ह्या धर्माच्या आज्ञा किती व कोणत्या आहेत, तें सांगा. त्यास आमचें उत्तर हेंच कीं, आमच्या धर्माच्या आज्ञा आठ आहेत, किंवा दाहा आहेत असें नाहीं. सर्व मानवबंधूंशीं प्रेमानें वागावें, हीच त्यांतील मुख्य आज्ञा. वर सांगितलेल्या लक्षणांवरून भागवतधर्माचें व प्रार्थनासमाजाचें साहचर्य आहे व त्या धर्माचा या व्यासपीठावरून उपदेश करण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं, अशी खात्री होईल व ह्यासंबंधानें प्रत्येकानें अवश्य विचार करावा, अशी माझी विनंति आहे.

१. "आमच्या प्रार्थनासमाजपंथाचा विशेष गुण हाच आहे कीं, सर्व धर्मगुरु, सर्व धर्मपुस्तकें आम्हांस पूज्य आहेत, व सर्वांत जें चांगलें असेल तें ग्राह्य करण्यास आमची हरकत नाहीं." प्रार्थनासमाजाचें ईश्वरप्रणीत मानलेल्या धर्मग्रंथांविषयीं काय धोरण आहे तें न्या. मू. च्या वरील उद्गारांवरून स्पष्टपणें कळून येईल.

–संपादक








# अवघें देखें जन ब्रह्मरूप

**ऐसें भाग्य कईं लाहाता होईन ।**
**अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥ १ ॥**

असा एक तुकोबांचा अभंग आहे. त्यासंबंधानें पुष्कळांस वाटतें कीं, 'अवघें देखें जन ब्रह्मरूप' हें व्हावें कसें ? असें भाग्य आपणांस कसें प्राप्त होईल ? ही स्थिति प्राप्त होणें कांहीं शक्य नाहीं; ही तुकाराम-बावांची अतिशयोक्तिच असली पाहिजे. तेव्हां ह्या तुकोबांच्या उक्तींत अतिशयोक्तीचाच भाग आहे, किंवा ती अनुभवाची गोष्ट आहे, ह्याचा क्षणैक विचार केला असतां कल्याणकारक होईल; आणि जन तर काय, पण सगळें विश्वही ब्रह्मरूप म्हणण्यांत केवळ कविलाघव आहे असें वाटणार नाहीं. प्रथमदर्शनीं ही केवळ कविता आहे, किंवा तिजमध्यें कांहीं सत्य आहे, अशी शंका तुम्हांआम्हांसारख्या सामान्य जनांच्या मनांत येण्याचा संभव आहे खरा; तथापि थोड्या विचारा अंतीं ती शंका दूर होईल. तो विचार करण्यास रंगनाथस्वामींनीं केलेल्या

**सावध सावध सावध मनुजा निजरूपीं सावध रे ॥ धृ० ॥**
**हिताहित मना न विचारिसि कां झांकुनि नेत्र सदा ।**
**कामकर्दमीं लोळसि निशिदिनिं मानुनि सौख्य सदा ।**
**वीज लवूनि सरे सुख तेवीं वेगिं घडे आपदा ।**
**इंद्रियग्राम विराम घडे मग हरिसी स्मरसी कदा ॥ १ ॥**

या पदांत ज्या विषयीं कधीं बेसावध असूं नये असें सांगितलें आहे तें निजरूप काय आहे, ह्याचा विचार साह्यभूत होईल. 'अवघें देखें जन ब्रह्मरूप' ह्या भाग्याचा लाभ थोड्याच लोकांस असेल; तथापि तुकारामबावांच्या उक्तीचें व वरील पदाच्या ध्रुपदाचें प्रमेय, या दोहोंतील उपदेश एकच आहे. निजरूपीं सावध होणें, आणि अवघें जन ब्रह्मरूप पाहणें, एकच आहे. अवघें जन ब्रह्मरूप पाहण्याचें भाग्य तुम्हां-आम्हांला प्राप्त झालेलें नाहीं; सध्यांच्या स्थितींत प्राप्त होईलसेंही दिसत नाहीं; त्याची कल्पना करण्याला मात्र मार्ग आहे. तो असा : आपलें मुंबई शहर घ्या. प्राचीन काळच्या आपल्या देशांतील इंद्रप्रस्थाप्रमाणें, अथवा हस्तिनापुराप्रमाणें, किंवा हल्लींच्या युरोपांतील लंडन, पारिस वगैरे शहरांप्रमाणें यांतही अनेक प्रकारचा व्यापार चालत असतो, आणि ऐषआराम दिसतो. यांत नानाविध हृदयंगम वस्तु आहेत. अनेक तऱ्हेचे चित्र-विचित्र पेहराव दृष्टीस पडतात. तशींच नाना तऱ्हेचे व्यापार करणारीं लक्षावधि माणसेंही या शहरांत आहेत. हें जें सर्व चाललें आहे, यांत आपणांस काय दिसतें; या पाहण्यापासून अथवा चक्षूंच्या व्यापारा-पासून आपल्या बुद्धीला काय संस्कार होतो; याचा विचार केला असतां, मनुष्याचें मन या सर्व योजना करीत आहे, असें मला दिसून येतें. एकंदर गोष्टींत त्या मनाची लीला दृष्टीस पडते, तें मन काढून घ्या, म्हणजे सर्वत्र अव्यवस्था होईल. विशेष स्पष्टीकरणासाठीं आपण गाडीचें उदाहरण घेऊं. गाडीला घोडा ओढून नेतो, तो तें स्वेच्छेनें करितो काय ? नाहीं. घोड्याच्या मनाचें आकलन करून त्याला लगामीं धरून चालवि-ण्याचें काम हांकणाऱ्या सारथ्यामुळें होत असतें. सारथी तरी आपल्या इच्छेनें वागतो काय ? नाहीं. तोही रथी अथवा गाडींत बसणारा जो यजमान असतो त्याच्या मर्जीप्रमाणें काम करीत असतो. यजमानाच्या मनांत अमक्या ठिकाणीं जावयाचें असतें त्याप्रमाणें सर्व योजना होते. एवंच, गाडी, घोडा, सारथी, रथी सर्व असून, रथ्याच्या मनांत जी स्फूर्ति होते तिचे सारथ्याच्या हांकण्यावर आणि घोड्याच्या व गाडीच्या गतीवर परिणाम होतात. मनांची परंपरा अथवा सांखळी लागून हा सगळा व्यापार होत असतो. पोलिस शिपाई घ्या. नाईक-हवालदार-जमादार त्याच्या वरचा अधिकारी, अशी मालिका असते. तथापि सर्व काम सुरळीत, एकसूत्रानें चालतें; हा सर्व कांहीं खेळ मनुष्याच्या इच्छेचा व्यापार होय. एकंदर चलन गति व रचना कोणा तरी योजकाच्या स्वाधीन आहे, असें दिसून येतें. कृत्रिम सृष्टीमध्यें मनुष्याचें काय काम

आहे म्हणून पाहूं गेल्यास, योजकपणा व योजना हीं मात्र त्याचीं कामें आहेत, असें आढळतें. हा योजकपणा, ही योजना काढून टाका; म्हणजे काय होतें, अथवा काय राहतें तें पहा. गाडीची काय, पोलिसाची काय, अथवा राज्याची काय, सर्व रचना, सर्व व्यवस्था बिघडून जाईल. कधीं कधीं मोठेमोठे अधिकारी दृष्टीस पडले नाहींत, तर हें चालतें कसें असें वाटतें. पण, वरिष्ठ अधिकारी रस्तोरस्तीं दिसले, म्हणजे ती कमी दर्जाची व्यवस्था समजावी. मोठे कामदार दृष्टीसही न पडतां सुयंत्रितपणें काम होतें, हीच उत्तम व्यवस्था होय. मनुष्याकडे पाहिलें, तर त्याचा मनुष्यपणा हातांत नाहीं, किंवा हाडांत नाहीं; तर त्याचें मन, इच्छा किंवा बुद्धि यांत आहे. यांमध्यें विचुकपणा होऊं लागला म्हणजे तो सृष्टींतून उठला, असें समजावें, आणि तसा लोकव्यवहारही आहे. तेव्हां सर्व व्यापारांत होत असतें काय, तर मनुष्याचें मन इतर मनुष्यांच्या मनांला पाहातें. मनुष्य मनुष्याला पाहातें; म्हणजे रूपवर्णादि साधनांच्या द्वारें एका मनाचा दुसऱ्या मनावर संस्कार होतो. पुस्तकाचा दृष्टान्त घेतला असतां, त्याच्या संबंधानें हा प्रकार विशेष रीतीनें व्यक्त होतो. पुस्तक पाहिलें म्हणजे पांढऱ्या कागदावर काळी शाई आहे इतकें दिसतें; परंतु पांढरा कागद घेतला आणि त्यावर काळी शाई ओतली, तर वाचतां येईल काय ? नाहीं. तथापि, सर्व पुस्तकें सर्वांस सारखीं वाचतां येत नाहींत. वाचण्याच्या संबंधानें मुख्य तीन अटी आहेत. एक, अक्षरें स्पष्ट सुवाच्य असलीं पाहिजेत; दुसरी, ज्या भाषेंत किंवा लिपींत तें पुस्तक लिहिलेलें असतें ती आपणास अवगत असली पाहिजे. तिसरी, त्या भाषेंतील शब्दांची आपणास चांगली माहिती असली पाहिजे. इतकें असूनही त्यांतील विषयांचें आपणास गम्य असलें, अथवा अर्थ समजत असला, तर तें पुस्तक चांगलें वाटतें. ज्या मनानें तें पुस्तक रचिलें, त्याशीं वाचकाच्या मनाचें संभाषण होतें. एक मन दुसऱ्या मनाला वाचतें. वाचनक्रिया काय; विद्या काय; तारायंत्रांतून सवालजबाबांचें येणेंजाणें काय; मनाचा मनाशीं व्यापार होत असतो. वाचनांत संकेतानें सर्व कांहीं होतें. तात्पर्य हेंच कीं, मनुष्यकृतीमध्यें अथवा कृत्रिम सृष्टीमध्यें शरीराचा शरीराशीं संबंध नाहीं; आत्म्यांचें आत्मेपणानें भाषण होत असतें. मध्यें असणाऱ्या साधनांची योग्यता नाहीं असें नाहीं; पण मनाची मनाला तार येतजात असते, हीच मुख्य गोष्ट होय. ही कृत्रिम (मनुष्यकृत) सृष्टीची व्यवस्था झाली. ईश्वरनिर्मित सृष्टीमध्येंही हाच भाग अथवा प्रकार आहे. ह्या सृष्टीचें शास्त्रज्ञान होतें, तें कशामुळें ? आठ महिन्यांनीं पाऊस पडायाचा हा शास्त्राचा सिद्धान्त आहे. हा भरवंसा कशानें उत्पन्न होतो ? आषाढ महिना जवळ आला म्हणजे पावसापाण्यापासून आपलें रक्षण करण्याकरितां जो तो आपल्या आद्याप्रमाणें छत्री, कांबळें, अगर इरलें विकत घेण्याच्या अथवा तयार करण्याच्या तजविजीस कां लागत असतो ? मनाची विवंचना करणाऱ्या या टोंकास बसणाऱ्या लोकांचें या सृष्टीमध्यें नांदणाऱ्या सत्तेशीं भाषण होत असतें त्यामुळें शास्त्रसिद्धान्त करणारे मनस्क आहेत; आपणही मनस्क आहों. हीं सर्व धोरणें बहुत कालच्या अनुभवावरून बांधलेलीं आहेत. हा अनुभव कशानें आला ? शाश्वतयोजना आपण कशा करूं शकतों ? शास्त्र म्हणजे सर्वव्यापी सिद्धान्तांचा संग्रह. हे सिद्धान्त करावयास कोणी तरी पाहिजे. आणि त्याचा आधार सृष्टींत विस्तृत असलेली शाश्वत व्यवस्था होय. या व्यवस्थेची, किंवा योजनेची समजूत घातली असतां आपणांस ती समजते. युक्लिडचा सिद्धान्त आम्हांस स्वतःला अवगत नसो; परंतु तो आपणांस समजून दिला असतां समजतो. सृष्टींत अनुबंध नियम सर्वत्र आहेत; म्हणूनच शास्त्रसिद्धान्त होऊं शकतात. या सृष्टीस जड म्हणतात, पण ती खरोखर जड नाही; जड असा पदार्थच नाहीं. विपर्यासानें, अथवा व्यतिरेकानें सृष्टि जड वाटते, तथापि जोंपर्यंत तिचें शास्त्रज्ञान होत आहे तोंपर्यंत ती जड नाहीं; कारण, अनेक उपचारांनीं व साधनांनीं तिजमधील पदार्थांच्या योजकाच्या मनाची कल्पना होऊं शकते. आम्ही जो सर्व न्यायीपणा समजतों तो अवताराचा, किंवा विशेष प्रसंगाचा नव्हे. सृष्टीचें जें जड आवरण आहे, त्याच्या पोटीं अंतश्चक्षूनें पाहिलें तर कृत्रिम सृष्टीप्रमाणें तेथेंही प्रकार दिसतो. शास्त्रबंध होणें शाश्वतनियम व शास्ता यांचें दर्शक होय. जड सृष्टीचें शास्त्र म्हणजे शाश्वतनियम व नियंता अथवा शास्ता यांच्या अस्तित्वाचा बोध हें ज्याच्या ध्यानांत आलें, त्याला 'अवघें देखें जन ब्रह्मरूप' हें कसें व्हावें याची कल्पना आली असें समजावें. तुम्हीआम्ही सर्व ब्रह्मांड एका शास्त्याच्या स्वाधीन असून तो कृत्रिम सृष्टींत सर्व कांहीं आपणाकडून करवितो. आणि ईश्वरनिर्मित सृष्टींत स्वतः

अनुक्रमणिका

करितो असें सर्वत्र पाहणें, हेंच अवघें जन अथवा विश्व ब्रह्मरूप देखणें होय. मनुष्यप्राण्याच्या संबंधानें पाहतांही, आपल्या बाह्य चक्षूंनीं दिसणाऱ्या या शरीरांत दोष, पापें व अभिलाष यांचीं पुटें असणारा जो वासनात्मक लिंगदेह आहे त्याचा शास्ता, त्याला आज्ञा करणारा देह आहे. याच्या अस्तित्वाचा अनुभव आपण एखादें दुराचरण करावयास प्रवृत्त झालों असतां आपला हात कांपतो, आपल्या उरांत धडकी भरते, यावरून आपणांपैकीं प्रत्येकास होत असतो. वासनात्मक लिंगदेहास वर्तविणारा जो कारण देह, तो, आपण प्रत्येकजणाच्या ठिकाणीं पाहूं शकतों. अवघें जग ब्रह्मरूप पाहणें, याचा अर्थ पापी, दुष्ट व साधु यांस, सारखेंच समजलें पाहिजे असा कोणी करील, तर ती अनवस्था, तें वेड होईल. पाप्याला शासन आणि उपदेशच योग्य; हा फरक सृष्टिनियंत्याच्या व्यवस्थेप्रमाणें राहणारच. मनुष्यप्राण्यामध्यें या निजरूपाची अथवा ब्रह्मरूपाची व्याप्ति अधिक आहे, मग तो मनुष्य पापी असो वा पुण्यशील असो; सुष्ट असो किंवा दुष्ट असो. मनुष्यजन्माचा अधिकार फारच मोठा आहे कारण, जगन्नियंत्याच्या ध्वनीला आपण प्रतिध्वनि देत असतों. प्रत्येक जनाच्या ठिकाणीं असणारें ब्रह्मरूप पाहायचें आहे. नाटकांत रंगभूमीवर सोंगें घेणारे आपण खरोखर कोण आहों, हें विसरत नसतात; पण तुम्हीआम्ही या सृष्टिरूपी रंगभूमीवर जीं सोंगें घेतों, त्यांत आपल्या खऱ्या स्वरूपास विसरून जातों. आपण आवरण घालून डोळे झांकून बसतों; अर्थात् तें आपण पाहूं शकत नाहीं. साधु पुरुषांचा सोंवळेपणा व अधिकार, त्यांची ज्योति व पवित्रता वेगळ्या प्रकारची आहे; तथापि तुम्ही, आम्ही व ते सर्व, सारथी असून प्रत्येकाच्या ठिकाणीं रथी एकच आहे. सारथी निष्काळजी व बेसावध असला, तर घोडे मस्त व अनावर होऊन गाडी कधीं कधीं गटारांत नेऊन आदळतात; तसाच प्रकार अनेकवेळां तुमच्याआमच्यासारख्यांचा होतो. आपण प्रत्येकाच्या ठिकाणीं परमात्म्याला पाहण्याचें सोडून एकमेकांचे दोष पाहत असतों. छिद्रान्वेषी होतों, हें आपलें अभाग्य. प्रत्येकाच्या ठिकाणीं परमेश्वराची ज्योति, परमेश्वराचें सिंहासन आहे, असें आपण पाहिलें, म्हणजे एथेंच स्वर्ग आहे. सर्वत्र ब्रह्मरूप पाहून सुखस्वरूप होणें, हीच स्वर्गप्राप्ति; स्वर्ग कांहीं निराळा लोक नाहीं. रथीच्या स्वाधीन केलेला सारथि घोड्यास चालवितो. रथी, नियंता, शास्ता, पिता, माता सर्वांच्या ठिकाणीं एकच आहे असें वाटलें म्हणजे प्रत्येकाला सुख होईल, आणि साधु पुरुषांचीं वचनें यथार्थ आहेत अशी थोडीबहुत प्रतीति होण्याला साधन होईल.

＊　＊

# विज्ञान

मागें कांहीं दिवसांपूर्वीं झालेल्या भाषणांत या विश्वामध्यें आपण खरोखर काय पाहतों व ऐकतों याचें विवेचन केलें होतें. त्यांत भावार्थ असा होता कीं, मन मनाला पाहत असतें. स्वाद, रचना, कवित्व, वगैरे नाना तऱ्हेचे व्यवसाय आम्ही करितों त्यांचें सार काय आहे? या सर्व व्यापारांचें वर्म काय आहे याचें अनुमान नुसत्या त्वचेवरून अथवा बाह्य स्वरूपावरून केलें, तर तें फसेल. नारळाची बाहेरची खरखरीत त्वचा व त्याचें कठीण कवच यांवरून त्याच्या गोडीचें अनुमान केलें असतां जसें चुकेल, त्याचप्रमाणें आमच्या व्यवहाराचें बाह्य स्वरूप पाहण्याचा परिणाम होईल. तें काढून आंत काय आहे म्हणून पाहिलें, तर मन मनाला पाहतें; त्याच्याशीं सहवास व संभाषण करीत असतें; जेथें दुसऱ्या मनुष्याचा संबंध नाहीं अशा निर्जन प्रदेशांतही मन मनाला पाहतें. सृष्टींत जो परमात्मा अवतरला आहे, त्याला आपला आत्मा पाहतो. सृष्टींतील सौंदर्य परमात्म्याचें सूचक आहे म्हणून पूर्वविवेचनांत सर्वांभूतीं अवतीर्ण झालेल्या आत्म्याला जाणणें, त्याच्याशीं प्रत्यक्ष सहवास व संभाषण करणें, हें जीवात्म्याचें कर्तव्य असें प्रतिपादन केलें. आज केवळ मन मनाला पाहतें, किंवा आणखी कांहीं खूण पटतें, हें पाहावयाचें आहे. उपनिषदाच्या एका भागांत एका विद्यार्थ्याचा पित्याशीं संवाद चालला असतां, त्याला सृष्टीमध्यें मन मनाला पाहतें असें उत्तर मिळालें; तेव्हां त्यानें पित्याला एवढेंच होत असतें कीं याच्या पलीकडे कांहीं तरी गूढ आहे. असे उलट प्रश्न केले. त्यावर पित्यानें उत्तर दिलें कीं याच्याही पुढें दोन पायऱ्या आहेत; त्यांपैकीं पहिली विज्ञान ही

अनुक्रमणिका

होय. मन व विज्ञान यांत कळण्यासारखा भिन्नपणा आहे. विशेष ज्ञान या धात्वर्थी विज्ञानाचा विचार आज कर्तव्य नाहीं. तर मग विज्ञान म्हणजे काय ? हत्ती, घोडा, पर्वत, इत्यादि बाह्य विषयांचें ग्रहण जोंपर्यंत मन करीत आहे, तोंपर्यंत तें ज्ञान; पण असें होतां होतां मनानें मनच ज्ञानाचा विषय केला, म्हणजे जो विचार होतो, तें विज्ञान. मन ज्ञानविषयीभूत होणें, हेंच विज्ञान. योग्यतेच्या मानानें, ज्ञानापेक्षां या विज्ञानाचा दूरान्वयाचा संबंध आहे, असें कित्येकांस वाटत असतें; तथापि तें मुळींच कधीं होत नाहीं असें नाहीं. ज्यांचा सर्व जन्म अशा ढंग रीतीनें जातो कीं, मनाचा संकोच आंत करून विचार करण्याचे प्रसंग येत नाहींत; ते अत्यंत अभागी समजावे आणि असे फारच थोडे असतील. तुम्हांआम्हांसारख्यांला कधीं कधीं तरी असे प्रसंग येतात हें, 'मी माझ्या मनच्या-मनीं विचार केला', 'माझें मन मला सांगतें' इत्यादि बोलण्याच्या प्रकारांवरून सिद्ध होतें. जो मनुष्य मनाला आंत खेंचीत नाहीं, तो मनाच्या खऱ्या स्वारस्याला पावत नाहीं. अंतर्यामींचा विचार झाल्याविना, अथवा आपलें मन ज्ञानाचा विषय झाल्याविना, इंद्रियांच्याद्वारें प्राप्त झालेलें बाह्यविषयक ज्ञान आपलेंसें होत नाहीं. मनाला ज्ञानाचा विषय करण्याची योग्यता मनुष्याच्या अंगीं आली, म्हणजे पूर्णकाल झाला. मनुष्य वयांत येणें म्हणजे हा अधिकार त्याला प्राप्त होणें. तो मुलगा वयांत आला नाहीं असें आपण म्हणतों त्याचा अर्थ हाच कीं, त्याला मन मनाचा विषय करून घेण्याचें सामर्थ्य आलेलें नाहीं. लोकरीतीनें व सरकारी कायद्यानें हा अधिकार आला, म्हणजे मनुष्याच्या कृतीची जबाबदारी त्याच्या माथ्या-वर विशेष येते; एऱ्हवीं लहान अल्पवयस्क मुलांस मोठ्या मनुष्यापेक्षां कमी ऐकूं येतें अथवा दिसतें असें नाहीं, तर त्याच्या कृतीची जबाबदारी त्याच्या माथीं येण्याइतकें त्याचें विज्ञान नसतें. बाह्य सृष्टींत मार्दव, काठिण्य, सुरूपता, कुरूपता इत्यादि इंद्रियजन्य ज्ञानाचे विषय आहेत; पण बरेंवाईट म्हणून जें कांहीं आहे तें विशेष असून बाह्य सृष्टींत नाहीं, आणि तें मनाच्या ठिकाणीं विचार अथवा मनाची परीक्षा केल्याविना समजत नाहीं. विषय इंद्रियाला संलग्न झाले, म्हणजे एका प्रकारचें ज्ञान होतें; परंतु बरेंवाईट समजणें, हा जो मनाचा धर्म, त्याची जागृति अथवा उद्बोधन होणें हें विज्ञान अधिक महत्त्वाचें आहे. शिष्टाचार, संतसमागम, शाळा वगैरे व्यवस्था यांकरितां आहेत कीं, त्यांच्यायोगें मनाचें निरीक्षण करण्याची योग्यता यावी व वाढत जावी. ही योग्यता अंगांत आल्याच्या योगानें जबाबदारीच्या संबंधानें जो फेरफार होतो तो लहान, असमंजस, मुलानें अनन्वित कर्म केलें, तर त्याला आपण खोडी म्हणतों; आणि तेंच प्रौढ वयाच्या मनुष्यानें केलें, तर तो शासनास योग्य असा अपराध समजतों, यावरूनच उघड दिसण्यांत येतो. मन स्तब्ध आहे; तें आदर्शासारखें म्हणजे आरशा-सारखें आहे. मन ज्ञानाला विषयीभूत केल्यानंतर बरेंवाईट समजतें आणि त्याची आवडनिवड करितां येते. यालाच विवेक अथवा विज्ञान अशी संज्ञा आहे. यालाच सदसद्विचारशक्ति असेंही नांव अलीकडे दिलेलें आहे. हें सामर्थ्य मानवप्राण्यांत विशेष आहे आणि तें कांहीं काळानें येत असतें.

आतां विज्ञानाचें स्थान, त्याची सूचना, मनुष्याच्या मनाच्या ठिकाणीं तर आहेच; पण या शक्तीची खूण सृष्टींत सांपडते कीं नाहीं, हें पाहावयाचें आहे. कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, विज्ञान सृष्टींत नाहीं; योजना व रचना दिसते, परंतु विज्ञान अथवा विवेक हा दैविक नसून, सुखाची वृद्धि व्हावी आणि दुःखाचा नाश व्हावा, एतदर्थ मनुष्यानें कल्पिलेला आहे. या मताचा थोडा विचार करणें जरूर आहे. वास्तविक पाहिलें असतां, ज्ञानापेक्षां विज्ञानाशीं आपला संबंध अधिक आहे. कारण, इंद्रियांपैकीं एखादें नष्ट अथवा शक्तिहीन झालें असतां, तद्द्वारा होणारें ज्ञान प्राप्त होत नाहींसें होतें, तसा प्रकार मनाचा नाहीं. म्हातारपणाचें सौभाग्य हेंच आहे कीं, त्या वयांत इंद्रियांचे व्यापार कुंठित होऊन कमी होतात, पण विज्ञान वाढत असतें. जर तेंही कमी झालें, तर मरण बरें असें वाटूं लागतें. विज्ञान विकसित होत जाणें, हाच म्हातारपणाचा शिक्का आहे. विज्ञानाचा व्याप मनुष्यसृष्टींत ज्ञानापेक्षांही अधिक आहे. शिष्टा-चार, राजदंड, दंडनीति. गृहस्थिति यांचा पाया विज्ञान आहे. घरांतील कर्त्या पुरुषानें आपल्या परि-वाराचें संगोपन करावें वगैरे व्यवस्था विज्ञानवश आहे, हें सर्व गृहीत होईल. पण, विज्ञान सृष्टींत कोठें आहे ? अशीं शंका येते. सृष्टीमध्यें माधुर्य आहे; सौंदर्य आहे; पाहिजे असल्यास मन आहे असेंही म्हणा; परंतु विज्ञान

कोठें आहे ? अंतश्चक्षूनें पाहिलें, तर सर्व सृष्टींत जर कांहीं दिसत असेल तर तें विज्ञान होय असें आढळेल. सृष्टींत होणाऱ्या व्यापारांवरून व उद्देशांवरून काय दिसून येतें ? ज्या गोष्टी केल्या असतां हित होतें त्यांच्याविषयीं तत्परता व ज्या अहितकर त्या न करण्याविषयीं दक्षता, हीं आपल्या दृष्टीस पडतात. आपण अव्यवस्थितपणें वागलों, तर वाईट परिणाम होईल असें समजून, आपण सावध राहतों. दिव्याचा उपयोग प्रकाश मिळविण्यापुरताच करून घेत असतों; लहान अज्ञान मुलाप्रमाणें आपण त्याच्यावर हात धरून पोळून घेत नाहीं. या मनाच्या व्यापारांत आपण अंतश्चक्षूनें पाहिलें असतां काय दिसतें ? सर्व प्राण्यांचें संगोपन व्हावें, शुद्धबुद्धीचा विकास व्हावा, प्रेम वाढावें. सर्वत्र कलह शांत व्हावेत. अशीच एकंदरीनें योजना आहे असा बोध होतो. ज्यांत परब्रह्माचें स्वरूप आविर्भूत होत असतें असा विज्ञानमय कोश मनोमय कोशा-पलीकडचा आहे. तेणेंकरून सृष्टि विज्ञानमय आहे, अशी प्रतीति होते. राजशासनांला आधार विज्ञानाचा असतो. तरी त्यांनीं विज्ञानमय होणारा फारच अल्प प्रदेश आहे; आणि त्यांचा धर्म्यपणा विज्ञानमय कोश आहे, म्हणूनच त्यांस प्राप्त होतो. पुण्यमार्गाकडे मन प्रवृत्त व्हावें व पापापासून परावृत्त व्हावें, असा स्वाभाविक कल असतो, त्याचें मूळ विज्ञानमय कोशांत आहे. सृष्टीची रचना, मनुष्याची स्थिति इत्यादिकांवर विज्ञानाचा परिणाम होत असतो. आल्हाद व क्लेश सर्वांस होतात. याहून भिन्न जें बरेंवाईट केल्यानें सुखदुःख होणें, तें विज्ञानाच्या विकासावर अवलंबून असतें. लूटलबाडीनें आपला चरितार्थ चालविणारे भिल्ल, रामोशी वगैरे लोक क्वचित् नसतात असें नाहीं, तरी सामान्यतः अनिर्वाहपक्ष म्हणून चोरी होत असते. चोराला चोरी पचली म्हणजे आल्हाद होतो; परंतु त्याचें मन त्याला खात असतें, आणि पोटाची गार भरण्यासाठीं केलेल्या चोरीविषयीं त्याला वाईट वाटतें. आल्हाद व क्लेश परावलंबी आहेत; त्यांच्या पलीकडचें सुखदुःख (आत्म्याचें) हें कांहीं निराळें आहे, आणि तें विज्ञानमय आहे. आत्मा सुखात्मा झाला, विज्ञानमय कोशाची वृद्धि झाली, म्हणजे तो पुरुष राजा नसला, अथवा अधिकारी नसला, तरी लोक त्याला जास्त भितात. व्यभिचारिणी स्त्रीला पतिव्रतेपाशीं गेलें असतां जें दुःख होतें तें विज्ञानमय कोशाची तिजमध्यें जागृति होते म्हणून होतें. पापी, दुराचारी मनुष्य शेजारच्या सदाचरणी मनुष्यापाशीं जावयास भीत असतो, त्याचेंही कारण हेंच असतें; त्याला कांहीं शारीरिक क्लेश होतात असें नाहीं. विज्ञानवृद्धि व्हावी; तन्मयसुख वाढावें; अशीच योजना सृष्टीमध्यें आहे; म्हणूनच तुकारामबावांनीं 'ऐसें भाग्य कई लाहाता होईन। अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥' असें म्हटलें आहे. ब्रह्मरूप म्हणजे विज्ञानरूप. आफ्रिकाखंडांतील ओसाड वाळवंटांत पाण्याचा झरा अथवा ओलवण दृष्टीस पडली असतां, प्रवाशाला आनंद वाटतो, त्याप्रमाणें आपणांपैकीं प्रत्येकास आपल्या आठवणीच्या वालुकामय प्रदेशांत निर्झर व झाडपान असलेल्या सत्संगरूप सुखकर प्रसंगाचा अनुभव कधींनाकधीं येत असतो. सदैव विज्ञान-मय कोशाची गांठ पडावी, याच उद्देशानें सृष्टीमध्यें गांभीर्य, सौंदर्य, शांतता इत्यादि योजना परमेश्वरानें केलेली आहे. विज्ञानाच्या विकासाप्रमाणें अधिकार वाढतो, आणि आपलें सुख वाढावें व दुःखाचा ऱ्हास व्हावा, अशा योजनेची साक्ष पदोपदीं सांपडते. आमचें दुर्दैव आहे कीं, आपण आपल्या डोळ्यांवर अंधारी आणून घेतों. मागील भाषणाच्या पुरीकरणासाठीं हा विषय आज आपणांला सादर केला आहे. तर प्रत्येकानें आपल्या ठायीं विज्ञानमय कोशाची वृद्धी होत आहे कीं काय, याविषयीं विवंचना करावी अशी माझी आपणा सर्वांस विनंति आहे.

* *

# भक्तिव्यवसायांत वेठ असतां नये

तळमळी चित्त दर्शनाची आशा ।
बहु जगदीशा करुणा केली ॥ १ ॥
वचनींच संत पावले स्वरूप ।
माझें नेदी पाप योगा येऊं ॥ २ ॥
वेठीऐसा करीं भक्तिवेवसाव ।
न पवेचि जीव समाधान ॥ ३ ॥
तुका म्हणे कई देसील विसांवा ।
देवराया धांवा घेतें मन ॥ ४ ॥

या तुकारामबावांच्या अभंगाचें सार दुसऱ्या व तिसऱ्या चरणांत आहे. 'हे परमेश्वरा, मागें साधुसंत तुझें नामोच्चरण करून स्वरूपाप्रत पावले, त्वद्रूप झाले; परंतु तसा योग घडण्यास माझें पाप आड येतें ', असें दुसऱ्या चरणांत म्हटलें आहे. ज्याला असे प्रसंग येत नाहींत, आणि परमात्म्याच्या दर्शनास आपलें पाप आडवें येतें, अशी प्रतीति येत नाहीं, तो धर्ममार्गांतला खरा अधिकारीच नव्हे. ऐहिक व्यवहारांत आपण कोणताही उद्योग केला, आणि त्याचें फल प्राप्त झालें नाहीं, तर देवाला, किंवा दैवाला शब्द लावण्याची साधारण प्रवृत्ति असते; आपणाकडेस दोष घेण्याची वृत्ति मनाची फारकरून नसते. संसाराप्रमाणें परमेश्वरप्राप्तीच्या मार्गास लागलेल्यांचाही प्रकार असाच होत असतो. आपण चुकत आहों म्हणून फलप्राप्ति होत नाहीं, असें मनाला सहसा वाटत नसतें परमेश्वराच्या दर्शनाविषयीं उत्कंठा असतां भेट तर होण्याचा योग येत नाहीं अशा विवंचनेंत पडलें असतां तुकारामबावांनीं वरील अभंग केला आहे. आपणांस ज्याविषयीं आज विशेषेंकरून विचार कर्तव्य आहे तो भाग तिसऱ्या चरणांत आहे. तो हा कीं, भक्तिव्यवसाय वेठीच्या दृष्टीनें केला असतां मनाला समाधान व्हावें तसें होत नाहीं. शहरांतील जुन्या अनुभवाच्या लोकांस व बाहेरगांवीं सांप्रतही, वेठ अथवा बिगार म्हणजे काय हें माहीत असतें. गोरगरीबांकडून त्यांस मुळींच मजुरी वगैरे न देतां आपल्या दौलतीच्या अथवा अधिकाराच्या जोरावर काम करून घेणें, याला वेठ म्हणतात. हा श्रीमंत लोकांचा व सरकारी अधिकाऱ्यांचा हक्क असतो. त्यांस सुखसाधनें अधिक सुलभ व्हावीं म्हणून गरीब दुबळ्यांकडून त्यांच्या मेहनतीच्या मानानें अत्यंत दीन बलुत्याप्रमाणें जो जुलमाचा रामराम करविला जातो, ती वेठ किंवा बिगार होय– अर्थात नाखुशीनें करावयाचा. असा हा वेठीचा व्यवसाय कधींही समाधानकारक व्हावयाचा नाहीं. ओझें उचललें, काबाडकष्ट केले, आणि त्यांचा मोबदला मिळाला नाहीं, तर करणाराला समाधान तें कसें होणार ? लोकव्यवहारांत वेठ अनेक प्रकारची होऊं शकते; पण भक्तिव्यवसाय वेठीचा कसा होऊं शकेल, ही शंका सहज उभी राहते. श्रीमंतानें, अथवा सत्ताधाऱ्यानें, गरीबावर कामगिरी लादणें संभवतें व तसें नेहमीं होतही असतें; पण त्याप्रमाणें परमेश्वराची भक्ति करण्याच्या बाबतींत होणें शक्य आहे काय ? होय, शक्य आहे, आणि तसें नेहमीं होतही असतें. भक्तिव्यवसायांतही वेठ आहे; इतकेंच कीं, ती परमेश्वर आम्हांवर लादीत नाहीं; ती आपण होऊन आम्ही आपणांवर लादून घेत असतों. अशा प्रकारच्या भक्तिव्यवसायापासून फलप्राप्ति होत नाहीं; प्रसन्नता, उत्साह, परमेश्वराच्या सद्धेतूविषयीं माहिती वगैरे कांहीं निष्पन्न होत नाहीं; आणि आपली गति उन्नत किंवा अवनत होत आहे, हें समजण्यासारखी खूणही मिळत नाहीं. वेठ सापेक्ष आहे; गरीब, श्रीमंत, समर्थ, दुर्बल, अशा परस्परविरुद्ध स्थितींत असणाऱ्या लोकांची कामकाजाच्या संबंधानें गांठ पडते, तेव्हां वेठीचा प्रकार होऊं शकतो. असें असतां " 'वचनींच संत पावले स्वरूप, माझें नेदी पाप योगा येऊं'; शुक, नारद, सनक, सनंदन इत्यादि भक्त नामाच्या संकीर्तनानें तुझ्या स्वरूपाप्रत पावले असतां, माझें पाप आडवें येऊन तशी प्राप्ति होत नाहीं; असें कां होतें, ही शंका मनांत येऊन आपण भक्ति करतों ती वेठीचा व्यवसाय तर होत नाहीं ? आपली पूजाअर्चा, आपलें भजन व नामसंकीर्तन यांत वेठीचा प्रकार होतो, असें तर नसेल ना ? " या विचारांत तुकारामबावा पडले. अशा स्थितींत असतां मनाला स्थैर्य, धैर्य आलें पाहिजे; उद्योग झाला पाहिजे; तसें होत नाहीं. आपण परमेश्वराची भक्ति करितों; मग पापाला चित्तांत जागा





कोठें राहिली ? अशा शंका मात्र आपणांस येतात. या बाबतींत एकानें दुसऱ्याला सांगावयाचें काम नाहीं; ज्याचा त्यानें आपल्या मनाशीं विचार केला पाहिजे. धर्मसंबंधी जें आपलें आचरण होत असतें; भजनपूजनादि जे आपण प्रकार करितों; त्यांत लोकांचें काम नाहीं; तें आपलें आहे असें समजून आपण चालतों कीं काय; याविषयीं आपल्या मनाची साक्ष कशी काय पटते, तें प्रत्येकानें पाहिलें पाहिजे. हा विचार करितांना परमेश्वर अलिप्त आहे; तो कोणत्याही प्रकारची वेठ आपल्यावर घालीत नाहीं, हे लक्षांत ठेवणे आवश्यक आहे. अंग मोडून केवळ निरुपायानें एखादे काम करणें व तेंच उत्साहानें करणें यांत पुष्कळ फरक असतो, ही प्रत्येकाची अनुभवाची गोष्ट होय. निरनिराळ्या इंद्रियांचे व्यापार एका प्रकाराचे व्हावे आणि मनाची प्रवृत्ति दुसरीकडे असावी, म्हणजे त्या क्रियेला वेठीचें स्वरूप थोड्याबहुत अंशीं येत असतें. स्मरणी घेऊन जप करण्यांत कांहीं म्हणण्यासारखें गैर नाहीं, व संवय लागण्याच्या कामीं स्मरणी निरुपयोगी आहे असेंही नाहीं; परंतु मनाची धाव दुसरीकडे असतां नुस्ते मणि ओढले, तर ती केवळ वेठ होय. कर्ममार्गांत हा वेठीच्या भक्तिव्यवसायाचा प्रकार नित्य दृष्टीस पडत असतो. व्रतें, अनुष्ठानें इत्यादिकांच्या भानगडीस न पडणाऱ्या आपणांमध्येंही जो विधीचा भाग आहे त्यात वेठ होऊं शकते. परमेश्वर कोणत्याही प्रकारें आपल्या डोयीवर धोंड देत नाहीं, असें समजून मनानें एखादी गोष्ट घेतली असतां ती उत्साहानें व मनोभावानें केली, तरच ती फलप्रद होईल. अशी वस्तुस्थिति असून अनेकवेळां असें होतें कीं, शुष्क बाह्य क्रियेलाच सर्वपरी प्राधान्य देण्यांत येतें, आणि तिजमध्यें मन संलग्न आहे किंवा नाहीं, याचा निर्बंध एकीकडे राहतो. अशी स्थिति झाली म्हणजे मनाला समाधान होत नाहींसें होतें, आणि अन्य तऱ्हेचे दोष उद्भवतात. विधिविधानांचा व क्रियाकलापांचा मूळ उद्देश आत्म्याला वळण लागण्याचा; त्याबद्दल हातांना, पायांना, जिभेला मात्र वळण लागतें. इंद्रियांस काय, मनास काय, निर्बंध पाहिजे, आणि त्याशिवाय तीं सुयंत्रित चालत नाहींत, ही गोष्ट खरी आहे. पण, इतर साधारण गोष्टींप्रमाणें धर्माच्या बाबतींत केलेल्या व्यवसायांत मन एकनिष्ठ असल्याविना कदाचित् त्यानें इंद्रियांला, शरीराला वळण लागेल; पण, परमेश्वराच्या ठायीं तल्लीनता उत्पन्न होत नसल्या-कारणानें तो विफल होतो. वेठीच्या तऱ्हेच्या व मनोभावानें उत्साहपूर्वक होणाऱ्या भक्तिव्यवसायानें जे मनावर संस्कार होतात त्यांत महदंतर असतें. अशा प्रकारचे जड भक्तिव्यवसाय एकदम टाकून द्यावे असा सांगण्याचा भाग नाहीं. आणि तसें सांगणें अन्यथा आहे; पण तेणेंकरून पापाविषयीं तिटकारा व सदाचरणाविषयीं आवड उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. कोणतेंही काम सक्तीनें, किंवा जबरीनें, करावें लागलें, आणि त्यांत स्वतःचें हित आहे, अथवा तें आपलें कर्तव्य आहे असें वाटून तें मनापासून झालें नाहीं, तर त्यांत काम करविणाऱ्या धन्याच्या चांगुलपणानें, किंवा कडवेपणानें जो काय फरक होतो, तो इतकाच कीं, चांगला धनी असला, तर तो पोटभर जेवावयाला घालतो; तोच वाईट, द्वाड असला, तर अपशब्द बोलून अर्धपोटीं, अथवा खावयास कांहीं न देतां, घालवून देतो; पण वेठीचा भाग राहतोच राहतो. मनुष्य केवळ काम करतो, परंतु मन तेथें नाहीं, तर तें व्हावें तसें होत नाहीं, आणि त्यांत फारसा अर्थ नसतो. धर्मसंबंधी बाबतींतही एकादी क्रिया करतां करतां ती वेठीच्या तऱ्हेनें करण्याची साधारण प्रवृत्ति असते. चांगल्या संवयी लागाव्या, हें अत्यंत इष्ट आहे; परंतु नियमानें एखादी क्रिया केली, म्हणजे होतां होतां तिचा आत्म्यावर मनाच्याद्वारें पूर्वी परिणाम होत असे, तसा होत नाहींसें होतें. आपणांमध्यें दुर्बळता किती आहे याचा विचार केला असतां चांगल्या संवयी लावून घेण्याची आवश्यकता कमी आहे असें नाहीं; पण संवयीमुळें वेठीच्या रीतीनें कार्यें होतात; मनाच्या स्फूर्तीनें होणारीं होत नाहींत. आपण योजिलेल्या उपायांनीं व निर्बंधांनीं अमुक एक प्रकारच्या सवयी लागतात, आणि त्या लागल्याही पाहिजेत. मोठी पंचाईत ही असते कीं, केवळ सवयीनें कोणतीही गोष्ट झाली, म्हणजे तिला सामान्यतः वेठीचें स्वरूप येतें. चांगल्या संवयीची व अभ्यासाची मातब्बरी इतर गोष्टींप्रमाणें धर्ममार्गांतही मुळींच नाहीं असें नाहीं; परंतु संस्काराचें महत्व अधिक आहे, आणि तें जागृत राहील असें केलें पाहिजे. धर्मसंबंधीं बाबतींत तल्लीनतेनें होणारी फलप्राप्ति कांहीं चमत्कारिक आहे. दोन गोष्टी होत असतां मनाला संस्कार काय व कसा होतो याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. आतां आषाढी एकादशी जवळ आली आहे; यास्तव चहूंकडून पंढरपुरास जाणाऱ्या वारकऱ्यांचेंच

उदाहरण आपण घेऊं या. त्यांतून बरेच, वारीचा नेम केला, म्हणून फक्त वारी करणारे असतात; परंतु कित्येक वारी करीत असतां त्याच संधीस व्यापारधंदा करणारे असतात. तथापि व्यापार करणाऱ्या वारकऱ्यांस फलप्राप्ति कमी होते, अथवा मुळींच होत नाहीं, असें अनुमान करणें बरोबर नव्हे. साधक स्थितींतील विचारी लोक संवयीस प्राधान्य देत नाहींत; त्यांच्या दृष्टीनें मनावर होणाऱ्या संस्काराला महत्त्व अधिक असतें. अशुद्ध मार्गानें जाणाराही संस्कारावर लक्ष देणारा असला, तर त्याला फलप्राप्ति अधिक होते. यासंबंधानें प्लेग-सारख्या ज्या भयंकर व्याधीनें येथें व अन्यत्र लोकांस घरदार नकोसें करून त्यांची दाणादाण करून सोडली आणि कोणी कोणास पुसेनासें झालें आहे, तिचा धर्म-दृष्टचा विचार केला असतां, अशा दुर्धर प्रसंगामध्यें अल्पांश तरी आपल्या हिताचा आहे, व त्याचा मनावर सुसंस्कार होण्यासाठीं आपण उपयोग केला पाहिजे, असें आपणांस वाटण्यासारखें आहे. सारांश, या अभंगा-वरून मुख्य बोध घ्यावयाचा तो हा कीं, इतर गोष्टीं-प्रमाणें धर्ममार्गांत चांगल्या संवयी नकोत असें नाहीं; परंतु त्यांस संस्काराच्या उच्चस्थानीं बसवितां नये. संवयीचा उपयोग असला तरी त्यांचा मान, त्यांचा अधिकार संस्कारापेक्षां कमीच; आणि संस्काराची महती मनांतून उठवून देईल अशी संवय लागतां नये. नाहींपेक्षां भक्तिव्यवसाय व भजनपूजनाची खटपट यांस वेठीचें स्वरूप येऊन मनास समाधान होणार नाहीं, आणि परमेश्वरदर्शनाचा लाभ न होतां ही वेठीची भक्ति निष्फळ होईल.



# आपलें संचित नावडेसें होणें

आम्हांसी आपुलें नावडे संचित ।
चरफडी चित्त कळवळचानें ॥ १ ॥
न कळतां जाला खोळंब मारगा ।
जगीं आलों जगा बहुरूपीं ॥ २ ॥
कळों आलें बरें उघडले डोळे ।
कर्णधार मिळे तरि बरें ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हाल ऐकत करुणा ।
तरी नारायणा उडी घाला ॥ ४ ॥

तुकारामबावा म्हणतात कीं, आम्हांला आपलें संचित आवडत नाहींसें झालें आहे. बरें, संचित आवडत नसेल असें असलें, तरी पुढें काय ? संचित आवडत नाहीं एवढ्यानेंच भागत नाहीं. तर तुकारामबावा सांगतात कीं, आमचें चित्त चरफडतें; कशानें ? तर कळवळचानें. हें तुकोबाच्या अभंगांतील वाक्य आमच्या अनुभवाला कसें काय पटतें. याचा विचार प्रत्येकानें आपल्या ठिकाणीं करावा. अभंगाच्या शब्दांमध्यें काठिण्य नाहीं आहे; अनुभवामध्यें प्रकार कसा आहे याची प्रतीति प्रत्येकानें पहावी. व्यवसायात्मिका बुद्धि नष्ट होऊन आम्हांमध्यें असणारे बाजारांतले काल्पनिक भेद सुटावे, म्हणून आपण या स्थलीं बसलों आहों; तर आपलें संचित आपणांस आवडत नाहींसें होऊन, दुःसह झालें आहे काय, आणि हवा बंद पडते, चैन पडेनासें होतें त्याप्रमाणें जीवात्म्याची चरफड झाली आहे, असा कधीं तरी आपणांला दिवस आला आहे काय, हा विचार केला पाहिजे. वस्तुस्थिति पाहिली, तर आमच्यांतून कोणाला संचित कधीं नावडतेंच होत नाहीं; चरफडणें दूरच. या संबंधानें अर्जुनानें श्रीकृष्णाला मार्मिक प्रश्न केला आहे, तो हा कीं, जनावराला खाटकानें ओढून न्यावें त्याप्रमाणें मनुष्य परवशतेमध्यें कां पडतो ? याचें कारण इतकेंच कीं, साधारणतः मनुष्याला संचित नावडतें होत नाहीं, इतकेंच नाहीं, तर उलट, त्याचें ओझें वाटत नाहीं. अशी स्थिति आहे तोंपर्यंत यथार्थता नाहीं. प्रत्येकानें हें अभिमानाचें गांठोडें बांधून ठेविलें आहे व त्याविषयीं त्याला घमेंडी वाटत असते. चालीवरून, मुद्रेवरून, पेहरावावरून व बोलण्याच्या ऐटीवरून माणसांमध्यें भेद असतो, तो भाग निराळा आहे; परंतु कोणास आपलें ज्ञान, कोणास आपलें बल, कोणास आपली शांति, कोणास आपलें औदार्य, कोणास आपलें स्वरूप, कोणास आपली कुटुंबवत्सलता वगैरे गुणांविषयीं अभिमान असून त्यांची लोकांत चहाच होत नाहीं असें








वाटतें; लोकांस आपल्या अंगचे गुण दिसतच नाहींत, अशीं गांठोडीं व ओझीं प्रत्येकजण वाहात आहे. मनाची अशी व्यवस्था असली, म्हणजे ओझें आपणांस दडपून टाकतें. अशा रीतीनें आपण मनाच्या बेड्या धारण केलेल्या असून आपणांला मात्र तें वाटत नाहीं, व आपले हातपाय खुले आहेत, अशीच धुंदी असते. या भारी बिड्या परचक्रानें अथवा परस्थ अंमलानें घातलेल्या नाहींत; तर आपल्या आपण ठोकलेल्या आहेत; ह्यामुळें आपणांस पाश नाहीं, आपण अगदीं निःशृंखळ आहों, असें भासत असतें. याच भासाला वेदांत्यांनीं अविद्या, अथवा माया म्हटलें आहे. स्थिति एक प्रकारची असतां विपरीत गोष्ट खरी वाटते, हीच माया. अनेक प्रासंगिक कारणांनीं जी बुद्धि, जो तिखटपणा, जें बल, जी विद्या इत्यादि प्राप्त झालेलीं असतात त्यांचें जें ओझें मी बाळगितों, तें संचित मी बादशहा, मी संस्थानिक, मी जहागीरदार, मी अमेरिकन, मी युरोपियन, मी धनाढ्य असा जो बोजा उत्पन्न होतो, तो आपण आपल्या कृतीनें मिळविलेला नसतो; तो वाडवडिलांपासून प्रमाणतः आलेला असतो; व पिढीप्रमाणें हें ओझें वाढत जातें. यांतून एखादी गोष्ट स्वसंपादित असली, तरी तो केवळ आपल्याच कृतीचा परिणाम नसून, त्याला अनुकूल अशा ज्या पुष्कळ गोष्टी झाल्या त्यांवर अवलंबून आहे. हे सर्व प्रकार संचिताचे आहेत; परंतु अभिमानानें आम्ही त्यांचें ओझें बाळगितों. आपल्या कृतीनें, अथवा क्रीयमाणानें त्यांची उपस्थिति केली असली, तर त्यांविषयीं अभिमान असो; परंतु तसें नसून जागृतींत तर काय, पण रात्रींही निजलों असतां, बोजा वाहत असतों; व त्यामुळें परस्परांविषयीं द्वेषबुद्धि मनांत वागते. खरोखर विचार केला असतां, हें संचित आवडूं नये, इतकेंच नव्हे, तर त्याच्या संबंधानें अंगाची लाही व्हावी; परंतु उलट प्रकार असा होत असतो कीं, या संचिताला आपण कुरवाळतों आणि खाऊं घालतों. तुकोबांचें संचित त्यांस कां नावडतें व्हावें; त्याचा त्यांला त्रास कां वाटावा व तुम्हांआम्हांला कां वाटूं नये याचा विचार प्रत्येकानें अवश्य करावा. असें केल्यावर खूण पटेल, त्याला पटेल; नाहीं, त्याला नाहीं; इतकेंच कीं ज्याला पटेल तो भाग्यवान् समजावयाचा. कितीही सुखाचीं साधनें असलीं, कितीही पुरुषार्थ असला, तरी या संचिताच्या योगानें काय स्थिती होते त्याचें 'माझ्या कनवाळू क्षमानिधी' या[१] पदांतील 'जाणुनि आधीं करितों अनुचित तें, काय असें मज होतें' व 'विचार करुनीही निश्चय, करितां स्थिर न होय' या दोन्ही कडव्यांच्या पूर्वार्धांत कवीनें फार मार्मिक रीतीनें वर्णन केलें आहे. यांत सांगितल्याप्रमाणें निश्चय स्थिर कां होत नाहीं; नियम कां पाळला जात नाहीं; ऊर्ध्वदिशेस जाऊं लागलों असतां, आपण पाठीमागें कां हटतों? तर या संचिताचें ओझें असलें म्हणजे तें आपणांस इतकें जखडून टाकतें कीं, आपली कर्तृत्वशक्ति अगदीं जाऊन स्वतंत्रता जणूं काय आपणांस नव्हतीच अशी परतंत्रता येतें व संचिताचे आपण दास बनून, तें करवील तें आपण करतों. संचिताचे दास होऊन आपल्या आपण परस्वाधीन होतों. ही परवशता परस्थ अमलाखालीं असण्यापेक्षांही दुःसह होय हें जाणून, तुकारामांसारख्यांनीं आपलें संचित नाहींसें केलें, तसें तुम्हांआम्हांला होत नाहीं, हें साधुपुरुषांमध्यें व आपल्यामध्यें अंतर आहे. साधुसंतांस देहधर्म आपल्याप्रमाणेंच लागू असतात, व त्यांपैकीं

१. हें पद हृदयंगम असल्यामुळें, ज्यांस तें अवगत नसेल अशांच्या फायद्यासाठीं येथें मुद्दाम दिलें आहे. सं०

माझ्या कनवाळू क्षमानिधि । दीन मी आहें साधी ।
मळलों दुरितमळें मज शोधीं । शरण तुला अपराधी ॥ ध्रु० ॥
जाणुनि आधीं करितों अनुचित तें । काय असें मज होतें ।
न कळे हें स्वामी विश्वपते । आवरीं या चित्तातें ॥ १ ॥
विचार करुनीही निश्चय । करितां स्थिर न होय ।
यासीं तव कृपेशिवाय । नाहीं अन्य उपाय ॥ २ ॥
समर्था घेतलें त्वां माझें । सर्वप्रकारें ओझें ।
तैसें कर भजनीं मन रिजे । आणि खेदाग्नि विझे ॥ ३ ॥

कोणी मेलेलीं माणसें सजीव करितात; कोणी मशिदी उठवितात; कोणी भिंती चालवितात असें सांगतात. त्यांत विशेष मोठेपणा आहे असें नाहीं. त्यांचें विशेष लक्षण हेंच कीं, जे आपणांस नानातऱ्हेचे संदेह व भ्रम असतात, आणि मिथ्या सामर्थ्याच्या, ज्ञानाच्या, अधिकाराच्या, व बलाच्या कल्पना व त्यांपासून होणारी घमंडी इत्यादि ते सर्व नष्ट करितात, व त्या अभिमानामध्यें वैय्यर्थ्य आहे, इतकेंच नव्हे, तर दुष्टपणा आहे असें समजून त्यांचें बळ मोडण्याचा सतत प्रयत्न त्यांच्या हातून होत असतो. आपण उलटे त्यांस अधिक पोटाळितों. याचा आपणास अनुभव आहे, किंवा नाहीं, याची ज्यानें त्यानें प्रतीति घ्यावी. तुकोबांनीं म्हटल्याप्रमाणें

**न कळतां जाला खोळंबा मारगा ।**
**जगीं आलों जगा बहुरूपी ।।**

आपल्या मार्गांत खोळंबा झाला आहे किंवा नाहीं, हें पाहूं गेल्यास आपण संचितानें परवश होतों; खऱ्या आत्मस्वरूपाच्या ( आपलेपणाच्या ) अंशाला उदयास येऊं देत नाहीं; तो संचिताच्या अभिमानानें दडपून जाऊं देतों, व आपल्या सभोंवतीं या संचिताचें वारूळ वाढवून त्यांत आपण बसलेले असतों, असें दिसून येईल. तसेंच जगामध्यें बहुरूप धारण करीत नाहीं असा कोटचवधि मनुष्यांत एकही बहुधा सांपडणें मुष्कील. श्रीमंत नसतांना श्रीमंतीचा बडेजाव, ज्ञान नसतां ज्ञानीपणाची घमंडी, अशुद्ध पापी वर्तन असतां पवित्रतेचा अभिमान, अशा रीतीनें बहुरूपीपणा एकदा नव्हे, तर आपल्या सर्व चरित्रांत नेहमीं, दृष्टोत्पत्तीस येत असतो. तेणेंकरून स्वरूपसिद्धि व्हावयाला जो कार्यभाग पाहिजे तो एकीकडे राहून, नाटकांतील सोंगें घेऊन बतावणी करण्यास व जें खरोखर मिथ्या तें सत्य मानून घेण्यास मात्र आपण तत्पर असतों. भगवत्प्राप्तीला मुख्य खोळंबा अथवा प्रतिबंध काय तो या बहुरूपीपणाचाच असतो. असें असून तुकारामबावांनीं म्हटलें,

**कळों आलें बरें उघडले डोळे ।**
**कर्णधार मिळे तरी बरें ।।**
**तुका म्हणे व्हाल ऐकत करुणा ।**
**तरी नारायणा उडी घाला ।। १ ।।**

त्याप्रमाणें आपण लोकांस फसविण्यास प्रवृत्त असतों, इतकेंच नव्हे, तर आपण स्वतः आजवर भ्रमांत होतों असें वाटून, परमेश्वरा, उडी घाल (जसें दोन स्नेही रानांतून जात असतां त्यांतून एक नदींत पोहावयास गेला, अथवा पाण्यानें भरलेल्या ओंड खाड्यांत पाय अवचित गेला आणि बुडूं लागला, म्हणजे तो दुसऱ्याला 'धांव, उडी घाल' असें आकांतानें म्हणतो त्याप्रमाणें) असें आक्रोशानें, कळवळ्यानें, अत्यंत निष्ठेनें आपण कधीं म्हटलें आहे काय? आपल्यामध्यें जी ज्योति, कला, परमेश्वराचें प्रतिबिंब आहे त्याजवरची काजळी नाहींशी व्हावी, त्याचा प्रकाश वाढावा, तरच नरजन्मास आल्याचें सार्थक; परंतु तुम्हीआम्ही करतों काय, तर या ज्योतीला आच्छादन करून आणि तिला निस्तेज करून, तिचा तामसपणानें आपण ऱ्हास करून टाकितों व अंधाराचाच अभिमान बाळगितों! केवळ वाचेनें 'देवा धाव' म्हटल्यानें कार्य होत नाहीं, इतकें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे. जन्माचें खरें साफल्य, खरें कल्याण यांच्याकडे दुर्लक्ष होतें, तोंपर्यंत व्यवसायामध्यें जोम नसतो व स्थिरता नसते. अशी जोंपर्यंत स्थिति आहे तोंपर्यंत आपणास शांति, प्रसन्नता, अधिकार व समाधान प्राप्त होणार नाहींत. मतें शुद्ध असावीं, ज्ञान शुद्ध व तेजस्वी असावें, हें ठीकच आहे; परंतु तीं परंपरेनें आलेलीं संचितरूपी नसून स्वकीय असावीं, त्यांत स्वतःचें तेज असावें. तेजपणा नाहीं असें नाहीं; परंतु दिवा चांगल्या तेजानें जळण्याकडे लक्ष नसतें, आणि स्वतःच्या ज्ञानाचें तेज, स्वतःचा पराक्रम, स्वतःची कर्तृत्वशक्ति, वाढविण्याचा व त्याचा चांगल्या दिशेनें उपयोग होण्याचा प्रयत्न एकसारखा निश्चयानें केला, म्हणजे पृथ्वीला स्वर्गपणा आणल्यासारखें होईल. साधारण मनुष्याच्या अंगीं नऊशें नव्याण्णव अंश तम व एक अंश तेज असतें, त्यामुळें संचित सर्वथैव नष्ट होईल असें सांगतां येत नाहीं, तरी प्रत्यहीं थोडेबहुत कमी होत जावें एतदर्थ झटलें पाहिजे. संचितें भिन्न भिन्न असलीं तरी तेज, ज्ञान हीं एकाच घरांतून आलेलीं असतात, हें ध्यानांत ठेवून मथाळ्यासाठीं घेतलेला जो तुकारामांचा अभंग त्याचें वरचेवर मनन करावें, अशी माझी प्रत्येकास विनंति आहे.

* *

# देवाजवळ मोक्षाचें गांठोडें नाहीं

नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोळें ।
आणुनि निराळें द्यावें हातीं ॥ १ ॥
इंद्रियांचा जय साधुनियां मन ।
निर्विषय कारण असे तेथें ॥ २ ॥
उपास पारणीं अक्षरांची आटी ।
सत्कर्मा शेवटीं असे फळ ॥ ३ ॥
आदरें संकल्प वारीं अतिशय ।
सहज तें काय दुःख जाण ॥ ४ ॥
स्वप्नींच्या घायें विवळसी वांयां ।
रडें रडतियासवें मिथ्या ॥ ५ ॥
तुका म्हणे फळ आहे मूळापाशीं ।
शरण देवासीं जाय वेगीं ॥ ६ ॥

* *

घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं ।
मुक्तां आत्मस्थिति सांडवीन ॥ १ ॥
ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं ।
भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥
तीर्थभ्रामकासी आणीन आळस ।
कडू स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥
सांडवीन तपोनिधा अभिमान ।
यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥
भक्तिभाग्यप्रेमा साधीन पुरुषार्थ ।
ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ५ ॥
धन्य म्हणवीन येह लोकीं लोकां ।
भाग्य आम्हीं तुका देखियेला ॥ ६ ॥

तुकारामबावांनीं, दुसरे त्यांचे हजारो अभंग आहेत ते केले नसते, तरी या दोन अभंगांनीं त्यांची सत्कीर्ति वाढली असती, आणि त्यांचे आपल्या लोकांवर मोठे उपकार झाले असते. आज पहिल्या अभंगाच्या तीन चरणांचा, दुसऱ्या अभंगास जोडीला घेऊन, विचार करावयाचा आहे. तीर्थयात्रा, यज्ञयाग, तप व दानधर्म, हीं करून स्वर्गवास प्राप्त करून घेण्याची ज्यांस उत्कटेच्छा असते त्यांच्या मनांत स्वर्गवास व तेथील भोग यांविषयीं विरसता आणवीन, आणि त्यांच्या व ब्रह्मरूप होऊं पाहणाऱ्या ब्रह्मज्ञान्यांच्याकडून आपला जन्म व्यर्थ गेला असें म्हणवीन, व तुकारामांसारख्याचा जन्म आपल्या देशीं झाला म्हणून आम्ही धन्य आहों असेंही म्हणवीन, अशी दुसऱ्या अभंगांत तुकारामबावांनीं प्रतिज्ञा केली आहे. हिचा संबंध जन्मोत्तरस्थितीविषयीं आपल्या देशांत ज्या दोन कल्पना आहेत त्यांच्याशीं आहे. एक कल्पना स्वर्गवासाची, व दुसरी आत्मस्थितीची अथवा मुक्तीची. ही दुसरी कल्पना ज्ञानमार्ग्यांची. त्यांचें मत असें आहे कीं, आत्मा नित्य, बुद्ध, शुद्ध व मुक्त आहे. आपली सहजस्थिति ज्ञानाची, मुक्ततेची व शुद्धीची असून अज्ञान, अविद्या इत्यादि अनेक अडचणींमुळें आपणांस तिचा विसर पडतो. ही सहजस्थिति अथवा आत्मस्थिति पुनः प्राप्त झाली असतां मनुष्य मुक्त होतो, म्हणजे आपल्या परमात्मतत्त्वाचा त्यास अनुभव येतो. अन्य लोकांत हा विचार नाहीं व ही समजूतही नाहीं. या ज्ञानमार्गाचें अवलंबन करून जे पैलतीरास गेले त्यांच्याकडून आपली चुकी झाली, हें सोडून दिलें असतें तर बरें होतें असें म्हणवीन, असें तुकोबांनीं म्हटलें आहे. स्वर्गवासाची कल्पना अशी आहे कीं, जप, तप, तीर्थयात्रा, दानधर्म, पुरश्चरणें वगैरे या मृत्युलोकीं केलीं असतां एथील यातना, क्लेश, दैन्य, पाप यांतून सुटून नानाप्रकारचे सुखभोग जेथें मिळतात अशा लोकांत अथवा वसतिस्थानीं मनुष्य मरणोत्तर जातो. याच कल्पनेची प्रवृत्ति अधिक आहे. या दोन मार्गांच्या बाहेर तृतीयपंथ काढणें तर तुकारामबावांसारखा ज्यांचा अधिकार– ज्यांची योग्यता, त्यांनींच करावें. मोक्षाच्या संबंधानें साधारण लोकांच्या समजुतीस अनुलक्षून मोक्ष म्हणून एक निराळी द्रव्याची पोतडी आहे आणि कांहीं तरी आपल्या मनाजोगा मोबदला घेऊन देव तें आपल्या स्वतःपाशीं जतन करून ठेविलेलें मोक्षाचें गांठोडें देतो, अथवा मनुष्याकडून देवास कोणत्या तरी प्रकारचा मोबदला मिळाला असतां, त्याच्या पदरांत माप घालावयाचें तें मोक्ष, असें मानणें केवळ भ्रमात्मक आहे, असें सांगून दुसऱ्या चरणांत मोक्षाचें खरें स्वरूप, म्हणजे इंद्रियांवर आपला पगडा बसवून, त्यांस सर्वपरी आपल्या हुकमांतलीं करून मन निर्विषय किंवा निर्वासन करणें हेंच होय, असें म्हटलें आहे. पहिल्या अभंगाच्या तिसऱ्या चरणांत उपासपारणीं व अक्षरांची आटी अथवा विद्या,

अनुक्रमणिका

ज्ञान संपादन करण्याची खटपट हीं जी अनुक्रमें कर्म-मार्ग्यांचीं व ज्ञानमार्ग्यांचीं साधनें त्यांस उद्देशून परिणामी सत्कर्मानींच खरें स्वहित साधतें, असा उपदेश तुकारामबावांनीं केला आहे. उपासपारणीं, योगसाधन, ज्ञानप्राप्ति हीं सर्वथैव निरुपयोगी आहेत; त्यांच्या भरीस मुळींच पडूं नये; तीं सर्वांनीं त्याज्य म्हणून टाकून द्यावीं, असें म्हणण्याचा भाग नाहीं; परंतु त्यांच्या योगानें सत्कर्माकडेस प्रवृत्ति होत असली, तरच त्यांत हांशील, हें निरंतर ध्यानांत ठेवून, तीं खुशाल करावीं. सरकारची इमानेंइतबारें चाकरी केली अथवा कामगिरी बजाविली, तर त्याचा मोबदला जहागीर, पालखी, किताब वगैरे रूपानें मिळत असतो; तसा यज्ञयाग, उपासपारणीं केलीं म्हणजे तेवढ्यानेंच देवाकडून मोक्ष देण्यांत येतो, हा समज चुकीचा आहे. मरणोत्तर प्राप्त होणारी मोक्ष ही वस्तु अथवा स्थिति नसून, ती याच जन्मांत स्वतः साध्य करून घेण्यासारखी आहे, हेंच तुकारामबावांचें सांगणें आहे. सर्वदा सत्यसंकल्प व सुविचार मनांत उत्पन्न होणें आणि विकल्पांस व कुवासनांस त्यांत रिघावयास अवसर न मिळणें, तसेंच सदाचरणाविषयीं दृढनिश्चय ढळूं न देणें व सदुद्योगाविषयीं तत्परता शिथिल न होणें याच मुक्तीच्या निरनिराळ्या पायऱ्या आहेत. परमेश्वराच्या ज्योतींत आपली ज्योती मिळवावयाची; अथवा मरणोत्तर दुसऱ्या लोकांत वास करून अप्सरा म्हणा, परी म्हणा, ह्यांची प्राप्ति साधावयाची, किंवा इतर शारीरिक सुखसाधनें यांचा उपभोग घ्यावयाचा, हाच पुरुषार्थ मानून तदर्थ साधनें करावीं, म्हणजे इष्टार्थ प्राप्त होतो हा समजुतीचा भाग चुकीचा आहे, इतकेंच नव्हे, तर हानिकारक आहे. साधनांत दोष आहे, किंवा तीं यथार्थ नाहींत असें नाहीं, पण खरी सिद्धि, खरें फळ शेवटीं सत्कर्मामध्येंच आहे, याची विस्मृति पडतां नये. साधनामध्येंच मनुष्य गढून गेला म्हणजे सत्यसंकल्पाची व सदाचरणाविषयीं निश्चय दृढतर होण्याची आवश्यकता आहे हें नजरेंतून चुकतें आणि बिघाड होतो.

आतां, यासंबंधानें आपल्या समाजाचे काय विचार आहेत, हा प्रश्न सहज उभा राहण्यासारखा आहे; कारण, समाजांत कर्मठपणाचा भाग नाहीं, आणि ज्ञान-मार्गी ज्या उपायांचें अवलंबन करितात त्यांचेंही ग्रहण केलेलें दृष्टीस पडत नाहीं. यास उत्तर हेंच कीं, मर्यादा, निग्रह, शिस्त, व्यवस्था इत्यादि आचारविचारांत असलीं पाहिजेत, व ज्ञानप्राप्त्यर्थ ग्रंथपठन झालें पाहिजे, हें आम्ही क़बूल करितों. तथापि मोक्ष अन्यत्र मिळणारी वस्तू आहे आणि तिचें गांठोडें देवापाशीं आहे, असें आम्ही मानीत नाहीं. सन्मार्गाकडे अशृंखल प्रवृत्ति असणें व असद्विचाराची स्फूर्ति मनांत कधीं न होणें, हाच आम्ही मोक्ष समजतों. मोक्षप्राप्तीच्या मार्गांत जी सिद्धता पाहिजे ती कर्ममार्गांतील क्रयविक्रयाच्या तऱ्हेनें होणें शक्य नाहीं. ब्रह्मज्ञान्यांनीं अवलंबन केलेल्या मार्गांत व साधनांत जो दोष आहे तो हा कीं, त्यांत निरसता आहे, त्यांनीं चित्तवृत्तीस चिरकाळ राहणारा आनंद मिळत नाहीं. ज्ञानमार्गाच्या अनुयायांस सगुणोपासनेची मिसळ करण्याची व्यवस्था करावी लागते त्याचें कारण, आपल्या मार्गांतील साधनांनीं संतृप्तता होत नाहीं, असा त्यांस प्रत्यक्ष आलेला अनुभवच होय. चिरस्थायी वृत्ति व आनंद हीं प्राप्त व्हावीं अशी इच्छा असून तीं प्राप्त होत नाहींत. 'घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं' असें जें तुकारामबावांनीं म्हटलें आहे तें याच मुद्द्यावरून. कोणत्याही पदार्थाची अथवा स्थितीची आशा मनांत धरून ती तृप्त झाली नाहीं, म्हणजे लाळ घोटणें होतें, ही गोष्ट लक्षांत आणली असतां, तुकारामबावांच्या म्हणण्याचा अर्थ काय आहे तें स्पष्ट दिसतें. 'मुक्तां आत्मस्थिति सांडवीन' असें म्हटलें आहे तें याहूनही भयंकर आहे. त्याचा आशय हाच कीं, ब्रह्मरूप होण्यापेक्षां भगवंताचें गुणगान, भजन व कीर्तन वगैरे करण्यांत अधिक आनंद व समाधान आहे. समाजांतले लोक तुकारामबावांच्या याच विचारांचे आहेत. ब्रह्मांतर्गत होऊन नाहींसें व्हावयाचें, अथवा देहावसानानंतर एखाद्या स्थानाप्रत जाऊन विसावा घ्यावयाचा व भोग भोगावयाचे यांत जन्माचें साफल्य होतें, असें आमचें मत नाहीं. चिंता व चित्तास वश करणारे अनेक विकार या बेड्यांनीं आपण बद्ध आहों; यामुळें जें आत्म्याचें स्वरूप अनुभवण्यांत येतें ते शुद्ध, बुद्ध व मुक्त नसतें. तथापि तुम्हांआम्हांमध्यें मुक्त होण्याची पात्रता नाहीं असें नाहीं. इतकेंच कीं, आपल्या व पूर्वजांच्या संस्कारांनीं आपणांस दैन्य आलें आहे. वडिलांपासून परंपरेनें व साहचर्यानें अनेक प्रकारचें संस्कार आपल्या मनावर होतात आणि आपणांस सुखदुःखें भोगावीं लागतात. याच नियमास अनुसरून आपल्या परंपरागत दैन्यामुळें आत्म्याच्या शुभ, मंगल गुणांचा लोप झालेला आपल्या दृष्टीस पडतो. आत्म्याला पुनरपि शुद्ध, बुद्ध व मुक्त असें स्वरूप प्राप्त होण्याला

उपाय काय तो देवाविषयीं प्रेम व भक्ति यांची अंतःकरणांत वृद्धि होणें हाच होय. परमेश्वराची प्रेमपुरःसर भक्ति करणें, हाच खरा पुरुषार्थ; आणि प्रेम व भक्तिभाग्य वाढण्यानेंच आपण कृतकृत्य होऊं. देवाविषयीं प्रेम व भक्ति अंतःकरणांत वृद्धिंगत झालीं असतां सत्कर्माविषयीं अढळ आवड आणि असत्संकल्पाची, असद्वचनाची व असत्कृतीची अप्रीति उत्पन्न व्हावयाचीच. दयामय देवाची योजना अशीच आहे कीं, कसाही अपराधी असला, तरी अपराधाचें शासन भोगून पलीकडे जावयाचा. शासनाच्या अंगीं असा कांहीं गुण आहे कीं, त्यानें आपणांवर देवाचा अनुग्रह आहे असें वाटून धैर्य यावें व परिणामीं मुक्तता व्हावी. सद्‌गुणांचें बीजारोपण व्हावें व त्यांची संवृद्धि व्हावी या उद्देशानें शासन होत असतें, असें हें देवाचें राज्य आहे; असें मानण्यांत आपल्या देशांतील सर्व धर्मसांप्रदायांची एकवाक्यता आहे. एथील एकंदर धर्मौघ असाच आहे कीं, एक जन्मीं नाहीं, तर अन्य जन्मीं, त्या नाहीं तर त्याच्या पुढच्या जन्मी उन्नति व्हावयाचीच; आंतून उकळी उन्नतीकडे व प्रगति होण्याकडेसच असते. लौकिक विषयांत सामर्थ्य व संवयी यांचा परस्परांशीं संबंध असतो, तसाच धर्माचा प्रकार आहे. कोणताही आत्मा कधीं नष्टप्राय होऊं नये, असा ईश्वरी संकेत आहे आणि तो तसा नष्ट होतही नाहीं. आत्म्याच्या अंगच्या गुणांचा अनेक कारणांनीं लोप होऊन त्याला दुर्बलता आली आहे, त्याची नैसर्गिक योग्यता उपाधींनीं गेली आहे; तथापि त्याला पुनः सामर्थ्य व योग्यता उत्तरोत्तर येणें याच मोक्षाच्या पायऱ्या होत; आणि त्या अनंत आहेत. ज्ञानमार्गाच्या अंगीं निरसता हा दोष आहे, त्याचप्रमाणें स्वर्गवास व तेथील भोग हा केलेल्या कर्माकरितां मोबदला मिळणारा ठेवा, ही कल्पना चुकीची आहे आणि ती तुकारामबावांस ग्रहणीय वाटली नाहीं. कारण, तिनेंही पुरून उरणाऱ्या आनंदाचा अनुभव प्राप्त होत नाहीं. स्वर्ग व नरक म्हणून कांहीं निराळीं स्थानें अथवा निराळे प्रदेश आहेत असें नाहीं. स्वर्ग व नरक याच लोकीं आहेत, आणि त्यांचा अनुभव आपणांस येथेंच येत असतो. आपण रस्त्यांत चालत असतां एका बाजूला स्वर्ग आणि एका बाजूला नरक असतो. ज्या कुटुंबांतील मनुष्यें परस्परांवर प्रेम करितात, एकोप्यानें वागतात आणि एकमेकांशीं कधीं भांडत नाहींत तेथें स्वर्गच आहे, असें समजावयाचें; आणि ज्या कुटुंबांत दुराचरणाकडेस प्रवृत्ति असून कोणाचें कोणी ऐकत नाहीं, वरचेवर कज्जेकफावती होत असून एकमेकांशीं बेवनाव असतो तेथें नरकवास होय. फार कशाला ? प्रत्येकाच्या अंतर्यामीं स्वर्ग व नरक आहेत. हें अंतर्दृष्टीनें पाहिलें म्हणजे समजण्यासारखें आहे. पापाचरण करणें व पापवासना मनांत येणें, हा नरक; चांगलें कृत्य केलें असतां पुनः तेंच अथवा त्याच्यासारखें करण्याची इच्छा होणें, हा स्वर्ग. वाईट संस्कार व तज्जन्य मनास आडवाटेनें नेणारे विकार यांची बेडी उकलावयाची आणि अधोगति, दुर्दशा टाळावयाची म्हणजे येथेंच स्वर्गवास, येथेंच मुक्ति, हीच समजूत श्रेयस्कर आहे. तेंच स्वर्गनरक अन्यत्र आहेत असे मानिल्यानें दुर्दशा होते, व ती आपण होऊन आपणांवर ओढून घेतों. स्वर्गनरक दूर आहेत; त्यांच्याविषयीं आजच विचार करण्याची जरूर नाहीं; असें म्हणून आपण बेफाम मनानें वागतों आणि तेणेंकरून दुर्धर हानि होते. स्वर्गवास व तेथील भोग यांविषयीं देवघेवीच्या कल्पना आहेत तोंपर्यंत हानिच व्हावयाची; मग मनुष्य कोणत्याही धर्मांतला असो.

सारांश, स्वर्ग, मोक्ष दूरस्थ, प्राप्तव्य आहेत असें नाहीं, हाच सर्व धर्मांचा खरा सिद्धान्त होय. रुचिवैचित्र्याप्रमाणें अथवा पात्रतेप्रमाणें ज्या वर सांगितलेल्या दोन अशुद्ध हानिकारक कल्पना उद्‌भूत झाल्या आहेत त्यांस धरून चालणें, म्हणजे डोक्यांत राख घालून घेण्यासारखें होय. जपतप, यज्ञयाग, ध्यान, आसन इत्यादिकांची योजना लागेल तर करावी, परंतु तुकारामबावांनी वरील अभंगांत आपला अनुभव लिहून ठेविला आहे त्याप्रमाणें तीं परिणामीं सत्कर्माकडेस प्रवृत्ति करणारीं असतील, तरच फलप्राप्तीची आशा आहे, हें सर्वकाळ लक्षांत ठेवावें, आणि आपणांतून प्रत्येकानें या अभंगांचें चिंतन करावें.

＊ ＊

# स्वर्ग आणि नरक

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।।
मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ।। २० ।।
त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ।। २१ ।।
एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ।। २२ ।।

स्वर्ग, नरक अथवा मोक्ष या विषयांच्या संबंधानें आमच्या या समाजाची जी समजूत आहे ती केवळ इंग्रजी शिकलेल्या आधुनिक सुधारकांची नसून तिला पूर्वकालीन तुकारामांसारख्या साधूंच्या मताचा आधार आहे, असें मागील एका प्रसंगी मीं प्रतिपादन केलें व आणखी कांहीं जुन्या ग्रंथांतील आधार दाखवून तो विषय त्याच वेळीं पुरा करण्याचा विचार होता; परंतु कालसंकोचामुळें तुकारामबावांचे दोनच अभंग वेंचून काढून तसें करतां आलें. म्हणून भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायांतील वरील तीन श्लोकांत स्वर्ग व नरक अथवा उत्तम गति व अधोगति यांच्या संबंधानें जो उल्लेख केला आहे, तोही त्याच धोरणाचा असल्यामुळें, आज त्याविषयीं बोलावयाचें आहे. पहिल्या दोन श्लोकांत मुख्य घेण्यासारखा भाग कोणता म्हणाल, तर काम, क्रोध व लोभ हीं तीन नरकाचीं द्वारें सांगितलीं आहेत आणि अधम गति म्हणजे आत्म्याचा नाश असें म्हटलें आहे, हा होय. तिसऱ्या श्लोकांत असें सांगितलें आहे कीं, हीं तीन द्वारें सोडून जो मनुष्य वागतो तो आपल्या आत्म्याचें कल्याण करितो आणि परा म्हणजे उत्तम गतीप्रत जातो. स्वर्ग-नरकांच्या संबंधीं आम्ही युक्तिवादाच्या रीतीनें प्रतिपादन करूं लागलों, म्हणजे आम्हीं युक्तिवादाच्या रीतीने प्रतिपादन करूं लागलों, म्हणजे आम्हीं तुमचें सांगणें कां मानावें? असा कित्येक श्रोत्यांकडून प्रश्न करण्यांत येतो. आणि नरक म्हणजे काय; अधमा गति म्हणजे काय; स्वर्गाचें स्वरूप काय; व त्याचे मार्ग कोणते; या अनुभवाच्या पलीकडील विषयांच्या संबंधानें अनधिकारी साधारण मनुष्यानें सांगावयास सरसावणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घास घेणें आहे, यांत संशय नाहीं. शिवाय, धर्मविषयक विचारजागृति करणें, हाच या मंदिरांत होणाऱ्या उपदेशांचा मुख्य उद्देश असल्याकारणानें, वर सांगितलेला आक्षेप घेण्यांत आला, हें मी उपदेशांचें भाग्यच समजतों. असो. स्वर्गाचें मार्ग कोणते व त्यांचें स्वरूप काय आणि नरकाचीं द्वारें कोणतीं व नरकाचें स्वरूप काय याविषयीं कोणींही दुराग्रह धरून बसण्यास कारण नाहीं, आणि तो मनांतून दूर करावा या हेतूनें जो निदान दोन हजार वर्षांपूर्वी रचिला होता अशा भगवद्गीतारूप ग्रंथांतील विधानें आधारभूत घेऊन चार शब्द बोलण्याचें आज मनांत आणिलें आहे.

आत्म्याचा नाश हाच नरक; आणि आत्म्याची उन्नति अथवा त्याचें कल्याण हाच स्वर्ग; तसेंच आत्मा स्तिमित नाहीं; त्याचा शरीराबरोबर नाश होत नाहीं; आणि आत्म्याला गति आहे; ही समजूत सर्व संप्रदायांस मान्य आहे, इतकेंच नाहीं, तर ती एकंदर धर्माच्या मुळाशीं आहे. परंतु सावयव, किंवा साकार दृश्य-पदार्थांची गति दिसते व समजते, तशा तऱ्हेनें आत्म्याला परा आणि अधमा गति असतांही, त्या दृग्गोचर नसल्याकारणानें, त्यांच्याविषयीं संशय वाटतो व मतभेदास जागा राहते. तथापि आपल्या आत्म्याला उत्तम अथवा अधम गति प्राप्त होईल असें करण्याचें स्वातंत्र्य व सामर्थ्य आपल्या ठिकाणीं कांहीं अंशानें तरी ठेविलें आहे, अशी साधारण समजूत आहे आणि तिला तुकारामबावांच्या पुढील दोन अभंगांत प्रमाणही सांपडतें. ते अभंग येणेंप्रमाणें —

**मरण माझें मरोन गेलें । मज केलें अमर ।। १ ।।**
**ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस बोसलें देहभावा ।। २ ।।**
**आला होता गेला पुर । धरिला धीर जीवनीं ।। ३ ।।**
**तुका म्हणे बुनादीचें । जालें साचें उजवणें ।। ४ ।।**

* *

**मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ।। १ ।।**
**नासोनियां गेली खंती । सहजस्थिति भोगाचे ।। २ ।।**
**न देखेंसें जालें श्रम । आलें वर्म हाता हें ।। ३ ।।**
**तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ।। ४ ।।**

'मरण माझें मरोन गेलें । मज केलें अमर' हा तुकारामबावांचा अभंग गीतेच्या अनुवादाचाच आहे. आतां मरण कधीं व कसें मरून जाईल आणि अमर शब्दाची व्याख्या काय, हा विचार राहिला. कोणी म्हणेल कीं, मरण मरून सर्वच जातात आणि त्यानें



अनुक्रमणिका

सर्वच अमर होतात. तर तसा ‘मरण मरून जाणें’ या शब्दांचा अर्थ नाहीं; देहांत असतां मरण मरून गेलें पाहिजे. यावर कोणी अशी शंका घेईल कीं, देहधारी असतां मरण मरून जाणें हें केवळ शब्दजाल, हा निव्वळ शब्दच्छल आहे; त्यापलीकडे कांहीं नाहीं. पण, देहांत असतां मरण मरून जातें, असें म्हणण्यांत विसंगति आहे असें नाहीं. ही स्थिति अनुभवानें समजण्यासारखी आहे. इतकेंच कीं, किंचित् अनुभवानें जी गोष्ट कळते ती चिरंतन अनुभवाची व्हावी आणि तिचा निरंतर अनुभव यावा. मरण मरून जाणें म्हणजे काय आणि तें कसें होतें, याचा उलगडा याच अभंगाच्या तिसऱ्या चरणांत केला आहे. जन्ममरणाचा पूर आला आणि गेला. नदीला बेसुमार पाणी चढतें आणि पुराचा भर होतो, तेव्हां त्यामध्यें सांपडलेला मनुष्य बळकट आधाराला धरून राहिला नाहीं, तर वाहून जाऊन त्याचा नाश होतो, त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं आपलें जीवन आहे आणि ज्याच्या योगानें सर्व सृष्टीला जीवन आलें आहे, अशा परमात्म्याला आपण धीरानें बिलगून राहिलों, म्हणजे आपण या जन्ममरणरूप पुरांतून तरून पार पडतों; नाहीं तर त्याच्याबरोबर झपाट्यानें वाहून जाऊं. देहधारी असतां परमेश्वराला चिटकून राहून आत्म्याचें श्रेय किंवा कल्याण होईल अशा रीतीनें वागणें, हा स्वर्गाचा मार्ग; आणि संसारांत बेफान निमग्न होऊन आत्म्याचा नाश होऊं देणें, हा नरकमार्ग या दृष्टीनें पाहिलें असतां, स्वर्ग-नरकांचा अनुभव या लोकींच मिळण्यासारखा आहे. स्वर्ग-नरक निराळीं प्राप्तव्य स्थानें नसून येथें आरंभ होणाऱ्या स्थितिचेच पुढें होणारे शेवट आहेत; आत्म्याच्या कल्याणाला अथवा नाशाला जी सुरुवात येथें झाली आहे तिचीच पुढें किंवा मागें गति अथवा वाढ होणें आहे.

दुसऱ्या चरणांत मरण मरून जाणें म्हणजे ‘ठाव पुसिलें बुड पुसिलें। वोस वोसलें देहभावा॥’ असें म्हटलें आहे. देहभाव ओस झाला म्हणजे काय, हें समजण्यास दुष्काळ म्हणजे काय होतें, तें मनांत आणिलें पाहिजे. मुंबईमध्यें दाण्या-गोट्याच्या महागाईखेरीज दुष्काळाचा परिणाम समजण्यांत येत नाहीं; त्याचें खरें भयंकर स्वरूप व परिणाम कळण्यास बाहेरगांवीं सवड मिळते. एखाद्या प्रांतांत दुष्काळ पडला म्हणजे त्यांतील गांवचेगांव उठून जातात; सर्व व्यवहार बंद होऊन सर्वत्र उजाड व बेचिराग (वस्ती नसल्याकारणानें दिवा न लागणारें) होत असतें. नाश करण्याच्या भौतिक उपायांनीं अगदीं नायनाट होतो, आणि त्या ठिकाणीं थोड्या दिवसांमागें गांव वसत होता त्याचा मागमूस राहत नाहीं असें होतें. वस्तीचा भाग नासून गेल्यामुळें उस्तवारीच्या अभावीं घरेंदारें पडित होतात आणि कांहीं दिवसांनीं केवळ जमिनीसारखी जमीन होते. तसेंच मागच्या काळांत एखाद्या गांवावर अथवा शहरावर राजाची इतराजी झाली आणि त्याचें नांव सहन होईनासें झालें, म्हणजे त्यावरून गाढवाचा नांगर फिरविणें, हेंच पराकाष्ठेचें शासन होत असे. तसें केलें म्हणजे गांव जमीनदोस्त होऊन उद्ध्वस्त पडत असे. हीच स्थिती, हाच प्रकार देहभाव ओस होण्याचा आहे; हेंच मरण मरणें होय. आपण देहांत असतां देहभाव अशा रीतीनें ओस होणें अवघड आहे, असा सामान्य मनुष्यांचा अनुभव आहे; तथापि देहभाव नाहींसा होतो असे क्षण प्रत्येकाला अनेक प्रसंगीं येतात. आपणास आपलें भान नाहींसें होतें या स्थितीचा अनुभव गवई व गायनप्रिय यांस अनेक वेळां येत असतो. एखाद्या मनास उल्लसित करणाऱ्या रागाची तान छेडण्यांत येते तेव्हां ते देहभान विसरतात व तल्लीन होऊन जातात. एखाद्या विद्यार्थ्याला कूट सोडवावयाचें असलें म्हणजे अन्न त्यापुढें सुचत नाहींसें होतें आणि खाल्लें असतांही खाल्लेंसें वाटत नाहीं. हा विद्याव्यासंगानें देहभान हरपल्याचाच प्रकार आहे. तसेंच एखादा मनुष्य आजारी होऊन अत्यवस्था होते त्या स्थितींत दुखणाईत मनुष्याचा तर वेळ जातां जात नाहीं; पण, त्याची खडी चाकरी करून त्यास दुखण्यापासून होणारे क्लेश व त्रास हलके करण्याकरितां उपाय योजण्यांत जागून दिव्यांनीं रात्र काढणाऱ्या व त्याविषयीं निरंतर चिंता वाहणाऱ्या आईबापांस, बहीणभावंडांस, इष्टमित्रांस, अथवा बायकोमुलांस आपल्या देहाचें भान राहत नाहींसें होतें. दुखणाइताची शुश्रूषा करण्याचा हा अनुभव अत्यंत श्रेयस्कर आहे, आणि तो ज्याला अवघ्या हयातींत मिळत नाहीं, तो हतभाग्यच समजावयाचा. याप्रमाणें प्रीतीच्या, नादाच्या व विद्याव्यासंगाच्या भरांत आपण देही आहों असा भाव राहत नाहींसें होतें, हा अनुभव अनेक प्रसंगीं येतो. ‘ब्रह्मानंदीं लागली टाळी। कोण देहातें सांभाळी॥’ अशा रंगाला भजन आलें म्हणजे भजनी लोकांचा अनुभव असा असतो कीं, त्यांस देहधारी असतां आपण देहातीत आहों असें होतें; आणि त्यांचें मन त्या वेळापुरतें तरी लुप्त झाल्यासारखें होतें. हा जो निवृत्तीचा व प्रवृत्तीचा अनुभव आहे तो थोडासा वेळ येतो आणि तो

स्थिर करणें कठीण आहे, हें सत्य आहे. परंतु तो चिरस्थायी करणें अवघड आहे म्हणूनच त्याची महती विशेष आहे, आणि तो आपणांस कल्याणकारक वाटत असेल, तर तो दृढ करावा, हें आपलें कर्तव्य आहे. याप्रकारें आपण देहधारी असतां आपलें (देहाचें) मरण पाहून आपण अमर झालों, म्हणजे 'ठाव पुसिलें बुड पुसिलें। वोस वोसलें देहभावा ॥' अशी स्थिति होते. ज्याच्या योगें सर्व सृष्टीला जीवन आलें आहे अशा परमात्म्याशिवाय आपणास आधार नाहीं, तोच आपलें एक शरणस्थान होय, असा दृढ विश्वास धरून जो त्यासच बिलगून राहतो, त्याला मरण आहे किंवा नाहीं याची फिकीर वाटत नाहीं. अशा पुरुषाला शरीराच्या साहचर्यानें दुखणेंबाणें झालें असतां क्लेश होत नाहीं असें नाहीं; पण त्याची समता, समाधी अथवा समाधान यांस कमीपणा येत नाहीं. अशा रीतीनें देहधारी असून शारीरिक क्लेश होत असतांही शरीराविषयीं उदासीन होणें, हेंच मरण मरून जाणें होय.

आत्म्याचा शरीराबरोबर नाश होत नसून, त्याला गति आहे आणि त्याची उन्नति हा स्वर्ग व अवनति अथवा नाश हा नरक, ही समजूत सर्व धर्मांच्या मुळाशीं आहे; परंतु चुकी कोठें होते म्हणाल, तर धर्मवितान माजलें म्हणजे कल्पनेला अंकुर फुटून स्वर्ग-नरकांचे बीजरूपी अनुभव आपणांस आपल्या ठिकाणीं वास करणाऱ्या सुष्टदुष्ट भावांत येत असतां, आपण स्वर्ग-नरकांस कोठें तरी दूर नेऊन ठेवीत असतों. आत्मा शरीराच्या पाशानें बद्ध होऊन, कामक्रोधादिकांच्या अधीन झाला, म्हणजे नरकाची अथवा अधोगतीची सुरुवात झाली; तोच दुष्ट वृत्तींपासून परावृत्त होऊन शांतीच्या– समाधानाच्या मार्गास लागला, तर स्वर्गास अथवा परागतीस प्रारंभ झाला असें समजावें. सारांश, परागतीला काय, अधमागतीला काय, जो व्यासंग अथवा उद्योग कारणीभूत होतो, त्याला प्रारंभ येथेंच झाला पाहिजे. पण, कवितेच्या कल्पनाशक्तीस वाव मिळणाऱ्या रीतीनें धर्माचें अतिशुद्ध स्वरूप बदलून वितानें माजतात, आणि स्वर्ग-नरकांच्या संबंधानें अवडंबर ग्रंथ झाले आहेत, त्यामुळें मनुष्याच्या धर्मकर्मांत मक्षिकापात झाल्यासारखा होतो. हीं वितानें कशींही असोत; परंतु स्वर्ग-नरक आपल्या परिवारांत, आचरणांत, व नेहमींच्या कृतींत आहेत, आणि याच्या उलट समजुतीनें त्या त्या धर्माच्या व सर्व धर्मांच्या रहस्याचा भंग होतो. स्वर्ग-नरक आपल्याच ठिकाणीं, आपल्या घरीं, आपल्या कुटुंबांत व शहरांत आहे, ही कल्पना दृढ झाली पाहिजे. आत्म्याला आपण येथें जी गति देऊं तीच पुढें चालावयाची. जसा चेंडूला एकदा टोला दिला म्हणजे ज्या दिशेनें तो द्यावा त्याच दिशेनें सामान्यत: त्याची गति असते, तसाच प्रकार आत्म्याच्या गतीचा आहे. इतकें मात्र आपण करण्याविषयीं सावधगिरी ठेविली पाहिजे कीं, शरीर आत्म्याला टोला देऊं लागलें, तर आत्म्याकडून त्याला उलट टोला द्यावयाचा आणि त्याचा जोर चालूं द्यावयाचा नाहीं. यासंबंधानें स्वर्ग व नरक अथवा परागति आणि अधमागति या आत्म्याच्या दोन्ही गतींला येथेंच प्रारंभ होतो, हें लक्षांत ठेवून त्याला शरीराकडून टोला मिळून अनिष्ट दिशेनें त्याची गति होऊं नये म्हणून लोकांस विशेष रीतीनें जागृत करणें, हेंच आपल्या या समाजाचें कर्तव्य आहे. स्वर्ग-नरकांविषयीं शुद्ध समजूत मनांत जागृत ठेवा, याउपर जशी श्रद्धा असेल तसें खुशाल माना. स्वर्ग-नरक बीजरूपानें येथेंच व आपल्या ठिकाणीं आहेत ही श्रद्धेची गोष्ट नव्हे, अनुभवाची होय; आणि ही शुद्ध व अनुभवसिद्ध समजूत अत्यंत श्रेयस्कर आहे. संपूर्ण विश्वाचें जीवन जो परमेश्वर त्याच्या ठायीं संलग्न होऊन कितीही पूर आले-गेले तरी हरकत नाहीं, अशी मनाची स्थिति होणें, हेंच देहांत असतां मरण मरून अमर होणें आणि आत्म्याची बीजरूप परागति होय. तशा रीतीनें मनाची तयारी होणें आणि औदार्य, समाधान व शांति यांचा निरंतर अनुभव घेणें अत्यंत इष्ट आहे. हा अनुभव ज्या भाग्यशाली पुरुषांस अखंडित प्राप्त होत असेल, त्यांस जन्ममरणरूप पूर कितीही असले, तरी त्यांची क्षिति न वाटतां 'तुका म्हणे गर्भवासीं। सुखें घालावें आम्हांसी' असा बेफिकीरीचा उद्गार त्यांच्या तोंडून निघाला, तर आश्चर्य नाहीं. विशेष महत्त्वाचा सिद्धान्ताचा जो भाग आहे, तो हाच कीं, काम, क्रोध व लोभ ही नरकाचीं तीन प्रकारचीं द्वारें आहेत; त्यांतून जो मुक्त होतो त्या आत्म्याचें कल्याण होऊन त्याला परा म्हणजे उत्तम गती प्राप्त होते; त्यांतून जो चालत असतो त्या आत्म्याचा नाश होतो आणि त्याला अधमागति अथवा नरकप्राप्ति होते. म्हणून भगवद्गीतेंतील वरील तीन श्लोकांचा व तुकारामबावांच्या वरील दोन अभंगांचा सर्वांनीं विचार केला असतां अत्यंत श्रेयस्कर होईल आणि तो अवश्यमेव करावा.

❋ ❋





अनुक्रमणिका

# सिद्ध, साध्य व साधक

थोड्या दिवसांपूर्वीं या शहरांत ख्रिस्ती धर्माचे मुख्य उपदेशक मुंबईचे लॉर्ड बिशप यांनीं त्या धर्माच्या प्रसारार्थ उद्योग करणारे लोक, कांहीं त्यांच्या अधिकारांतील व कांहीं बाहेरचे, एकत्र जमवून येथें ख्रिस्ती धर्मानुयायांच्या साडेतीनशें पंथांपैकीं जे दहा-वीस मुख्य आहेत त्यांच्यामध्यें असणारा बेबनाव मिटून एक मेळ कां होऊं नये, आणि तो होईल किंवा नाहीं, हा प्रश्न विचाराकरितां मांडला. त्या सभेंत ज्या गोष्टींचा विचार झाला त्याची सविस्तर हकीकत प्रसिद्ध झाल्यावर असल्या विषयांवर भवति न भवति करणाऱ्या वर्तमानपत्रांतून वरील मुद्द्यावर बरीच चर्चाही झाली. पोटभेद नसते तर अधिक श्रेयस्कर होतें, आणि निदान ते सर्व एकवट होतील अशी तजवीज व्हावी हें सभेंत हजर असलेल्या लोकांस वाटत होतें असें दिसलें. लॉर्ड बिशपसाहेबांस हा विचार सुचण्याचें प्रत्यक्ष कारण हें कीं, ख्रिस्ती धर्मांतील सर्वांत मोठ्या रोमन काथोलिक पंथाचे प्रधानाचार्य पोप लिओ यांनीं प्रतिवर्षाच्या रिवाजाप्रमाणें इंग्लंडांतील लोकांस उद्देशून एक आशीर्वादपत्र पाठविलें होतें. या निरनिराळ्या ख्रिस्ती संप्रदायांमध्यें पुष्कळ वर्षांपासून चालत आलेले मतभेद मोडून एकी होणें अत्यंत इष्ट आहे आणि तसें लौकरच होईल, अशी आपण आशा करितों, असा मजकूर होता. यावरून आपसांत असणारा बेबनाव मिटून सलोखा व्हावा ही ख्रिस्ती लोकांमध्यें सामान्य चिंतना आहे, हें उघड आहे. आपण ज्या ब्राह्मधर्माचे अनुयायी आहों त्याचा प्रसार फारसा झालेला नाहीं आणि विस्तारही थोडा आहे. असें असतां आपणांतही दोन-तीन पंथ आहेत; आणि त्यांच्या एकीकरणाची चिंता आपणांसही लागली आहे, हें, जसा आपल्या प्रार्थनासमाजाचा चालू असलेल्या हिंदू धर्माशीं संबंध आहे, तसाच प्रचलित ख्रिस्ति धर्माशीं ज्यांचा आहे अशा यूनिटेरिअन संप्रदायाचे उपदेशक डाक्तर संडर्लंड कलकत्त्यास गेले होते, तेव्हां ब्राह्मधर्मानुयायांचे जे लहानमोठे समाज आहेत त्यांत भेद कां असावे आणि ते मिटणें कोणत्या धर्तीवर शक्य आहे, हा प्रश्न त्यांनीं काढला, यावरून सिद्ध होतें. या सवालाचा उलगडा करण्यास गैरमाहीत असल्याकारणानें आपणांस अधिकार नाहीं व साधनेंही नाहींत, सबब तीन पंथांपैकीं प्रत्येकानें दोन-दोन अथवा तीन-तीन प्रतिनिधि निवडून त्यांची एक कमिटी करून तिजकडून याचा विचार करण्यांत यावा, अशी साहेबमजकुरांनीं सूचना केली; आणि तिच्या बर्हुकूम व्यवस्था होऊन त्या कमिटीपुढें हा विचार चालू आहे. इतक्यांत नवविधान पंथाच्या संबंधाचें एक वर्तमानपत्र आहे त्यांत हे भेद असेच कायम राहतील आणि मनुष्याच्या कृतीनें किंवा तजविजीनें ते मोडण्यासारखे नाहींत, असा अभिप्राय प्रसिद्ध झाला. आपल्या इकडे साताऱ्याच्या प्रार्थनासमाजानें धर्मसंबंधी सुधारणा करण्याच्या बाबतींत चळवळ करणाऱ्या ज्या संस्थांमध्यें अथवा समाजांमध्यें व आपणामध्यें पुष्कळ गोष्टींत साम्य व थोड्यांत फरक आहे अशांनीं वार्षिक उत्सवांच्या वेळीं एकत्र जमावें व परस्परांस मदत करावी अशी सूचना इतर समाजांस केली आणि तिला अनुसरून साताऱ्यास थोडीबहुत व्यवस्थाही केली. मुंबईंत या दिशेनें थोडा उद्योग झाला, पण त्यास विशेष सिद्धी आली नाहीं. ज्याचें सामर्थ्य प्रचंड, ज्याचा विस्तारही आपल्यापेक्षां पुष्कळपट अधिक, अशा ख्रिस्ती धर्माच्या अनुयायी लोकांस हे भेद व पोटभेद नसावे ही चिंता असते; तर मग असे हे पोटभेद होण्याचा प्रकार पाहण्यांत येतो त्यांत मनुष्यकृतीचा भाग आहे, किंवा तो स्वाभाविक आहे, तो मनुष्यकृतीनें निघण्यासारखा आहे, त्याचीं कारणें क्षुल्लक व प्रासंगिक आहेत, किंवा त्याच्या मुळांशीं कांहीं विशेष विचार करण्यासारखा भाग आहे, याचा आजच्या प्रसंगीं एक वेळ विचार करणें अप्रासंगिक होईल असें नाहीं. धर्मभेद व त्यांच्या पोटभेदाचे नामभेद अनेक असतात, तरी माझ्या समजुतीनें प्रत्येक संप्रदायांत तीन प्रकारचे लोक असतात. साध्य, सिद्ध आणि साधक अथवा साधू. प्रत्येक देशांत, प्रत्येक वेळीं, स्थितींत, धर्मांत व संप्रदायांत या तीन प्रकारचा लोकसमाज असतो, हें कांहीं नूतन कोडें नाहीं; ही कांहीं नवीन व्यवस्था आहे असें नाहीं. ही लोकसमूहाची वांटणी वेदांच्याही पूर्वीची आहे, हें पुरुषसूक्तांतील

यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।
ते ह नाकं महिमानः सचंत यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ॥
या ऋचेवरून सिद्ध होतें. मनुष्यांची योनि तशीच गंधर्वांची व देवांची योनि अथवा लोक आहे, असें त्या वेळचे लोक मानीत असत. यांपैकीं साध्य, देव झाले. ते यज्ञ अथवा कर्म करणारे लोक; आणि विधीनें सांगितलेले आचार अतिकटाक्षानें किंवा आग्रहानें करणाऱ्यांचा मनुष्यांत काय, देवांमध्यें काय, एक वर्ग असावयाचाच. हे साध्य झाले. सिद्धांचा दुसरा वर्ग; यांची साध्यांच्या कर्मांविषयीं अश्रद्धा असते. कडकडीत तप, योग, वैराग्य किंवा सखोल ज्ञान यांनीं सिद्ध करून घेण्याकडे, अथवा आपल्या अंगीं विशेष सामर्थ्य येईल असें करण्याकडे बुद्धीचा कल असतो; परमेश्वराची सिद्धि आपल्या पराक्रमानें करून घ्यावयाची असते. या वर्गास दोष देण्याचा माझा विचार नाहीं. आणि ज्यांना ही आटाआट सहज होत असेल त्यांनीं ती करूं नये असेंही माझें म्हणणें नाहीं; परंतु त्यांत सामान्य मानवांस जागा नाहीं. तिसरा राहिला तो साधकवर्ग; याची साध्यांच्या कर्मांवर अथवा सिद्धीवर श्रद्धा नसते आणि तीं विशेष शक्य नाहींत असें वाटत असतें. तर आपण दुर्बल, पामर, आपला सर्व आधार परमेश्वरावर; आपला निर्वाह व उद्धार करून घ्यावयाचा तो केवळ त्याच्या कृपेनें; असें या वर्गाचें मत असतें. हा इतिहास इतर देशांप्रमाणें आपल्या देशाचाही आहे. वैदिककाळीं हजारो लोक जमून यज्ञ करावयाचे व हजारो खंडी द्रव्य नासावयाचें, असा रिवाज होता. आपणांस प्रिय अशा वस्तु अथवा पशु परमेश्वरप्रीत्यर्थ अर्पण करावयाचे; असें होतां होतां देवाच्याही पलीकडे यज्ञाचा महिमा वाढला, आणि पुत्रेष्टि वगैरे योग प्रचारांत आले. या थरास गोष्ट पोहोंचली, तेव्हां साध्यांच्या या कर्मांविषयीं अत्यंत अश्रद्धा उत्पन्न झाली; आणि हें खोटें व पाप आहे असें वाटूं लागलें. साध्यांची श्रद्धा नष्ट होऊन तिच्या जागीं सिद्धांची श्रद्धा आली. योगबलानें व तपोबलानें अमानुष शक्ति संपादन करून घेणारांचा, ज्ञान्यांचा, व तार्किकांचा धर्म हा सिद्धांचा धर्म समजावयाचा. बुद्धाचा धर्मही साध्यांचा नव्हे; सिद्धांचा आहे. कारण, त्यांत स्वतःच्या पराक्रमास विशेष महत्त्व दिलेलें आहे. या धर्माप्रमाणें देवापेक्षांही सिद्धाची योग्यता अधिक. आणि सर्वांत वंद्य काय ते सिद्ध; आणि एकदम सिद्धि प्राप्त करून घेणें यांतच जन्माचें साफल्य; अशी तऱ्हा झाली. आपल्या ठिकाणीं दौर्बल्य अथवा पाप आहे ही बुद्धि नाहीं; आणि आपली वासनाच नाहींशी करणें बरें, असें सिद्धांस वाटत असतें. आपल्या वासनांच्या तृप्त्यर्थ यज्ञयाग करण्याकडे साध्यांची प्रवृत्ति असे; आणि वासनेचा समूळ नाश करण्याबद्दल सिद्धांनीं विशेष उद्योग केला. परमेश्वराच्या घरचे लाल, ज्यांच्या ठायीं लोकोत्तर नैसर्गिक सामर्थ्य, त्यांस हा सिद्धांचा मार्ग कामाचा. इतरांस उपयोगी नाहीं; कारण, जो सिद्ध होतो त्याला पुढें कांहीं कर्तव्य राहत नाहीं. ज्याच्या ठिकाणीं दैविक अंश जास्ती अशांनी वैदिक काळांतील धर्माचा साध्यमार्ग सुटल्यानंतर तार्किक, बौद्ध, योगी वेदान्ती वगैरे सिद्धमार्गाचें ग्रहण केलें. हें उपनिषत्काल व भगवद्‌गीताकाल यांच्या दरम्यानच्या कालाचें स्वरूप किंवा विशेषलक्षण समजावयाचें; एऱ्हवीं सर्व कालांत व स्थितींत तिन्ही प्रकारचे लोक असतात. नंतर या दोन्ही मार्गांपासून लोक पराङ्मुख होऊं लागले. कारण, नसतें सामर्थ्य अंगीं आणण्यासाठीं अट्टाहास व त्रास करणें योग्य नाहीं आणि ही मोठी चूक होय असें वाटूं लागलें. कर्मांविषयीं विशेष श्रद्धा नाहीं, सिद्धीविषयीं विशेष खात्री नाहीं आणि वेदांत्याप्रमाणें जन्ममरणापासून मुक्त होण्याविषयीं उत्कट इच्छा नाहीं; असें होऊन हीन, दीन, मलिन व दुर्बल असे जे आपण त्यांचा निर्वाह, उद्धार जसा भक्तीनें होईल तसा यज्ञयागादि विशेष कर्मांनें, अथवा ज्ञान, तप, योग आदिकरून साधनांनीं होणें शक्य नाहीं असा विचार लोकांच्या मनांत येऊं लागला. हा आमच्या देशाचा प्रकार झाला. हें सर्व सांगण्याचा मूळ हेतु हाच कीं, निरनिराळ्या पंथांतील व संप्रदायांतील मतभेद मोडून ऐक्य कां होत नाहीं, या प्रश्नाची वाटाघाट करीत बसण्यापेक्षां आपल्यांतली साधकमंडळी कशानें वाढेल याची चिंतना करणें अधिक इष्ट आहे; आणि याविषयीं चर्चा झाली असती तर अधिक श्रेयस्कर झालें असतें, असें मला वाटतें. पुष्कळांस भेदाचें महत्त्व अधिक आहे असें वाटतें. परंतु माझ्या मतें साम्य विशेष महत्वाचें आहे. तुकाराम, नामदेव, कबीर, चैतन्य वगैरे साधुसंत साधक स्थितींतले होते. साधकपणाचा संबंध तुकारामबावांच्या प्रत्येक अभंगांत परिस्फुट आहे; आणि सिद्धीचा संबंध आहे असा एकही अभंग नाहीं. यामुळें त्यांच्या अभंगांविषयीं आपलें रहस्य अतिशय असतें. तुकारामबावांचा

घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं ।
मुक्तां आत्मस्थिति सांडवीन ॥ १ ॥
ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं ।
भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥
तीर्थभ्रामकासी आणीन आळस ।
कडू स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥
सांडवीन तपोनिधा अभिमान ।
यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥
भक्तिभाग्यप्रेमा साधीन पुरुषार्थ ।
ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ५ ॥
धन्य म्हणवीन इहलोकीं लोकां ।
भाग्य आम्हीं तुका देखियेला ॥ ६ ॥

असा एक अभंग आहे, त्यांत त्यांनीं साध्यांच्या व सिद्धांच्या मार्गांचें मार्मिक रीतीनें वर्णन केलें आहे. तें आपली स्वतःची महति वाढविण्यासाठीं केलेलें नाहीं; तर नसता आवांका धरून उडी मारली म्हणजे फसगत होते, हें दाखविण्यासाठीं आहे. साधकमार्गानें जें सुख प्राप्त होतें, तें ब्रह्मज्ञान संपादन करून आत्मस्थिती मिळविली तरी तिच्या प्राप्तीनें सिद्धाला होत नाहीं, आणि ब्रह्मज्ञान्याला तृप्ति न वाटतां लाळ घोटीत बसावें लागतें. तसेंच साध्यमार्ग्यांचा, म्हणजे तीर्थाटन, यज्ञ, हवनादि करणारांस इष्ट जो स्वर्ग- म्हणजे नंदन-वनादि भोग ते साधकस्थितींत होणाऱ्या आनंदाच्या मानानें कडू वाटण्यासारखे आहेत. आपण साधक-स्थितींतले असल्याकारणानें तुकारामबावा आपणांस अत्यंत जवळ येतात. नामभेदांत विशेष योग्यता नाहीं आणि एका यादींत अथवा पटांत नांवें पडल्यानें ऐक्य होत नाहीं, हाच सांगण्याचा मुख्य उद्देश आहे. तुमच्याआमच्यासारख्या लंगड्यापांगळ्या, ज्ञान नाहीं, सामर्थ्य नाहीं व फुरसतही नाहीं, अशा मंडळीची वाट काय, हाच मुख्य मोठा सवाल आहे व साधकांचा मार्ग, साधकांची भक्ति हीं वाढतात कीं काय हेंच पाहिलें पाहिजे. साध्यांच्या यज्ञादि कर्मांचा अथवा सिद्धांच्या तपोयोगादि साधनांनीं प्राप्त झालेल्या सिद्धींचा हल्लीं बोभाट कानीं पडत नाहीं; यावरून त्या वर्गाचे लोक थोडे, असेंच सिद्ध होतें. तुकारामबावांनीं म्हटल्याप्रमाणें 'नित्य करितों कीर्तन' इत्यादि, हाच मोठा अधिकार, हीच योग्यता आणि 'सत्य सत्य मी नाहीं तरलों; परमेश्वरा तुझ्यावर भार घातल्याविना उद्धार होणें नाहीं' ह्या तऱ्हेच्या समजुतीचे लोक हल्लीं जास्त आहेत. जे भेद आहेत त्यांत विशेष नाहीं; साम्य महत्त्वाचें आहे. साधकमार्गांत मनाच्या वळणाची एकता आहे, आणि अनेक संप्रदाय असले, तरी साधकांचा समाज वाढत आहे कीं काय, ही विवंचना माझ्या समजुतीनें अधिक उपयोगी होईल. ख्रिस्ती लोकांकडे पाहिलें, तर सिद्धमार्गा-कडे त्यांचें वळण आहे आणि सिद्धांची संख्या त्यांच्यामध्यें अधिक आहे; तसें आपल्याइकडे नाहीं, हें आपलें भाग्य समजलें पाहिजे; आणि आपण साधकमार्गानुयायी लोकांची संख्या वाढण्यासाठीं वाटाघाट केली पाहिजे. आपला समाज साधकसंप्रदायाचा आहे. सबब साध्य व सिद्ध यांस बाजूला दूर ठेवून आपण साधकमार्गानुगामी लोकांची संख्या वाढण्यासाठीं उद्योग करूं व चिंतना धरूं, तर अधिक श्रेयस्कर होईल. साधकमंडळी सांप्रत अधिक आहे याचें प्रमाण आम्ही कांहीं वर्षांमागें सातारा जिल्ह्यांत यवतेश्वरीं गेलों होतों, तेव्हां आमच्या दृष्टीस पडलें. तेथें कधीं कधीं टोळधाड येत असते, त्याप्रमाणें टोळांची धाड आली. त्या वेळीं आम्ही तेथील सिद्धेश्वराच्या देवळांत उतरलों होतों; आणि आमच्यामध्यें सिद्धमंडळी, म्हणजे Herbert Spencen वगैरे वाचलेली मंडळी, त्याचप्रमाणें साध्य-मंडळी म्हणजे गणपतीचें आराधन, सांबाला कोंडणें, अभिषेकाची धार धरणें इत्यादि अशा प्रसंगीं करणें योग्य असें मानणारी मंडळी, आणि तसेच तुमच्या-आमच्यासारखे साधकस्थितींतले लोक होते. इतक्यांत देवळाकडे गांवांतील लोक आले; त्यांतही कांहीं वेदान्ती, कांहीं कर्मठ व बरेच साधकवर्गांतले होते, असें पुढील हकीकतीवरून दिसून येईल. गांवकरी मंडळीनें विनंति केल्यावरून आम्ही त्यांस जागा देऊन बाहेर अंगणांत जाऊन राहिलों. आम्हीं गांवकरी लोकांस तिकडे येण्याचें कारण विचारिलें. तेव्हां ते म्हणाले, 'आम्ही देवाला प्रसाद लावणार. देवानें रहा म्हणून प्रसाद दिला, तर गांवांत राहणार; नाहीं तर येथून गांव सोडून चालते होणार.' तेव्हां आम्हांपैकीं स्पेन्सर वाचलेली मंडळी स्वपराक्रमाच्या तोऱ्यावर देवाला गाऱ्हाणें घालण्याबद्दल हंसली. आणि कर्मठ आपल्या रीतीचे उपाय सुचवूं लागले. परंतु साधकवर्गानें विचारलें तेव्हां गेल्या वर्षाचा अशाच प्रसंगाचा आपला अनुभव सांगून, आपण देवाला कौल लावणार आणि त्याचा जबाब मिळेल त्याप्रमाणें करण्याचा आपला निर्धार आहे, असें गांवकरी लोकांनीं सांगितलें. तेव्हां कौलाच्या

संबंधानें आमच्यांत बरीच चर्चा झाली. कारण, साध्यांला व सिद्धांला मनुष्याचा आणि देवाचा खरा संबंध व खरें नातें कळतच नाहीं; आणि कौल घेण्याची रीत तर साधकवर्गाची पडली. कौल लावतांना वयोवृद्ध व पाटील वगैरे ग्रामाधिकारी पुढें होऊन 'बापा, तुझी इच्छा आम्ही गांवांत राहावें अशी असली, तर अमूक बाजूनें फूल पडूं दे. नसली तर दुसऱ्या बाजूचें फूल पडलें म्हणजे आम्ही देवळाकडूनच परभारें सांगशील तेथें जाऊं', असे उद्गार काढण्यांत आले. थोडा वेळ गेल्यावर गांवांतच राहावें असें फूल पडलें. टोळांची धाड गेली आणि त्यांची काळजी दूर झाली; आमच्या मंडळींतला वाद मात्र बराच वेळ चालला ! इंग्रजी शिक्षणानें सर्वांच्या मनावर सारखे संस्कार होतात असें नाहीं. या जुन्या समजुतीच्या साधकमंडळीची रीत भिन्न असली, तरी देवावर संकट घालून त्यास ठिकाणावर आणूं, अथवा स्वतःच्या तपोबलानें व योगसामर्थ्यानें आपणांवर आलेला कठीण प्रसंग टाळूं, असा वृथा आवांका न धरितां त्यांनीं आपण दुर्बल, देवाच्या कृपेवरच आपला सर्वपरी आधार, असें समजून त्याचा त्यांनीं धावा केला आणि त्यांच्या समजुतीप्रमाणें देव त्यांना पावला. हीच लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. ही भावना आपल्यासारखीच आहे. साधकांची मूळ भावना शुद्ध आहे. देवाला गाऱ्हाणें सांगणें, आणि त्याची अनुज्ञा होईल त्याप्रमाणें वागणें, ही उद्भावना वाढण्याविषयीं आपण चिंतना केली, तर अधिक कार्य होईल. साध्यांची व सिद्धांची बुद्धीच निराळ्या प्रकारची असते. साधकवर्गांतील लोकांच्या मतांत व आचारांत भेद असले, तरी मूळ भावना शुद्ध आहे. आणि त्यांचेंआमचें तिच्या संबंधानें साम्य आहे. यास्तव या साधकमंडळीची बढती व्हावी, त्यांची संख्या वाढावी एतदर्थ आपण प्रयत्न केला पाहिजे. साधकवर्गाच्या निरनिराळ्या संप्रदायांत आपणांस अपवादक वाटण्यासारख्या कांहीं गोष्टी असतील, तरी मुख्य सिद्धान्ताच्या संबंधानें त्यांचा-आमचा विरोध नाहीं. असा माझा समज आहे; आणि ही आजची माझी सूचना सर्वांस रुचेल, अशी मी आशा करतों.

* *

# देवावर भार घालून प्रपंच करणें

कृपावंत किती । दीन बहु आवडती ॥ १ ॥
त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥ २ ॥
भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥ ४ ॥

या तुकारामबावांच्या उक्तीप्रमाणें त्यांचा दुसरा एक अभंग आहे तो असा—

आलिया भोगासी असावें सादर ।
देवावरी भार घालूनियां ॥ १ ॥
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें ।
येर तें बापुडें काय रंक ॥ २ ॥
भवाचिये पोटीं दुःखाचिया राशि ।
शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे काय त्या करितां ।
चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

यांत 'देवावरी भार घालूनियां' बद्दल 'देवावरी भार घालूं नये' असा क्वचित् पाठ आहे; पण तो अशुद्ध आहे. कारण, देवावर भरिभार ठेवून त्याच्यावर भार घालणें, हाच खऱ्या भक्ताचा मार्ग असतो. तुकारामबावा म्हणतात कीं, देवाला दीन फार प्रिय आहेत आणि त्यांचें योगक्षेम तो चालवीत असतो. पूर्वीचे राजे अथवा त्यांचे मोठे कामगार जमीन, वर्षासन, किंवा नेमणूक यांची सनद करून देतांना, योगक्षेम चालण्यासाठीं, हे शब्द वापरीत असत; आणि त्यांचा अर्थ खाण्यापिण्याच्या, वस्त्रप्रावरणाच्या, अन्नाच्छादनाच्या व साधारण घर-संसाराच्या संबंधानें सुखानें राहण्यासाठीं, हाच असतो. परमेश्वर दीनांच्या योगक्षेमाचा भार आपल्या माथीं वाहतो, त्यांस मार्ग दिसत नाहींसा झाला म्हणजे वाट चुकूं नये म्हणून हातानें धरून नेतो आणि ती दाखवितो. परंतु एक अट आहे, ती कोणती म्हणाल तर, जे जीवें व एकभावें त्यास अनुसरतात, त्यांसच असें होत असतें.

अनुक्रमणिका

आतां देवाला दीन फार आवडतात, या म्हणण्याला एक आक्षेप आहे तो हा कीं, पर्वताच्या वरच्या प्रदेशापेक्षां खालच्या भागाला सूर्याची ज्योति उशिरां पोहोंचते; आणि सामान्यत: ज्या मनुष्यांस बल, सत्ता, ज्ञान अथवा द्रव्य यांची अनुकूलता अधिक असते त्यांची जतन व जोपासना विशेष होत असते; यावरून सृष्टिमाहात्म्यामध्यें व मनुष्यसृष्टींत हा नियम नाहीं, हें उघड आहे. मग धर्ममार्गांतच कोठून आणतां ? आपणांमध्यें आंधळें, पांगळे व लुले यांचा भार घेणारे असतात, असा साधारण अनुभव नाहीं; तर देवाला दीन फार आवडतात, आणि तो त्यांचें योगक्षेम चालवितो, हें खरें कशावरून ? ही गोष्ट अनुभवाला येत नाहीं, असें वरवर पाहणाराला वाटलें, तर फारसें नवल नाहीं. आंधळे, पांगळे हे आमच्या समजुतीनें दीन असले, तरी त्यांच्या स्वत:च्या किंवा देवाच्या दृष्टीनें दीन असतात असें नाहीं. आपलें सर्व गौरव, आपला मोठेपणा, व स्वप्रकाशाची प्रौढि एकीकडे ठेवून, जे एका भावानें देवाला अनुसरले ते जन राजासारखे ऐश्वर्यवान् असले, तरी तेच धर्ममार्गांतले खरे दीन समजावयाचे; आणि तुकारामबावांचें म्हणणें त्यांनाच लागू आहे. आपल्या मानानें ज्यांच्यामध्यें कांहीं कमीपणा आहे ते दीन, असें म्हणण्याचा प्रघात आहे; तरी त्यांस अनुलक्षून ही उक्ति नाहीं. आपलें ऐहिक ऐश्वर्य, आपला प्रभाव, आपलें शहाणपण कितीही असलें, तरी आपण दुर्बल, परमेश्वरी सत्तेच्या सर्वपरी अधीन असें समजून, देवाला अनन्यभावानें जे शरण जातात आणि त्याच्या इच्छेस अनुसरतात तेच खरे दीन; ते देवाला आवडतात; त्यांचें ओझें कसलें, आणि त्यांस वाट चुकण्याची भीति कोठें राहते ? धर्ममार्गांतल्या दीनाचीं हीं दोन लक्षणें आहेत. ज्यांच्या घरीं ऋद्धिसिद्धि पाणी वाहतात असे सिद्ध, व जे आपल्या धर्मकर्मांनीं आपला उद्धार करूं शकतात असे साध्य, यांतला एकही दीन नव्हे. ज्याला ओझ्याचा भार दु:सह वाटतो आणि वाट चुकण्याची भीति फार असते असा साधकस्थितींतला दीन मनुष्य अनन्यभावानें देवाला शरण गेला असतां त्याची त्याला कींव येते; त्याचें देव रक्षण व तारण करितो. साध्यांची व सिद्धांची सृष्टि अलाहिदा आहे. याउपर कोणी म्हणतील कीं, आम्ही याच स्थितींतले आहोंत आणि आमचा प्रपंच वाढत चालला आहे, तर मग देव आमचा भार कां वाहत नाहीं ? यांतही पुन: एक विचार आहे. हा भक्तिमार्ग साध्यांकरितां व सिद्धांकरितांही नव्हे. त्यांचे मार्ग निराळे; त्यांचीं शास्त्रें निराळीं; तरी ज्याला प्रपंचाचा गाडा ओढावयाचा आहे, दोन वाटा फुटतात अशा रस्त्यानें ज्याला जावयाचें आहे आणि नानाविध संशयांनीं, कल्पनांनीं व संकल्पांनीं ज्याला सुचेनासें झालें आहे; असा जो प्रपंचाचा भारवाही त्याचें दैन्य देव हरतो; त्याचें ओझें देव वाहतो; आणि त्याला धरून मार्गास लावितो, असा तुकारामबावांचा सिद्धान्त आहे. मात्र त्यानें एका भावानें अनुसरलें पाहिजे. याला साक्ष ज्यानें त्यानें आपल्या मनांत विवंचना करावी, म्हणजे मिळण्यासारखी आहे. जेणेंकरून आपण अगदीं बेदिल होतों असा विशेष अडचणीचा प्रसंग राहूं द्या. संसारांत अनेक ऋणानुबंध जोडावयाचे असतात; अनेक प्रकारचे भार वाहावयाचे असतात; हें सर्व ओझें कोणीं सोसलें याचा विचार केला असतां, तें सहन करण्याचें अथवा करविण्याचें सामर्थ्य तुमचेंआमचें नव्हे, हें सहज दिसून येईल. अतिशय दु:खकारक प्रसंगीं आपण नास्तिक नसतांही देवाला दूषण देण्यास तयार असतों, अशी अंत:करणाची वृत्ति होते, ती हा विचार करितांना प्रमाणभूत नव्हे. सतत नैसर्गिक स्थिती पाहिली आणि एकंदर लोकांची योगक्षेमचिंता कोण करितो, स्वत:च्या प्रपंचाचा भार वाहण्यास अथवा दुसऱ्यांचा वाहविण्यास कोण प्रेरणा करितो, इत्यादि गोष्टींचा विचार केला, तर आपणांस न कळतां आपली योगक्षेमचिंता कोण वाहत आहे आणि आपलें ओझें लोकांकडून वाहवीत आहे व आपणांस वाईट मार्गापासून परावृत्त करीत आहे, याविषयीं आपली खात्री होईल.

आपली सार्वत्रिक साहजिक स्थिति अशी असते कीं, आपण पुण्यवान नाहीं, तर अत्यंत पापीही नाहीं; आणि आपण खड्डयांत पडण्याचा संभव असतो. संसारांत अनेक प्रकारचे उपद्व्याप चालत असतात व आपण प्रपंचाचा गाडा वाहतों, तें सर्व तुम्हीआम्ही करीत नाहीं; तथापि परमेश्वराची जी रम्य लीला म्हटली आहे ती येथेंच अनुभवास येते. ती अशी कीं, अनेक घोटाळ्यांत पाडणाऱ्या आडवाटांतून सरळ बिनधोक्याचा मार्ग आपणच शोधून काढतों; डोंगरावर भार आपणच नेऊन पोहोंचवितों; आणि एकंदर खटाटोप आपल्याच सामर्थ्यानें चालला आहे, असें आपणांस वाटत असतें. आणि नाना संकल्पविकल्पांनीं आपण वारंवार गडबडून जात असतों, तेव्हां आपला वाली, कैवारी, मातापिता

व साहाय्यकारी होऊन आपली अडचणींतून सोडवणूक कोण करितो, तें आपणांस कळत नाहीं. सूक्ष्म विचार केला, तर यत्किंचित् बिघाड कोठेंही झाला असतां तो नीट करण्याचें सामर्थ्य आमच्या अंगीं नसतें, असें दिसून येईल. साध्यांच्या गौरवाची अथवा सिद्धांच्या तयारीची घमंडी मुळींच नसून, आपली दुर्बलता व परवशता ज्यांस कळत असते, तेच धर्ममार्गांतील दीन. ते एकनिष्ठेनें देवाला शरण गेले असतां तो त्यांचा नेता व पाठीराखा होतो. वास्तविक पाहतां, परमदयाळू परमेश्वरच आपणां सर्वांचा त्राता व मार्गदर्शक आहे. पण, दुर्भाग्य हें आहे कीं, परमेश्वरी रम्य लीलेच्या योगानें प्रत्येक मनुष्याला आपण बलवान्, आपण शाश्वत आहों असें वाटून, नश्वरतेच्या व दुर्बलतेच्या भागाचा अगदींच विसर पडतो. आपला योगक्षेम आपणच चालवितों, असें वाटत असतें; पण, तो चालविणारी शक्ति दुसरीच आहे. तरुणपणीं काय, म्हातारपणीं काय, जे कष्ट व त्रास आईबापें मुलांसाठीं सोसतात ते सर्व त्यांच्याकडून करविणारा दुसराच आहे. अशी खरी प्रतीति असावी; ती सर्वांला होत नाहीं. ज्याला झालेली आहे त्याला सर्व ऐहिक संबंधांची कडीनकडी दुसऱ्यानें गुंतविलेली आहे असें वाटतें; व या गोष्टीची विस्मृति होऊं न देतां प्रापंचिक दुःसह ओझें डोक्यावरून उतरावें म्हणून ईश्वराचे जो पाय धरितो, तो दीन. साध्य व सिद्ध आपापली व्यवस्था लावून घेतात, तसा साधक-मार्गांतल्या लोकांचा प्रकार नसतो; आणि साधकांपैकीं जे ओझ्याच्या भाराखालीं दडपलेले देवास अनन्य-भावानें शरण जातात त्यांचें योगक्षेम तो चालवितो व त्यांस हातानें धरून सरळ मार्गास लावितो, असा तुकारामबावांचा प्रतिज्ञापूर्वक उपदेश आहे. अहंपणाचा पडदा थोडासा दूर केला असतां, याच्या सत्यतेचा अनुभव येतो; आणि एकंदर रचना कशी आहे तें मनांत पूर्णपणें बिंबलें असतां अधिक आश्वासन येतें. तर हीं साधुवाक्यें वरचेवर वाचावीं आणि त्यांचें मनन करावें, अशी माझी विनंति आहे.

* *

# भक्तिमार्ग पंगुपणाचा आहे काय ?

हेचि थोर भक्ति आवडती देवा ।
संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥
ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें ।
चित्तीं असो द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ ।
भोगणें तें फळ संचिताचें । ३ ॥
तुका म्हणे घालूं तयावरी भार ।
वाहूं हा संसार देवापायीं ॥ ४ ॥

भक्तिमार्ग हा पंगुपणाचा, अशक्ततेचा मार्ग आहे; व हजार पांचशें वर्षें ज्या साधूंनीं ह्या मार्गाचा उपदेश केला, ते स्वतः पंगु होते, त्यांनीं सर्व लोकांस व आपल्या अनुयायांस पंगुपणा शिकविला व त्यायोगें देशाला अत्यंत शोचनीय स्थिति प्राप्त झाली, असा एक आक्षेप अलीकडे निघाला आहे.

ही पंगुता खरी आहे कीं काय ? व भक्तिमार्गाची सरणी हानिकारक आहे किंवा कसें ? हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. ज्यांचे हातपाय, किंवा इतर इंद्रियें गेलीं आहेत, किंवा व्यापार करण्यास असमर्थ झालीं आहेत त्यांना आपण पंगु म्हणतों. भक्तिमार्गाच्या योगानें अशा प्रकारची शिथिलता मनास येते, व्यक्ति व समाज निरुत्साह होतो, हा समज खरा आहे, किंवा अन्यथा आहे, हें आज पाहणें आहे.

ज्यांनीं आक्षेप घेतला आहे ते रामदासांची गणना पंगु कोटींत करीत नाहींत व त्यांच्या मार्गाला मात्र सामर्थ्याचा मार्ग असें म्हणतात. हें म्हणणें अत्यंत अशुद्ध व वस्तुस्थितीला विरुद्ध आहे. गुरुशिष्यसंवादरूप दासबोध ग्रंथ लिहिण्यास स्वामी कां प्रवृत्त झाले ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, इतर साधूंनीं जो मार्ग वद्य केला, तोच भक्तिमार्ग संवादाच्या रूपानें गुरूकडून शिष्यास प्राप्त व्हावा एतदर्थ तो ग्रंथ रचिला, असें ग्रंथारंभीं विशेष रीतीनें स्वामींनीं कथन केलें आहे. आतां दासबोधांत राजकारणावर कांहीं प्रकरणें आहेत. व प्रजेची योजना कशी करावी, खलांचा उच्छेद खलांच्याच द्वारें करावा, जो ज्या रीतीनें उपयोगीं पडेल तसा त्याचा उपयोग करून घ्यावा, इत्यादि लौकिक शहाणपणाचा संग्रह अत्यंत मार्मिकतेनें केला

आहे; हें जरी खरें आहे, तरी ग्रंथांत मुख्य प्रमेय काय आहे ? त्या ग्रंथाचीं एकंदर प्रकरणें व विषय मनांत धरून विचार केला म्हणजे भक्तिमार्गाचा उपदेश हाच प्रधान हेतु आहे, असें उघड दिसतें. प्रसंगोपात्त आलेल्या चातुर्याच्या थोड्याशा भागाकडे मात्र आपण लक्ष द्यावें, व बाकीचा प्रमुख भाग सोडावा हें, अन्यथा आहे. यावरून असें दिसून येईल कीं, रामदासांची सांगड इतर साधूंबरोबरच घातली पाहिजे. त्यांची एकट्यांची वेगळी नौका समुद्रांत एकटीच ढकलून चालवायाचें नाहीं. त्यांच्यासाठीं इतर साधूंच्या नौकेंतच जागा राखून ठेविली पाहिजे.

एक रामदास कोणच्या कोटींतले हा विशिष्ट व्यक्तिविषयक विचार बाजूस ठेविला तरी हा भक्तिमार्ग पंगुपणाचा का सामर्थ्याचा हा प्रश्न राहतोच. 'सर्व माया संकल्पावी, देवापायीं संसार व्हावा, व त्यावर भार घालावा' असें ज्या थोर भक्तीचें तुकारामबावांनीं वर्णन केलें आहे, अथवा मुख्य लक्षण मानिलें आहे, ती भक्ति पंगुपणा अथवा जडता उत्पन्न करील, कीं सामर्थ्य व तेज देईल, ह्याचा स्वतंत्रच विचार केला पाहिजे. ज्या भाग्यवान् पुरुषाला साधूंच्या उपदेशानें, किंवा परमेश्वराच्या अनुग्रहानें ही श्रेयस्कर भक्ति प्राप्त झाली आहे, परमेश्वराच्या ठायीं निर्धारबुद्धि उत्पन्न झाली आहे, तो पंगु, असमर्थ होईल काय ? हल्लींच्या किंवा जुन्या काळच्या थोर व्यक्तींचें उदाहरण घेऊन पहा. त्यांच्या ठायीं मानसिक व्यवहारांत निश्चयाचा किंवा दाढर्याचा भाग किती विशेष रीतीनें दिसतो ! ज्यांना भक्तीच्या द्वारें सिद्धी बऱ्याच अंशानें प्राप्त झाली आहे, जे केवळ निर्धाराचे पुतळे बनले आहेत त्यांना पंगु म्हणणें, म्हणजे कसरतीनें किंवा तालीम करण्यानें शरीरास शिथिलता येते, अथवा ज्ञानार्जनाच्या साधनांनीं व अभ्यासानें मनास दौर्बल्य येतें, असें म्हणण्यासारखेंच आहे. संसारांत व परमार्थांत जर कांहीं कठीण भाग असेल, तर परमेश्वरावर भार ठेवून व माया संकल्पून वागतां येणें, हा होय. ही थोर भक्ति ज्यांस प्राप्त झाली, ज्यांनीं वैराग्याची परमावधि दाखविली त्यांस पंगु म्हणणें म्हणजे अर्थाचा विपर्यास करणेंच नव्हे, तर ह्या विषयाचें पूर्ण अज्ञान दाखविणें होय.

थोरपण कशांत आहे ? अंगांत बल आहे म्हणून लोकांस त्रास द्यावा, बलाचा प्रभाव अशक्तांवर दाखवावा, ह्यांत थोरपणा नाहीं. व्यवहारांत आपण अशांस शासन करितों. एकट्यामध्यें ही असली शक्ति दिसत असतां तिचा आपण प्रतिकार करितों. परंतु दहा-पांच चोर मिळून दरोडा घालूं लागले म्हणजे आपणास मोह पडूं लागतो. आणि हें सामर्थ्य असें वाटूं लागतें ! एका व्यक्तीच्या ठिकाणीं जर तें सामर्थ्य होत नाहीं, तर हजार नव्हे लाख असे लोक जमले, तरी त्यांत तें 'सामर्थ्य' कोठून होणार ? ह्यास फार झालें तर 'पशुसामर्थ्य' म्हणतां येईल ! सामर्थ्याच्या ह्याहून वरच्या पायऱ्या पुष्कळ आहेत, व खरें सामर्थ्य वाढविण्यास भक्तिमार्गच अनुकूल आहे. जोंपर्यंत आपण यथान्याय वागत आहों, व श्रेष्ठ मनोवृत्तींनीं प्रेरित, किंवा साधूंनीं उपदिष्ट असे खऱ्या हिताचे मार्ग आक्रमीत आहों तोंपर्यंत भक्तिमार्ग आपणांस अक्षय्य सामर्थ्यच देत असतो. पंगुपणा जो आहे तो साधूंच्या उपदेशापासून नसून त्याच्या उलट जाण्यांतच आहे.

देवावर भार घालणें म्हणजे आपण मुळींच भार वाहावयाचा नाहीं, तटस्थ राहावयाचें असें नाहीं, तर हें परमेश्वराचें कार्य आहे अशा बुद्धीनें ओझें वाहावयाचें व उद्योग करावयाचे. 'चित्तीं असों द्यावें समाधान' असें जें सांगितलें आहे तेंही एवढ्याचकरितां. आपला मोठेपणा व्हावा, आपल्या क्षुद्र हेतूची फलसिद्धी व्हावी असे जे व्यासंग, ते अन्यथा होत. व्यक्तिलाभाचे हेतु एकीकडे ठेवून परमेश्वराच्या इष्ट हेतूंची सिद्धी आपल्या हातून, एकसमयावच्छेदेंकरून किंवा जमावानें व्हावी ही बुद्धी धरणें म्हणजेच माया संकल्पिणें, किंवा देवापायीं संसार वाहणें होय. जगाच्या प्रगतीविषयीं परमेश्वराचे उद्देश निश्चित आहेत व आपल्याला कसरत व्हावी, आपल्याला शाला व्हावी, आपलें सामर्थ्य वाढावें, आपल्या गुणांचा विकास सर्व प्रकारें, सर्व दिशांनीं होत असावा, एवढ्याचकरितां आपल्याला संसार लावून दिला आहे. देवाचा डांगोरा पिटण्याकरितांच आम्ही येथें आलों आहोंत, असें तुकारामबावांनीं म्हटलें आहे. ईश्वरप्रेरित म्हणून केलेल्या कार्याची महती अशी आहे कीं, इतर गोष्टी त्याच्या पासंगालाही पुरावयाच्या नाहींत. ह्या दृष्टीनें पाहिलें असतां, भक्तिमार्गाचा उपदेश अत्यंत सामर्थ्यदायी नाहीं काय ?

अनुक्रमणिका

# ब्रह्मरसाच्या प्राप्तीची वास्तविक महती

सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं ।
टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥ १ ॥
समाधीचें सुख सांडा ओवाळूनि ।
ऐसा हा कीर्तनीं ब्रह्मरस ॥ २ ॥
पुढती घडे चढतें सेवन आगळें ।
भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ ३ ॥
उपजोंचि नये संदेह चित्तासी ।
मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ ४ ॥
तुका म्हणे मन पावोनि विश्रांति ।
त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ५ ॥

समाधीचें, योगाचें जें सुख आहे तें अत्यंत सुख होय, असें मानिलें आहे. संसारसुख, इंद्रियसुख, मानसिकसुख हीं सर्व सुखें आहेत; तरीपण ज्यांची योगावर श्रद्धा आहे त्यांस समाधीचें सुख हें सर्वांत श्रेष्ठ आहे, असें वाटत असतें. ह्या सुखांत सर्व सुखांची परमावधी झाली, असें ते मानीत असतात. पण, तुकारामबावा हें इतकें श्रेष्ठ मानिलेलें सुख ओवाळून टाकीत आहेत ! आपला नेहमींचा व्यवहार असा आहे कीं, ज्याला आपण कमी महत्त्व देतों तें जास्त महत्त्वाच्या वस्तू अगर व्यक्तीवरून ओंवाळून टाकीत असतों. आपापल्या मुलांवरून आया पैसाअडका ओवाळून टाकीत असतात, त्याचें तरी कारण हेंच. त्याच न्यायास अनुसरून कीर्तनावरून समाधीचें सुख तुकारामबावा ओवाळून टाकीत आहेत. म्हणजे तें सुख जरी श्रेष्ठ असलें, तरी तें ब्रह्मरसप्राप्ती करून देणाऱ्या कीर्तनाच्या पासंगासही पुरणारें नाहीं असें झालें; आणि कीर्तनाच्या द्वारें प्राप्त होणाऱ्या ह्या ब्रह्मरसास गति आहे व ती

पुढती घडे चढतें सेवन आगळें ।
भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ १ ॥
उपजोंचि नये संदेह चित्तासी ।
मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ २ ॥
तुका म्हणे मन पावोनि विश्रांती ।
त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ३ ॥

या चरणांत दाखविली आहे.

आतां, तुम्ही ज्ञान, योग अगर कर्ममार्ग घ्या. त्यांच्या बुडांशीं श्रम हा आपला आहेच.[१] ज्ञानमार्गाचेंच अवलंबन केल्यास शंकानिवृत्ती ही कधीं व्हावयाची नाहीं. जसजसें तुम्ही आपलें ज्ञान वाढवीत जाणार, तसतशी शंकित वृत्तीही वाढत जाणारच. परंतु भक्ति-मार्गाचें तसें मुळींच नाहीं. ह्या मार्गांत जो पडला त्याला संदेहच मुळीं नाहीं. समाधीच्या बळावर चार मुक्ति मिळतात, असा समज आहे. त्या मिळत असतील किंवा नसतील; पण, ह्या भक्तिसुखाच्या योगें मुक्ति मिळतात, इतकेंच नव्हे, तर त्या दासी होतात, आणि भक्त स्वामी होतो. ह्या ठिकाणीं त्याला पूर्ण विश्रांति मिळते; त्याचे सर्व ताप नाहींसे होतात. अशी ही ब्रह्मरसाच्या प्राप्तीची महती आहे. विश्रांति प्राप्त करून देण्याचें, संदेह नाहींसा करण्याचें, वृत्ती समाधानी करण्याचें सामर्थ्य इतर मार्गांत नाहीं, तें ह्या मार्गांत आहे. आतां ह्यावर अशी शंका उद्भवण्याचा संभव आहे कीं, हें सर्व काल्पनिक आहे, कीं ह्याला कांहीं आधार आहे ? हा विचार जरी मनांत अगदीं साहजिकपणें आला, तरी ह्या प्रश्नाचा विचार आदरानें केला पाहिजे.

प्रत्येक मनुष्यास जिज्ञासा, धारणाशक्ति, ज्ञान वगैरे आहे. हे त्याचे क्षुद्र गुण आहेत. त्यांना मर्यादा आहे. पण, ह्या सर्वांपेक्षां जास्त महत्त्वाचें प्रेम आहे. ह्याला मर्यादा नाहीं. लहानपणीं ज्ञान नसतें; पण प्रेम असतें. आपण वयानें जसजसे मोठमोठे होत जातों तसतसें आपलें ज्ञान वाढतें खरें; पण, तेंच ज्ञान आपलें आणखी वय झालें असतां कमी होत जाऊन आपणांस सोडून जातें. असाच प्रकार कर्माचा आहे. कर्मे करीत असतां हातून अनेक प्रमाद घडत असतात. कारण, कर्माचें स्वरूप असें आहे कीं, त्यांपासून शांति प्राप्त व्हावयाची नाहीं. ती प्राप्त झाली, तर श्रद्धेपासूनच होईल. ज्ञान कितीही वाढलें, तरी अज्ञान सागरासारखें असावयाचें. वर म्हटल्याप्रमाणें कधीं तृप्ति नाहीं, नेहमीं साशंक वृत्ति, तापाचा शम नाहीं व विश्रांतीही नाहीं. पण,

१. ज्ञानमार्ग, योगमार्ग, कर्ममार्ग व भक्तिमार्ग ह्या मार्गांविषयीं भागवतधर्मावरील व्याख्यानांत सविस्तर विवेचन झालें आहे. सं०

भक्तीची गोष्ट तशी नाहीं. त्यांत विशेष आहे तो हा कीं, ती प्रेममय आहे. आपण प्रेमानें वाढलों आहों हा गुण आपल्यांत लहानपणापासून असतो, तो दिवसेंदिवस वाढत जातो, व अंतकाळापर्यंत आपल्याला सोडीत नाहीं. अत्यंत दुष्ट मनुष्य घ्या, तोदेखील प्रेमासाठीं सुष्ट कृत्यें करीत असतो. हें त्याचें प्रेम अव्यवस्थित असेल, प्रेमाचें स्थान नीतिदृष्टया शुद्ध नसेल; पण, तें कांहीं असलें, तरी ह्या प्रेमामुळें त्याच्या हातून चांगलें कृत्य कधीं तरी घडत असतें. एखाद्या म्हाताऱ्या मनुष्याचा प्राण जात असला तरी अखेरीस तो घुटमळत असतो तो प्रेमाच्या माणसांसाठीं. तो अश्रु टाकीत असतो तेदेखील त्याचें ज्यांच्यावर प्रेम आहे त्यांच्यासाठीं.

आपला प्राण जात आहे, इहलोकींचा आपला आजपर्यंतचा संबंध सुटत चालला आहे म्हणूनच केवळ त्याला वाईट वाटत असतें असें नव्हे. तर वर म्हटल्याप्रमाणें त्याची स्थिति असते म्हणून. एक हरदासी दृष्टान्त आहे कीं, एका भक्तानें देवापाशीं वर मागितला कीं, आपल्या नातवंडाला पालखींत बसलेलें आपण पहावें. हा जरी हरिदासी दृष्टान्त आहे, तरी ह्यापासून आपल्याला जो बोध होत आहे तो हा कीं, ह्या प्रेमामुळें मनुष्य आपल्या एका व्यक्तीची, अगर पिढीची काळजी वाहत असतो. असें नव्हे, तर अनेक पिढ्यांची काळजी वाहत असतो. संपत्ति संपादन करावयाची, घरेंदारें बांधावयाचीं तीं कशासाठीं ? तर आपल्या मुलाबाळांना सुख प्राप्त व्हावें म्हणून. आणि हें त्यांच्या ठायीं प्रेम असतें म्हणूनच करावयाचें. आपलें प्रेम विषयांत गुंतलेलें असतें. भक्ताचें प्रेम एकभावानें देवाच्या ठायीं असतें. आणि त्यामुळें अनंत जन्म जरी मिळाले, तरी देवाचें व आपलें हेंच नातें असावें, असें त्याला वाटत असतें. तो पुनर्जन्माला भीत नाहीं, अनंत जन्मांना घाबरत नाहीं. ज्ञानी आपल्या ज्ञानाची लालसा करील, ह्या जन्मापलीकडे त्याची दृष्टी नसेल; तोच प्रकार योग्याचा असावयाचा; पण, भक्तांची गोष्ट अगदीं निराळी आहे. देव माझा स्वामी व मी त्याचा दास, तो आपला सखा, त्याच्या चरणीं आपण नम्र असावयाचें हें नातें सदोदित असावें, अनंत जन्मीं असावें; व ह्यापेक्षां मुक्तिसुख म्हणून जें मानिलें आहे तें नसलें तरी चालेल, अशी स्थिती ज्याला एकदा ब्रह्मसुखाची लालसा लागते त्याची होत असते. आतां पुष्कळांना असें वाटत असतें कीं, आपलें सर्व प्रेम विषयसुखांत मात्र असतें. पण, केवळ तसाच प्रकार नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हें जें प्रेम आहे तें कांहीं काळपर्यंत असतें. परंतु जें प्रेम निष्काम आहे तें अनंत काळपर्यंत असतें. म्हणून वरील अभंगांत तुकाराम साधूंनीं जें वर्णन केलें आहे तें अयथार्थ नाहीं.

दुसरा भाग असा कीं, ज्ञानमार्ग, योगमार्ग, ह्यांत जरी कांहीं लाभ असले, तरी ते सर्वांना साध्य असे नाहींत. हे मार्ग फारच खडतर आहेत; एवढेंच नव्हे, तर बहुतेकांना ते असाध्य आहेत. परंतु संतांनीं घालून दिलेला हा मार्ग अत्यंत सोपा व श्रेष्ठ असा आहे. टाळमृदंगांच्या साह्यानें प्राप्त होणारा हा मार्ग आहे. आतां ह्यावर कोणाला असेंही वाटण्याचा संभव आहे कीं, ह्या मार्गांत कठीण असें कांहींच नाहीं, नुसता टाळ-मृदंग घेऊन नाचावें, म्हणजे झालें. पण, तसें नव्हे. हा मार्ग जितका सोपा वाटतो, तितकाच तो कठीण आहे. नुसत्या टाळ-मृदंगांच्या हातांत ब्रह्मरसाची प्राप्ति करून देण्याचें नाहीं. ब्रह्मसुखाची लालसा उत्पन्न होणें कठीण आहे; आणि एकदा ह्या सुखाची लालसा उत्पन्न झाली कीं, मग मुक्तीचें सुख यःकश्चित् वाटूं लागतें. कारण, तुकोबांनीं सांगितलेल्या ज्या गोष्टी आहेत त्या केवळ ह्याच मार्गांत प्रविष्ट झाल्यानें लाभत असतात. आणि ज्याला ब्रह्मरसाची लालसा उत्पन्न झाली आहे व जो देवाच्या कीर्तनांत मग्न आहे त्याच्या हातीं अखेरीस जरी लोकांना टाळ आणि मृदंगच दिसले, तथापि त्याला तुकोबांनीं म्हटले त्या सर्व सुखांचा लाभ होत असतो.

मनुष्यस्वभाव साधारणपणें असा आहे कीं, जें थोड्या आयासानें प्राप्त होण्यासारखें आहे तें प्राप्त करून घेण्याकडेच तो लागतो. जिकडे आपला कल नाहीं, तें प्राप्त करून घेण्याकडे तो लागत नाहीं. परंतु जिकडे आपला स्वाभाविक कल नाहीं, तें प्रयत्न करून जर प्राप्त करून घेतलें, तर आपल्या ठायीं एका प्रकारचें बल, एका प्रकारचें धैर्य प्राप्त होत असतें; तोच प्रकार धर्ममार्गांत आहे. अदृष्ट गोष्टींविषयीं आपण थोडेंबहुत व्रतस्थ असलें पाहिजे. दृष्ट गोष्टींवर आपली आसक्ति फार असते. ती कमी करून, अदृष्ट व कठीण गोष्टींविषयीं आपली आसक्ति वाढविणें, ह्यांत मनुष्याचें खरें ऐश्वर्य आहे. कठीण आणि अदृष्ट अशा गोष्टींविषयीं आपली आवड दिवसेंदिवस वाढविणें ह्यांतच मनुष्याची खरी योग्यता आहे.

अनुक्रमणिका






व्यवहारांत आपलें नेहमीं स्वत:विषयीं समाधान आणि इतरांविषयीं असमाधान असतें. अमुकानें अमुक एक गोष्ट केली, असें आढळल्यावर ह्यापेक्षां जास्त त्याला करितां आलें असतें. असें म्हणावयास आपली तयारी असते. हा अव्यवस्थित चित्ताचा प्रकार आहे. वास्तविक प्रकार ह्याच्या उलट असला पाहिजे. हा व्यवहारांतील खरा प्रकार; पण, धर्ममार्गांतही असाच प्रकार आहे. आपण सर्वश्रुत व दृष्ट विषयांच्या मागें आहोंत. त्यापलीकडे आपली दृष्टि जात नाहीं. म्हणून आपल्याला देवालयें, ग्रंथ, गुरू वगैरे लागत असतात. तरीपण, आपला नेहमींचा व्यासंग, ब्रह्मसुखाच्या प्राप्तीसाठीं योग्य मार्गानें सतत प्रयत्न, उद्योगशीलता व आस्थे-वाईकपणा ह्यांचा आश्रय केल्यास अदृष्ट असें जें ब्रह्मसुख आहे त्याच्याविषयीं आपलें ठायीं लालसा उत्पन्न होणार आहे.

* *

# चित्तशुद्धीसंबंधी विचार

**चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती ।**
**व्याघ्रही न खाती सर्प तया ॥ १ ॥**
**विष तें अमृत आघात तें हित ।**
**अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ २ ॥**
**दुःख तें देईल सर्व सुखफळ ।**
**होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ ३ ॥**
**आवडेल जीवां जीवाचिये परी ।**
**सकळां अंतरीं एकभाव ॥ ४ ॥**
**तुका म्हणे कृपा केली नारायणें ।**
**जाणिजे तें येणें अनुभवें ॥ ५ ॥**

ह्या अभंगांचा अर्थ सोपा आहे. ज्याचें चित्त शुद्ध आहे त्याचे शत्रु मित्र होतात. त्याला वाघ खात नाहीं व सर्प दंश करीत नाहीं. फार तर काय, त्याला विष अमृततुल्य होतें आणि अग्निज्वाळा शीतळ होतात. तसेंच आघातही हितकर होतात. तुकारामबावांच्या चरित्रांतील या उक्तीचा प्रसंग सर्वांस श्रुत असेल. तुकारामबावांचा रामेश्वरभट्ट नांवाचा एक छळक होता, तो विहिरीवर स्नानास गेला असतां, त्याच्या अंगाचा दुःसह दाह झाला आणि फोड उठले. तेव्हां हें काय झालें असें वाटून ह्या विवंचनेंत, ज्ञानोबारायाला भेटण्याकरितां तो आळंदीस गेला तेव्हां त्याला 'तूं देहूस तुकारामबावांकडेस जा. ते तुझ्या दुःखाचा परिहार करितील ' असा दृष्टान्त झाला. त्याप्रमाणें त्यानें केल्यावर त्याचा दाह शांत करण्यास या अभंगांतील उक्ति कारणीभूत झाली. असा ह्या अभंगांतील प्रसंग आहे. ही आख्यायिका कोणांस सत्य वाटो वा ना वाटो; पण, या अभंगांतील प्रमेय आपणां सर्वांस अत्यंत विचारणीय आहे. आपणांस ठाऊक आहे कीं, आपण ह्या स्थितींत असतांना ज्याला शत्रु नाहींत असा एकही प्राणी मिळावयाचा नाहीं. मित्र पुष्कळ असले, तरी ज्याला शत्रु मुळींच नाहींत, असा मनुष्य आपणांस आढळणारच नाहीं. प्रत्येकास विचारलें कीं, तुला मित्र फार आहेत काय ? तर मित्र म्हणविणारे पुष्कळ असले, तरी प्रसंगास उपयोगीं पडणारे असे फारसे नाहींत, असें उत्तर मिळतें. तेंच त्याला शत्रु आहेत काय ? असें पुसलें, तर तो राज-कारणी असो, रोजगारी असो, व्यापारी असो वा मजुरी करणारा असो, श्रीमंत असो वा गरीब कंगाल असो. सज्ञान असो वा अज्ञान असो, लहान असो वा मोठा असो, प्रत्येकाची रड अशीच असते कीं, हें जग माझ्या शत्रूंनीं भरलेलें आहे. घरींदारीं, धंदेरोजगारांत सर्वांस हाच अनुभव असतो. त्याअर्थीं शत्रु म्हणजे काय, हें कोणास सांगावयास नको आहे. मित्रांपेक्षां शत्रु अधिक, हा सामान्य अनुभव असला, तथापि कदाचित् शत्रूही मित्र होतील. कारण, शत्रु झाले तरी ते मनुष्यच आहेत. आणि एकाद्या मनुष्याशीं शत्रुत्व असलें, तरी तो प्रसंग-विशेषीं आपलें हित करील, हें म्हणणें संभवेल; पण, पुढल्या चरणांत ज्या मनुष्याचें चित्त शुद्ध असतें त्याला वाघ खात नाहींत, सर्प दंश करीत नाहींत, विष अमृत होतें, अग्निज्वाळा शीतळ वाटतात, कोणीं आघात केला असतां तो हितकर होतो, आणि दुःख दिलें असतां सुखप्राप्ति होते; असें तुकारामबावांनीं रामेश्वरभट्टास

अनुक्रमणिका

सांगितलें. व तो अंगास होणाऱ्या दाहानें त्रस्त झाला होता, तरी हें ऐकून त्याला शांतता प्राप्त झाली. आणि या अभंगांतील उक्तीची सत्यता त्याच्या प्रतीतीस आली, अशी कथा आहे. तरी ती सांगण्यापैकीं आहे, कीं अनुभवाची आहे, हा प्रश्न सहज निघण्यासारखा आहे. पण, ही कविता आहे, शास्त्रांतील निर्णय अथवा वचन नाहीं, एवढा भाग ध्यानांत ठेवून तिजमधील प्रमेयाचा आपण विचार केला, तर हा अभंग निरंतर आपल्या कंठीं बांधून ठेवावा इतकी ह्याची मातब्बरी आपणांस वाटेल. जुन्या विचाराचे वैष्णव तुळशीच्या मण्यांची माळ अगर कंठी आपल्या गळ्यांत घालीत असतात. आपणही वैष्णव आहोंत, परंतु आपणांस तुळशीची माळ अगर कंठी घालणें जमत नाहीं. म्हणून तिच्याऐवजीं हा अभंग निरंतर आपण गायिला व आपल्या हृदयांत ठेविला, तर त्यांतील प्रमेय आपणांस अत्यंत हितकर होईल, इतकेंच नव्हे, तर ह्या ठिकाणीं आपणांस जो अर्थ साध्य करावयाचा आहे, त्याचें हा अभंग उत्तम साधन आहे, असा आपणांस अनुभव आल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां शत्रु मित्र कसे होतात तें आपण पाहूं या. हा विचार करितांना सर्वच शत्रू मित्र होतात असें म्हणण्याचा भाग नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जर आपलें चित्त शुद्ध आहे, आपल्या ठिकाणीं कांहीं किल्मिष नाहीं, दुसऱ्याचा मत्सर नाहीं, दुसऱ्याविषयीं हेवा नाहीं, आपल्या अंत:करणांत काम, क्रोध, लोभ इत्यादिकांचीं उचंबळ नाहीं, तर शत्रु मित्र होतील, हें सांगण्यास ठीक दिसतें; पण, तें अनुभवास पटत नाहीं, असा आक्षेप कोणीं घेतला, व त्याचा आपण विचार केला, तर वरील अनुभव घेण्यास जो अधिकार आपल्या अंगीं पाहिजे तो वसत नाहीं, हेंच मुख्य कारण ही गोष्ट अनुभवास न पटण्याचें आहे, असें आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल. आपण आपल्या स्वत:च्या प्रयत्नानें अशा प्रकारची चित्तशुद्धि करूं म्हटलें, तर तसें होणें कठीण आहे. परंतु जें सामर्थ्य परमेश्वरानें आपल्या अंगीं ठेविलें आहे, त्याचा आपण उपयोग केला आणि आपले यत्न सफल होण्यासाठीं देवाची करुणा भाकिली, तर आपल्या सामर्थ्यानें, प्रयत्नानें आणि देवाच्या साह्यानें आपल्या ठिकाणीं अशी योग्यता येईल कीं, शत्रु मित्र होतील, हें म्हणणें केवळ कवितेंतील अतिशयोक्ति नसून, त्यांत पुष्कळ सत्यांश आहे, अशी आपली खात्री होईल. शत्रु मित्र होतात म्हणजे त्यांचें शत्रुत्व नष्ट होतें, असें म्हणण्याचा तुकारामबावांचा हेतु नाहीं. आपणांस पुष्कळ प्रसंगीं असा अनुभव येतो कीं, जर आपलें मन शुद्ध आहे आणि आपण दुसऱ्या कोणाचें वाईट चिंतीत नाहीं, तर आपलें आपल्या शत्रूकडूनही अनहित होणार नाहीं. ते आपलें वाईट चिंतणार नाहींत. अथवा चिंतीत असले, तरी ती चिंतना सोडून देतील असें नव्हे. शत्रु मित्र होतात असें सांगण्यांत साधुजनांचा मुख्य उद्देश हा आहे कीं, जें कार्य मित्रांपासून व्हावें अशी आपण आशा करितों तें शत्रूंकडून होत असतें. मित्रांची अपेक्षा आपण कां करितों, तर आपणांस साहाय्य व्हावें, आपणांवर कांहीं अरिष्ट आलें असतां त्यांच्या मदतीनें त्यापासून आपली मुक्तता व्हावी. हें काम मित्रांचें आहे. तरीपण तें शत्रूंपासून होऊन आपणांस मित्रांप्रमाणें त्याचा लाभ होतो. या अर्थानें शत्रु मित्र होतात, असेंच म्हणण्याचा भाग नाहीं. अथवा आपलें मन दुसऱ्याविषयीं शुद्ध असलें तर दुसऱ्याचें मन आपणाविषयीं शुद्ध होतें, असा जो भाग पुष्कळांच्या अनुभवामध्यें येतो, तोही सांगण्याचा तुकारामबावांचा हेतु नाहीं. आपलें चित्त शुद्ध असलें, तर ज्यांना शत्रु म्हणून आपण समजतों, त्यांच्यापासून मित्रपणाचें तर काय, पण याहीपेक्षां जास्त कार्य करून घेतां येतें; मित्राच्या साहाय्यापासून जी आपल्या आचारविचारांची सुधारणा व्हावी, आपणांस उन्नति प्राप्त व्हावी ती आपलें मन शुद्ध असलें, तर आपणांस शत्रूपासूनही होत असते, हाच तुकारामबावांच्या उक्तीचा मतलब आहे. 'निंदकाचें घर असावें शेजारीं' असें म्हणून तुकारामबावांसारखे साधु निंदकास चहातात. तें कां ? तर जे दोष मित्रांकडून दाखविले जाणें शक्य नाहीं, ते निंदक दाखवितात व याप्रकारें ते आपल्या उन्नतीस कारणीभूत होतात. आपल्या शत्रूनें आपली अवहेलना व विटंबना केली, तर आपले डोळे उघडून आपली सुधारणा होण्याच्या बाबतींत मित्रापेक्षां शत्रूकडून अधिक हितकर कार्य होतें. मात्र सर्व बाजूंनीं शांतपणें विचार करण्याची संवय लावून घेतलेली असली पाहिजे. या अर्थानें 'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती' या उक्तीचें प्रमेय आपणांस चांगलें समजेल व ह्या स्थितीचा आपणांस अनुभवही येईल. तसेंच आपणांस शत्रु कां असावेत ह्याचा आपआपल्या ठिकाणीं विचार करण्याकडे प्रत्येकाची प्रवृत्ति होईल.

आपणास शत्रु कां असावे, याचा ज्याचा त्यानें

विचार केला असतां, मी यःकश्चित् प्राणी, माझ्यासारखे असंख्य प्राणी या लोकीं येतात-जातात; जशी शत्रूंची तशी माझीही शाश्वति नाहीं; साधु, संत आपला खरा लाभ जो सांगतात तो आपणास साध्य करून घ्यावयाचा आहे; या गोष्टी प्रत्येकाच्या लक्षांत याव्या, असें असून शेजारीपाजारी, भाऊबंद यांच्याशीं तर काय, पण सख्या बंधुबंधूंमध्येंदेखील तंटे होतात; आणि त्यांच्यामध्यें एकदा बेबनाव झाला, कीं परिणामीं त्यांचें पटत नाहींसें होऊन एकाचें तोंड पूर्वेस, तर दुसऱ्याचें पश्चिमेकडेस, असा प्रकार होतो. प्रत्येकाला असें वाटत असतें कीं, माझ्या ठिकाणीं कांहीं दोष नाहीं; मीं काय करावयाचें तें केलें; माझ्या हातून प्रमाद झालेला नाहीं. दोष दुसऱ्या मनुष्यांचा आहे; ते दुष्ट आहेत; ते सर्प आहेत. सर्पाला दूध पाजिलें तरी तें विष होतें; तद्वत् त्यांच्याशीं कितीही चांगल्या रीतीनें मी वागलों, तरी ते विषबुद्धि सोडावयाचे नाहींत. तसाच तो वाघ आहे; आपला हिंस्रपणा सोडणार नाहीं, असें आपण नेहमीं म्हणतों. याच्या उलट आपले दोष लोकांत तोंडानें बोलून दाखविणारेही कित्येक असतात; आणि कित्येक तोंडानें ते बोलून दाखवीत नाहींत. अशीं अनेक तऱ्हेचीं माणसें आहेत; पण, आपल्या अंगीं दोष आहेत असें मानावयास आपलें मन घेत नाहीं. एकाद्या स्नेह्यानेंही आपला दोष दाखवून दिला असतां बाहेरून आनंद वाटल्यासारखें आपण दाखवितों; तरी मनांतली बुद्धि अशी असते कीं; मी शुद्ध आहें; सज्जन आहें; दुसरे दुर्जन आहेत; सर्व जग अशुद्ध आहे. याच समजुतीनें आपण मित्रवर्ग कमी करीत असतों व शत्रुवर्ग वाढवीत असतों. वास्तविक पाहतां आपणांस वाटतें तितकें आपलें अनिष्ट करणारे आपले शत्रु नसतात. आपणांस येथें पांच पन्नास वर्षें फार तर राहावयाचें आहे; कधीं कोणास देवाचें बोलावणें येईल याचा नेम नाहीं; तिकीट संपलें म्हणजे गाडींतून उतरून कधीं चालतें व्हावें लागेल याचा भरवंसा नाहीं. असें असून परस्परांमध्यें वैमनस्य असतें, याचें कारण हेंच आहे कीं, जो तो स्वतःस निर्दोषी, पापभीरू मानीत असतो, व बाकीचे दुष्ट, व्यर्थ आपला मत्सर आणि हेवा करणारे आहेत, अशी आपल्या मनाची समजूत करून घेत असतो; पण, ही समजूत खरी नाहीं. वस्तुस्थिती अन्यथा असते. आपण चांगले असलों, तर जगही आपणांशीं कांहीं वाईट नसतें, हा पहिला प्रकार झाला. दुसरें, जगांत विनाकारण कोणाचा कोणी दावा करीतच नसतो. असा परमावधीचा सिद्धान्त करणें यथार्थ होणार नाहीं; तथापि मी दुसऱ्यांचा दावा करीत नाहीं; मी त्यांच्याशीं सरळ भावानें वागतों; तथापि दुसरे लोक माझ्याशीं सरळ रीतीनें वागत नाहींत; ते मनामध्यें कांहीं तरी दावा धरून चालतात; अर्थात् इतरांकडे दोष आहेत, असा आपण आरोप करितों, हीच मोठी चुकी होत असते. मी शुद्ध आहें; माझ्या ठिकाणीं पापवासना, दंभ, दुसऱ्याचा मत्सर, हेवा इत्यादि किल्मिषें आहेत असें समजून, जर आपण शत्रूंकडे शुद्ध चित्तानें पाहूं लागलों, तर आपणांस असा अनुभव येईल कीं, ज्यास आपण शत्रु समजतों ते शत्रु नसून मित्र आहेत. या दृष्टीनें पाहिलें असतां आपणांस शत्रु फारकरून राहणार नाहींत, अथवा दुष्टपणामुळें किंवा पूर्वचरितांतील कारणांमुळें यदाकदाचित् थोडे राहिले, तरी ते मित्रकार्य करणारे होतील. म्हणजे त्यांपासून आपलें कल्याण, आपली उन्नति व आपला लाभ होईल. स्वतःस चांगला व निर्दोष मानण्याची चुकी न करितां जर आपण दुसऱ्याकडेस शुद्ध मनानें पाहिलें, तर 'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती' या वचनाची सत्यता किती आहे याचा पूर्णपणें आपणांस अवश्यमेव अनुभव येईल, असें जरी नाहीं, तरी प्रत्येकानें जगाकडेस त्या दृष्टीनें पाहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सर्व जग आपणाशीं वितुष्ट करितें असें मानणें, हा कोत्या दृष्टीचा भाग आहे; शत्रु वाटतो तो मित्र करणें, म्हणजे त्याकडून मित्राचा कार्यभाग करून घेणें, हें आपलें मुख्य काम आहे.

आतां हे शत्रु सर्पवत् वा व्याघ्रवत् असतात; म्हणजे पाठीमागून जंबियानें मारणारे, अथवा तोंडावर मारणारे असतात. शत्रूला सर्पाची उपमा दिली आहे; कारण, तो पाठीमागून निंदारूप दंश करितो. जो तोंडावर आपले दोष बोलून दाखवितो तो व्याघ्रवत् समजावा. 'व्याघ्रही न खाती सर्प तया' असें म्हटलें आहे. तें वाघाच्या व सर्पाच्या स्वभावाच्या अशा मनुष्यांस उद्देशूनच आहे. चित्त शुद्ध असलें, तर वाघ खात नाहीं आणि सर्प चावत नाहीं, याचा अर्थ अक्षरशः चित्त शुद्ध आहे अशा मनुष्यास वाघापुढें उभा केला असतां, तो त्याला खात नाहीं, अथवा अशा मनुष्यास सर्प दंश करीत नाहीं, असा समजूं नये. आपली चुकी अथवा आगळीक नाहीं; आपण कोणाची चुगली, निंदा,

किंवा दावा करीत नाहीं; असें असून जर कोणी आपला द्वेष, आपली निंदा करील, तर त्यापासून आपलें अनहित न होतां अत्यंत हितच होईल. आपण कितीही कडक आत्मपरीक्षण केलें; आपल्या स्वतःस छेडलें; तरी आपल्या अंगांतील व्यंगें आपणास पूर्णपणें दिसून येणें अशक्यच म्हटलें असतां चालेल. परिटापासून इस्त्री जशी छान होते, तशी आपली आपण करूं म्हटलें असतां होत नाहीं; त्याप्रमाणें शत्रूच्या आगीनें व आघातानें आपल्या अंगांतील दोषांची छान होणें शक्य आहे. हें लक्षांत ठेवून शत्रु मित्र कसे होतात याचा अनुभव प्रत्येकानें आपल्या ठिकाणीं पाहून घ्यावा. आपलें चित्त शुद्ध करण्याविषयीं आपणांतून प्रत्येकानें आपली पराकाष्ठा करून पाहावी, म्हणजे शत्रुच नाहींसे होतात. अथवा राहिले, तरी त्यांच्या हातून मित्रकार्य कसें होतें आणि व्याघ्रासारख्या हिंस्र अथवा घातक स्वभावाच्या व सर्पासारख्या मागून दंश करणाऱ्या शत्रूपासूनही अनहित किंवा नुकसान कसें होणार नाहीं, याचा त्याला अनुभव येईल, व आपण जें कार्य हातीं घेतलें आहे त्याला बळकटी येईल.

आपण चित्त शुद्ध केलें, तर जें कार्य मित्रापासून होणारें आहे तें शत्रूकडूनही करून घेतां येईल आणि व्याघ्रवत् अथवा सर्पवत् असणाऱ्या शत्रूंपासून आपलें अनहित न होतां कल्याणच होईल या गोष्टी संभवनीय आहेत. पण, 'विष तें अमृत' म्हटलें आहे तें कसें होईल? होय; विषही अमृत होऊं शकेल. परंतु या गोष्टीची कल्पनाही करणें कठीण आहे; कारण, देहाला अत्यंत दाह करणें आणि त्यापासून परिणामीं शरीराचा नाश, हें विषाचें कार्य आहे. सृष्टीमध्यें सर्पाचें विष, सांथीच्या रोगांचें विष वगैरे अनेक प्रकारचीं जलाल विषें आहेत; आणि सामान्य अनुभवावरून आपणांस असें वाटतें कीं, सापाच्या विषापेक्षां अधिक जाहालिम विष दुसरें कोणतें नाहीं. परंतु त्याच्यापेक्षांही जलाल विष आहे तें मनुष्याच्या ठिकाणीं आहे, आणि कोठें म्हणाल, तर तुमच्याआमच्या जिभेच्या टोंकाशीं तें असतें. विंचवाच्या नांगींत दुःसह वेग उत्पन्न करणारें विष असतें, त्यापेक्षांही जाहालिम विष आपल्या जिव्हेच्या अग्रांत आहे. हें विष इतकें जलाल आहे कीं, तें पृथ्वीचा प्रलय करून टाकूं शकेल, आणि त्याच्यापुढें दुसरीं सर्व विषें पत्करतील. पुराणांतरीं असें म्हटलें आहे कीं, समुद्राच्या पोटांत अत्यंत जलाल असें हलाहल विष होतें; आणि समुद्रमंथन करून तें बाहेर काढल्यावर त्याच्या भडक्यानें विश्व दग्ध होईल या भीतीनें शंकरानें तें प्राशन केलें. हा कथाभाग कांहींही असो; पण, प्रत्येकाला आपल्या ठिकाणीं विष आहे याचें भान नसतें. शंकर अत्यंत शांत व भोळा अवतार मानिला आहे. आणि विश्वाला जाळून टाकणारें विष प्राशन केल्यामुळें त्याची महती वाढली आहे; या गोष्टी लक्षांत आणल्या असतां, जें हलाहल विष सांबानें प्राशन केलें असें म्हटलें आहे, तें मनुष्याच्या जिव्हेंतलेंच असावें असें वाटतें. पण, या पौराणिक गोष्टीच्या संबंधानें कांहीं विशेष सांगावयाचें आहे असें नाहीं. आपल्या ठिकाणीं जें प्रत्यक्ष विष दिसतें त्याविषयीं बोलावयाचें आहे, आणि तें अमृत होऊं शकेल कीं काय, हें पाहावयाचें आहे. आपली जिव्हा मृदुवचनी केली, आणि तिजमधून निघणारा शब्दरूप रस आल्हाद देणारा व्हावा अशी आपली वाणी झाली, तर विषाचें अमृत करण्याचें सामर्थ्य तुकारामबावांनीं म्हटल्याप्रमाणें तुम्हांआम्हांपैकीं प्रत्येकामध्यें आहे असें वाटेल. आपणांस असें ठाऊक आहे कीं, प्रसंग आला असतां एका कटु शब्दानें घोर युद्धें माजतात; एका गोष्टीनें सर्व घडी बिघडते, आणि मनुष्यवाणीच्या विषामुळें मोठमोठ्या राज्यांमध्यें नानाप्रकारचे अनर्थ ओढवतात. विषतुल्य कटु शब्दानें दुसऱ्याचें काळीज करपून जातें व आपला-त्याचा संबंध तुटतो; तोच शब्द आपण गोड बोललों, तीच गोष्ट एखाद्याला आपण कठोर व दुष्ट वाणीनें न सांगतां अमृतासारख्या गोड व मृदु वाणीनें सांगितली, तर द्वेषभाव दूर होऊन आपण संबंध जोडतों. सापाच्या विषाचें प्रमाण करतां येतें, परंतु मनुष्याच्या जिव्हेंत जें विष आहे त्याचें मोजमाप करितां येत नाहीं. म्हणून 'विषाचें अमृत आघात तें हित', या वरील अभंगांतील चरणांत तुकारामबावांनीं सांगितलेल्या गुरुमंत्राला मोल नाहीं. आपलें चित्त शुद्ध नसतें, म्हणून आपल्या मनांत जें वेड कायम होऊन बसलेलें असतें व कुत्सित कल्पना भरलेल्या असतात त्या सर्व त्रयस्थ मित्राच्या मध्यस्थीनेंच दूर होतात; त्याविना होत नसतें. उपदेशाप्रमाणें आपण वागलों आणि आपल्या जिभेंतील विष कमी करून अमृत वाढविलें, तर हा मृत्युलोक अमरलोक होण्यास विलंब लागेल असें नाहीं. या एका अभंगाचा उपदेश करून आपणांस त्याप्रमाणें वागण्यास कोणी उदाहरण घालून देईल, तर यांतील सार अमूल्य आहे. आपलें

चित्त शुद्ध करावें तें एकीकडेस सोडून दुसऱ्यांची चित्त-शुद्धि करण्याच्या पंचाइतींत आपण पडत असतों. हीच चुकी होत असते; तुमचें चित्त शुद्ध असल्यानें अशुद्ध विचारांच्या लोकांकडून तुमचें अकल्याण व्हावयाचें नाहीं, कल्याणच होईल; आपणांस प्रतिकूल वाटणाऱ्या कृतीचा परिणाम हितावह व श्रेयस्कर होईल. कोणीं शरीरास दुःख केलें असतां त्यापासून पीडा होते, हें तर खरेंच आहे. तसेंच कोणीं आपणास पाठीवर काठीनें मारलें असतां काठीचे वळ उठावयाचे नाहींत, किंवा कोणीं डवंचल्यापासून आपणास लागावयाचें नाहीं असें नाहीं. आपल्या देहास कोणीं इजा केली, तर सुखप्राप्ति होते, आनंद वाटतो, असें व्हावयाचेंच नाहीं, व तसा तुकारामबावांच्या म्हणण्याचा भावार्थही नाहीं. त्यांचें सांगणें हेंच आहे कीं, आपलें चित्त शुद्ध असलें, तर इतरांनीं केलेलें दुःख हलकें होईल, सुखफल होईल, म्हणजे दुःख देणारे लोक परिणामीं सुखकर होतील; हिंस्र पशुवत शत्रु आपलें अनहित करूं शकणार नाहींत; त्यांनीं कितीही अंगाचा दाह होण्यासारखें वर्तन केलें तरी आपण शांत व थंड राहूं. कथेकऱ्यांनीं प्रल्हादाचें चरित्र सांगितलें म्हणजे आपल्या सर्वांच्या डोळ्यांस अश्रु येतात; परंतु त्यांतील प्रमेय काय आहे, त्यापासून काय बोध घ्यावयाचा आहे, तें आपण विसरतों. प्रल्हादाच्या गोष्टीचेंच प्रमेय वरील अभंगांत तुकारामबावांनीं सांगितलें आहे. मनुष्याचें मन कितीही शुद्ध असलें तरी त्याला हत्तीच्या पायांखालीं दिलें असतां हत्ती त्याला चिरडणार नाहीं, या प्रल्हादाच्या आख्यायिकेंत जो कवित्वाचा भाग आहे तो सोडून देऊन तिजमधील प्रमेयाकडे, तिजपासून होणाऱ्या बोधाकडे आपण पाहिलें, तर अशी बोधपर गोष्ट दुसऱ्या कोणत्याही लोकांच्या धर्मपुस्तकांत सांपडणार नाहीं; आणि ज्या पुस्तकांत ही आहे त्याविषयीं आपला अना र कधीं व्हावयाचा नाहीं. परंतु आपली चुकी अशी होते कीं, ही कविता आहे हें आपण विसरतों, आणि ही गोष्ट जशीच्या-तशीच अनुभवाच्या दृष्टीनें पाहतों. अर्थात् ती अनुभवास पटत नाहीं व खरी वाटत नाहीं. तेंच प्रल्हाद-चरित्राकडे वर सांगितलेल्या दृष्टीनें पाहिलें, तर त्यांत किती गौरव आहे ? त्यांत मुख्य सार हेंच आहे कीं, प्रल्हाद निःस्सीम ईश्वरभक्त असल्यामुळें त्याचें चित्त इतकें शुद्ध होतें कीं, त्याला शत्रु होणें शक्य नव्हतें, आणि कोणीं कितीही ताप दिला, तरी शीतलच वाटे. 'होतील शीतळ अग्निज्वाळा', हें प्रल्हादाविषयींही सांगितलें आहे. त्याला अग्नीनें तप्त झालेल्या तेलांत टाकलें, तरी त्याचें अंग पोळलें नाहीं, अथवा तुकारामबावांच्या उक्तीचा चित्त शुद्ध असलेला मनुष्य आगीत टाकला तरी जळत नाहीं, असा शब्दशः अर्थ करावयाचा नाहीं. अग्नीमध्यें टाकल्यानें अंगाचा दाह तर होणारच; परंतु ह्या बाहेरील दाहाचें कांहीं उपचारांनीं उपशमन होण्यासारखें असतें आणि तो अंतर्दाहापुढें कांहींच नाहीं, असाच अनुभव येईल कारण, कितीही पाणी ओता, मलयानिल अंगावर घाला, अंतर्दाहाचें शमन होऊं शकत नाहीं. प्रल्हादाचें चित्त शुद्ध होतें व त्याची वाणी गोड व मृदु होती, म्हणूनच तो स्वतः शांत होता. त्याचा अनेक प्रकारें छळ झाला, तरी त्याला संताप झाला नाहीं, आणि आपल्या शांत वृत्तीनें त्यानें अंतरीं सज्जनांला निवविलें. प्रत्येकानें अशा तऱ्हेनें आपलें चित्त शुद्ध केलें व आपल्या वाणींतून शांततेचा रस पाझरेल अशी खबरदारी ठेविली, तर द्वंद्वें माजून कोणाची अवहेलना, कोणाचा उपमर्द न होतां, शत्रु मित्र होतील आणि मित्रांस शत्रु होण्याची धास्ती राहणार नाहीं. यदाकदाचित् तुकारामबावांसारख्यांची निंदा करणारे लोक राहिले, तरी त्यांची मधुर वाणी ऐकिली, त्यांची प्रसन्नता पाहिली, आणि त्यांच्या शांतिरंगाचा अनुभव घेतला, म्हणजे अशुद्ध मनाच्या लोकांची चित्तवृत्ति शांत होते. सारांश, सर्व धर्मांचें सार हें आहे कीं, प्रत्येकानें आपलें चित्त इतकें शुद्ध करावें कीं, आपल्या मित्रांची संख्या वाढेल आणि शत्रु कमी होतील, निदान कमी होत आहेत, असें आपणास वाटेल. आपणास एकही अनिष्टचिंतक अथवा शत्रु या जगांत राहणार नाहीं. सर्व विश्व मित्र होईल; अशी आमच्यातुमच्यासारख्या सामान्य मनुष्यांनीं आशा बाळगणें, म्हणजे आकाशास गवसणी घालण्यासारखें, अथवा लहान तोंडानें मोठा घास घेण्यासारखें होईल. इतरांची चित्तवृत्ति अशुद्ध व क्षुब्ध असली, तरी आपल्या शुद्ध भावानें व मधुर वाणीनें अमृतवल्लीसारखी शांतता करितां येते, असा अधिकार ज्या पुरुषांस आहे, तेच खरे साधुसंत म्हणावे. याप्रकारें शत्रु मित्र होतात; पण, आपली दिशा याच्या उलट असते. आणि धर्माची दिशा आपलें वर्तन सुलट करण्याकडे असते. आपण धर्माचीं तत्त्वें जाणून घेऊन साधुसंतांचा कित्ता वळविण्यास प्रयत्न केला पाहिजे; म्हणजे दुसऱ्या लोकांकडून दाह वाढला, तर





अनुक्रमणिका

साधुसंतांकडची शीतलता व शांतता जास्त वाढते. प्रत्येकाच्या ठिकाणीं जिभेंत विष आहे व अमृतही आहे, आणि आपण शत्रु होऊं, मित्र होऊं, वाघ होऊं व सर्प होऊं; परंतु आपलें मन अशुद्ध म्हणून होऊं देणार नाहीं; तरी आपणास कोणीं मारावयाचें मनांत आणिलें, तरी आपण कोणास त्रास देणार नाहीं, अथवा ताडन करणार नाहीं; आपणास कोणीं भाजिलें, तरी त्यांस आपण पोळविणार नाहीं, असा आपण निश्चय ठेविला आणि तदनुरूप वर्तन केलें, तर आपल्या अंगीं मनुष्य-पणाचा भाग अधिक वाढेल व पशुवृत्तीचें बळ कमी होईल. अर्थात्, शत्रु मित्र होतील. म्हणून या अभंगांतील उपदेशाचा विशेष आदरबुद्धीनें सर्वांनीं अवश्य विचार करावा.

* *

# विवेकासहित वैराग्य पाहिजे

**ऐसें भाग्य कइं लाहाता होईन ।**
**अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥ १ ॥**
**मग तया सुखा अंत नाहीं पार ।**
**आनंदें सागर हेलावती ॥ २ ॥**
**शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं ।**
**परावृत्त संगीं कामादिकां ॥ ३ ॥**
**विवेकासहित वैराग्याचें बळ ।**
**धगधगीतोज्वळ अग्नि जैसा ॥ ४ ॥**
**भक्ति नवविधा भावशुद्ध बरी ।**
**अळंकारावरी मुकुटमणि ॥ ५ ॥**
**तुका म्हणे माझी पुरवी वासना ।**
**कोण नारायणा तुजविण ॥ ६ ॥**

ह्या अभंगाच्या पहिल्या तीन चरणांविषयीं अन्य प्रसंगीं ह्याच स्थलीं दोन शब्द सांगण्यांत आले आहेत.[१] आज " विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगीतोज्वळ अग्नि जैसा " ह्या एका चरणासंबंधानें दोन शब्द सांगावयाचे आहेत.

ज्या गुणांविषयीं तुकारामबावांनीं वरील अभंगांत वर्णन केलें आहे त्या शांति, क्षमा, दया इत्यादि गुणांत विवेकासहित वैराग्य हवें आहे असें म्हटलें आहे. अशा विवेकासहित वैराग्याला धगधगीत उज्वळ अग्नीची उपमा दिलेली आहे.

ही वरील साधूची वाणी अगदीं सोपी दिसते; तथापि परमेश्वराच्या एखाद्या करणीच्या संबंधानें जसजसा जास्त तपास करावा, शोध करावा, तसतसें तिजमध्यें अधिकाधिक गांभीर्य दृष्टोत्पत्तीस येतें, तसाच ह्या साधुवाक्याचा प्रकार आहे. अग्नि पुष्कळ तऱ्हेचे आहेत. त्यांपैकीं एकाचा उल्लेख येथें तुकारामबावांनीं केला आहे. हा अग्नि धगधगीत असून उज्वळही असला पाहिजे (उज्वळ असा जो अग्नि तो विवेक व तें वैराग्याचें द्योतक). तुकारामबावांनीं आपल्या दृष्टान्तांत धगधगीत असून उज्वळ असणारा अग्नि मुद्दाम निवडला आहे. कारण, कांहीं अग्नि धगधगीत असतात, पण उज्वळ नसतात. कांहीं उज्वळ असतात, पण धगधगीत नसतात. जुन्या गंधकाच्या पेटींतील एक काडी लांकडा-वर, किंवा दुसऱ्या कशावर ओढली असतां जी रेघ उठते ती अग्नीची होय. तो अग्नि उज्वळ असतो; पण, त्यांत धगधगीतपणा मुळींच नसतो. समुद्रामध्यें रात्रीच्या प्रहरीं तेज दिसतें, उज्वळपणा दिसतो; पण, तेथेंही धगधगीतपणा नसतो. तसेंच होळीच्या अग्नींत तेज असतें, तो धगधगीत असतो; पण, त्यांत उज्वळपणा इतका नसतो. सूर्यांत उज्वळपणाही आहे आणि धग-धगीतपणाही आहे; परंतु चंद्रांत दोन्ही नाहींत. अशा ह्या अग्नींच्या निरनिराळ्या तऱ्हा आहेत. आपल्या ह्या दृष्टान्तांतील अग्नींतही जेथें एक तेज आहे तेथें दुसऱ्याचा अभाव, असा प्रकार आढळतो. विवेकासहित वैराग्याची गोष्टही तशीच आहे. आज आपल्या देशीं वैराग्याचा बराच प्रसार आहे. वैराग्य आपण रस्त्यांत जातांनाही पाहतों ! बाहेरचा गलिच्छपणा आणि अंतःकरण गर्वाचें ठाणें व वैराग्याच्या पुण्याईवर निर्वाह अशा तऱ्हेचा प्रकार आज आपल्याला जिकडेतिकडे दिसत आहे. असल्या वैराग्यावर आज हजारो लोकांचा निर्वाह

१. **अवघें देखें जन ब्रह्मरूप व विज्ञान** हीं दोन व्याख्यानें पहा. सं०

चालत आहे. म्हणूनच तुकारामबावांनीं विवेकाची व वैराग्याची सांगड घालून दिली आहे. नुसतें वैराग्य, किंवा नुसता विवेक हें वरचें कवच आहे– टरफल आहे. त्याची सांगड असेल तर पुरुषार्थ.

पूर्वीं म्हटलेंच आहे कीं, जो अग्नि फक्त धगधगीत मात्र आहे, पण त्यांत उज्वळपणा नाहीं, तर असल्या अग्नींत कांहीं अर्थ नाहीं. दिवा पेटलेला दिसत आहे; पण, तो वाट दाखवूं शकत नाहीं, तर असल्या दिव्या-पासून कांहीं फायदा नाहीं. त्याचप्रमाणें गोवरी धुमसत पडली आहे, तिच्यांत अग्नि आहे, पण त्याच्यांत तेजही नाहीं व धगधगीतपणाही नाहीं, तर असला अग्नि-देखील नको आहे. आपल्याला जो अग्नि पाहिजे तो ह्या दोन्ही गोष्टींनीं युक्त असा पाहिजे. तर आपला कार्यभाग होणार. पण, असें तुकारामबावांनीं कां सांगितलें ? चित्तीं दया, क्षमा, शांति पाहिजे असें सांगून पुरें न करितां विवेकासहित वैराग्य असलें पाहिजे, असें त्यांनीं कां सांगितलें ?

ह्यासंबंधानें विचार करितानां आपल्याला पुराणांत नामदेव व गोरा कुंभार ह्यांची जी कथा आहे तिच्यापासून बराच बोध होण्यासारखा आहे. कथा अशी आहे कीं, नामदेवांना एके काळीं असा अभिमान झाला कीं, आपण परमेश्वराला प्रिय आहोंत. देवापाशीं बसण्याचा हक्क काय तो आपला आहे. असा विचार त्यांच्या मनांत उत्पन्न होऊन ह्यांची वृत्ति गर्विष्ठ झाली आहे, असें गोऱ्या कुंभारानें ताडलें. गोरा हा जातीनें कुंभार खरा, पण तो परमेश्वरभक्त. नामदेवांच्या आचरणावरून त्यानें, ते देवापासून आपल्या वृथा अभिमानामुळें कसे दूर जात आहेत तें पाहिलें. तेव्हां जमलेल्या सर्व मंडळींची तपासणी करावयास तो निघाला. कुंभाराचें एक आयुध असतें. तें भाजत घातलेल्या खापरावर आपटलें म्हणजे तें खापर तयार झालें कीं नाहीं तें त्यास कळत असतें. तें आयुध घेऊन गोरा कुंभार प्रत्येकाचें डोकें त्यानें थापटून तपासूं लागला. इकडे नामदेवांला काय विलक्षण प्रकार चालला आहे म्हणून आश्चर्य वाटत होतें, तों गोऱ्या कुंभाराची स्वारी त्यांच्यापाशीं आली व आपले आयुध नामदेवांच्या डोक्याला लावून तो म्हणाला कीं, हें भांडे बदबद वाजत आहे ! नामदेवांना ह्याचें फार आश्चर्य वाटलें; पण, विचार करितां त्यांस दिसून आलें कीं, देवाजवळ बसण्याचा अधिकार काय तो आपला, हा गर्व आपणास झाला व तो दाखवून देण्यासाठीं व घालविण्यासाठीं गोऱ्या कुंभारानें हा उपाय योजिला.

गोऱ्या कुंभारानें नामदेवाच्या डोक्याला जें आयुध लावून पाहिलें तें आपण लावून पहावें कीं, आपल्या ठिकाणीं विवेकासहित वैराग्य आहे, किंवा नुसत्या विवेकाचा, अगर वैराग्याचा जोर आहे. हें कांहीं एकाचें दुसऱ्यानें सांगावयास नको. ज्याचें त्यास कळण्या-सारखें आहे. आपल्या ह्या प्रांतीं कांहीं मंडळीची विवेकाकडे अतिशय प्रवृत्ति. आमच्या इकडे पांडित्य, कोरडें ज्ञान फार माजलें आहे. त्याचा हा परिणाम असा झाला आहे कीं, परमेश्वर कसा ओळखावा ही साधी गोष्टही कळत नाहींशी झाली आहे ! परमेश्वराचें रूप कसें ओळखावयाचें त्याचा निर्णय विवेक फार माजल्या-मुळेंच होत नाहीं. परमेश्वराच्या अस्तित्वाविषयीं व त्याच्या स्वरूपाविषयीं प्रथम जरी कांहीं ओलावा असला, तरी ह्या शुष्क विवेकाच्या योगें तो नाहींसा होतो. तेव्हां विवेक नको आहे असें नाहीं. विवेक तर अवश्य असावा. त्याला प्रथमस्थान दिलें आहे. पण, तो नुसता विवेक नसावा. आपण सर्व जास्त विवेकी झालों, म्हणजे फार तर आपली चित्प्रभा, चिच्छक्ति वाढेल; पण, तेवढ्यानें कार्य होत नाहीं. विवेकांत दुसरा कांहीं भाव नाहीं, असें कधीं होऊं नये. विवेकाबरोबर वैराग्य, वैराग्याचें बळ पाहिजे. आपल्यापैकीं कित्येकांस विरक्ति साधते. पण, नुसती विरक्ति नको. ह्या चातुर्मास्यांत आपल्या इकडे विरक्ति फार माजून राहते. त्याच्या योगानें बळ कसें उत्पन्न व्हावें ? विवेकाबरोबर वैराग्य पाहिजे, आणि तें धगधगीत पाहिजे, कीं त्याच्या योगानें कार्यभाग व्हावा.

धगधगीत निखारा हा कार्यकारी असतो; पण, दुसरे कोळसे असे असतात कीं, त्यांतून ठिणग्या उडतात व ते फुटतात. हे दोषी निखारे. तसेंच वरील वैराग्य दोषी. ह्या संबंधानें विचार करितांना आपण दोन गोष्टींचा विचार केला पाहिजे. पहिली गोष्ट अशी कीं, वैराग्य विवेकासहित आहे काय ? तसें जर नसलें, तर मग सर्व लंगडें. दुसरी गोष्ट अशी कीं, त्या वैराग्याच्या योगानें बळ उत्पन्न झालें आहे काय ? कांहीं लोकांत सारखे पंचेचाळीस दिवस उपवास करण्याची वहिवाट आहे. ह्यांतून जो कोणी वांचतो त्याचा मग बहुमान व गौरव होत असतो. हें वैराग्य जर कसोटीला लाविलें, तर त्यांत विवेकही नाहीं व

बळही नाहीं, असें आपल्याला दिसून येईल.

आमच्या लोकांत आज जर कांहीं असलें, तर तो कोरड्या विवेकाचा भाग फार जास्त व खरें वैराग्य कमी. कांहीं लोकांत विवेकही जास्त आणि वैराग्यही जास्त असा प्रकार आहे. अशी स्थिति असणें देखील समाधानकारक नव्हे. कोणीं कोणाच्याविषयीं अनादर मानण्याचा हा भाग नव्हे. पण, नुसता विवेक, किंवा नुसतें वैराग्य, हें कांहीं कामाचें नाहीं. त्यांची सांगड नेहमीं असली पाहिजे. वैराग्याचा भाग प्रबल होण्यासाठीं विवेकाची हेळसांड करणें, हें ज्याप्रमाणें विचारास अनुसरून नाहीं, त्याचप्रमाणें विवेकावरच सर्व मदार घालून राहणें गैर आहे.

मॅथ्यू आर्नोल्ड ह्यांनीं आपल्या एका ग्रंथांत असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, अलीकडे इंग्लंडांत विवेकाचा भाग कमी असून, वैराग्याचा, निग्रहाचा भाग अधिक आहे. वैराग्याचें बळ तेथें अधिक आहे. अशा स्थितीचा परिणाम वाईटही होतो, असें ह्या ग्रंथकारानें प्रतिपादण्याचा प्रयत्न केला आहे. हा ग्रंथकार स्वतः विवेकवादी आहे. म्हणजे विवेकाचें प्राबल्य जास्त वाढलें पाहिजे असें म्हणणारा आहे. म्हणून त्यानें तेथील लोकांस जागृत करण्यासाठीं एक पुस्तक लिहिलें आहे.

आपल्या येथें वास्तविक पाहतां खरा विवेकही नाहीं व वैराग्य व त्याचें बळही नाहीं. आपल्याला आज उज्वलितपणा व धगधगीतपणा ठेवणारा अग्नि पाहिजे. आपल्यांत जे जे दोष दिसतील ते वरील दोन गोष्टींच्या- (१) विवेक वैराग्याची सांगड आपल्यांत आहे काय ? आणि (२) त्या वैराग्यापासून बळ उत्पन्न होत आहे काय ?– कसास लावून ते घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

* *

# ईश्वराचें व धर्माचें सौम्य व उग्र स्वरूप[1]

अर्जुनाने गीतेचे पहिले दहा अध्याय ऐकल्यानंतर त्यास परमेश्वराचें दर्शन घेण्याची इच्छा झाली, असें गीताकारांनीं जुळवून आणिलें आहे. दहा अध्यायांत श्रीकृष्णानें अर्जुनास जो उपदेश केला तो त्याच्या मनावर इतका ठसला कीं, त्याला परमेश्वराचें रूप प्रत्यक्ष पाहण्याची उत्कट इच्छा झाली. आणि एखादी गोष्ट मनांत ठसल्यावर ती प्रत्यक्ष पाहण्याविषयीं जर इच्छा झाली, तर ती गोष्ट खरोखरच मनावर ठसली असें म्हणावयाचें. पांडित्य झालें म्हणजे त्या मनुष्याच्या अंतःकरणांत ज्याविषयीं पांडित्य झालें असेल तें पाहण्याविषयीं इच्छा उत्पन्न झाली, तर तें पांडित्य त्याच्या मनावर ठसलें असें म्हणावयाचें. असो. अर्जुनाची ईश्वराचें स्वरूप पाहण्याविषयींची उत्कटेच्छा पाहून ती परीपूर्ण करणें श्रीकृष्णास योग्य वाटल्यावरून हा अकराव्या अध्ययाचा प्रसंग गीतेंत आला आहे. श्रीकृष्णानें प्रथम आपल्या उग्र स्वरूपाचें दर्शन दिलें आहे. हें उग्र स्वरूप म्हणजे आपल्या पुराणांत ज्या तऱ्हेचीं वर्णनें पाहतों त्यापैकींच एक आहे. श्रीकृष्णाच्या दाढेखालीं कांहीं माणसें, कांहीं तोंडांत, कांहीं इकडे, कांहीं तिकडे, असें ह्या स्वरूपाचें वर्णन आहे. पण, तिकडे आपणांस पाहावयाचें नाहीं; आंतील तात्पर्याकडे–प्रमेयाकडे आपणांस लक्ष द्यावयाचें आहे. श्रीकृष्णाचें तें उग्र स्वरूप पाहिल्याबरोबर अर्जुन अगदीं भयभीत झाला. त्याच्या असें स्वप्नींसुद्धां नव्हतें कीं, श्रीकृष्णाचें उग्र स्वरूप असें असेल. तें स्वरूप पाहतांच अर्जुनानें श्रीकृष्णास विचारिलें, 'तूं आहेस तरी कोण ?' त्यावर श्रीकृष्णानें 'मी काळ आहें; सर्वांचा नाश करावयास ह्या ठिकाणीं प्रवृत्त झालों आहें' असें सांगितलें. 'हें माझें उग्र स्वरूप आहे. तूं आजपर्यंत माझें सौम्य स्वरूप पाहात आला आहेस, त्यामुळें तुला माझ्या उग्र स्वरूपाची कल्पनाही नाहीं.' त्यावर अर्जुन म्हणाला, 'कृष्णा, आजपर्यंत मी तुला सखा, मित्र, यादव ह्या नांवानें कधीं विनोदानें, कधीं प्रेमानें हाक मारीत आलों. हें एका अर्थीं माझें धाष्टर्यच होय. तरीपण, कृष्णा, तूं आपलें उग्र स्वरूप हें काढून घे. आणि आपले नेहमींचें सौम्य स्वरूप

१. मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या ३१ व्या वार्षिकोत्सवसमयीं दिलेलें व्याख्यान. सं०



अनुक्रमणिका

धारण कर.'

परमेश्वराचीं हीं जीं सौम्य व उग्र स्वरूपें सांगितलीं हीं काय आहेत ? व संसारांत ह्या दोन्ही स्वरूपांचें साम्य आपणांस कितपत दृष्टीस पडतें, तें आज पाहणें आहे. संसारांत आपणांस परमेश्वराचें सौम्य स्वरूपच पाहण्याची संवय झालेली असते. त्यामुळें उग्र स्वरूपाकडे आपलें लक्ष जात नाहीं, इतकेंच नाहीं, तर परमेश्वरास उग्र स्वरूप असेल असें आपल्या ध्यानींमनींही नसतें. आणि दोन वर्षे आपणांवर जे प्रसंग आले आहेत तसे प्रसंग आले, म्हणजे ईश्वरावरील आपली श्रद्धा मात्र कमी होते. हल्लींदेखील ईश्वरावरची कांहीं लोकांची श्रद्धा कमी झाल्याचें आढळून येतें. कोणी म्हणतात, जगांत पाप फार झालें आहे म्हणून ईश्वरानें उग्र स्वरूप धारण केलें आहे; कोणी अशा वेळीं त्यास संतुष्ट करण्याकरितां बळी देतात; कोणी अनुष्ठानें करितात, कोणी संततधार धरून त्यास शांत करण्याचा प्रयत्न करितात, आणि कोणी तर त्याला पाण्यांत सबंध बुडवून ठेवतात ! मूर्तीला मानणारे जे लोक आहेत ते वरील सर्व प्रकार करीत असतात. सारांश, हें प्रसंगविशेषीं दिसणारें उग्र स्वरूप नाहींसें व्हावें म्हणून लोक कांहींनाकांहीं तरी करीत असतात. पण, वास्तविक पाहूं गेलें, तर परमेश्वराचीं उग्र व सौम्य अशीं भिन्न वेळीं दिसणारीं दोन निराळीं स्वरूपें नाहींतच. आपण ज्याप्रकारचें स्वरूप मनांत आणितों त्याप्रमाणें तें दिसतें. अमुक काळीं परमेश्वराचें ध्यान उग्र व अमुक काळीं तें सौम्य असा वास्तविक प्रकारच नाहीं. पापाविषयीं तें उग्र असतें व सत्कृत्याविषयीं तें सौम्य असतें. सूर्याच्या प्रखर तेजामुळें झालेल्या तापाचें पर्यवसान शांतता करणाऱ्या पर्जन्यवृष्टीच्या रूपानें होतें. ज्याप्रमाणें त्याचें उग्र स्वरूप आहे असें आपणांस वाटतें, त्याप्रमाणें त्याचें सौम्य स्वरूपही आहे असें वाटलें पाहिजे. ज्या वेळीं तें उग्र असतें त्याच वेळीं तें सौम्य नसतें असें नाहीं. ज्या वेळीं तें उग्र दिसतें त्या वेळीं तें सौम्य आहे असें मानून आपण चाललों असतां, या आयुष्यांत आपला बराच फायदा होईल. आपण बाजवीपेक्षां फाजील झोंप घेतली असतां आपणांस आळस येतो; जुगार खेळलों असतां आपला पैसा गमावितों; हीं परमेश्वराच्या उग्र स्वरूपाचीं खरीं लक्षणें नव्हत; हीं तर सौम्यच स्वरूपें होत. कारण, त्या उपायांनीं तरी परमेश्वर आपणांस आपल्याकडे ओढून घेतो. सारांश, आपण ज्या दृष्टीनें परमेश्वराचें स्वरूप पाहूं त्याप्रमाणें तें दिसणार आहे. उग्र दृष्टीनें पाहिलें, तर उग्र दिसेल. सौम्य दृष्टीनें पाहिलें तर सौम्य दिसेल.

परमेश्वराप्रमाणें धर्माचीही उग्र व सौम्य अशीं स्वरूपें आहेत. समाजस्थापना होऊन तीस वर्षे होऊन गेलीं, आज एकतिसावा वार्षिकोत्सव सुरू आहे. पण, एवढ्या काळांत समाजापासून जितका फायदा व्हावयास पाहिजे तितका झाला नाहीं, असें पाहून आपण जे निराश होतों, त्याचें तरी कारण हेंच कीं, आपण ईश्वराचें सौम्य स्वरूप मात्र मनांत आणितों. उग्र स्वरूपाकडे आपण लक्षच देत नाहीं. समाजमतांचा प्रसार होत नाहीं व समाजाचे सभासद फारसे वाढत नाहींत ह्यांबद्दल निराश न होतां, समाजांत जाऊं लागल्यापासून आपल्या आत्म्याची थोडीबहुत उन्नति झाली आहे किंवा नाहीं, जर झाली असेल, तर समाजमतांचा प्रसार होत नाहीं. याबद्दल निराश न होतां, प्राप्त स्थितींतच आपण परमेश्वराचें सौम्य स्वरूप पाहिलें पाहिजे. आपण नेहमीं दोन्हीं स्वरूपें पाहण्याकडे लक्ष पुरविलें पाहिजे. समाजांत नवीन नवीन लोक फारसे येत नाहींत म्हणून मला एवढा खेद होत नाहीं. पण, जे येतात त्यांचें लक्ष सौम्य स्वरूपाकडेच असतें म्हणून मला खेद होतो. येथें उपासना झाल्यानंतर मजकडे कांहीं तरुण विद्यार्थी आपल्या संशयाचें निरसन करावयास येतात. त्यांना माझा नेहमीं प्रश्न हाच असतो कीं, तुम्हांला ह्या मार्गांत कांहीं कमीपणा वाटतो कीं काय ? ह्या प्रश्नास त्यांचें उत्तर असें असतें कीं, समाजांत तुम्ही जें करितां, तें आम्ही घरीं करितों. या मंडळीचें सर्व लक्ष सौम्य स्वरूपाकडे असतें, म्हणून आपणांस जें साध्य होत नाहीं, तें ह्यांना सहज साध्य झालेंसें वाटतें. पुष्कळ लोक असें म्हणतात कीं, समाजाचे लोक जास्त तें काय करितात ? कोणी म्हणेल आम्ही समाजांत नेहमीं येतों; पण, आम्हांस लाभ कां होत नाहीं ? तर ह्या सर्वांचें कारण एकच कीं, आम्ही समाजाचें सौम्य स्वरूप मात्र तेवढें लक्षांत घेतों. त्याचें जें अतिशय उग्र असें स्वरूप तिकडे आपण मुळींच लक्ष देत नाहीं. ब्राह्मधर्माचें स्वरूप जितकें सौम्य आहे तितकेंच तें उग्रही आहे. एकादशी, उपवास वगैरे उपाय परमेश्वरास संतुष्ट करण्याचे मार्ग आहेत, असें कांहीं लोकांना वाटतें; म्हणून त्याप्रमाणें ते करितात. आपला

अनुक्रमणिका

ह्यांच्यावर विश्वास नाहीं; पण, आपण एकादशी, उपवास ह्यांत कांहीं नाहीं, असें जरी मानीत असलों, तरी आपण आपणांस नियमबद्ध करून घेतलें पाहिजे. नुसतें समाजांत आल्यानें, किंवा बाहेरील सौम्य स्वरूप पाहण्यांतच कांहीं विशेष नाहीं. तर ब्राह्म-धर्माच्या अति उग्र स्वरूपाकडे आपण लक्ष दिलें पाहिजे. आपल्या अंतःकरणांत परमेश्वराचें ध्यान करणें, हा मार्ग आपणांस जितका सोपा दिसतो, तितकाच तो कठीण आहे. ईश्वराचें ध्यान अंतःकरणांत करणें हा मार्ग सोपा आहे, असें ज्यांस वाटतें त्यांच्या मनावर सौम्य स्वरूपाचाच परिणाम झालेला असें म्हणावयाचें. ह्या समाजाचा प्रसार दिवसेंदिवस होवो किंवा न होवो, समाजाचे लोक दिवसेंदिवस वाढोत किंवा कांहींही होवो; त्याकडे ह्या समाजाचें लक्ष नाहीं; पण, परमेश्वराचीं व धर्माचीं जीं दोन सौम्य व उग्र अशीं स्वरूपें आपणांस दिसत असतात त्यांची सांगड घालणें, हा ह्या समाजाचा मुख्य उद्देश आहे.

या ठिकाणीं येणाऱ्या मंडळीनें विशेषतः तरुण मंडळीनें, ह्या समाजाचें जें सौम्य स्वरूप तेंच केवळ न पाहातां त्याच्या उग्र स्वरूपाकडेही लक्ष दिलें पाहिजे. समाजस्थापनेच्या वेळचे बरेच लोक आपणांस सोडून गेले. गेल्या एक-दोन वर्षांत तर तरुण असेही लोक गत झाले, म्हणून त्याबद्दल निराश न होतां, परमेश्वरानें जें हें उग्र स्वरूप प्रगट केलें आहे, असें आपणांस वाटत आहे, त्यांतच सौम्य स्वरूप आहे असें लक्षांत आणून चालावें; म्हणजे आपलें आयुष्य बरेंच सुखकारक होईल यांत कांहीं शंका नाहीं.

* *

# परकृति कशी पहावी ?

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषौनि मज द्यावें । पसायदान हें ।। १ ।।
जे खळाची वंकटै सांडो । तया सत्कर्मीं रति वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ।। २ ।।
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें इच्छिल तो तें लाहो । प्राणिजात ।। ३ ।।
वर्षत सकळ मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटतु भूतां ।। ४ ।।
चळां कल्पतरूचे आरव । चेतना चिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ।। ५ ।।
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।। ६ ।।
किंबहुना सर्व सुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ।। ७ ।।

— ज्ञानेश्वरी

कोणत्याही कार्यास प्रारंभ करण्यापूर्वीं व त्याच्या अखेरीस परमेश्वराची आराधना करण्याचा प्रघात आहे. आतां आपण जी प्रार्थना केली, तशी पूर्वीं झाली असेल अगर नसेल, येथें लोक करीत असतील अगर नसतील, आपणां[1] सर्वांस हा मार्ग संमत असेल अगर नसेल, असल्या प्रार्थनेचा, आराधनेचा नेहमीं उद्देश हा असतो कीं, परमेश्वराच्या कृपेखालीं आपण सदा असावें. असाच हेतु मनांत धरून ज्ञानदेवांनीं आपली परिस्थिती, विचार, लोकाचार ह्यांस अनुसरून ह्या ओव्यांत व तुकारामांसारख्या साधूंनीं

ऐसें भाग्य कईं लाहाता होईन ।
अवघें देखें जन ब्रह्मरूप ।। १ ।।
मग तया सुखा अंत नाहीं पार ।
आनंदें सागर हेलावती ।। २ ।।
शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं ।
परावृत्त संगीं कामादिकां ।। ३ ।।
विवेकासहित वैराग्याचें बळ ।
धगधगीतोज्वळ अग्नी जैसा ।। ४ ।।
भवित नवविधा भावशुद्ध बरी ।
अळंकारावरी मुकुटमणी ।। ५ ।।
तुका म्हणे माझी पुरवी वासना ।
कोण नारायणा तुजविण ।। ६ ।।

ह्या अभंगांत देवापाशीं आशीर्वाद मागितला आहे.

१. १९०० सालीं साताऱ्यास दिलेलें व्याख्यान. सं०

अनुक्रमणिका

सर्व जन मला ब्रह्मरूप दिसूं लागावें; सर्वांच्या ठायीं शांति, क्षमा, दया, इत्यादि वृत्ति वास कराव्यात; वैराग्य असावें, पण तें विवेकासहित असावें; भक्ति असावी, पण ती पायाशुद्ध असावी; ही तुकारामांची प्रार्थना. ज्ञानदेवांनीं आपला ग्रंथ संपवितांना परमेश्वरापाशीं पसायदान म्हणजे प्रसाद मागितला आहे कीं, वाईट लोक जे आहेत त्यांची वक्रदृष्टि म्हणजे पापबुद्धि, पापी विचार नाहींसे व्हावे; सत्कृत्यांत त्यांचें मन लागावें, सर्व मनुष्यांत प्रेम वाढावें; जगांतील अज्ञान नाहींसें व्हावें व सदासर्वकाळ ईश्वरभक्तांचे समुदाय, भगवज्जनांच्या मंडळ्या, भूतलावर नांदाव्या. पुढील ओव्यांत ह्या ईश्वरनिष्ठांच्या मांदियाळीचें वर्णन आहे. कल्पतरूविषयीं वास्तविक अशी कल्पना आहे कीं, तो अचल असून एकच आहे. म्हणजे तो जेथें असेल तेथें व तेथील लोकांना त्यापासून फायदा. पण ईश्वरनिष्ठांस "चळां कल्पतरूच्या आरवां" ची उपमा दिली आहे. ईश्वरनिष्ठ अचल व एकच कल्पतरू नसून ते चल व अनेक आहेत. त्याचप्रमाणें चिंतामणीविषयीं आपली अशी कल्पना आहे कीं, तो ज्याच्याजवळ असेल त्यालाच फायदा व्हावयाचा; आणि तो अचेतन असतो. त्याच्यापासून वांछित वस्तु प्राप्त होतात, असा समज आहे; तरी स्वतः चिंतामणि सचेतन नाहीं. परंतु भगवज्जन जीवंत चिंतामणीचे गांव आहेत. त्याचप्रमाणें अमृत ही दुर्मिळ वस्तु मानलेली आहे. तरी अमृताचे समुद्राचेसमुद्र कांहीं साध्य नसतात. परंतु भगवद्भक्त हे अमृताचे चालतेबोलते अर्णव, म्हणजे सागरच होत. चंद्राचा प्रकाश फार शीतळ खरा. पण, त्याला काळोखी लागलेली आहे. त्याला डाग लागला आहे. भगवद्भक्तांचा प्रकार तसा नाहीं; ते लांछनरहित आहेत. त्यांचें तेज सूर्याप्रमाणें आहे खरें; पण, सूर्याच्या तेजापासून लोकांस जो त्रास होतो तो त्यांच्यापासून होत नाहीं. ते नेहमीं सज्जन असून सर्वांशीं ममतेनें व प्रेमानें वागतात, व सर्वांचे सोयरे असतात. शेवटल्या ओवींत सर्वांचें सार आणिलें आहे कीं, सर्वांनीं सदासर्वकाळ आदिपुरुषास म्हणजे परमेश्वरास भजावें, त्याचें भजन, पूजन, ध्यान करावें. असो.

ज्ञानदेव, अगर तुकाराम ह्यांच्यासारख्यांच्या कृतीपासून आपण जो एक महत्त्वाचा बोध घ्यावयाचा तो हा कीं, उद्योग फलाची सिद्धि नव्हे. म्हणजे आपण कोणताही इष्ट उद्योग आरंभिला असतां, तत्क्षणींच फळप्राप्ति होणें अगर न होणें, हें लांबचें असून, आपल्या हातचें नाहीं. सदुद्योगाविषयीं होणारी प्रवृत्ति हितकारक आहे. परमेश्वरानें ज्या ज्या विषयीं स्फूर्ति दिली तें तें करावयाचें. हाच विचार आपणांस समाधानवृत्ति प्राप्त करून देऊन परमेश्वराच्या आराधनेस उद्युक्त करीत असतो. ज्ञानेश्वर, तुकाराम यांनीं सर्व जन ब्रह्मरूप दिसावें असें म्हटलें आहे. तुम्हांआम्हांला असें वाटणार आहे कीं, सर्व जन ब्रह्मरूप दिसणें हें आपणांला शक्य नाहीं.[1] असें आपल्याला वाटतें ह्याला कारण वास्तविक पाहतां आपणच आहों. आपल्या ठिकाणीं परमेश्वराची स्थिति आहे, ती न पाहतां दंभ, अभिमान, गर्व, असत्य इकडे आपलें सर्व लक्ष जातें. आपण आपल्या स्वतःकडे मात्र चांगल्या दृष्टीनें पाहतों. म्हणजे दुसऱ्याचे दुर्गुण, व्यंगें पाहण्याकडे आपलें सर्व लक्ष लागलेलें असतें. त्याची न्यूनता शोधण्यांत आपणांस मोठेपणा वाटतो; म्हणजे इतरांत जो ब्रह्माचा भाग असतो त्याकडे आपण बिलकूल लक्ष देत नाहीं. आणि त्यामुळेंच आपणांस अवघे जन ब्रह्मरूप दिसत नाहीं. प्रत्येकांत असणाऱ्या ब्रह्माच्या अंशाकडे जर आपण पाहूं, तर आपल्यालाही अवघे जन ब्रह्मरूप दिसेल. प्रत्येक व्यक्तीची योग्यता कांहींनाकांहीं तरी असतेच. म्हणून पाहणारानें ब्रह्मरूप पाहण्याचा नेहमीं निश्चय ठेवावा. आपण सत्ताधीश नाहीं, न्यायाधीश नाहीं, दोषान्वेषण करण्याचें काम आपलें नव्हे, तो आपला अधिकार नव्हे, तसें केल्यानें आपण आपलें ब्रह्म हरवून बसूं. आपल्या ठायीं असलेल्या ब्रह्माचा हा गुण, अगर ही प्रभा नव्हे. आपले स्वतःचे सदासर्वदा दोष पाहणें, त्यांकडे सदासर्वदा लक्ष देणें व इतरांच्या कृतींतील देवाचा अंश नेहमीं पाहणें, अशी उदार वृत्ति सदासर्वदा संसारांत असली पाहिजे. तरच अवघे जन ब्रह्मरूप दिसावयाचें. मनुष्य जात्या कितीही नीच, अगर स्वार्थपरायण असला, तरी प्रमाणतः त्याच्यांत ब्रह्माचा अंश असतो. हा जो अंश प्रत्येकाच्या ठायीं आहे त्याच्या वाढीनेंच आनंदाचे सागर हेलावणार आहेत.

आतां, येथें असें वाटण्याचा संभव आहे कीं, हें सर्व

१. ह्या विषयासंबंधानें **अवघें देखें जन ब्रह्मरूप** ह्या व्याख्यानांत सविस्तर विवेचन झालें आहे. सं०

ह्या ठिकाणीं सांगण्याचें प्रयोजन काय ? तर आपणां सर्वांमध्यें ही दोष पाहण्याची वृत्ति फार आहे. कोणी मनुष्य परहिताच्या बुद्धीनें स्वत: त्रास सोसून एखाद्या कार्यास प्रवृत्त होतो. वास्तविक पाहतां परहितासारखें दुसरें स्वहित नाहीं. परहित तेंच खरें स्वहित. परमेश्वराचें ज्ञान लोकांस करून द्यावयाचें, देवाच्या सेवेस इतरांस लावावयाचें, असा ज्यांचा निर्धार त्यांच्यांतील दोषांकडेच पाहणें सरळ नव्हे. हें भजनालय आहे. ईश्वराच्या आराधनेचें गृह आहे. येथें जें सर्व कांहीं होतें तें आपणांस मान्य नसेल, इतर ठिकाणीं प्रार्थना-समाज जसे आहेत तसा येथें नसेल, तेथें लोकबल जसें आहे तसें येथें नसेल, तरी ज्या दोन-चार व्यक्ति परमेश्वराच्या चरणांपाशीं आपापल्या समजुतीप्रमाणें इतरांस नेण्याचा प्रयत्न करीत असतात त्यांच्यांतील दैवी अंश नेहमीं पाहावा, अशी आपणांस माझी विनंति आहे.

* *

## पंढरीची यात्रा[1]

थोड्या दिवसांपूर्वी पंढरपूर येथें मोठी यात्रा जमली होती. त्या यात्रेच्या संबंधानें या शहरांत आळंदी व देहू येथील पालख्या येण्याचा मोठा समारंभ होतो तो सर्वांच्या पाहण्यांत आहेच. तो समारंभ ज्यांनीं लक्षपूर्वक पाहिला आहे त्यांस साधू व महात्मे पुरुष यांविषयीं लोकांत किती पूज्यबुद्धि आहे, हें विशेष रीतीनें कळल्याशिवाय राहणार नाहीं. येथून ज्याप्रमाणें पालख्या जातात त्याप्रमाणें अन्य ठिकाणांहूनही पालख्या व दिंड्या मार्गामध्यें एकत्र मिळून, नंतर पंढरपुराच्या जवळजवळ गेल्यावर बहुत मोठा समाज म्हणजे सुमारें एक लक्ष मनुष्यांवर लोक हरिनामाचें संकीर्तन करीत शहरांत प्रवेश करितात; व तेथें चार दिवसपर्यंत मोठ्या उत्साहानें भजन करून नंतर आपापल्या घरीं जातात. असा प्रकार शेंकडो वर्षें प्रतिवर्षी चालू आहे. सर्व जातींचे व महाराष्ट्रांतील सर्व ठिकाणचे लोक अशा दिवसांत हा एवढा लांबचा प्रवास हालअपेष्टा भोगीत केवळ भक्तिभावानें करितात. ही सर्व गोष्ट आपण सर्वत्र ऐकतों व पाहतों, असें असूनही आपणांपैकीं किती थोडे लोक ह्या बाबतींत विचार करतात, यांचें अनुमान मनांत काढिलें म्हणजे विस्मय वाटतो. वारकरीपंथाचे जरी आपण अनुयायी नाहीं, तथापि इतके लाखो लोक दरवर्षी हा उत्सव नेमानें करितात त्याबद्दल सविस्तर कच्ची माहिती करून घेऊन, त्यांच्या वर्तनापासून आपणांस कांहीं बोध होण्यासारखा आहे किंवा नाहीं, ह्या दोन गोष्टींचा विचार माझ्या मतें आपण अवश्य केला पाहिजे. याकरितां या यात्रेच्या व्यवस्थेची थोडीशी माहिती देऊन त्यापासून आपणांस कोणत्या गोष्टींचा बोध करून घेतां येईल त्याचा विचार पाहूं.

आपल्या शहरांतून दोनच पालख्या जातात. एक ज्ञानेश्वरांची आळंदीहून येते व दुसरी तुकारामबावांची देहूहून येते. ह्या दोन्ही पालख्या गांवांत येण्यापूर्वी रस्त्यांत मिळून नंतर समारंभानें गांवांत प्रवेश करितात. पुढें येथून सासवड, जेजुरी, वाल्हें वगैरे गांवांवरून नातेंपोतें माळशिरसच्या रस्त्यानें पंढरपुरास सुमारें पंधरा दिवसांनीं पोंचतात.

ह्या शहरांत व ज्या ज्या इतर ठिकाणीं यांचे कांहीं लोक थांबतात, तेथें तेथें धर्मखात्याच्या पैशांतून सदावर्तासारखें सर्वांस शिजलेलें अन्न अगर शिधा देण्याची तजवीज लोक आपआपसांत करतात.

पुण्यांतून जाणाऱ्या पालख्यांत वाटेनें पैठण येथून एकनाथ साधू यांची पालखी येते ती मिळते. अमळनेर येथील गोविंदबावा, देठण येथील रावजीबावा, चोपडें येथील सखारामबावा, अरणभेंडी येथील सांवत्या माळी, तिरेगांवचा गोरा कुंभार, काशीकर कबीर, धामणगांवचे बोधलेबावा, विठ्ठल पुरंदरे कर्नाटकचे व बोरवणकर-बावा वगैरेंच्या सुमारें पंधरा पालख्या परस्पर पंढर-पुरास जातात. प्रत्येक पालखीबरोबर कांहीं स्वतंत्र रीतीनें अशा दिंड्या असतात. दिंड्या म्हणजे भजन करणारांचे जे लहानलहान मेळे एकत्र होऊन दरवर्षी

१. १८८२ सालीं पुण्याच्या प्रार्थनासमाजांत दिलेलें व्याख्यान. सं०






पंढरपुरास उत्सवाकरितां जातात ते. अशा दिंड्या सुमारें शंभरांवर पंढरपुरीं जातात. त्यांतील मुख्य मुख्य दिंडीवाले लोकांचीं नांवें, कूळ व जात यांची माहिती करून घेणें अवश्य आहे. त्याशिवाय या यात्रेचें खरें स्वरूप ध्यानांत येणार नाहीं. मुख्य मुख्य दिंडीवाले लोकांचीं नांवें व जाती पुढील तपशिलावरून कळतील. ज्ञानेश्वरांचे पालखीबरोबर तीन दिंड्या मुख्य असतात. तुकारामबावांचे पालखीबरोबर दोन दिंड्या असतात; पैकीं एक एकनाथाचे वंशजांची व दुसरी अमृतराय कवि व साधू यांचे वंशजांची असते. आपल्या पुणें शहरांतून ज्या दिंड्या जातात त्यांत मुख्य दिंडीवाले सिद्धेश्वरप्रमुख राममंडळी यांची दिंडी, पुंडलिक व सुऱ्या महार यांची दिंडी, भवानी पेठेंतील खडकतकर व रामा निकम यांच्या दिंड्या, रामा बुरूड व रामा भोंपळे माळी यांच्या दिंड्या; तसेच तुकाराम न्हावी, खंडुजीबावा वाडीकर, लखोबा सोनार, बापू तांबट, श्रीपतीबोवा भिंगारकर, पांडोबा भडभडे, डांगे वगैरे सुमारें वीस दिंडीवाले समाज आहेत. यांशिवाय खानदेशांतील मालेगांव, चोपडें, अमळनेर; सातारा प्रांतांतील कोरेगांव, कऱ्हाड, तासगांव, वाई; कोल्हापूर, मिरज; आजरें येथील गोविंदबावा शेणवई; बेळगांवचे शहापूरकर महादजी पाटील; शिंदे व शितोळेकर; लष्करवाले; नागपूरकर; बेलापूरकर; शिरोळकर; तसेच हैदराबादकर नारायणबावा, सांवत्या माळी, गोरा कुंभार, चोखा महार, कर्नाटकांतील विठ्ठल पुरंदरे, काशींतील कबीर, सोलापूर येथील वारकऱ्यांच्या फडांतील चार दिंड्या, पुण्याजवळील पाबळ, वाल्हें, तळेगांव, सुपें, केंदूर, नारायणगांव, लोहगांव, चऱ्होली, आळेंबेलें; नासिककर, नगरकर वगैरे ठिकाणच्या दिंड्या मिळून प्रतिवर्षीं जातात.

सदरील तपशिलावरून महाराष्ट्र देशांतील सर्व ठिकाणचे, सर्व जातींचे, सर्व धंद्यांतील व स्थितींतील लोक आपापला व्यवसाय सोडून व भिन्नपणा विसरून केवळ भक्तिभावानें या कामास प्रवृत्त होतात, असें दिसून येईल. यात्रेचा सांप्रदाय असा आहे कीं, नातेंपोतें, माळशिरस व शेगांव हे तीन शेवटच्या मजलीचे गांव आहेत तेथें पालख्या व दिंड्या एकत्र मिळून रंगण करतात. म्हणजे पालख्या मध्यें ठेवून प्रत्येक पालखीच्या संबंधानें आलेले दिंडीवाले लोक पाळीपाळीनें भजन करीत प्रदक्षिणा करतात. नंतर सर्व मिळून पंढरपुरास दशमीचे दिवशीं मोठ्या समारंभानें प्रवेश करतात. पुढें नगरप्रदक्षिणा घालून रथ निघतो व अहोरात्र भजन व निरूपण (अर्थ सांगणें) करून जागरण करितात. नंतर ग्रामस्थांकडून पालख्यांस मेजवानीचे बेत होऊन सर्व पालख्या काल्याचे दिवशीं गोपाळपुऱ्यांत जाऊन प्रसाद घेऊन नंतर आपापल्या मार्गास लागतात. याप्रमाणें या यात्रेच्या समारंभाची माहिती आहे.

यासंबंधानें आपल्यास विचार करण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, इतके लाखो लोक या पालख्यांविषयीं एवढी पूज्य बुद्धि कां बाळगतात ? कोणास असें वाटेल कीं, धर्मभोळेपणाचा हा एक प्रकार आहे. परंतु वास्तविक विचार पाहतां पालख्यांबद्दलची खरी समजूत वेगळीच आहे. पूर्वकाळीं जे साधुपुरुष होऊन गेले, ते जिवंत असतांना यात्रा करण्यास जात असत, तो प्रकार ते मेल्यानंतरही चालू ठेवून, ते जसे कांहीं जिवंतच आहेत व यात्रेस जात आहेत अशा समजुतीनें यात्रेकरू लोक त्यांच्या समागमानें यात्रा घडावी म्हणून इतके सर्व हाल सोसतात. साधुपुरुषांनीं देहाचा त्याग केल्यानंतर त्यांचें चरित्र संपतें, त्यांचीं पुस्तकें आपण वाचून उपदेश करून घ्यावा एवढाच त्यांचा व आपला संबंध राहतो, अशी पुष्कळांची समजूत असते. परंतु ही समजूत सर्वांशीं खरी नाहीं. जे जे साधुपुरुष ह्या अगर अन्य देशांत होऊन गेले त्यांच्यापासून परमेश्वरसाधनाच्या मार्गांत आपल्यास पुष्कळ साह्य होण्यासारखें आहे. तें करून घेण्याच्या रीतीनें प्राप्त करून घेतलें पाहिजे. ते ज्या ठिकाणीं राहात होते, परमेश्वराचें भजन करीत होते, ज्या ठिकाणीं त्यांच्या साधुत्वाची विलक्षण कसोटी लोकांच्या नजरेस आली, त्या ठिकाणीं आपण जाऊन त्या सर्व गोष्टी मनांत आणल्या असतां आपलें मन विशेष गंभीर व भक्तिपर होतें. आपल्यास उपरति होऊन त्या महात्म्याचें अनुकरण करण्याची दृढ बुद्धि होते. हा लाभ कांहीं लहान नव्हे. ज्ञानदेव, तुकाराम, एकनाथप्रभृति साधु पुरुष आज आपणांमध्यें देह-विशिष्टरूपानें वागत असते, तर आपण त्यांचा सन्मान करून त्यांस आपल्या गांवांत आणून त्यांच्या भजनाचा व भक्तीचा लाभ आपल्यास व्हावा म्हणून आपण त्यांचा सहवास केला असता, त्याचप्रमाणें, हल्लीं तितक्या अंशानें न झाला तरी, वर दर्शविलेल्या मार्गानें आपण त्यांचा लाभ आपल्यास करून घेतला पाहिजे.

तद्वतच हल्लीं जे लोक पालख्यांबरोबर जातात त्यांची समजूत असावी. साधु लोकांच्या परस्पर गांठी पडल्या म्हणजे प्रेम व भक्तिभाव अधिक वाढतो, हा सर्वत्र अनुभव आहे. हा विचार मनांत आणिला म्हणजे हें धर्मवृद्धीचें साधन आपल्या फारच उपयोगाचें आहे, असें दिसून येईल. आपणांवर नानाविध संकटें येतात, किंवा आपण रांशयांत सांपडतों, किंवा आपण मोह पावतों अशा प्रसंगीं परमेश्वराचें साह्य मागणें हें जितकें अगत्याचें आहे, तितकेंच जे पुरुष सर्व उपाधींतून मुक्त झाले त्यांच्या चरित्राच्या व अनुभवाच्या आश्रयानें, पुस्तकांतून त्यांचे लेख वाचून, तसेंच त्यांचीं राहण्याचीं ठिकाणें पाहून, आपण आपली धर्मबुद्धि वाढवावी, हें आपणां सर्वांस इष्ट आहे. क्षेत्रांत अगर साधुपुरुषांच्या चरित्रांनीं प्रसिद्धीस आलेल्या स्थळीं आपण केवळ क्षणिक वस्ति केली असतां, मनावर जे संस्कार होतात ते अधिक सहवास केल्यानें दृढ होतील, हा सतत बोध यात्रेकरू लोकांच्या पालख्यांपासून आपण करून घेण्यासारखा आहे. आतां दिंड्यांविषयीं विचार करितांना दिंड्या म्हणजे वैष्णव साधूंचे थवे अगर संघ आहेत. त्यांत जाती, विद्या, अधिकारपरत्वें भेद यात्रेकरू लोक मानीत नाहींत. सर्व एकाच परमेश्वराचे भक्त, भक्तिमार्गानें आपली उन्नति होण्याविषयीं झटतात. पण, हा विचार ब्राह्मणधर्मांत नाहीं. त्यांत भेदाभेद व आग्रहाचा प्रकार विशेष आहे. ज्या वैष्णव साधु लोकांनीं आपल्या उपदेशांत व आचरणांत हा आग्रहाचा भाग सोडून सर्वत्र समबुद्धि ठेविली त्या वैष्णवमताचा हल्लींच्या कालमानाप्रमाणें आपण अंगीकार करतों. आराध्य दैवत एक आहे, दुसरें नाहीं व आपण सर्व त्याचे सारखेच भक्त आहोंत. हीं मतें आपणांस ग्राह्य आहेत. पूर्व संस्काराचे अभिमानामुळें दिंडीवाल्या लोकांकडून ह्या मताचा पूर्णपणें स्वीकार होत नाहीं; तथापि त्यांच्यापासून आपल्यास एका गोष्टीचा बोध करून घेण्यासारिखा आहे. ती ही कीं, परमेश्वरप्राप्तीच्या मार्गास लागल्यानंतर ते लौकिक लज्जा, आढ्यता व संकोच या गोष्टी एकीकडे करून गांवोगांवीं, देशोदेशीं, घरांत, देवळांत, एकान्तीं, लोकान्तीं, जेथें सवड सांपडेल तेथें, सर्वत्रांस हा उपदेश करितात. त्या योगानें ह्या देशांतील आग्रहाचा प्रकार पुष्कळ कमी झाला आहे व असा आपणांस अनुभवही आहे. त्यांजजवळ जी पताका असते ती ध्वजरूपी चित्र आहे. तो ध्वज ईश्वरप्राप्तीच्या मार्गास अनुसरणाऱ्या लोकांच्या हातीं दिल्यानें सदैव परमेश्वरास आपण वाहिलों, त्याचे आपण पाईक आहोंत, जेथें जाऊं तेथें त्या ध्वजाचें आरोपण करूं, त्याचें कार्य फत्ते होईल व त्याचा जयजयकार होईल अशी करणी आपल्या हातून व्हावी, याबद्दलची प्रतिज्ञा आपण केली आहे, ही बुद्धी नेहमीं जागृत राहते. आपल्यासंबंधानें विचार पाहतां हे दोन्ही प्रकार आपणांमध्यें वसावे तसे वसत नाहींत. आपला संकोच, आपली आढ्यता व लोकलज्जेची भीति हीं सर्वांशीं नष्ट होत नाहींत. रस्त्यांतून भजन करीत जाण्याचा आपणांपैकीं पुष्कळांस संकोच वाटतो, त्याचप्रमाणें ईश्वराचे पाईक आपण आहोंत, त्यास आपला देह अर्पण केलेला आहे, ही बुद्धीही आपणांत कमी आहे. ह्या दोन्ही संबंधानें आपण दिंड्यांचें अनुकरण करण्यासारखे त्यांत पुष्कळ गुण आहेत. त्यांचें दिग्दर्शन मात्र येथें केलें आहे. प्रत्येकानें आपापल्या ठिकाणीं विचार करून या बाबतीत आपणास काय कर्तव्य आहे याचा निर्णय ठरवावा. ह्या उणिवेमुळें आपल्या मतांचा प्रसार होत नाहीं व ह्या साधनामुळें ज्या महाराष्ट्र साधूंचे अनुयायी लोक तापीपासून तुंगभद्रेपर्यंत लाखो गणतीनें सर्व ठिकाणीं नांदत आहेत त्याच साधुलोकांच्या मतांचा अंगीकार कालस्थितिमानानें आपण करून त्यांतील देवभोळेपणाचा, आळसाचा व कांहीं अंशानें मूर्तिपूजेचा दोष दूर करून त्यांचें उदाहरण वर लिहिल्याप्रमाणें आपण घेतलें असतां, आपल्या मनांतील हेतु ईश्वरकृपेनें लौकर सिद्धीस जातील अशी खात्री आहे.

* *

अनुक्रमणिका

# आपल्या लोकांचा धर्मसंशोधनाकडील कल

पाळिलों पोषिलों सर्वस्वी अजिवरी ।
वागविलों करीं धरोनियां ।। १ ।।
आतां काय माझा घडेल अव्हेर ।
मागें बहु दूर वागविलें ।। २ ।।
नेदी वारा अंगीं लागों आघाताचा ।
घेतला ठायींचा भार माथां ।। ३ ।।
तुका म्हणे बोल करितों आवडी ।
अवीट तेचि गोडी अंतरींची ।। ४ ।।

आतां तुकारामबावा देवाला आळवून काय म्हणतात तें पाहूं या. ते म्हणतात कीं, ज्या मला त्वां आजपर्यंत सर्वस्वीं पाळिलें, पोषिलें व हातांत धरून वागविलेंस, तसेंच मागें लांबपासून बहुत दूरवर तू मला वागवून आणिलेंस, त्या माझा तूं आतां अव्हेर करिशील काय ? मुळापासून तूं माझा सर्व भार आपल्या शिरावर घेऊन संकटाचा, किंवा आघाताचा वाराही लागूं दिला नाहींस, असा जो तो तूं आतां माझा अव्हेर करिशील काय ? असें कधींही होणार नाहीं.

याच धोरणावर, पण दुसऱ्या समजुतीनें, आज वरील अभंगाचें विवेचन करावयाचें आहे. सामान्यतः मार्गदर्शक जो असतो तो हातीं धरून वाट दाखविणारा असतो. आणि वाटसरूचा बोजा आपल्या डोईवर घेऊन चालणारा मार्गदर्शक त्याहूनही विरळा. ज्याचा बोजा त्याच्या माथ्यावर असाच प्रकार बहुधा आढळतो. आपल्या व अन्य धर्मांच्या लोकांत मुख्य फरक हाच आहे कीं, आम्ही पूर्वीपासून देवावर सर्वपरी भाव ठेवीत आलों आहों; तशा प्रकारें, निदान तितक्या मानानें, इतर लोकांनीं केलेलें आढळत नाहीं. याच कारणानें आपल्या हिंदू लोकांविषयीं चांगल्या बुद्धीनें विचार करणारे, केवळ टवाळकीनें बोलणारे नव्हत, असे लोक एक आक्षेप घेतात तो हा कीं तुम्हां हिंदू लोकांमध्यें धर्मसंबंधानें उठाठेव व वाटाघाट करण्याची संवय दिसण्यांत येते ती कां ? एक थोर पार्शी गृहस्थ, पुण्याचे खानबहादुर दोराबजी पदमजी, कांहीं दिवसांमागें मला भेटले होते. त्यांनीं आपला प्रार्थनासमाज पाहून मला हाच सवाल केला कीं, इतर लोकांचे धर्मसंबंधी आचार, मतें व संप्रदाय, तसेंच सामाजिक अथवा कुटुंबव्यवस्थेच्या संबंधाचे आचारविचार सर्वच अतिशुद्ध असतात, आणि त्यांमध्यें दोषाचा भाग मुळींच नसतो असें नाहीं; तर कोणांत दोष कमी, कोणांत अधिक, असा तारतम्याचा भाग मात्र असतो. मग हिंदू लोकांच्याच भोवतीं हें काय घुमतें आहे ? तुम्हीं नवीन नवीन धंदेरोजगार शोधून काढावे, देशाची संपत्ति वाढवावी, तें सोडून बोलण्याप्रमाणें धर्मसंबंधी अथवा सामाजिक बाबतींत चालण्यांत होणारे त्रास व अडचणी व लोकनिंदा आपणांवर ओढून आणण्याची पंचाईत कां करितां ?

इतर धर्मांच्या लोकांनीं धर्मसंबंधीं सुधारणा केली, तरी ते देवळें बांधून आमच्यासारखे चर्चा करीत बसले नाहींत, हें खरें आहे; आणि त्याअर्थीं ह्या आक्षेपाचा विचार व त्याचें समाधान करणें इष्ट आहे. एका पुरुषास एकदम अनेक स्त्रिया असण्याच्या संबंधानें महंमदी धर्म आपल्यापेक्षां अधिक सदोष आहे, तरी त्याच्या दूरीकरणार्थ व्यवस्थित सभा स्थापन होऊन, चळवळ करण्यांत आलेली कोणाच्या आढळण्यांत आहे काय ? नाहीं. यावरून हें उघड दिसतें कीं, या आपल्या जन्मभूमीची खाणच अशी आहे कीं, असल्या गोष्टींत इतर लोक जसे उदासीन राहतात, अथवा बुद्धीला वाटेल तसें करितात, तसें आपणांस करून चैनच पडावयाचें नाहीं. इतर लोक अशा गोष्टींत तटस्थ किंवा उदासीन असतात, अथवा मुळींच लक्ष पुरवीत नाहींत; परंतु आम्हांस उपद्व्याप पाहिजे. आपले दोष सर्व लोकांपुढें कां मांडावे व एकमेकांविषयीं जिकीर कां वाढवावी, असा आपल्या मनांत विचार जणूं येतच नसतो. इतर लोक लौकिकार्थ, साधनाच्या प्राप्त्यर्थ, अथवा आपली औद्योगिक अथवा सांपत्तिक स्थिति सुधारण्यासाठीं चळवळींत पडतात. आपल्या हिंदू लोकांचा विचार ह्याच्या उलट असतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. आपल्या लोकांच्या अंगांत धर्मसंबंधी बाबतींत चळवळ करण्यांत एक प्रकारचें स्फुरण चढत असतें. आणि आपल्या मनाची आपल्यामागें टोंचणी असते, ती आपणांस स्वस्थ बसूं देत नाहीं. पण, हा दोष म्हणा, किंवा गुण म्हणा, आजकाल लागलेला आहे असें

नाहीं. आधुनिक कालांत बाळशास्त्री जांभेकर व दादोबा पांडुरंग यांच्या वेळेस ही चळवळ नव्हती असें नाहीं. ही करण्यांत व्यर्थ कालक्षेप व पराक्रमाचा अपव्यय होतो, असें वाटून इतर लोकांस व आपणांपैकींही कित्येकांस दोष दिसतो. अर्थात, ज्या धर्मसंबंधी व सामाजिक बाबतींचा आपल्या लोकांमध्यें अतिनिकट संबंध असतो त्यांत सुधारणा करण्याविषयीं इतकी खटपट व इतका हट्ट कां, हा प्रश्न सहजच निघतो, आणि त्यांत कांहीं अर्थ नाहीं, किंवा तो विचार करण्यासारखा नाहीं असें नाहीं. एक गोष्ट निर्विवाद आहे कीं, ही उठाठेव करण्याची संवय, सदोष असो वा निर्दोष असो, तिला चांगला गुण माना, अथवा वाईट खोड माना, पूर्वीपासून चालत आलेली आहे. असा प्रकार, अशी समजूत, आतां पाश्चात्त्य शिक्षण मिळाल्याचा परिणाम नसून पूर्वीपासून आहे. हें नवीन बंड उपस्थित झालेलें नाहीं, हें आपल्या देशाचा इतिहास पाहिला असतां बौद्ध, जैन हे धर्म; तसेच शांकर, रामानुज, माध्व, वल्लभ व स्वामिनारायण हे एकामागून एक झालेले संप्रदाय याच गोष्टीची साक्ष देतात. नाना प्रकारचे उद्योग, जल-पर्यटन, यांत्रिक कला ह्यांमध्यें प्रावीण्य, इत्यादी गोष्टीं-तून लक्ष कमी होऊन देवाचा सहवास व्हावा, त्याच्याशीं लडिवाळपणाचे बोल बोलावे, देवाचा व आपला संनिकट संबंध मनांत आणून त्यास आळवावें, एतदर्थ प्रयत्न करण्यास व नवीन नवीन धर्मव्यवस्था करण्यांतच आपला ऐतिहासिक काल गेला आहे, असें आपणांस दिसून येईल. ही धर्मसंबंधी चळवळ करण्याची चाल आरंभापासून आहे, आणि ती कबीर, नानक, चैतन्य, तुकाराम इत्यादिकांच्या चारित्रांवरून सिद्ध होते. देशांत अनेक वेळां राज्यक्रांति झाली, बहुत राजे आले व गेले; परचक्रें आलीं-गेलीं; परंतु या कारणांमुळें आपल्या लोकसमाजास धर्मसंबंधी बाबतींत चळवळ करण्याची जी संवय पडलेली आहे तिजमध्यें फरक झालेला, किंवा तिचें रूपांतर झालेलें आढळत नाहीं. विदेशी व विधर्मी लोक येथें सत्ताधारी झाले. त्यांपैकीं कित्येक येथचे स्थानिक झाले, तरी जसे तांदळांत मिसळ-लेले मूग पाटावर, अगर सुपांत घालून घोळले असतां वेगळे होतात, तद्वत् आमचे हिंदू लोक त्यांपासून अलग राहिले. हजारो वर्षांपासून आपल्या लोकांची समजूत ही कीं, आपल्या दु:खाचा व संकटाचा भार सर्वपरी देवाच्या डोकीवर घालावा, म्हणजे त्याला काकळूत येऊन तोच त्याचा परिहार करितो. कित्येक लोकांस ही समजूत व तिच्यामुळें उद्भूत होणारी धर्मसंबंधी बाबतींतच चळवळ करण्याची मनाची प्रवृत्ति ही प्रापंचिक बाबींत प्रत्येक प्रगतीस अवरोध व ऱ्हास करणारी असें वाटतें; तरी ती आमच्या हाडींमासीं इतकी मुरलेली आहे कीं, ती आमचें भाग्य होऊन राहिली आहे, आणि आमचा उदय झाला तर तद्द्वाराच व्हावयाचा असें दिसतें. इंग्रजी शिक्षणाचें हें फळ, अथवा ही नवीन टूम म्हणणें निव्वळ चुकीचें आहे; हा प्रकार परंपरेनें चालत आलेला असून धर्मसंबंधी व त्याला चिकटून असणाऱ्या सामाजिक बाबतींत अधिक जिकीर असणें ही स्थिति, आम्हां लोकांची आरंभापासून स्वाभाविक आहे. हा देहस्वभाव चांगला आहे, किंवा त्याचें खंडन व्हावें हें बरें, हा निराळा मुद्दा आहे, आणि याविषयीं मतभेद असूं शकेल. आपण नांवें ठेवितों; दुसऱ्यांकडून ठेवून घेतों; व तंटे-भांडणें वाढवितों; यापेक्षां ज्याच्या त्याच्या बुद्धीस रास्त व उचित वाटेल तें धर्मसंबंधी अथवा सामाजिक गोष्टींत ज्यानें त्यानें मुकाट्यानें करावें, आणि औद्योगिक स्थिति सुधारण्याकडे मन वळवावें हें बरें, असें दुसऱ्या देशांतील व धर्मांतील लोकांस वाटो; व आमच्यामध्यें आपआपसांत अधिकार आणि योग्यता ह्यांच्या संबंधानें न्यूनाधिक भाव असो; पण, आपणांमधील जे लोक धर्मसंबंधी व सामाजिक सुधारणा करण्यास झटणाऱ्यांस, तुम्ही इतके हटवादी कां होतां असा प्रश्न करितात, त्यांस आमचा उलट सवाल हा आहे कीं, होय आम्ही आग्रही, हट्टी आहों खरे, पण तुम्ही तसे कां होतां? आमची धर्मसंबंधी सुधारणेची दिशा वेगळी असो; पण, तुमचा तरी त्या संबंधानें आग्रह कां? यावरून असें सिद्ध होत नाहीं काय कीं, धर्मसंबंधी चर्चा, विवेक व भांडणें हेंच. या देशाचें स्वरूप, हाच येथील जणूं काय हवापाण्याचा गुण आहे? ब्रह्मबांधव उपाध्याय नांवाचे बंगाली गृहस्थ सिंध, हैदराबादेहून येथें आले होते; त्यांची माझी गांठ पडून याच संबंधानें संभाषण झालें. हे मूळचे हिंदू धर्मानुयायी असून नंतर ब्राह्म झाले व आतां धर्मांतर करून रोमन कॅथलिक पंथाचे ख्रिस्ती झाले आहेत. त्यांच्या चरित्रावरून व मतांवरून धर्मचर्चाच आमच्या लोकांस सर्वांत प्रिय आहे, असेंच सिद्ध होतें. या गोष्टीला. त्या स्वभावाला उपायच नाहीं. आमचें जात्या लक्षणच असें आहे. आमचें भात आणि नारळ



व जोंधळा आणि बाजरी, कोंकण, देश व गुजराथ यांत अनुक्रमें पिकत असतात, आणि याला जमिनीचा गुण कारण आहे, तसा या देशाचा धर्मसंबंधी चळवळीच्या बाबतींत प्रकार आहे. हें स्वरूप, हा उद्योग चांगला आहे कीं नाहीं, हा निराळा मुद्दा आहे. देवाचा आपणांवर विशेष लोभ आहे, असें आपले लोक इतर धर्मांच्या लोकांप्रमाणें मानीपणानें, अभिमानानें, अथवा अव्यवस्थित रीतीनें मानीत आलेले नाहींत, ही गोष्टीं या संबंधानें आपण लक्षांत ठेविली पाहिजे. यहुदी लोकांमध्यें आपण परमेश्वराचे आवडते अशी समजूत आहे; पण त्यांच्यापेक्षां दृढतर, निदान विस्तारानें जास्ती व अधिक निर्मल, शुद्ध अशी आपल्या लोकांची समजूत आहे. आणि हाच आपला विशेष गुण आहे. देवाचा व आपला संनिकट संबंध आहे; संसारांतील अरिष्टांत व दुःखांत देव आपला पाठीराखा आहे; त्याच्यावर भरंवसा ठेविला असतां तो आपला सर्व भार वाहील; कधीं अव्हेर करणार नाहीं, ही बुद्धि प्रत्येकाच्या ठिकाणीं जागृत आहे; हा विश्वास दृढ आहे; हें आपल्या लोकांचें भाग्यच समजलें पाहिजे. हा उपजत अंगस्वभाव, हा विशेषपणा टाकून देतां येत नाहीं, तर तो शुद्ध मार्गानें जाईल, अशी योजना केली पाहिजे; असें त्यास वळण दिलें पाहिजे. आपल्या अंगीं साहस, पराक्रम व सामर्थ्य वाढविण्यासाठीं निरंतर प्रयत्न केला पाहिजे. पण, तें या अंगस्वभावास चांगली दिशा लावून होण्यासारखें आहे, आणि झालें पाहिजे. नाहीं तर साबण लावून काळ्याचें पांढरें करावयास केलेली खटपट पाण्यांत जाते तसें होईल. हें माप पदरीं पडतें खरें; परंतु त्यासाठीं खेद मानण्यास कारण नाहीं, असें मला वाटतें. हा स्वभाव, किंवा हा विशेष दोष पंचवीस कोट प्रजेच्या अंगीं ठेवून, देव तिला फुकट जाऊं देईल, असें सहसा मानवत नाहीं. आपल्या लोकांतील निरनिराळ्या पंथांचा अथवा पक्षांचा मार्ग वेगळा वेगळा असला, तरी सर्वांचा दृढविश्वास वरील अभंगांत तुकारामबावांनीं वर्णन केल्याप्रमाणें असल्याकारणानें उद्देश एकच असतो. सारांश, धर्मसंबंधी चर्चा व चळवळ आपल्या लोकांत कोणत्या ना कोणत्या रूपानें अथवा दिशेनें पूर्वीपासून चालत आलेली आहे; ती नवीन शिक्षणाचा परिणाम आहे किंवा आजकालची आहे असें नाहीं. आतां धर्मविषयक बाबतींत उदासीनता आपल्या लोकांस श्रेयस्कर कां वाटत नाहीं, याचा ज्याचा त्यानें आपल्या ठिकाणीं विचार करावा.

* *

# धर्मानुशासन

आपल्या देशांत ख्रिस्ती झालेल्यांशीं किंवा ख्रिस्ती लोकांशीं संवाद करण्याचे जेव्हां जेव्हां प्रसंग येतात तेव्हां तेव्हां एक विचार त्यांच्याकडून नेहमीं पुढें करण्यांत येत असतो. तो असा कीं, प्रत्येक धर्मांत उपरति होण्यासाठीं, मनाचें संयमन करण्यासाठीं व पापाचा नाश करण्यासाठीं कांहीं तरी धर्माज्ञारूप अनुशासन असलें पाहिजे. तसें अनुशासन स्पष्ट रीतीनें ह्या देशांतील धर्मांत नाहीं, म्हणून अशा अनुशासनविरहित प्रचलित धर्मांपेक्षां ज्या धर्मांत विशेष आज्ञा सांगितल्या आहेत तो धर्म श्रेष्ठ होय, असें ख्रिस्ती धर्मानुयायी व धर्मप्रचारक प्रतिपादीत असतात. ख्रिस्ती लोकांचें जें धर्मपुस्तक आहे त्यांतील जुन्या करारांत दहा अनुशासनें आहेत. त्यांतील पांच केवळ धर्माचीं व पांच नीतीचीं आहेत, ती अशी :

१. मी परमेश्वर तुझा देव आहें, माझ्याशिवाय तुला दुसरे देव नसोत.

२. तूं आपल्यासाठीं कोरींव मूर्ति करूं नको आणि जें वरतीं आकाशांत, अथवा जें खालतीं पृथ्वींत, अथवा जें पृथ्वीच्या खालतीं पाण्यांत, त्याची प्रतिमा करूं नको, त्याच्या पायां पडूं नको, आणि त्याची सेवा करूं नको, कां कीं, मी परमेश्वर तुझा देव आवेशी देव आहें. माझ्या शत्रूंच्या तिसऱ्या व चौथ्या पिढीपर्यंत बापाच्या अन्यायामुळें लेंकरांचें शासन करितों. आणि जे मजवर प्रीति करितात आणि माझ्या आज्ञा पाळितात त्यांच्या हजारांवर मी दया करितों.

३. परमेश्वर जो तुझा देव त्याचें नांव व्यर्थ घेऊं नको, कां कीं, जो त्याचें नांव व्यर्थ घेतो त्याला परमेश्वर निर्दोष असें मानणार नाहीं.

अनुक्रमणिका

४. शाब्बाथ जो दिवस तो पवित्र पाळावा म्हणून त्याची आठवण कर. सहा दिवस उद्योग करून आपलें सर्व काम कर. परंतु परमेश्वर जो तुझा देव त्यासाठीं सातवा दिवस विसाव्याचा आहे, त्यांत तूं कांहीं काम करूं नको, तूं व तुझा पुत्र व तुझी कन्या व तुझा दास व तुझी दासी व तुझा पशु व तुझ्या दरवाज्यांतील जो तुझा विदेशी यानेंही करूं नये. कां कीं, परमेश्वरानें सहा दिवसांत आकाश व पृथ्वी व समुद्र यांस व यांमध्यें जीं सर्व त्यांस उत्पन्न केलें आणि सातव्या दिवशीं तो स्वस्थ राहिला, यास्तव परमेश्वरानें शाब्बाथ दिवसाला आशीर्वाद देऊन त्याला पवित्र ठरविलें.

५. परमेश्वर तुझा देव, जो देश तुला देतो, त्यांत तुझें आयुष्य दीर्घ व्हावें म्हणून आपला बाप व आपली आई यांचा सन्मान कर.

६. तूं हत्या करूं नको.

७. तूं जारकर्म करूं नको

८. तूं चोरी करूं नको.

९. तूं आपल्या शेजाऱ्याविषयीं खोटी साक्ष देऊं नको.

१०. तूं आपल्या शेजाऱ्याच्या घरावर लोभ ठेवूं नको. आपल्या शेजाऱ्याची बायको, अथवा त्याचे चाकर, अथवा त्याची चाकरीण, अथवा त्याचें गुरूं अथवा त्याचें गाढव, अथवा आपल्या शेजाऱ्याचें जें कांहीं असेल, त्यावर लोभ ठेवूं नको.

ख्रिस्ती धर्मांत वर सांगितलेल्या दहा आज्ञा ज्याप्रमाणें आहेत त्याप्रमाणें आपल्या पुरातन धर्मग्रंथांत आहेत कीं नाहींत ह्याविषयीं शंका वाटते; परंतु तैत्तिरिय उपनिषदांत दोन अनुवाक आहेत त्यांत पुढील भाग आहे :

**वेदमनूच्याऽऽचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति। सत्यं वद। धर्मं चर। स्वाध्यायान्मा प्रमदः। आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः। सत्यान्न प्रमदितव्यम्। धर्मान्न प्रमदितव्यम्। कुशलान्न प्रमदितव्यम्। भूत्यै न प्रमदितव्यम्। स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ॥ १ ॥**

**भावार्थ** :– गुरू शिष्याला वेद शिकवून मग उपदेश करितो :– हे शिष्या, तूं खरें भाषण कर. धर्माप्रमाणें वाग; स्वाध्यायाचे कामीं कधींही हेळसांड करूं नकोस; गुरूला दक्षिणा देऊन त्याची आज्ञा घे; आपल्या वंशाचा छेद करूं नकोस ( म्हणजे तुला प्रजा होऊं दे ) सत्य सोडूं नकोस; धर्माविषयीं कधींही हेळसांड करूं नकोस. अध्ययन करणें व शिष्यांस पढविणें ह्या दोहोंविषयीं भूलूं नकोस.

**देव-पितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम्। मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव। अतिथिदेवो भव। यान्यनवद्यानि कर्माणि। तानि सेवितव्यानि। नो इतराणि। यान्यस्माक ँ सुचरितानि। तानि त्वयोपास्यानि ॥ २ ॥**

**भावार्थ** :– देव व पितर ह्यांसंबंधीं आपलें कर्तव्य करण्याचे कामीं चुकूं नकोस. आईला देवाप्रमाणें पूज्य मान. बापाला देवाप्रमाणें पूज्य मान. गुरूला देवाप्रमाणें पूज्य मान. अतिथीला देवाप्रमाणें पूज्य मान. जीं वंद्य कर्में आहेत, जीं विहित आहेत, तीं करीत जा. दुसरीं करूं नकोस. आमचें जें योग्य आचरण आहे त्याप्रमाणें वागत जा. आमचीं जीं अनुचित कर्में असतील त्यांप्रमाणें वागूं नकोस.

**नो इतराणि। ये के चास्मच्छ्रेया ँ सो ब्राह्मणाः। तेषां त्वयाऽऽसनेन प्रश्वसितव्यम्। श्रद्धया देयम्। अश्रद्धयाऽदेयम्। श्रिया देयम्। ह्रिया देयम्। भिया देयम्। संविदा देयम्। अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ॥ ३ ॥**

**ये तत्र ब्राह्मणाः सम्मर्शिनः। युक्ता आयुक्ताः अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा ते तत्र वर्तेरन्। तथा तत्र वर्तेथाः। अथाभ्याख्यातेषु। ये तत्र ब्राह्मणाः सम्मर्शिनः। युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा ते तेषु वर्तेरन्। तथा तेषु वर्तेथाः। एष आदेशः। एष उपदेशः। एषा वेदोपनिषत्। एतदनुशासनम्। एवमुपासितव्यम्। एवमुचैतदुपास्यम् ॥ ४॥**

**भावार्थ** :– आमच्याहूनही कांहीं ब्राह्मण श्रेष्ठ आहेत ते प्राप्त झाले असतां, त्यांना आदरानें आसन दे. जेणेंकरून त्यांचे श्रम दूर होतील असें कर. दान करणें झालें, तर तें श्रद्धेनें देत जा. अश्रद्धेनें कधींही देऊं नको. मन प्रसन्न करून द्यावें. मर्यादेनें द्यावें; भीतीनें द्यावें; ममतेनें द्यावें. तुला कर्म अनुष्ठानांविषयीं, अथवा आपल्या वर्तनाविषयीं संशय प्राप्त झाला, तर तेथें विचारवान, दयाळू, धर्मनिष्ठ असे जे ब्राह्मण असतील त्यांचेप्रमाणें वागत जा. मग ते ब्राह्मण नियुक्त अधिकारी असोत वा नसोत. त्याचप्रमाणें कांहीं दोषाचा आरोप झाला असतां, वर लिहिल्याप्रमाणें विचारवान, दयाळू, धर्मशील असे ब्राह्मण ज्या ज्या प्रमाणें वागतील त्या त्या प्रमाणें वागत जा; मग ते नियुक्त अधिकारी असोत

वा नसोत. ही ईश्वराची आज्ञा आहे; केवळ ईश्वराची आज्ञा आहे, इतकेंच नव्हे, तर वेदांत सांगितलेला उपदेश आहे. हें वेदांचें रहस्य आहे. हें अनुशासन आहे, म्हणजे ही वेदाज्ञा आहे.

ख्रिस्ती धर्मांतील दहा अनुशासनांचा प्रसंग असा आहे कीं, ज्या वेळीं मुसानें मिसर देशांतून यहुदी लोकांस एशियांत आणिलें, त्या वेळीं त्यांनीं कोणत्या नीतीनें वागावें, कोणत्या धर्माज्ञा मानाव्या तें कळण्यासाठीं देवानें दहा आज्ञा केल्या. उपनिषदांतील हा जो उपदेश आहे त्याचा प्रसंग असा आहे कीं, पूर्वी वेदपठणासाठीं शिष्य गुरुगृहीं राहत असत. अध्ययन पूर्ण झाल्यानंतर संसारांत प्रवेश करितेवेळीं व नंतर शिष्यानें कसें वागावें, अशाविषयीं गुरू शिष्यांस, उपदेश करीत असत. हल्लीं आपल्या विश्वविद्यालयांतसुद्धां कांहीं अंशानें असाच उपदेश करण्यांत येत असतो. असो. वर जीं उपनिषदांतील अनुशासनें दिलीं आहेत त्यांत ख्रिस्ती धर्मांत ज्याप्रमाणें पांच स्पष्ट धर्माज्ञा आहेत त्याप्रमाणें कांहीं स्पष्ट अनुशासनें कां केलीं नाहींत, अशीं शंका येथें येण्याचा संभव आहे. ख्रिस्ती धर्मांतील आज्ञांत माझ्याशिवाय दुसरा देव नाहीं; मी मोठा चिरडखोर देव (Jealous God) आहें वगैरे वाक्यें आहेत; तसा प्रकार उपनिषदांतील अनुशासनांत नाहीं, हा मोठा गौण प्रकार होय, असें कदाचित् कोणास वाटेल. जुन्या करारांतील आज्ञा ज्या वेळीं करण्यांत आल्या त्या वेळीं त्या लोकांचे आचारविचार आपल्यापेक्षां फार निराळे होते. त्या वेळीं त्या देशांत प्रतिमापूजन फारच प्रचारांत होतें. आणि यास्तव कंठरवानें मूर्तिपूजेचा निषेध करणें भाग पडलें असावें. परंतु आपल्या देशांत उपनिषत्काळाच्या वेळीं मूर्तिपूजेचा उद्भवही झालेला नव्हता, अर्थात् प्रसार झालेला नव्हता, हें सांगावयास नकोच. त्या काळीं अग्निहोमाच्या द्वारानें हवन व आराधनेच्या द्वारानें ईश्वरभजन होत असे. होमशाळा, अग्निशाळा, ह्यांशिवाय त्या वेळीं निराळीं देवळें, किंवा देवघरें नसत. हल्लीं बहुतेक प्रत्येक घरांत एक निराळें देवघर असतें. देवघर ह्या शब्दांत कांहीं गैर नाहीं. पण, त्याचा खरा अर्थ जाऊन, कुलांतील, कुटुंबांतील मूर्ति ठेवण्याचें ठिकाण, तें देवघर, असें हल्लीं मानण्यांत येतें. उपनिषत्कालीं मूर्तिपूजा नव्हती म्हणून त्याबद्दलचे निषेध सांगितले नाहींत. धर्माप्रमाणें वागत जा, या वचनांत सर्व गोष्टींचा समावेश होत असे.

ख्रिस्ती धर्मांतील व उपनिषदांतील नीतीच्या आज्ञा बहुतेक सारख्या आहेत. तरी आईबापांचा मान ठेवीत जा, या आज्ञेखेरीज ख्रिस्ती आज्ञा निषेधपूर्वक आहेत. आमच्यांतील बहुतेक आज्ञा विधिपूर्वक आहेत, हा दुसरा भेद लक्षांत ठेवण्यासारखा आहे. उपनिषदांत 'सत्यं वद' असें आहे. बायबलांत खोटी साक्ष देऊं नको' असें वचन आहे. आमच्यांत विधान आहे. दुसऱ्यांत निषेध आहे. ख्रिस्ती धर्मांत नीतीच्या ज्या दुसऱ्या निषेधपर चार आज्ञा आहेत त्यांबद्दल आमच्यांत 'धर्मं चर' अशी एक विधिपूर्वक आज्ञा आहे. 'धर्मं चर' असें सांगण्यांत नीतीस धर्माच्या इलाख्यापासून वेगळी करून, नीतिमत्तेस धर्मावांचून निराळा इलाखा नाहीं, असें दाखविलें आहे. नीतीला धर्मावांचून थाराच नाहीं, असें ह्यांत दाखविलें आहे. 'धर्मं चर' ह्यांत विधानाचा सर्व भाग आला. धर्म्य जें असेल तेवढें कर. प्रमाणशुद्ध असेल तेवढें बोल. अधर्म्य असेल त्याचा त्याग कर. हा सर्व धर्माचा इलाखा आहे आणि धर्माच्या पायावर उपनिषत्कारांनीं नीतिमत्ता ठेविली आहे. या दोन्ही अनुशासनामध्यें तिसरा भेद असा दिसतो कीं, ख्रिस्ती शास्त्रांत ज्या आज्ञा आहेत त्यांचें पर्यवसान आज्ञेचे बाहेर नाहीं. आपल्या आज्ञेचा प्रकार तसा नाहीं. सत्य बोलल्यापासून, तपश्चर्या अथवा धर्माचरण केल्यापासून साध्य काय आहे त्याचा बोध ज्या उपदेशांत केला आहे, तो उपदेश येणेंप्रमाणें :–

**सत्यञ्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**तपश्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**दमश्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**शमश्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**अग्नयश्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**अग्निहोत्रञ्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**अतिथयश्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**मानुषञ्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**प्रजा च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**प्रजनश्च स्वाध्याय-प्रवचने च ।**
**प्रजातिश्च स्वाध्याय-प्रवचने च ।**

हें स्वाध्यायाचें वर्णन आहे. दमाची व शमाची प्राप्ति व्हावी व दमशम प्राप्त झाले असतांही मनुष्याचे हातून त्याचीं सर्व कर्तव्यें व्हावीं म्हणून हा सर्व नीतीचा उपदेश करण्यांत आला, असें वरील वचनांवरून स्पष्ट होतें. ह्या सर्व स्वाध्यायामध्यें स्वाध्यायप्रवचनाचें महत्व

विशेष सांगितलें आहे. ज्ञान प्राप्त करून घेण्याचा क्रम अव्याहतपणें चालू दे; पण एवढ्यावरच राहूं नको. तर लोकांसही पढीव. स्वतः शहाणा तर होच; पण लोकांसही शहाणे कर. ही पूर्वतयारी झाली. हा धर्म सर्वांना सांगितला. स्वाध्यायही करीत नाहीं व लोकांना शिकवीतही नाहीं; सत्संगतीचा स्वतःस लाभ करून घेत नाहीं; व लोकांसही घडूं देत नाहीं, तर तुमचें जिणें व्यर्थ आहे. तुम्ही नुसते भूमीला भार आहां. म्हणून शिका व शिकवा असें म्हटलें आहे. पण, तें कोठपर्यंत ? त्याला कांहीं काल, किंवा स्थलमर्यादा आहे काय ? नाहीं. त्याला मर्यादा घातलेली नाहीं. सर्व स्थळीं, सर्व काळीं शिका व शिकवा. स्वाध्याय व प्रवचन, शिका व शिकवा, हे दोन धर्म झाले. तिसरा धर्म 'शमश्च स्वाध्याय प्रवचने च' हा होय. स्वाध्याय केला, प्रवचन केलें, सर्व कांहीं केलें. तुम्हांला प्राप्ति काय झाली ! अंतर्यामींच्या उन्नतीचा ठेवा सांपडला नाहीं. म्हणून ज्याचेमध्यें दम वाढत आहे, शम वाढत आहे, तो एकेक पायरी चढत आहे असें समजावें. परंतु यावर कोणी अशी शंका घेतील कीं, ह्या दमशमांनीं तर आमच्या देशाची हानि झाली आहे. दमशमांचे प्रकार वाढले, वैराग्य माजलें, संसारांतून लोकांचें लक्ष उडालें, आणि यास्तव आम्ही आजच्या स्थितीला मिळालों. मग आणखी दमशम काय करावयाचे ? हा आक्षेप हल्लीं कांहीं अंशीं खरा असेल. पण, उपनिषत्काळाला हा आक्षेप लागू करितां यावयाचा नाहीं. कारण, 'प्रजातन्तुं माव्यवच्छेत्सीः' असा संसार करण्याविषयीं उपदेश केला आहे. मनुष्याचें सुख ज्यांत आहे, कल्याण ज्यांत आहे, तें अवश्य करावें. आपल्या प्रजातंतूचा छेद करूं नये. ह्यापेक्षां संसार करण्याविषयीं जास्त उपदेश नको आहे. प्रजातंतूचा छेद करूं नको हा निषेधपक्षीं उपदेश आहे. एवढ्यावरच थांबलें नाहीं. कल्याणकारक जें असेल तें करावें, आयुष्य ज्याचे योगें वाढेल तें करावें; भूति व ऐश्वर्य संपादावें, अशीं स्पष्ट विधिवाक्यें आहेत. ऐश्वर्य, भूति, ह्या सर्व गोष्टी स्वाध्याय-प्रवचनाबरोबर चालावयाच्या. तेव्हा असा जेथें स्पष्ट उल्लेख आहे तेथें वैराग्य फार आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. हल्लींच्या व्यवस्थेला पाहिजे तर दोष द्या. पण, हल्लींचा प्रकार मुळामध्यें नाहीं, हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे.

वर तीन भेदांचें विवरण झालें, आणखी एक चौथा प्रकार उपनिषदांतील धर्माविषयीं लक्षांत ठेवण्यासारखा आहे. पूर्वींच्या लोकांत चार तऱ्हांचे विचार करणारे लोक असत. कांहीं आचार्य केवळ सत्यवचनामध्येंच सर्व पुण्य आहे असें मानीत; कांहीं तपश्चर्येंत सर्व साधन आहे असें मानीत; कांहीं ऋतु म्हणजे विहित कर्मानुष्ठानांत सर्व सिद्धि आहे असें मानीत व कांहीं स्वाध्याय-प्रवचनांतच मुख्य कर्तव्य आहे असें मानीत. याप्रमाणें चार मतांचे लोक त्या वेळीं होते.

मनुष्य खरें बोलेल, धर्माप्रमाणें आचरेल व स्वाध्याय-प्रवचनही करील. पण, इतकेंही करीत असतांना धर्माविषयीं, किंवा कर्माविषयीं शंका प्राप्त झाली तर काय करावें, हा प्रश्न राहिलाच. त्याचा उपाय उपनिषत्कारांनीं सांगितला आहे. इतकेंही करून जर तुला संशय राहिला, दोन नीतींचा झगडा आला, विचिकित्सा उत्पन्न झाली, तर पहिला उपदेश असा आहे कीं, आम्ही जे तुम्हांपेक्षां श्रेष्ठ आहोंत त्या आमच्या सदाचरणाचा कित्ता घ्या. एवढें सांगूनच मात्र ते तृप्त झाले नाहींत. आमच्या सदाचरणाप्रमाणें तुम्ही आचरण करा. आमच्या आचरणांत जें पायाशुद्ध, नीतिशुद्ध, धर्मशुद्ध, सत्यानें भरलेलें असेल त्याचा स्वीकार करा. जें तसें नसेल त्याचें सेवन करूं नका. एवढें सांगूनही त्यांची तृप्ति झाली नाहीं. आमच्यापेक्षां ज्ञानानें जे श्रेष्ठ आहेत त्यांना बोलावून, त्यांचा आदर करून, त्यांचा विचार घ्या; त्यांचा मान राखा. असे पुरुष कोण त्याची व्याख्या देतांना ते नियुक्त आहेत किंवा नाहींत या गोष्टीस विशेष महत्त्व न देतां, ते समशील व विचारवान् असून म्हणजे दयाळू आणि धर्मकाम, म्हणजे धर्माविषयीं ज्यांस आस्था आहे अशा गुणांची प्रशंसा करणारे असे जे थोर पुरुष असतील त्यांनीं सांगितलेला निकाल नीतीचे संबंधानें सर्वमान्य आहे, असें अखेरीस या उपदेशांत सांगितलें आहे. याप्रमाणें या दोन्ही धर्मांमध्यें जे विशेष भेद लक्षांत धरण्यासारखे आहेत त्यांचा विचार थोडक्यांत सांगितला. त्याबद्दल सर्वांनीं आपापल्या ठिकाणीं मूळ ग्रंथ पाहून नित्य चिंतन केल्यास हल्लींची आपली शोचनीय स्थिति जाऊन लौकरच उपनिषद्वचनांप्रमाणें आपणांमध्यें उत्तम नीति वास करील, याविषयीं तिलप्राय शंका धरण्यास जागा नाहीं.

* *

अनुक्रमणिका

# आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति

बृहदारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांच्यांतील संवाद एके ठिकाणीं दिलेला आहे. हा संवाद व्हावयास कारण काय झालें तें सांगितलें पाहिजे. याज्ञवल्क्य इतर लोकांप्रमाणेंच संसार करीत होता. त्याला दोन बायका होत्या. बऱ्याच वर्षांनीं त्यानें आश्रमांतर करून गृहत्याग करण्याचा निश्चय केला. वनांतरीं जाऊन ईशभजनपूजन करावें, हा त्याचा हेतु होता. परंतु आश्रमांतर करितेवेळीं गृहस्थाश्रमांतील जीं आपलीं मुलेंमाणसें त्यांचा विचार घेऊन, त्यांच्या आशा व इच्छा तृप्त करून गेलें पाहिजे, असा नियम आहे. त्याप्रमाणें त्यानें मैत्रेयीस आपलें मनोगत कळविलें. आपला पति आश्रमांतर करून वनांतरीं, आपल्या ताब्यांत गृह, धन वगैरे करून, जात आहे हें पाहून मैत्रेयी म्हणते– "हें धन, हें गृह घेऊन मला काय करावयाचें आहे? ह्यापासून मला काय उपयोग होईल? हें आज आहे तर उद्यां नाहीं. ह्या ऐहिक धनानें मला अमरत्व प्राप्त होणार आहे काय? ज्याच्या योगानें मला अमरत्व प्राप्त होईल, असें कांहीं तरी द्या. ज्या सुखाला कधीं खळ नाहीं, असें कांहीं तरी मला प्राप्त करून द्या." ही आपल्या पत्नीची अखेरची इच्छा पाहून याज्ञवल्क्यास फार संतोष झाला. त्याची स्त्री बहुश्रुत, विद्वान्, म्हणून तिनें असा प्रश्न केला. पण, साधारण मनुष्यांला असा आश्रमांतर करण्याचा जर प्रसंग आला, तर आपल्या स्त्रिया, मुलें, इतर आप्त, आपल्याजवळ आपली अखेरची इच्छा म्हणून काय प्रदर्शित करितील? तर पुत्रसंतान असावें, धन बरेंचसें संग्रहीं असूं द्यावें, घरादाराची व्यवस्था चांगली झालेली असावी, अशाच तऱ्हेच्या आपल्या इच्छा तीं प्रदर्शित करितील. म्हणजे अशा वेळीं जो तो आपल्या अपेक्षेचे विषय मागणार. ह्यांत त्या निरनिराळ्या वस्तु मागणारांचा परोपकाराचा असा कांहीं भाग नसतो. वस्तुस्थितीच मुळीं अशी आहे. नवऱ्याला बायको जी हवी ती बायकोच्या कल्याणासाठीं नव्हे; तर आत्म्याच्या कल्याणासाठीं. पुत्राला बाप हवा, बापाला पुत्र हवा तो अनुक्रमें बापाच्या व पुत्राच्या कल्याणासाठीं नव्हे. तर त्याच्या त्याच्या आत्म्याच्या कल्याणासाठीं. आज देवयोनींतील अनेक देव जे आहेत ते त्या देवांच्या कल्याणासाठीं नसून आत्म्याच्या कल्याणासाठीं होत. हे सर्व विषय आत्म्याच्या शांतीसाठीं हवे असतात. आत्मा त्यांच्या शांतीसाठीं नव्हे; हे सर्व विषय सापेक्ष आहेत.

आत्मा ह्या शब्दाचा एक प्राकृत अर्थ करीत असतात. आणि हाच अर्थ बहुतेक प्रचारांत आहे. तो असा कीं, आत्मा म्हणजे आपण. पण, हा अर्थ याज्ञवल्क्याचा नव्हे. त्यानें आपल्या पत्नीला जो उपदेश केला व त्यांत हे सर्व विषय आत्म्याच्या कल्याणासाठीं असें जें म्हटलें आहे, तेथें हा प्राकृत अर्थ असणें शक्य नाहीं. तर जो आत्मा सर्वांच्या ठिकाणीं आहे, जो आत्मा परमात्मा आहे, त्याच्याकरितां हें सर्व, असा त्याचा अर्थ. खरें कल्याण, खरें प्रेम ह्या सर्वांचें बीज ज्याचें त्याचें कल्याण व्हावें हें नव्हे. आपण एकमेकांवर प्रीति कां करितों? एकमेकांविषयीं एवढी कळकळ कां बाळगितों? कारण, आपण पृथक् दिसतों खरे, पण आपण पृथक् नाहीं. जो पिता, तोच पुत्र, तीच पत्नी, तीच माता, तोच स्नेही. म्हणजे ह्या सर्वांच्या अंतर्यामीं एक आत्मा आहे. तो प्रेममय आहे. परस्परांशीं प्रेमभावानें असावें, हा त्याचा गुण आहे.

सृष्टि रम्य कां वाटते? तर त्या आत्म्याची छाया प्रत्येक ठिकाणीं उत्पन्न होऊन ती सृष्टि उल्लसित होत असते. सर्व शरीराला सुई टोंचली असतां एकत्व देणारा ज्याप्रमाणें आपला आत्मा, त्याचप्रमाणें सर्व व्यक्तींला एकत्व आणणारा हा अंतरात्मा आहे. हें जाणणें हा वेदान्ताचा सिद्धान्त समजतात.

उपनिषदें होण्यापूर्वीं कर्ममार्गाची प्रसिद्धी होती. पुण्यकर्म कां करावयाचें, तर पुत्र, धन, दारा हीं प्राप्त व्हावी म्हणून. परंतु उपनिषदें झाल्यानंतर ह्यापेक्षां खोल विचारांत लोक गेले. धन कितीही प्राप्त झालें तरी तें थोडेंच. त्यापेक्षां जास्त प्राप्त झालें तरीही तें थोडेंच. ज्ञान वाढलें, तरी त्याला मर्यादा आहे. आयुष्य कितीही वाढलें, तरी तें सापेक्ष. त्याला मर्यादा आहेच. यांत चित्ताची शांति नाहीं. ह्यापासून खरें समाधान प्राप्त होत नाहीं. असा विचार होतां होतां असें










दिसून आलें कीं, माझ्या ठिकाणीं जसा आत्मा आहे तसा सृष्टीच्या ठिकाणीं परमात्मा आहे. त्याच्याशीं सर्वांचा संबंध. त्याचे आम्ही दास. त्याची लीला सर्वत्र प्रसृत आहे. त्याची आपण छाया आहों. त्याचा अंश आपल्या ठिकाणीं असला पाहिजे. असें होतां होतां वेदान्ताच्या मतांप्रमाणें तो व आपण एकच, त्यांच्यांत व आपल्यांत कांहीं फरक नाहीं, असें मानण्यापर्यंतही मजल गेली.

एखाद्या कांचेच्या तुकड्यावर सूर्याचे किरण पडले असतां जी छाया पडते ती छाया व सूर्य एकच, असें म्हणणें अगदीं चुकीचें होईल. छाया ती छाया व सूर्य तो सूर्य. तद्वत् आत्मा व परमात्मा एकच खरे; पण, त्यांच्यांत व आपणांत कांहीं फरक नाहीं, किंवा आत्म्यास परमात्म्याच्या स्वरूपाप्रत पावतां येईल या अर्थानें नव्हे. तो पृथक् रीतीनें वास करीत असतो. तो प्रेममय आहे. मीं माझ्या स्नेह्यावर प्रीती कां करावी? माझ्या कल्याणासाठीं नव्हे. माझें कल्याण होईपर्यंत माझी शाश्वती काय? कोणत्या वेळीं काय होईल आणि काय नाहीं ह्याचा काय नेम आहे! म्हणून मीं माझ्या स्नेह्यावर प्रेम जें करावयाचें तें ह्या हेतूनें नव्हे, तर तसा माझा साहजिक धर्म आहे म्हणून. कारण, सर्वांच्या ठिकाणीं अंतरात्म्याची एकता आहे. आणि प्रेममय असणें हा त्याचा नैसर्गिक धर्म आहे. निर्लोभानें जी प्रीति जडलेली ती खरी प्रीति. कांहीं हेतु मनांत धरून एखाद्यावर कितीही प्रेम केलें, तरी तें निर्लोभ नव्हे. तें खरें प्रेम नव्हे. मी व माझ्या प्रेमाचा, प्रीतीचा विषय एकच असें वाटलें पाहिजे. तरच ती प्रीति, किंवा तें प्रेम खरें म्हणता येईल. अहंकारबुद्धीवर जितका आळा पडेल तितकी ही अशी शुद्ध प्रीति जास्त वाढण्याचा संभव आहे. अहंकारबुद्धीला अनुसरून असणारी प्रीति ही खरी पायाविशुद्ध प्रीति नव्हे.

आपणांस नीतिमत्ता असावी असें वाटत असतें. पण, असें कां वाटत असतें? एक तर आपलें स्वतःचें कल्याण व्हावें म्हणून व दुसरें लोकांचें कल्याण व्हावें म्हणूनही आपणांस असें वाटत असतें. न्याय आपणांस कशास पाहिजे असतो? मनुष्य दोषी आहे किंवा नाहीं, हें ठरविण्याकरितांच आपल्याला त्याची आवश्यकता वाटत असते. पण, न्याय हा तो देणाऱ्याच्या कल्याणासाठीं नव्हे, व ज्याच्यासाठीं तो द्यावयाचा त्याच्याही कल्याणासाठीं नव्हे; तर सर्वांच्या कल्याणासाठीं. नीतिमत्ता ही स्वार्थपरही नाहीं व परार्थपरही नाहीं. स्वार्थ व परार्थ ह्यांना परमात्म्याची एक गवसणी आहे. ती गवसणी लक्षांत ठेवून जी नीतिमत्ता, किंवा जें प्रेम, तें शुद्ध असणार. त्याचा पाया मजबूत. त्यामुळें स्वार्थाचा स्वार्थपणा व परार्थाचा परार्थपणाही जावयास वेळ लागावयाचा नाहीं. हे भेद अवयवरूपानें आहेत खरे; परंतु ते एका झाडाच्या पानांप्रमाणें आहेत.

आपण परमेश्वराचे दास आहों; परमेश्वर आपलें कल्याण करितो वगैरे जे विचार आपणांत नेहमीं वास करीत असतात, त्याचें तरी कारण एकच आहे. तें असें कीं, आपल्या आत्म्याच्या कल्याणासाठीं ह्या सर्व गोष्टी असतात. आपणांस एकमेकांवर प्रेम ठेवावें असें वाटत असतें खरें. पण, तें प्रेम इतकें पायाशुद्ध असलें पाहिजे कीं, त्याच्यामुळें आत्म्यांत व परमात्म्यांत अंतर पडणार नाहीं. ज्या प्रेमामुळें आत्म्यांत व परमात्म्यांत अंतर पडतें, तें विशुद्ध प्रेम नव्हे. परमेश्वरांत व आपणांत जेव्हां जेव्हां आपल्या वर्तनाच्या योगें अंतर पडलें असें आपणांस वाटतें, तेव्हां तेव्हां तें आपलें वर्तन शुद्ध नव्हे असें समजावें. आपल्या ठायीं वास्तव्य करणारा जो अंतरात्मा त्याचा दिवसेंदिवस उत्कर्ष व्हावा, तो उन्नत उन्नत दशेप्रत जावा, ह्या हेतूनें आपण सर्व गोष्टी करीत असलें पाहिजे. पण, ज्या गोष्टींनीं आपलें दैवी सामर्थ्य कमी होतें त्या गोष्टी शुद्ध नव्हत. अर्थात, त्यांच्यायोगें अंतरात्म्यास दिवसेंदिवस उन्नतावस्था प्राप्त होणार नाहीं असें समजावें. असो.

मैत्रेयीनें आपल्या पतीजवळ जें अमरत्व मागितलें आहे त्याचा अर्थ काय? आपण शरीर धारण केलेलें असावें. पण, त्याला नाश कधींही असूं नये, असा त्याचा अर्थ समजावयाचा काय? ह्या अर्थानें मैत्रेयीनें हें वरप्रदान मागितलें आहे, असें ह्या बृहदारण्यकोपनिषदांतील श्लोकांवरून दिसत नाहीं. तशांतून मैत्रेयी ही साधारण स्त्रियांत मोडणारी स्त्री नव्हे. नाशवंत शरीर अविनाशी झाल्यानें आपल्या जीविताचें साफल्य झालें, असें तिला वाटणें शक्यच नव्हतें. तिनें जें वरप्रदान मागितलें त्याचा अर्थ हाच कीं, ईश्वराचा व माझा नेहमीं सहवास असावा; कितीही विपत्ति आली, कशीही संकटें भोगावीं लागलीं, तरी त्याच्या सहवासांत अंतर पडूं नये. ही जी स्थिति तिचें नांव अमरत्व. हें अमरत्व

प्राप्त व्हावें, अशी याज्ञवल्क्याच्या स्त्रीनें इच्छा प्रदर्शित केलेली. आपले पृथक् पृथक् आत्मे एकमेकांवर प्रेम करीत असतात त्याचा तरी एक हा मुख्य हेतु असतोच कीं, परमात्मा व अंतरात्मा ह्यांची संगति असल्यामुळें निरनिराळ्या आत्म्यांवर तरी प्रेम करून अशा निरनिराळ्या आत्म्यांचा जो परमात्मा त्याचें सान्निध्य घडावें, परमात्म्याचा व आपला दिवसेंदिवस जास्त जास्त सन्निवेश घडावा. परमात्म्याचा हा सन्निवेश घडावा म्हणून जे जे प्रयत्न होत असतात त्यांत दांभिकपणा असूं नये. त्यांत कोणत्याही प्रकारची अतिशयोक्ति असूं नये. बाहेरील सोवळें करून आंतील अशुद्धता नाहींशी होते व परमात्म्याशीं सहवास घडतो, असें ज्यास प्रामाणिकपणें वाटत असेल, त्यानें योग्य वाटल्यास वाटेल तितकें सोवळें करावें. पण, बाहेरच्या सोवळ्याचें मात्र वाटेल तितकें अवडंबर माजविलेलें, आणि अंतःकरणांतील अशुद्धता जशीच्यातशीच कायम. तर या अशा सोवळ्याचा कांहींच उपयोग नाहीं, तो केवळ दांभिकपणा झाला. म्हणून आपणांस जेणेंकरून परमेश्वराचें सान्निध्य दिवसेंदिवस अधिकाधिक होईल, असें आचरण ठेवणें, हें आपलें कर्तव्य होय व त्याच्याच योगें आपणांस अमरत्व प्राप्त होणार आहे.

* *

# माझ्या हातून पुण्याचरण कां घडत नाहीं ? पाप कां घडतें ?

**किमहं साधु नाकरवम् । किमहं पापमकरवम् ।**

गेल्या खेपेस याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांच्यांतील संवाद सांगून त्याचें तात्पर्य काय तें सांगितलें. आज तशाच रीतीचा, पण तैत्तिरीय उपनिषदांतील, भाग वाचून दाखवावयाचा आहे. मी आतां वाचणार तो भाग आपण वाचलाही असेल, पण तो इतका उदात्त आहे कीं, तो पुनः वाचण्यास हरकत नाहीं:—

**यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह ।**<br>
**आनन्दं ब्रह्मणो विद्वान । न बिभेति कुतश्चनेति ।**<br>
**एत ँ ह वाव न तपति । किमह ँ साधु नाकरवम् ।**<br>
**किमहं पापमकरवमिति ॥**

**भावार्थः—** ज्याप्रत वाणी व मन हीं पोहोंचूं न शकतां परावृत्त होतात, त्या ब्रह्माचें ज्ञान ज्यास झालें आहे त्यास कशाचेंही भय वाटत नाहीं. मी साधु कर्म-सत्कर्म कां करीत नाहीं, माझ्या हातून पापकर्म कां घडतें, हा विचार त्यास त्रास देत नाहीं.

ह्या विचारानें विद्वानांच्या चित्तास क्षोभ होत नाहीं. ते ह्याविषयीं उदासीन असतात हें खरें. पण तुम्हांआम्हांपुढें, माझ्या हातून पुण्याचरण कां घडत नाहीं, पाप कां घडतें, हा विचार नेहमीं येत असतो. आपल्याला जर एखादा छंद असला, व्यसन असलें, तर मात्र हा विचार आपल्या मनांत येत नाहीं. आम्हांस संसार हा दुःखमय कां भासतो, जिकडे तिकडे त्रास क्लेश, पीडा कां दिसतात, ह्याचेंही उत्तर वरील दोन प्रश्नांत आहे. आपलें धन कसें वाढेल, बायकामुलें हीं सुखी कशीं होतील, आपला अधिकार, आपला मान कसा वाढेल ह्यांकडे आपलें सर्व लक्ष असतें. मुख्य प्रश्नांकडे आपलें लक्ष नसतें. ह्या सर्व व्याधी आहेत. ह्या सर्व वस्तू प्राप्तव्य आहेत. पण, आपल्या हातून पुण्य कां घडत नाहीं; आणि पाप कां घडतें ही चिंता आपल्याशीं अगदीं संलग्न आहे. ज्ञान काय, ऐश्वर्य काय, धन काय, संपत्ति काय ह्यांच्या प्राप्तीच्या योगें आपलेपणा वाढत नाहीं. आपलेपणाचा जो विचार आहे तो ह्या प्रश्नांत आहे. आपण अगदीं एकांतीं असलों म्हणजे ह्या ऐहिक धनाचा प्रश्न आपल्यापुढें सहसा येत नाहीं; किंवा आपलें मोठें नुकसान झालें, आपल्यावर मोठें संकट आलें म्हणजे अगदीं एकान्ताच्या व शांत अशा वेळीं एरव्हींचे तामस विचार आपल्या मनांत न येतां सात्विक विचार मनांत येतात. आणि ते सात्विक विचार ह्या दोन प्रश्नांसंबंधानेंच असतात. त्या वेळीं आपल्या मनांत अशी चिंता उत्पन्न होते कीं, माझ्या हातून हें असें विपरीत आचरण कां घडत असतें ? ह्या चिंतेचा व आपला निजसंबंध, निकट संबंध आहे. ती आपणांशीं अगदीं संलग्न आहे. बाकीच्या सर्व

गोष्टी उपाधि आहेत, हें पूर्वी सांगितलेंच. औषधानें रोग दूर होईल, बलानें आरोग्य वाढेल, धन, ऐश्वर्य असलें तर मनुष्य श्रीमान् होईल; हे सर्व आपण जिवाच्या व्याधीसाठीं करीत असतों. दिवसांतील चोवीसचेचोवीस तास आमचे ह्या व्याधीचे मागें लागलेले असतात. खरी जी चिंता ती आमच्या मनांत फार वेळ टिकत नाहीं. बेफाम झालेल्या मुलाला घरांतील वडील मनुष्य आपल्या पथ्यकर उपदेशानें त्याच्या दुराचरणापासून परावृत्त करीत असतां त्याला ज्याप्रमाणें तो उपदेश कडू वाटतो, त्याचप्रमाणें ही चिंता मोठी गुणकारी असूनही तिला आम्ही थारा देत नाहीं. ती चिंता मनांत बाळगल्यानें खरें सौख्य प्राप्त व्हावयाचें असें जरी आहे, तरी तिच्यापासून आम्ही होईल तितके दूर राहत असतों. ब्रह्म जाणण्यांत खरा मनुष्यधर्म आहे. ज्यानें ब्रह्म जाणिलें त्याला ह्या व्याधीपासून त्रास व्हावयाचा नाहीं. तो खरा विद्वान्, तो मुक्त झाला म्हणावयाचा.

ह्या उपनिषदाच्या सातव्या अनुवाकामध्यें ब्रह्माचें लक्षण असें सांगितलें आहे:—

**रसो वै सः। रस ९ ह्येवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति। को ह्येवान्यात्कः प्राण्यात्। यदेष आकाश आनन्दो न स्यात्। एष ह्येवाऽऽनन्दायति।...भीषाऽस्माद्वातः पवते। भीषोदेति सूर्यः। भीषास्मादग्निश्चेन्द्रश्च। मृत्युर्धावति पञ्चम इति।**

**भावार्थ:**— तो सर्व पदार्थांचा स्वाद आहे. त्या स्वादाची प्राप्ति झाली असतांच जीवात्मा आनंद पावतो; तो आनंदस्वरूप नसता, तर कोण प्राणी जीवंत राहूं शकता? तोच सर्वांस आनंदानें भरितो. त्याच्या भयामुळें वायु वाहातो, सूर्य उदय पावतो व इंद्र, अग्नि व मृत्यू हे आपापलीं कामें करितात.

ब्रह्म हें ह्या सर्व गोष्टींचा रस आहे. हा रस प्राप्त करून घेतला असतां आनंद होतो. ब्रह्मप्राप्तीचा रस जीवात्म्याला प्राप्त झाला असतां जीव आनंद पावतो. जर परमात्मा, कीं ज्याचा आपल्या सर्वांच्या आत्म्यांत वास आहे, आनंद नसता, तर आपले प्राण कसे राहिले असते? कोणाचे प्राण रक्षिले असतां, बालकाची अज्ञानपणाची चेष्टा पाहिली असतां, सारांश, पृथ्वींतील अनेक चेष्टा पाहिल्या असतां आपणांला आनंद कां होतो? तर ह्यांचा व त्या आनंदाचा परस्परकार्यकारणसंबंध आहे म्हणून. तो नुसता आनंद नसून आपणांस आनंदवीत असतो. मातेंतील आपल्या मुलाविषयींचें प्रेम त्या आनंदापासून प्राप्त झालेलें. मित्राची आपल्या मित्राविषयींची पूज्य बुद्धि त्यापासून झालेली. स्नेही, मित्रपरिवार, सारांश, आनंद उत्पन्न करणारे जेवढे संबंध ते सर्व त्याचे भाग आहेत. तो आनंदमय आहे, म्हणून ह्या सर्व ठिकाणीं आनंद आहे. पण, तो अदृष्ट आनंद आहे. झाडाला पानें — फुलें येतात, मुळें येतात, तें मोठें टवटवीत दिसतें तेव्हां त्या झाडाचें गौरव कोणी करीत नाहीं, फुलांचें करीत नाहीं, फळांचें करीत नाहीं, तर त्यांतील अदृष्ट रसाचें गौरव करीत असतात. रखरखीत प्रदेशांत, कीं जेथें आसपास पाणी नाहीं, दुसरें झाड नाहीं, पावसाचे दिवसही नाहींत, अशा वेळींसुद्धां जो अदृष्ट रस त्या झाडाला टवटवी आणीत असतो, त्याला पालवी आणितो, फुलें— फळें प्राप्त करून देतो त्या अदृष्ट रसाचें गौरव सर्व जन करीत असतात. वृक्षांतील अदृष्ट रसाप्रमाणेंच हा आनंद अदृष्ट आहे. तेव्हां असा जो हा परमात्मा त्याचें ऐश्वर्य, सामर्थ्य तरी किती, असा विचार येथें मनांत येण्याचा संभव आहे. हा कल्याण करणारा असून मोठा सामर्थ्यवान् आहे. वारा कसा कांपत असतो, सूर्य वेळच्या वेळीं कसा उगवतो, याचें कारण शास्त्राच्या दृष्टीनें कांहीं असो; धर्माच्या दृष्टीनें खरें कारण हें कीं, सूर्य त्याच्या भयानें वेळेवर उगवतो. वारा त्याच्या स्वरूपाला कांपत असतो. म्हणून सर्व ठिकाणीं वाहात असतो. त्याचें सामर्थ्य इतकें आहे कीं, मृत्यूदेखील त्याच्या भयानें धावत असतो.

मनुष्याचा आनंद जर एक धरिला, तर अशा शंभर मनुष्यांच्या आनंदाबरोबर एका गंधर्वाचा आनंद आहे. शंभर गंधर्वांच्या आनंदाबरोबर एका देवगंधर्वाचा आनंद. शंभर देवगंधर्वांच्या आनंदाबरोबर एका पितरांच्या देवाचा आनंद. अशी परंपरा लागून शेवटीं आनंदाचा आगर परमात्मा आहे. सारांश मिळून इतकाच कीं, त्या आनंदाची गणति करणें शक्य नाहीं. असा आनंद ज्या ठिकाणीं वसत आहे, त्या ठिकाणीं आल्यावर कशाचें भय नाहीं, भीति नाहीं. ज्याच्या ठायीं इतका आनंद आहे, तो सामर्थ्यवानही तसाच आहे.

आपण जीवंत असतांना थोरांशीं सहवास केला, त्यांचेच सान्निध्यांत नेहमीं राहिलों, त्यांचे आनंदांत आनंद मानिला, त्यांचे अनुरोधानेंच आपण चाललों, तर त्यांत आपल्याला भय नाहीं; आपल्या कल्याणाचा





तो एक मार्ग आहे. पूर्वीं सांगितलेला आनंद ज्यांस प्राप्त झाला असेल त्यांस माझ्या हातून पापाचरण कां घडतें, पुण्य कां घडत नाहीं, ह्या प्रश्नाची टोंचणी लागत नाहीं. ह्या प्रश्नाचीं उत्तरें अन्य द्वारें अन्य रीतीनें मिळतील, नाहीं असें नाहीं; पण खरें उत्तर वर सांगितल्याप्रमाणें आहे.

वास्तविक पाहिलें तर आम्ही साधु पुरुषांशीं संगच करीत नाहीं. आमचा स्नेह नेहमीं पापकल्पनांशीं फार असतो. पण, साधु पुरुषांशीं सहवास केल्यास शांति प्राप्त झाल्यावांचून राहात नाहीं. आपल्यांत व परमात्म्यांत अनंत समुद्राइतकें अंतर आहे. पण, साधु पुरुषांची गोष्ट तशी नाहीं. त्यांच्यांत व परमात्म्यांत फार अंतर नाहीं. संकल्पविकल्पांत पाप असतें. पण, ज्यांनीं परमात्मा सांठविला आहे, त्यांना दुसरा विषयच दिसत नाहीं. आपल्या ठायीं परमेश्वराविषयीं आवड कां होत नाहीं, परमेश्वरापासून आपण दूर दूर कां राहातों, ह्याचें उत्तर आपलें मनच देऊं शकेल. आपण आपल्या स्वतःशींच विचार करीत बसावें, म्हणजे वास्तविक स्थिति काय आहे ती आपणांस दिसून येईल. परमेश्वर आपला अंगीकार करावयास सिद्ध नाहीं, किंवा आपण परमेश्वरापाशीं अनन्य भावें जात असतांही आपला हिरमोड होतो, असा प्रकार अशा वेळीं आपणांस आढळावयाचा नाहीं. उलट, आपला व अन्य लोकांचा अनुभव असा आहे कीं, परमेश्वर नेहमीं हातांत प्रेमाचें भातुकें घेऊन उभा आहे. उभा आहे म्हणजे एखाद्या शिळेवर उभा आहे, असा भाग नव्हे. तर तो या सर्व ब्रह्मांडांत व्यापून राहिला आहे. तो वाटेल तेव्हां हातभार द्यावयास तयार आहे. तो आमचें कल्याण करावयास तत्पर आहे. आम्ही मात्र आपलें कल्याण करून घ्यावयास सिद्ध नाहीं. आपण आपल्या मातेची अवज्ञा करीत असतों. पित्याची अवज्ञा करीत असतों. आपणांस हितबोध सांगणाऱ्या आप्तांची अनेक वेळां अवज्ञा करीत असतों. आणि परमेश्वराची तर हरप्रसंगीं करीत असतों. असें आहे तरी परमेश्वर आपलें प्रेमाचें भातुकें घेऊन आपल्या सन्निध नेहमीं उभा आहे. आपल्याला सुख कसें प्राप्त होईल, आपल्यावरील संकटें कशीं दूर होतील, अशाविषयीं अतुल प्रेमानें परमेश्वराचे नेहमीं संकेत चाललेले असतात. परमेश्वराचें हें प्रेमस्वरूप आहे. उपनिषदांतील स्वरूप देखील हेंच आहे.

तेव्हां वास्तविक पाहिलें, तर आपण सर्व निजलेले आहों. आपणांस गाढ निद्रा लागली आहे. आपलें हित कशांत व अहित कशांत, हेंही आपणांस कळत नाहीं व घडोघडीं, पळोपळीं परमेश्वराची आपण जी अवज्ञा करीत असतों त्यामुळें त्याची व आपली भेट होत नाहीं व उलट आपण त्याचेपासून दूरदूर जात असतों, असें आपणांस वाटत असतें. म्हणून माझ्या हातून साधुकर्म कां घडत नाहीं, पापाचरणाकडेच ओढा कां, हा प्रश्न आपल्यासमोर सतत ठेवावा. हा प्रश्न नेहमीं आपल्यासमोर ठेवून त्यासंबंधानें विचार करणें हा जरी एक रोग आहे, ही जरी एक मोठी चिंता आहे, व्याधि आहे, तरी हा प्रश्न मोठें बल आहे. ह्याच्यांत मोठें सामर्थ्य आहे. ह्याचा सतत विचार निजकल्याणास कारण होणार आहे. म्हणून पुनःपुनः सांगावयाचें तें हेंच कीं, माझ्या हातून पापाचरण कां घडतें, साधुकर्म कां घडत नाहीं, हा विचार जरी सकृद्दर्शनीं आनंदकारी नसला, तरी त्यापासून आपलें खरें कल्याण होणार आहे. खरें कल्याण साधून देण्यास तोच एक उपाय, हें लक्षांत ठेवून तो विचार सतत आपल्यापुढें ठेवावा.



# मामेव विजानीह्येतदेवाहं मनुष्याय हिततमं मन्ये

मागील दोन प्रसंगीं पतिपत्नी, पितापुत्र ह्यांच्यांत पुरातन काळीं कोणत्या रीतीचे संवाद होत असत व त्यांपासून आपण काय बोध घ्यावा तें सांगितलें. आज कौषीतकि उपनिषदांतील एका प्रसंगासंबंधानें दोन शब्द सांगावयाचे आहेत.

हल्लीं चातुर्मास्य सुरू आहे, तेव्हां जिकडे तिकडे कथा, कीर्तनें, पुराणें चाललीं आहेत. कोठें भीमार्जुनांच्या कथा आपण ऐकतों, तर कोठें रामरावणांच्या कथा आढळतील; परंतु पुरातन काळचे जे खरे ऋषि त्यांच्या नांवांचा, कीर्तीचा जयघोष चाललेला आपण क्वचित् ऐकतों. ते जे पुरुष होऊन गेले त्यांचा कोठें मागमूस नाहीं, असा प्रकार हल्लीं झाला आहे. उपनिषदें जर आपण दूर केलीं, तर प्राचीन व अर्वाचीन ह्यांची एकवाक्यता न होतां धर्मविचारांची परंपरा मोडते. परंपरा मोडल्यानें फार नुकसान आहे. आपल्या पित्याची, प्रपित्याची परंपरा मोडली, तर त्यापासून एवढें नुकसान नाहीं. पण, धर्मविचारांची परंपरा मोडणें, हें फार चुकीचें आहे. असें केल्यानें आपण प्रवाहाला बांध घातल्यासारखें, किंवा नवीन सृष्टि उत्पन्न केल्यासारखें होणार आहे. शुद्ध परंपरा असतां, केवळ इकडील तिकडील वचनें घेऊन धर्माचें शुद्ध स्वरूप पाहण्यासाठीं याचना करण्यांत अर्थ नाहीं. तें इष्ट नाहीं, असें मी म्हणत नाहीं. परंतु तें असाध्य आहे. असें केल्यानें आपण आपला दुबळेपणा व्यक्त करणार आहों. उपनिषदांतील उन्नत विचारांची परंपरा जर कीर्तनांत, पुराणांत, मंदिरांत सुरू होईल, तर आज जीं दुष्ट विचारांचीं कीटें वाढलीं आहेत, तीं सहज नाहींशी होतील.

आज जी गोष्ट मला येथें सांगावयाची आहे तिचें रहस्य फार थोडें आहे. तें पांच शब्दांतसुद्धां सांगतां येईल. ह्या कौषीतकि उपनिषदांत प्रतर्दन राजाची एक कथा आहे. हा राजा काशीच्या राजाचा मुलगा.

संस्कृत मूळामध्यें कथा खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:

**प्रतर्दनो ह दैवोदासिरिन्द्रस्य प्रियं धामोपजगाम।**
**युद्धेन च पौरुषेण च तं हेन्द्र उवाच।**
**प्रतर्दन वरं ते ददानीति स होवाच प्रतर्दनः**
**त्वमेव मे वृणीष्व यं त्वं मनुष्याय हिततमं मन्यस इति तं हेन्द्र उवाच।**
**न वै वरोऽवरस्मै वृणीते त्वमेव वृणीष्वेत्येवमवरो वै किल म इति होवाच प्रतर्दनोऽथो खल्विन्द्रः सत्यादेव नेयाय।**
**सत्यं हीन्द्रः स होवाच।**
**मामेव विजानीह्येतदेवाहं मनुष्याय हिततमं मन्य।**

ह्या कथेवरून बौद्ध धर्माच्या पूर्वीं आपल्या येथें विचाराची दिशा कोणत्या बाजूला होती, तें कळण्यासारखें आहे. प्रतर्दन राजा हा मोठा पराक्रमी असून तो आपल्या पराक्रमाच्या जोरावर इंद्रपदीं गेला. तेथें गेल्यावर इंद्रानें त्यास वर मागण्यास सांगितलें. आपल्या येथेंही हल्लीं जे कांहीं संस्थानिक राहिलेले आहेत त्यांपैकीं गायकवाडांसारख्यांनीं जर आपणांस असाच वर मागावयास सांगितलें, तर आपण काय मागूं, ह्याचा विचार ज्याचा त्यानें करावा. आपण अशा प्रसंगीं काय मागूं ह्याचा अनुभव प्रत्येकास असला पाहिजे. आपण जर धर्मपरायण असलों, तर धर्मसंबंधानें कांहीं तरी वर मागूं. स्वार्थपरायण असलों, तर धनद्रव्य, घरदार, इनाम, जहागिरी असें कांहीं तरी मागूं. सारांश, मनुष्य गरीब अगर श्रीमंत असो; तो अशा प्रसंगीं कांहीं तरी वर मागितल्यावांचून राहणार नाहीं. पण, ह्या राजानें काय केलें पाहा. राजा म्हणाला, "इंद्रा, मी तुझ्याजवळ वर मागणार नाहीं. माझें कल्याण कशांत आहे, हें मी कांहीं जाणत नाहीं. तें तुलाच चांगल्या रीतीनें माहीत आहे. तेव्हां असें असून मीं वर मागणें, हें अन्यथा होणार आहे. कारण, माझा अधिकार मागण्याचा नाहीं. तूं जें देशील त्याचा स्वीकार करण्याचा आहे."

ह्यावर इंद्र म्हणाला, "हें असें कसें? कनिष्ठानें वरिष्ठापाशीं मागावयाचें; म्हणून तुला जें पाहिजे तें त्वां मागावें."

ह्यावर प्रतर्दन म्हणाला, "व्यवहारांत तसें असेल खरें. पण, मला वर नको आहे. माझें कल्याण कशांत

अनुक्रमणिका







आहे हें तुलाच माहीत असल्यामुळें तें तूंच केलें पाहिजे." नंतर इंद्र म्हणाला, "तूं म्हणतोस तेंच सत्य आहे. मनुष्याचें कल्याण देवानें करावयाचें; म्हणून तूं वर मागावयाचा नव्हे. तर आतां माझ्या समजुतीप्रमाणें मी तुला हाच वर देतों कीं, तूं मला जाण. मला जाणण्यापलीकडे तुझें कल्याण नाहीं." (येथें इंद्र ह्याचा अर्थ लाक्षणिक घ्यावयाचा.)

ही सगळी गोष्ट. हा सर्व प्रकार ऐकून तुमच्या-आमच्या सारख्यांला असें वाटतें कीं, ही मंडळी स्वर्गांतली होती. पण, असा कांहीं खरा प्रकार नाहीं. ज्या राजाची ही गोष्ट तो स्वर्गांतला नव्हता. तो तुमच्या-आमच्यासारखाच मनुष्य होता.

आतां, विचार करून पाहतां आपल्या असें दृष्टोत्पत्तीस येईल कीं, वास्तविक स्थितिदेखील अशीच आहे. पांच वर्षांच्या मुलाचें कल्याण कशांत आहे, हें त्या मुलाला कळत नसतें. तें त्याच्या आईला चांगल्या रीतीनें कळतें. आपण आपली आर्ति काय आहे ती सांगावी. तिचा उपाय सांगत बसूं नये. ज्यांच्या आश्रयीं आपण असूं त्यांच्यावरच आपण उपायासाठीं अवलंबून राहावें. आपले मित्र डॉ. आत्माराम ह्यांना रोग्यानें अमुक कारणापासून रोग झाला व त्याला अमुक उपाय बरा दिसतो, असें सांगणें आवडत नसे. ते म्हणत कीं, रोग्यानें आपला रोग सांगावा. त्याला उपाय काय तें पाहाणें आमचें काम आहे. आणि हेंच अगदीं खरें आहे. मनुष्याचें हित कशांत आहे तें त्याला न कळतां देवालाच कळणार. म्हणून मनुष्यानें तें आपणास कळतें, असें म्हणणें अन्यथा आहे. असो.

हा प्रतर्दन राजा गौतमबुद्धाच्या पूर्वीं अडीच हजार वर्षें होता, असा उल्लेख काशीखंडांत आढळतो. ह्या कथेवरून आपल्या भरतखंडांत बौद्धधर्माचा उदय होण्यापूर्वीं हिंदुधर्माचें कसें कसें रूपांतर होत गेलें तें कळण्यासारखें आहे.

ह्या प्रतर्दनाच्या काळापूर्वीं धार्मिक लोकांची प्रवृत्ति यज्ञयागादि कर्में करण्याकडे होती. असल्या यज्ञांस पशुवध वगैरे जे अवश्य असावयाचे त्यांविषयीं त्या वेळीं कांहीं विधिनिषेध मानण्यांत येत नसावा. परंतु ह्या राजाच्या काळीं व नंतर जें "प्रातर्दन संयमन" प्रचारांत आलें त्यामुळें लोकांचीं मनें ह्या यज्ञयागादि कृत्यांपासून परावृत्त होऊं लागलीं. कर्ममार्गाची योग्यता कमी कमी होऊं लागल्यामुळें ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग ह्यांच्याकडे लोकांची प्रवृत्ति होऊं लागली.

"प्रातर्दन संयमना" च्या योगें यज्ञयागांपासून लोक परावृत्त झाले, असें पूर्वीं म्हटलें आहे. पण, प्रातर्दन संयमन म्हणजे काय तें आतां पाहिलें पाहिजे. ह्या राजानें जो मार्ग स्वीकारिला होता त्यालाच प्रातर्दन संयमन म्हणत असत. पूर्वीं म्हटलेंच आहे कीं, ह्या राजाच्या पूर्वीं यज्ञयागाची व्याप्ति फार होती. ह्या यज्ञयागासाठीं हजारो बळी पडत असत. नंतर विचारजागृति होतां होतां प्रातर्दन मार्ग प्रसिद्ध होऊन, तो प्रचलित झाला. ह्या संयमनाची योग्यता फार मोठी आहे. अग्निहोत्रापासून जी फलप्राप्ति व्हावयाची ती ह्या प्रातर्दन संयमनापासून होते, असें त्या काळच्या विद्वानांस वाटत असे. व म्हणून ह्या संयमनाचा मार्ग स्वीकारून विद्वान् लोक यज्ञयागादि कृत्यें न करिते झाले.

आपल्या ठायीं कामक्रोधमदमत्सरादि जे दुर्गुण आहेत त्यांचें दमन जो करितो त्याला अग्निहोत्राचें फळ मिळतें. प्रतर्दन राजानें असेंच केलें. ह्याला आणखी साक्ष अशी कीं, पूर्वींचे विद्वान् लोक अग्निहोत्रापासून परावृत्त होऊन त्यांनी ह्या मार्गाचा स्वीकार केल्यानें तीच फलप्राप्ति होईल असें पाहून हा मार्ग धरिला. प्रातर्दन संयमनासारखा कांहींसा भाग आपल्या हल्लीं प्रचारांतसुद्धां आहे. जुन्या संप्रदायांतील जे लोक आहेत ते जेवणापूर्वीं वैश्वदेव करीत असतात. त्या वेळी नारायण उपनिषदांतील एक मंत्र म्हणत असतात, तो असा :

**तस्यैवंविदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धा पत्नी शरीरमिध्ममुरो वेदिर्लोमानि बर्हिर्वेदः शिखा हृदयं यूपः काम आज्यं मन्युः पशुस्तपोऽग्निर्दमः शमयिता दक्षिणा वाग्घोता प्राण उद्गाता चक्षुरध्वर्युर्मनो ब्रह्मा श्रोत्रमग्नीत्** । इत्यादी.

ह्या मंत्राचा साधारण अर्थ असा आहेः– आत्मा हाच कोणी यजमान; श्रद्धा ही पत्नी; कामक्रोध हे पशू; शरीर हें लांकूड; खावयाचें अन्न ती हवि; उदक जें प्राशन करावयाचें तो सोम. अशा रीतीनें जो आपलें आयुष्य घालवितो त्याला यज्ञयागादि कृत्यें केल्याचें श्रेय मिळतें.

परंतु पुढें कालांतरानें ह्या सर्व कृत्यांकडील प्रवृत्ति कमी कमी होत जाऊन, अग्निहोत्रादि कृत्यांचा

अनुक्रमणिका

तिरस्कार करणाऱ्या बौद्धधर्माचा जय झाला. ह्या धर्माची अग्निहोत्र वगैरे सर्व कृत्यांविषयीं नेहमीं पूर्ण उदासीनता असावयाची. अंतर्यामींचें स्थंडिल करण्याकडे ह्या धर्माची प्रवृत्ति. ह्या धर्माचा सगळा जोर जो आहे तो ह्यांत आहे. बौद्धधर्माचा ऱ्हास होऊन जरी पुन्हा हिंदुधर्म प्रस्थापित झाला, तरी पूर्वीचे ते यज्ञयागादि व्यवहार सर्व गळले. वर दर्शविलेलें अंतर्यामींच्या स्थंडिलाचें मत आपणांस अनुकूल आहे. अशा तऱ्हेचें स्थंडिल करण्याकडेच प्रत्येकाचें लक्ष असलें पाहिजे.

* *

# आत्मा परमात्म्याचा एक रश्मि आहे

**य आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः स सर्वा९श्च लोकानाप्नोति सर्वा९श्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति ह प्रजापतिरुवाच ॥ १ ॥**

जो आत्मा पापानें अलिप्त, जरारहित, मरणरहित, शोकरहित, भूक व तहान नसलेला, सत्यमनोरथ, सत्यसंकल्प असा आहे त्याचें अन्वेषण केलें पाहिजे. त्याचें ज्ञान करून घेण्याची इच्छा बाळगिली पाहिजे. जो त्या आत्म्यास शोधितो व त्याचें ज्ञान करून घेतो, त्याला सर्व लोकांची प्राप्ति व त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात, असें प्रजापति म्हणाला. हें वाक्य देवांचा राजा इंद्र व दैत्यांपैकीं विरोचन यांनीं ऐकिलें. तेव्हां तें काय आहे, त्याचा अर्थ काय तें जाणून घेण्यासाठीं ते प्रजापतीजवळ आले. पूर्वकालीं शिष्य होण्याचाही अधिकार आहे कीं नाहीं, तें पाहात असत. त्याप्रमाणें प्रजापतीनें त्यांस आपल्या येथें बत्तीस वर्षें राहावयास सांगितलें. ती पूर्ण झाल्यावर दोघांनींही प्रजापतीला आपला पूर्वोक्त प्रश्न विचारिला. त्यांच्या प्रश्नास प्रजापतीनें उत्तर दिलें कीं, जो आत्मा तुमच्या डोळयांत दिसतो, तो तो आत्मा. हें उत्तर एकून दोघांनींही विचार केला कीं, आपल्या डोळयांतील आत्मा आपणांस कसा दिसावा? तेव्हां गुरूंनीं आरशांत अथवा पाण्याच्या भांडयांत पाहावयास सांगितलें. त्या वेळीं ज्याला त्याला स्वतःची बाहुली मात्र दिसली. आंत पाहणाऱ्या व्यक्तीचा जसा पोशाख असेल, तसें प्रतिबिंब दिसावयाचें. इतकें सांगून प्रजापतीनें आपल्या दोघांही शिष्यांस जाण्यास सांगितलें. विरोचन आपल्या दैत्यांच्या मंडळांत गेल्यावर गुरूपासून शिकून आलेली विद्या सर्वांस सागूं लागला कीं, ह्या जगामध्यें शरीरच अलंकार इत्यादिकांनीं पूजा करण्यास योग्य आहे. शरीराचीच सेवा करावी. म्हणून जो देहाची पूजा व सेवा करितो त्याचे इष्ट मनोरथ सहज पूर्ण होतात.

परंतु इंद्राची स्थिति मात्र अशी झाली नाहीं. वाटेंत जातां जातां त्याला अनेक विचार सुचले कीं, जसें शरीरास चांगले दागिने घातले असतां प्रतिबिंबही चांगलें दिसतें, त्यास चांगलीं वस्त्रें नेसविलीं असतां प्रतिबिंबही चांगलीं वस्त्रें नेसविलेलें दिसतें, निर्मळ दिसतें, त्याचप्रमाणें शरीर आंधळें झालें असतां प्रतिबिंब आंधळें होईल. शरीराचे नाक, डोळे गळूं लागले, तर प्रतिबिंबाची तीच अवस्था होईल, शरीराचा नाश झाला असतांना प्रतिबिंबालाही तीच अवस्था प्राप्त होईल. मग असें असून प्रतिबिंबांत दिसणारा आत्मा हा विजर, विमृत्यू इत्यादि कसें? हीं विशेषणें ह्या आत्म्याला जुळत नाहींत. म्हणून त्याच पावलीं इंद्र गुरूकडे परत आला. व गुरूनें उपदेश केल्यानंतरचा आपला अनुभव त्यानें त्यांस सांगितला. गुरूला पूर्वींच वाटलें होतें कीं, जो ह्या दोहोंत मूढ असेल तो शांतपणें आपलें समाधान झालें असें मानून जाईल.

मग गुरूनें इंद्रास सांगितलें कीं, जो आत्मा स्वप्नांत क्रीडा करतो, तो तो आत्मा. त्या आत्म्याचा शरीराशीं कांहीं संबंध नसतो. हें ऐकून इंद्र परत जाऊं लागला. पण, त्याची तृप्ति झाली नव्हती. पुनः त्याला पूर्ववत् विचार सुचले. स्वप्नामध्यें नेहमीं चांगल्याच चेष्टा होतात असें कोठें आहे? चांगल्याही होतात आणि वाईटही होतात. तो प्राप्तव्य आत्मा तर विजरा, विमृत्यू इत्यादि असला पाहिजे. तेव्हां स्वप्नांत अनिष्ट क्रीडा करणारा तो हा आत्मा नसावा, असें त्याला

अनुक्रमणिका

वाटलें व तो परत गुरूकडे आला व त्यानें आपले विचार गुरूस सांगितले.

त्यावर प्रजापतीनें त्यास सांगितलें कीं, गाढ निद्रा लागल्यावर कसलीच आठवण राहात नाहीं व जागें झाल्यावर आपण निद्रित होतों असें वाटतें. तो, तो आत्मा. ह्या उपदेश ऐकूनही इंद्राचें समाधान झालें नाहीं. पुनः त्याला विचार सुचला कीं, आठवण राहात नाहीं; केली तरी होत नाहीं; ही स्थिति परावलंबी झाली. ती असली काय आणि नसली काय; व असा आत्मा सत्यसंकल्प, सत्यकाम इत्यादि कसा होईल ? तेव्हां इंद्राची स्वारी पुनः गुरूकडे परतली. त्यावर प्रजापतीस वाटलें कीं, ह्या शिष्याला सत्य जाणून घेण्याची खरी जिज्ञासा आहे. असें पाहून त्यानें त्यास आणखी पांच वर्षें राहावयास सांगितलें व नंतर उपदेश केला. तो असा कीं, ह्या सर्व लक्षणांत तुझी साहजिक स्थिति आहे. परंतु हें विसरून तूं शरीराला आपण समजतोस. तुला वाटतें कीं, डोळ्यानें सर्व कांहीं दिसतें, पण डोळ्यानें काय दिसतें ? डोळ्यानें कोण पाहतो ? डोळे हें साधन आहे. डोळे झांकूनही कांहीं गोष्टी दिसतात, त्या डोळे उघडूनही दिसावयाच्या नाहींत. तुला जरा, शोक वगैरे विकार होतात ते शरीराच्या योगें होत असतात. सूर्याचें तेज पाण्यावर पडून पाण्यास उष्णता देतें व त्याची वाफ होऊन ती सूर्याकडे जाते व पुनः वितळून पुनः पाण्यांत पडते. तसेंच आत्म्यांचा आधारभूत परमात्मा आहे. सर्वांचे आत्मे त्याचे रश्मि आहेत. तूं माझ्या रश्मीचा एक अंश आहेस, हें जाणून जेव्हां मजकडे येशील तेव्हां तूं धन्य होशील.

आतां, ह्या गोष्टीचें तात्पर्य काय ? इंद्र प्रजापतीजवळ अमुक एक वर्षें राहिला; त्याला प्रत्येक खेपेस अमुक वर्षें राहावें लागे, त्याला तीन वेळ परत जावें लागलें वगैरे गोष्टी एके बाजूस ठेविल्या तरी, ह्या सर्व कथेपासून आपणांस कांहीं बोध घेण्यासारखा आहे कीं नाहीं; कीं प्रजापति, इंद्र, विरोचन वगैरे पुरुष व त्यांच्या कथा आणि उपदेश हे सर्व पुरातन काळचे असें कल्पून सध्यांच्या काळीं त्यांपासून कांहीं हित नाहीं, असें मानावयाचें ? असें नव्हे. हल्लींच्या काळी प्रजापति आहेत, इंद्र आहेत, विरोचन आहेत व त्यांच्या अनुभवासारखा अनुभवही आपणांस कमी-अधिक मानानें येत आहे. प्रत्येकाच्या ठायीं सुष्ट कल्पना, सुष्ट संकल्प, दुष्ट कल्पना व दुष्ट संकल्प हे आहेतच. शरीराचें सुख, धनाची प्राप्ति, ऐषआरामाचीं साधनें प्राप्त करणें ही जी आपली वृत्ति असते ती विरोचनवृत्ति होय.

असें जरी आहे, तरी आपल्यांत सुविचार वृत्ति आहेच. वाईट कृत्यापासून परावृत्त करणारे विचाराचे अंकुर प्रसंगविशेषीं उत्पन्न होत असतातच. आपल्या अंतःकरणांतील देवभाग तो हाच. हा देवभाग जसजसा वाढेल तसतशी आपापली योग्यता जास्त होणार आहे. आपली योग्यता कितीही वाढली तरी अखेरीस प्रत्येक आत्मा परमात्म्याचा एक रश्मि आहे, हें जाणून त्याच्या संन्निध जाणारेच धन्य होतात, हें विसरूं नये.

* *

## सृष्टि, जीवात्मा व परमात्मा ह्यांचा संबंध : पिंडीं तें [1]ब्रह्मांडीं

**कां रे नाठविसी कृपाळु देवासी ।**
**पोषितो जगासी एकला तो ॥ १ ॥**
**बाळा दुधा कोण करितें उत्पत्ति ।**
**वाढवी श्रीपति सवें दोन्ही ॥ २ ॥**
**फुटती तरुवर उष्णकाळमासीं ।**
**जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥**
**तेणें तुझी काय नाहीं केली चिंता ।**
**राहें त्या अनंता आठवूनी ॥ ४ ॥**
**तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर ।**
**त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ५ ॥**

गेल्या व त्याच्या मागील आठवड्यांत विलायतेहून आलेल्या धर्मोपदेशकांचीं जीं सहा व्याख्यानें झालीं तीं

१. ता. ४ डिसेंबर १८९८ रोजी दिलेल्या ह्या व्याख्यानांत विलायतेहून आलेल्या ज्या धर्मोपदेशकांचा उल्लेख केला आहे ते डॉ. फेअरबर्न होत.

पुष्कळांनीं ऐकलीं असतील व वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेले त्यांचे सारांश वाचलेही असतील. पण, आपल्या ज्या मराठी पत्रांत ह्या व्याख्यानांचा सारांश म्हणून प्रसिद्ध झाला आहे अशीं एक-दोन पत्रें पाहण्यांत आलीं, त्यांवरून असें दिसतें कीं, विषयाचा कठीणपणा व विलक्षणपणा यांमुळें म्हणा, किंवा धर्मरहस्याचे तसे विचार आपल्या येथें विशेष प्रचलित नाहींत म्हणून म्हणा, भाषांतर बरोबर उतरलें नाहीं.

विलायतेहून आलेल्या धर्मोपदेशकांच्या पहिल्या व्याख्यानासंबंधानें आज येथें दोन शब्द बोलावयाचे आहेत. ह्या व्याख्यानांत बेकनाच्या Man is the interpriter of Nature ह्या वाक्याच्या आधारें उपदेशकांनीं विवेचन केलें. ह्या वाक्याचें जें भाषांतर केलें आहे त्यांत शब्दबोध मात्र आहे. नुसत्या शब्द-बोधानें अर्थबोध किंवा विचारबोध होत नाहीं. 'मनुष्य हा सृष्टिरूपी परभाषेचा अर्थबोध करून देणारा प्राणी आहे.' असें संकोचित केल्यानें अर्थबोध कांहींच होत नाहीं. सृष्टीची सार्थकता मनुष्याच्या योगें होत असते, असें म्हणण्यापेक्षां, मनुष्य हा सृष्टीच्या रहस्याची सार्थकता दाखवितो, असें म्हणणें चांगलें. हें होतें कसें ? सृष्टीला कांहीं तरी अर्थ आहे. ही सर्व घडामोड आपण पाहातों, स्वतः अवलोकन करितों, ह्यासंबंधानें विचार करितों त्या वेळीं आपल्या लक्षांत येतें कीं, सृष्टीची खरी सार्थकता मनुष्यच आहे. आपल्या भाषेंतच आपल्या लोकांत बोलावयाचें, तर हा विचार अश्रुत आहे. ह्यासंबंधानें उपनिषदांत वगैरे विचार केलेलाच नाहीं असें नाहीं, सध्या हा विचार अपरिचित आहे. तरीपण आपल्या साध्या व्यव-हारांतसुद्धां पिंडीं तें ब्रह्मांडीं, असें म्हणण्याचा प्रघात आहे. तुमच्यांत व आमच्यांत जें आहे तें विश्वांत आहे. विश्वांत असें कांहीं नाहीं, कीं ज्याचें प्रतिबिंब, किंवा छाया आपल्यांत नाहीं. उपनिषदांत तर ह्या विचाराचा अतिरेक आहे. तेथें प्रत्येक इंद्रियाला एकेक देवता समजून साम्य दाखविलें आहे.

मनुष्याविषयींचें ज्ञान सृष्टीच्या द्वारानें करून घ्यावयाचें नाहीं, तर मनुष्याच्या द्वारानें सृष्टीचें ज्ञान करून घ्यावयाचें. आपण जें डोळ्यांनीं पाहातों, तें काय पाहातों ? नाद, शीतलता, रंग हे कांहीं मनुष्य पाहात नाहीं, ऐकत नाहीं, तें काम कानांचें व डोळ्यांचें आहे. सृष्टीच्या अंतर्गत जें अधिकारी तत्त्व आहे त्याचा अनंतपट विस्तार होऊन त्या विभूतीची प्रतिभा आहे, तिला मनुष्य पाहातो; मनुष्य मनुष्याला पाहातो तें काय पाहातो ? तर आत्मा आत्म्याला पाहातो. जीवात्मा परमात्म्याला पाहातो. त्याचें तेज अवलोकावयाचें, त्याचा विस्तार, ऐश्वर्य पाहावयाचें हा खरा प्रकार. मनुष्याच्या द्वारानें परमेश्वराचें ज्ञान अशा रीतीनें करून घेऊन, मनुष्य हा आपल्या स्वरूपाला सार्थकता आणीत असतो. धर्माचें रहस्य हें आहे. पुष्कळ सांखळ्या आहेत. एकाला एक अशी जरी सांखळी अडकत गेली, तरी अखेरीस मनुष्याच्याच योगें शेवटली सांखळी अडकावयाची आहे.

आतां आपण " कां रे नाठविसी कृपाळु देवासी " हा जो साधुवर्य तुकारामांचा अभंग गाइला त्याचा तरी हाच बोध आहे. ज्या वेळीं तळ्यांतील, विहिरींतील सर्व जलसंचय आटून जातो, जिकडेतिकडे सर्व प्रदेश रखरखीत असतो, अशा वेळीं तरूंना पल्लव फुटत असतात; पण, मनुष्याविरहित जर ह्याकडे पाहिलें, तर चमत्काराच्या पलीकडे कांहीं दिसत नाहीं. सृष्टींतून हा सर्व चमत्कार पाहिला, तर गूढार्थ मनाला बरोबर पटत नाहीं. परंतु तें हृद्गत मनुष्याचें नांव मनांत आणितांच लक्षांत येतें. कारण, मनुष्याच्या ठिकाणीं ह्या रहस्याची सार्थकता आहे. त्याच्या द्वारानें आपणांस सर्व वैभव, सर्व ऐश्वर्य कळणार आहे. पहा ! ज्या वेळीं आपण दीनावस्थेंत असतों, संकटांत सांपडतों, त्या वेळीं आपल्या इष्टमित्रांस, आप्तांस दया येते; त्या वेळीं त्यांस दयेचा पाझर फुटून तीं आपल्या कामीं पडतात. आपण आजारी असलों, तर आपली शुश्रूषा करितात. ह्या ठिकाणीं चमत्काराशिवाय दुसरें ज्ञान आहे व तें अतिश्रेष्ठ आहे. ती मदत योग्य वेळीं येते. ह्यावरून असें ज्ञान होतें कीं, जो परमात्मा ह्या सृष्टींत अंतर्भूत व अंतर्हित आहे त्याच्या कृपेची मनुष्याच्या द्वारें साक्ष पटते. असा भाव लक्षांत आला, कीं कवीची उक्ति व धर्माचा उपदेश यांची एकवाक्यता होते.

त्याचप्रमाणें मातेच्या ठायीं योग्य काळीं कृपेचा पूर कशानें येतो ? तो प्रसंग तर असा असतो कीं; साहजिक तिला ह्या प्रसंगीं कृशता आलेली असते, अन्नसेवन योग्य रीतीनें होत नसतें. असें असून कृपेचा पूर येत असतो. ह्यासंबंधानें कोरडया शास्त्राच्या योगें आपलें समाधान होत नाहीं. अमुक प्रसंगीं, अमुक

ठिकाणीं मार्दव प्राप्त होतें वगैरे शास्त्राच्या चऱ्हाटानें समाधान व्हावें कसें ? आपल्याला तर उघडपणें दिसत असतें कीं, आकस्मिक रीतीनें कृपेचा पुरवठा आपणांस एका निराळयाच ठिकाणाहून होत असतो. व हें आपणांस मनुष्याच्या द्वारानें कळतें.

आपल्या देशांतील ग्रंथांत धर्मसंबंधानें तत्त्वज्ञान फार आहे. परंतु मनुष्य, सृष्टि व परमात्मा ह्यांच्यांत जी मोठी सांगड आहे ती आम्हांस साधलेली नाहीं. त्या परस्परांचा संबंध दाखविण्याचा प्रयत्न आपल्या येथें झालेला नाहीं. निरनिराळ्या मतवाद्यांनीं जीवात्मा व परमात्मा ह्यांच्या संबंधानें फारच विस्तृत विवेचन केलें आहे. सृष्टि, जीवात्मा व परमात्मा हें त्रिकूट आहे. ही गोष्ट अमान्य करितां यावयाची नाहीं. ह्या त्रिकुटाची सांगड पाश्चात्त्य तत्त्ववेत्त्यांनीं घातली आहे व आपण त्यांचेपासून ह्या संबंधाचें ज्ञान प्राप्त करून घेणें अत्यंत इष्ट आहे.

* *

# उन्नत धर्मविचारांचा होत असलेला [1]प्रसार

आजचा हा दिवस समाजस्थापना येथें झाली तो आहे. तेव्हां वार्षिकमानाप्रमाणें जेव्हां हा दिवस येतो तेव्हां आपल्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें गेल्या बारा महिन्यांत आपले हे विचार लोकांत किती फैलावले, व आपल्या स्वतःची वाढ झाली कीं पीछेहाट झाली, हें पाहावयाचें. ह्या दोन प्रश्नांपैकीं पहिल्याचें उत्तर आपल्या सभोंवतालची स्थिति पाहून आपण देऊं शकूं; परंतु दुसऱ्या प्रश्नासंबंधानें कोणी एक व्यक्ति उत्तर देऊं शकेल कीं नाहीं, ह्याचा संशय आहे; किंबहुना तें देतां यावयाचेंच नाहीं. ह्या गोष्टीचा विचार ज्याचा त्यानेंच आपल्या मनाशीं करणें आहे व ह्या अत्यंत गुप्त असल्याकारणानें त्यांचा विचार ज्याचा त्यानेंच केला पाहिजे, हें इष्ट आहे. स्वतःच्या आचरणाचे दोन प्रकार असतात. एक आपणास स्वतः आपलें आचरण माहीत असतें तो. दुसरा, लोक तें ज्या प्रकारचें आहे असें समजतात तो. ह्या संबंधानें लोक दुसऱ्याचें आचरण ताडतांना दांभिक अशासारख्या शब्दाची योजना करितात. ह्या शब्दाचा अर्थ फसवणारा असा आहे व त्यावरून जो मनुष्य आपलें अंतःस्थ आचरण एक ठेवून, लोकांत तें दुसऱ्या तऱ्हेचें आहे असा भास उत्पन्न करितो, तो दांभिक होय, ही त्याची व्याख्या झाली. परंतु माझ्या मतें जो दांभिक आहे तो इतर जनांस फारसा फसवीत नाहीं. कारण, त्याच्या आचरणानें भोंवतालच्या मंडळीचें विशेष नुकसान होत नाहीं. परंतु ह्या त्याच्या आचरणानें तो एक मोठा तोटा करितो, तो हाच कीं, आपणास आंतून जी स्फूर्ति होत असते तिच्याविरुद्ध तो वागतो व त्यामुळें स्वतः त्यास फार त्रास होतो. म्हणजे खरें पाहूं गेलें असतां, दांभिक मनुष्य आपल्या स्वतःलाच फसवितो, असें दिसून येईल. हा दंभ प्रत्येक धर्माच्या अनुयायांत दृष्टोत्पत्तीस येतो. धर्माच्या नांवानें किती लोक अगदीं अशुद्ध व गलिच्छ असें आचरण करितात, हें आपल्या नजरेस वरचेवर येतें. सारांश, ज्यास दंभानें जित केलें तो ह्या जगांत असून नसून सारखाच; त्याला ह्या अवनतींतून वर येण्यास मार्गच नाहीं. जिकडे पाहावें तिकडे अशा आचरणामुळें प्रत्येक व्यक्तीसमोर एक पडदा दृष्टीस पडतो. ह्यामुळें त्याचें अंतस्थ आचरण काय आहे तें समजत नाहीं. परंतु पूर्वी मीं म्हटल्याप्रमाणें, ह्या गोष्टींचा विचार ज्याचा त्यानेंच आपल्या मनाशीं केला पाहिजे. कारण, ह्या अत्यंत गुह्य गोष्टी होत.

आतां आपल्या सभोंवतालीं पाहिलें असतां ह्या गेल्या बारा महिन्यांत काय प्रकार झाला तें पाहूं. ह्या अवधींत फारच संतोषकारक जी एक गोष्ट घडून आली ती अमेरिकेंत भरलेलें धर्मसंसद ही होय. ह्या संसदेंत पृथ्वीवरील अस्तित्वांत असलेल्या सर्व धर्मांचे अनुयायी प्रतिनिधि ह्या नात्यानें गेले होते. ह्यासंबंधानें मुख्य गोष्ट ही कीं, तेथल्या लोकांत आपल्या धर्माविषयीं पराकाष्ठेचा अभिमान असल्यामुळें, पृथ्वीवरील दुसरे धर्म तुच्छ असे वाटतात; तरी सर्व धर्मांच्या अनुयायांस त्यांनीं प्रेमपूर्वक आमंत्रण केलें व त्याप्रमाणें तेथें ही

१. १८९४ सालीं मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या उत्सवाच्या मुख्य दिवशीं झालेलें व्याख्यान. **सं.**

मंडळी गेली ही कांहीं लहान आनंदाची गोष्ट नव्हे. सर्व धर्मांच्या अनुयायांनीं आपला मतभेद एकीकडे ठेवून, एकजुटीनें सर्व काम तडीस नेलें, इतकेंच नाहीं, तर जेव्हां जेव्हां भाषणें चालत होतीं तेव्हां तेव्हां कोणत्याही धर्माच्या वतीनें कां भाषण असेना, ह्या वेळेस सर्व मंडळी एकाग्र चित्तानें तें ऐकून घेऊन टाळयांचा गजर करीत होती. ही मोठचा महत्त्वाची गोष्ट आहे. आपल्या संस्थेसंबंधानें आनंद मानण्याची गोष्ट ही आहे कीं, बंगाल्यांतून बाबू प्रतापचंद्र मुझुमदार हे ह्या मताचे प्रतिनिधि म्हणून गेले होते व त्याचप्रमाणें येथूनही एक गृहस्थ (रा. रा. ब. भा. नगरकर) गेले होते. प्रतापचंद्र येथें आल्यावर त्यांनीं तेथें काय केलें यासंबंधाच्या त्यांच्या भाषणावरून आपणांस बरेंच कळून आलें आहे. ह्यासंबंधानें जी एक गोष्ट विशेष लक्षांत येते ती ही कीं, अमेरिकेंत, किंवा युरोपांत सर्व धर्मांचे लोक एकाच वेळीं व एकाच स्थळीं सांपडावयाची मोठी मुष्कील असतांना, त्या लोकांनीं मोठा धीर धरून सर्वांस पाचारण करून हें काम घडवून आणिलें. आपल्या देशाचें हें एक महद्भाग्य आहे कीं, कोणत्याही धर्माचा अनुयायी आपणांस सहज पाहावयास मिळतो. परंतु ह्या सर्वांचा, निदान सत्य काय आहे तें शिकण्यास, कधींच जमाव जमत नाहीं, ही मोठी खेदाची गोष्ट आहे. अशा दृष्टीनें ह्या संसदेचा विचार केला म्हणजे आपणांस त्या मंडळीनें एक कित्ताच घालून दिला आहे, असें लक्षांत येतें. अशा सभा वरचेवर झाल्यास सर्व धर्मांचें ऐक्य होण्यास फारसा वेळ लागेल, असें मला कधींच वाटत नाहीं; आणि ही जी सुरुवात झाली आहे, ती तरी देव घडवून आणितो अशाच कृत्यांपैकीं एक होय, असें मी समजतों. आपल्या ह्या संस्थेचाही सर्व धर्मांचें शक्य तितकें ऐक्य करण्याचाच मूळ कटाक्ष आहे. तेव्हां अर्थांत गेल्या बारा महिन्यांत ही संसद भरल्यामुळें आपल्यास आनंद मानण्यासारखी ही एक गोष्ट झाली. आनंद मानण्यास दुसरें कारण झालें तें हें कीं, पृथ्वींतून सर्व अशुद्ध प्रकार जावे ह्याबद्दल जी चळवळ झाली ती आपणांस पाहावयास सांपडली. ज्याप्रमाणें समुद्राची एखादी लाट येऊन किनाऱ्यावर आपटते, त्याप्रमाणें एक मोठी लाट येऊन सर्व देशावर आपटली. अफू खाणें, गांजा ओढणें, भांग पिणें वगैरे प्रकार फारच निंद्य व अनिष्टकारक आहेत, असें शब्दोशब्दीं बरेच दिवस चाललें होतें. परंतु त्यास सार्वजनिक व महत्त्वाचें असें स्वरूप गेल्या बारा महिन्यांतच आलें. ह्यासंबंधानें चळवळ करण्यास जी एक मोठी लाट विलायतेहून निघाली ती हिंदुस्थानावर आपटली व येथून चीन, जपान वगैरे देशांवर जाऊन परत गेली. ह्यासंबंधानें हितकारक असें निष्पन्न काय झालें, हा भाग निराळा. परंतु धर्माच्या नांवाखालीं मोडणाऱ्या ह्या दुष्ट चाली जाव्या ह्यासंबंधानें लोकांचें लक्ष बरेंचसें ओढलें, ही लहानसहान गोष्ट नाहीं. मी म्हणतों ही गोष्टही देवाच्याच प्रसादाची खूण आहे. आपलें सर्वांचें मत ह्या निंद्य कृत्यांविरुद्धच असल्यामुळें, ह्या बारा महिन्यांत ही एक आपणांस आनंद मानण्यासारखीच गोष्ट झाली. तिसरें आनंद मानण्यासारखें एक कार्य झालें व त्याचा आपणांशीं निकट संबंध आहे. तें हें कीं, आज बऱ्याच वर्षांपासून येथें एक मंडळी आलेली आहे व ती आपल्या मतांचा प्रसार करण्यासाठीं फारच झटत असते. ह्या मतांचा प्रसार आणखी जारीनें चालावा एतदर्थ एक वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध बाई एथें नुकत्याच येऊन गेल्या. ह्या बाईंनीं आपल्या देशांत ठिकठिकाणीं मिळून सुमारें शंभर व्याख्यानें दिलीं. **ब्रह्मविद्या** ह्या विषयावर त्या पुण्यास बोलल्यावर माझे एक मित्र, मला वाटतें रा. रा. बाळ गंगाधर टिळक, ह्यांनीं त्या बाईंस प्रश्न केला कीं, "काय हो ! तुम्ही तर आम्हांस ब्राह्मसमाजाच्या मतांचाच उपदेश करितां हें कसें ?" बाई म्हणाल्या, "तें कांहीं असो; पण, मी सांगतें तेंच खरें."

त्यांच्या भाषणांतून इतर कांहीं भाग गाळून जर आपण पाहिलें, तर असें स्पष्ट दिसून येतें कीं, त्याही (अप्रत्यक्षपणें) आपल्याच मतांचा प्रसार करीत आहेत. प्रत्येक धर्मांत जें ग्राह्य असेल तें घेऊन आपला धर्म रचावा व तदनुसार आपलें वर्तन करावें, हें त्या बाई सांगत होत्या. आतां ह्याच गोष्टीसंबंधानें विचार केल्यास आपणांस मोठें समाधान मानण्यास जागा आहे, असें दिसून येईल. तेव्हां ही तिसरी गोष्ट आपणांस आनंद मानण्यासारखी ह्या बारा महिन्यांत घडून आली. कांहीं प्रसंगीं आपल्यास दुःख वाटण्यासारखींही कांहीं कारणें झालीं आहेत; परंतु ह्यामुळें आपल्या मनाचें स्वास्थ्य डगमगूं न देतां, आपले परिश्रम अव्याहत रीतीनें असे पुढें चालविले पाहिजेत. मनांत उदासीनता ठेवूं नये. आपणांस अद्याप ह्या नाना तऱ्हांच्या धर्मरूपी खाचरांचे बांध फोडावयाचे आहेत. जो तो आपल्या धर्मरूपी शेताचा बांध आपल्या

शेजाऱ्याच्या बांधावर वाढवूं पाहातो. कोणी आपला बांध दुसऱ्याच्या शेतांत घालून त्याच्या शेतांतील जागा आपल्या शेतांत घेऊन, आपलें शेत वाढवितो. सारांश, जिकडे तिकडे आपला धर्म चांगला व तो दुसऱ्यानें घ्यावा, असा धंदा चालला आहे. परंतु आपलें कर्तव्य हे मधील सर्व बांध फोडून, एक मोठें शेत तयार करून, प्रत्येक शेतांतील तण व कांटेरी झाडें काढून टाकावीं, हेंच आहे. ह्या ज्या मीं मघाशीं तीन आनंद मानण्यासारख्या गोष्टी सांगितल्या त्या तरी आपणांस हेंच सांगतात कीं, ईश्वराचा हेतु हाच आहे कीं, अंतस्थ पाझर फुटून हे सर्व बांध स्वयमेव वितळावे व जेथें तेथें चढाओढ बंद होऊन शांतता व्हावी. एकमेकांच्या मनांतील ग्रंथि सुटून सर्वांनीं मोकळ्या मनानें वागावें. धर्मांतर न करितां सर्व धर्मांतून चांगलें तेंच घ्यावें. हाच श्रेयस्कर मार्ग होय व हाच ईश्वरास पसंत आहे. आपलेही त्याच संबंधानें श्रम चालले आहेत, तेच सदोदित चालवावे, हें आपलें कर्तव्य होय.

* *

# शुद्ध धर्मप्रसारक संस्थांची एकजूट[1]

कृपाळु म्हणोनि बोलती पुराणें ।
निर्धार वचनें यांचीं मज ॥ १ ॥
आणीक उपाय नेणेंचि मी कांहीं ।
तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥ २ ॥
न ये धड कांहीं बोलतां वचन ।
रिघालों शरण सर्वभावें ॥ ३ ॥
कृपा करिसी तरी थोडें तुज काम ।
माझा तरी श्रम बहु हरे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज दाखवीं श्रीमुख ।
हरेल या भूक डोळियांची ॥ ५ ॥

* *

अशक्य तों तुम्हां नाहीं नारायणा ।
निर्जीवा चेतना आणावया ॥ १ ॥
मागें काय जाणों स्वामीचे पवाडे ।
आतां कां रोकडे दावूं नये ॥ २ ॥
थोर भाग्य आम्ही समर्थाचे कासे ।
म्हणवितों दास काय थोडें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझे निववावे डोळे ।
दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ४ ॥

वरील दुसऱ्या अभंगासंबंधाची कथा अशी आहे कीं, कोणा एका बाईचें मूल मेलें असतां तें जीवंत करण्याविषयीं तिनें तुकोबास विनंति केली व नंतर तुकोबांनीं वरील अभंग म्हटला. ही अशी कथा आहे. आपल्याला आंतील अर्थाकडे लक्ष द्यावयाचें आहे.

आज हा समाज स्थापन झाल्याला बत्तीस वर्षें पूर्ण झालीं याची आजचा दिवस खूण आहे. ह्यापेक्षां विशेष चांगल्या रीतीनें आजचा उत्सव पार पडावयास पाहिजे होता. पण, सर्व मंडळी सुस्थितींत नसल्यामुळें आजच्या दिवसावरच कार्य भागवून घ्यावें लागत आहे. ज्यांनीं या प्रांतीं समाज स्थापन केला त्यांच्यापैकीं दहा-बारा आज जीवमान आहेत. जुनी मंडळी गेली, कांहीं नवीन आंत आली. ह्याप्रमाणें आज बत्तीस वर्षें ही संस्था चालली आहे. विशेष उत्साहानें आजचा दिवस पार पाडण्यासारखी लोकांच्या मनाची स्थिति नाहीं, आणि तें शक्य व इष्टही नाहीं. प्रथम माझा असा विचार होता कीं, आजच्या प्रसंगीं आपल्या या समाजाचें पाऊल पुढें पडत नाहीं, असें जें आपणांस वाटतें, त्यासंबंधानें कांहीं सांगावें. पण, तसें आज सांगून कांहीं विशेष फायदा व्हावयाचा नाहीं. म्हणून या समाजाच्या मतांचा किंवा धर्माचा इतरत्र कसा प्रसार होत आहे, ह्याविषयीं थोडीशी माहिती आज येथें द्यावी असा विचार आहे. दरसाल कांहीं कारणानें जो प्रवास करण्याचा प्रसंग येत असतो त्यामुळें प्रत्येक पांच वर्षांनीं सगळ्या हिंदुस्थानभर मला फिरावयास सांपडतें व त्यामुळें ह्या मतांचा इतरत्र कसा फैलाव होत आहे तें दिसतें. आपल्या इकडल्या सर्व लोकांत ती सर्व माहिती असणें शक्य नाहीं.

ही हकीकत सांगतांना आर्यसमाज, ब्राह्मसमाज

1. १८९९ सालीं मुंबईच्या प्रार्थनासमाजांत झालेलें व्याख्यान. सं.

अनुक्रमणिका

अगर प्रार्थनासमाज अशा व्यक्तिविषयक संस्थांची ती न सांगतां, प्रचलित असलेल्या धर्माला आपलें पूर्वीचें जें शुद्धतम स्वरूप तें प्राप्त करून देण्याविषयीं ज्यांचे प्रयत्न चालले आहेत अशा संस्थांचीं हकीकत मी सांगणार आहे. पूर्वीच्या शुद्धतम अशा धर्माच्या स्वरूपास अनेक उपाधींच्या योगें हल्लीं काळिमा आला आहे. तो धुऊन टाकण्याविषयीं ज्यांचा प्रयत्न चालला आहे अशा संस्थांची गेल्या एक वर्षातील हकीकत पुढें ठेवावी, असा विचार आहे.

कलकत्त्यास जो ब्राह्मसमाज आहे त्याच्या तीन शाखा झाल्या आहेत : आदिसमाज, नवविधान व साधारण ब्राह्मसमाज. त्यांपैकीं आदिसमाजाचे प्रमुख व महर्षिपदाला योग्य असे जे महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर ह्यांनीं आर्य व ब्राह्मसमाज ह्यांच्यांत जो ऐक्यभाव दिसत नाहीं तो नाहींसा व्हावा, व प्रेमभाव उत्पन्न होऊन शक्य असेल तितकें दोघांनीं एकत्र व्हावें, परस्परांनीं परस्परांचीं पुस्तकें वाचावीं, एकोप्यानें वागावें, अशासाठीं प्रयत्न करण्याविषयीं आपला नातू बलेंद्रनाथ ठाकूर ह्यांस सांगितलें. महर्षि देवेंद्रनाथांस हल्लीं डोळ्यांनीं कांहीं दिसत नाहीं व कानांनींही कांहीं ऐकू येत नाहीं. त्यांच्या डोळ्यांतून नेहमीं अश्रूंचा प्रवाह चाललेला असतो. हे आनंदाश्रू असतात. ह्यांना दुःखाचा स्पर्श होण्याचा कांहीं संभवच नाहीं. ईश्वराच्या दयेनें ते सर्व बाजूंनीं चांगल्या स्थितींत आहेत. परंतु विश्वांतील शांत, गंभीर, शुभ, अनंत तेजाचा त्यांच्या चित्प्रभेंत प्रकाश होतो, तेव्हां त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहात असतात. अशी या महर्षींची योग्यता आहे.

आपल्या आजोबांची ही इच्छा मनांत बिंबल्यावर बाबू बलेंद्रनाथ यांनीं प्रथम आर्यसमाजसंबंधाचीं जीं पुस्तकें आहेत त्यांचें चांगल्या रीतीनें अध्ययन केलें. लाहोरास ते दोन वेळा गेले. सहा महिन्यांपूर्वीं एकदा तेथें गेले होते त्या वेळीं त्यांचीं तेथें व्याख्यानें झालीं, त्यांचा तेथील लोकांनीं उत्तम रीतीनें आदरसत्कार केला व त्यांनीं आरंभिलेला उद्योग अत्यंत इष्ट आहे, असें तेथें दिसून आलें. हल्लीं बलेंद्रबाबू[1] लाहोर येथेंच आहेत. पंजाबांतील आर्यसमाजाची सर्व मंडळी एक आहे असें नाहीं. त्यांच्यांतही फाटाफूट झालेली आहे. व हल्लीं दोन मोठे पक्ष झाले आहेत. एक पक्ष मांसाशन न करणारा व दुसरा त्याविषयीं उदासीन असा. ह्या दोन्ही पक्षांतील लोक परस्परांची नेहमीं अतिशय निंदा करीत असतात, ती इतकी कीं, त्या बाजूचीं पत्रें वाचणाराला त्या उखाळ्यापाखाळ्यांचा अगदीं वीट येतो. पण, विशेष लक्षांत घेण्याची गोष्ट ही कीं, बलेंद्रबाबू लाहोरास होते तेव्हां परस्परांतील दुजाभाव व वैमनस्य एके बाजूस ठेवून बलेंद्रांच्या व्याख्यानांसंबंधानें दोन्ही पक्षांनीं सारखा उत्साह दाखविला.

इकडे कलकत्त्यास देखील असाच कांहीं प्रकार चालला आहे. देवेंद्रनाथांच्या समाजांत राममोहनरायां-पासून अशी वहिवाट चालत आली आहे कीं, त्यांचे गायक ठरींव असतात. त्याचप्रमाणें धर्मपुस्तकांतील वचनांचें वाचन करणारेही ठरींवच असतात. ह्यांमध्यें बाहेरच्यांस मिसळूं द्यावयाचें नाहीं, अशी तेथील आजपर्यंतची वहिवाट होती. परंतु बलेंद्रबाबू जें सांगत आहेत त्यांत सत्यांश किती आहे तें पाहाण्यासाठीं विश्वेश्वरानंद व दुसरे एक ब्रह्मचारी गृहस्थ कांहीं दिवसांपूर्वीं कलकत्त्याच्या आदिसमाजांत गेले होते. त्या वेळीं आपल्या त्या प्रिय व सन्माननीय स्थानीं ह्या दोन्ही गृहस्थांस बसण्याचा अधिकार आदिसमाजानें दिला.

ब्राह्मसमाज व आर्यसमाज ह्यांची सर्व बाजूंनीं एकवाक्यता होईल तेव्हां होवो. आज तें सर्व शक्य दिसत नाहीं. परंतु परमेश्वराचें एकत्र भजन करावयाचें, सर्वांनीं एकत्र होऊन अनेक कार्यें करावयाचीं, हें मात्र आज सहज होण्यासारखें आहे. त्यांचा उद्योग मोठ्या आस्थेनें आणि कळकळीनें चालला आहे. एकंदर हिंदू समाजामध्यें ब्राह्म, प्रार्थना, किंवा आर्य-समाजाची मंडळी हजारो किंवा लाखो जरी झाली, तरी ती थोडीच आहे. तेव्हां अशा मंडळींत शाखा आणि उपशाखा असणें योग्य नव्हे. आपल्या या प्रांतींसुद्धां अशा तऱ्हेचा प्रयत्न मागें एकदा झाला होता. पण, त्यांत अडचणी येऊन त्या वेळीं तो प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां कलकत्त्यास अशा रीतीचा प्रयत्न करण्याची ईश्वरी प्रेरणाच महर्षि देवेंद्रनाथांस

१. हे बलेंद्रबाबू नंतर थोड्याच दिवसांनीं परलोकवासी झाले, त्या वेळीं पंजाबांतील आर्यसमाजाच्या मंडळीस फारच वाईट वाटलें. सं०



अनुक्रमणिका

झाली, असें मी म्हणतों. तेथें बाबू प्रतापचंद्र, पंडित शिवनाथशास्त्री वगैरे मंडळी आहे; पण, या अशा कामास एकटे देवेंद्रनाथच योग्य आहेत. दुसरे हे दोघे गृहस्थ थोर आहेत, विद्वान् आहेत; पण, त्यांच्या हातून हें काम झालें नसतें. आपल्या ह्या प्रांतीं चिंतामणराव भटांचे मनांत हा विचार नेहमीं फार घोळत असे व त्यांच्या हातून बरेंच कार्यही झालें असतें; पण, त्यांचा ह्या लोकांतून दुर्दैवानें उठाव झाला. पुनः पुढेंमागें हा प्रयत्न येथें सुरू होईल. परंतु जोंपर्यंत आमच्यांत आपल्या शुद्धतम धर्ममतांविषयीं अभिमान नसेल व इतरांचा विटाळ सहन करावयाचा नाहीं अशी बुद्धी जोंपर्यंत असेल, तोंपर्यंत धर्मांत पाऊल पुढें पडावयाचें नाहीं.

कलकत्त्याहून आलेल्या माझ्या कांहीं मित्रांनीं सांगितलें कीं, यंदा तेथील तिन्ही समाजांचे उत्सव फार चांगल्या रीतीनें पार पडले. म्हणजे या समाजानें त्या समाजाच्या उत्सवास जाणें, असा प्रकार सहसा होत नसे, तो यंदा झाला. आणखी कांहीं कामें तिन्ही समाजांतील प्रमुख प्रमुख मंडळी एकत्र होऊन करण्याकडे तिकडे कल दिसत आहे. गुदस्ता तेथें प्लेगचा उद्भव जेव्हां झाला त्या वेळीं तिन्ही समाज मिळून एक कमिटी नेमण्यांत आली व सगळ्या ब्राह्मसमाजासाठीं म्हणून काम करावयाचें, अमुक एक विवक्षित समाजासाठीं नाहीं, असें ठरलें; त्याचप्रमाणें मँचेस्टर कॉलेजमध्यें पाठविण्यासाठीं विद्यार्थ्यांची जी निवडणूक दरसाल होत असते ती करण्याचें देखील अशाच एका कमिटीकडे सोपविण्यांत आलें आहे. सारांश, कांहीं कांहीं कार्यांसाठीं एकत्र होण्याचा कल दिवसेंदिवस तेथें जास्त होत चालला आहे. पंजाबांतील आर्यसमाजानें आणखी एक चांगला उद्योग आरंभिला आहे. हा उद्योग म्हणजे गुरुकुलाची स्थापना. आपल्याकडे वल्लभाचार्यांचे जे अनुयायी ते सर्व ज्याप्रमाणें ब्रह्मचारी असतात व गुरुपदास पावतात, त्याचप्रमाणें पंजाबांत नानक वंशांतल्या लोकांकडे कांहीं विशेष हक्क असतात. वल्लभाचार्यांचे अनुयायी विषयी असतात. पंजाबांतील गुरुकुलांतील लोक उदासीन असतात. हें गुरुकुल, शीख लोकांच्या जुन्या रीतीप्रमाणें स्थापावयाचें, असा आर्यसमाजाचा विचार नाहीं. त्या समाजाचा अनुभव असा आहे कीं, कांहीं व्रतस्थ उपदेशक ब्रह्मचारी असल्यावांचून धर्मप्रचाराचें काम चांगल्या रीतीनें होणें शक्य नाहीं. आपल्याइकडे सेंट् झेविअरची मंडळी ज्याप्रमाणें सर्व कामांस उपयोगी पडतात त्याचप्रमाणें एकदा गुरुकुलाची स्थापना केली, म्हणजे निरनिराळीं कामें करावयास माणसांची वाण पडावयाची नाहीं. म्हणून ह्या गुरुकुलाच्या स्थापनेचा विचार आर्यसमाजाची एक शाखा तेथें मोठ्या झपाट्यानें करीत आहे. गुरुकुलाच्या स्थापनेच्या विचाराच्या पूर्वीं एका पक्षानें थोडे थोडे पैसे जमवून तीन लाख रुपये जमविले. पण, त्यांचा उपयोग न होतां दयानंदशाळा स्थापन करण्याचें काम मागें पडलें होतें, तें काम आतां दुसऱ्या पक्षानें घेतलें आहे. तेथेंही उपदेशक धर्मप्रचारक तयार व्हावयाचे आहेत. आपल्याला ह्या दोन्ही संस्था हव्या आहेत. कारण, त्यांपासून झालें तर हितच होणार आहे.

मद्रासकडे आपल्यानंतर ही चळवळ सुरू झाली व साधारणपणें दहा ठिकाणीं तेथें समाजांची स्थापना झाली आहे. तेथें स्थापना जरी मागाहून झाली, तरी तेथील मंडळी आपल्यापेक्षां जास्त कळकळीनें व आस्थेनें कामें करीत असतात; म्हणून येथल्यापेक्षां तेथील समाज अधिक जोरावर आहेत, असा माझा अनुभव आहे.

आजच्या दिवशीं ही सर्व हकीकत आपणांस निवेदन करण्यांत माझा उद्देश हा कीं, ही संस्था कमजोर आहे, तींत बळ नाहीं, ती लंगडी आहे, ह्या म्हणण्यांत अर्थ नाहीं, हें दाखवावें. संस्था बलवान आहे, तिचा दिवसेंदिवस जयच होत आहे. आपल्या ह्या प्रांतीं जर तशी चांगली समाधानकारक स्थिति नसली, तर हा दोष संस्थेचा नाहीं. आपल्यामागें ज्या उपाधी आहेत त्यांमुळें तसें असेल.



# आपल्या लोकांमध्यें धर्मविचार निद्रित झाला आहे काय ?

**पाळिलों पोषिलों सर्व जन्मवरी ।**
**वागविलों करी धरोनियां ॥ १ ॥**
**आतां काय माझा घडेल अव्हेर ।**
**मागें बहु दूर वागविलें ॥ २ ॥**
**नेदी वारा अंगीं लागो आघाताचा ।**
**घेतला ठायींचा भार माथां ॥ ३ ॥**
**तुका म्हणे बोल करितों आवडी ।**
**अवीट तेचि गोडी अंतरींची ॥ ४ ॥**

परमेश्वरानें आपलें रक्षण केलें, पोषण केलें व लालन केलें, तो संकटाचे वेळीं आपणास सोडून जाणार नाहीं व हाताला धरून योग्य मार्गास लावील, असें जें साधु तुकारामबावांनीं म्हटलें आहे, तें अगदीं यथार्थ आहे. तुकारामांनीं ज्या काळीं या वचनाचा उच्चार केला त्या काळीं तें खरें होतें व आतां त्याची सत्यता कमी झाली आहे असें नाहीं. तुकारामबावांची उक्ति पूर्वीच्या काळीं जशी लागू होती, तशी ती आतांही लागू आहे व तिची सत्यता किमपिही कमी झालेली नाहीं. या हिंदुस्थानच्या पुरातन लोकांवर जेव्हां जेव्हां धर्मसंबंधीं संकटें आलीं, म्हणजे धर्माची अव्यवस्था जेव्हां जेव्हां झाली, तेव्हां तेव्हां जर परमेश्वरानें थोर थोर साधु पुरुषांच्या करवीं ती अव्यवस्था मोडून आपलें रक्षण केलें आहे, तर हल्लींच्या काळीं तो परमेश्वर आपणांस सोडून चालता झाला व आपली त्यास कांहीं काळजी वाटत नाहीं, असें मानणें चुकीचें आहे. कलियुगाचा हा काळ, या वेळीं सर्व अव्यवस्था व अनाचार व्हावयाचाच, अशी दृढ समजूत करून घेऊन केवळ उदासीन होण्याचें कारण नाहीं. सूक्ष्म रीतीनें अवलोकन करणारांना, सर्व देशभर धर्म व आचारसंबंधीं विचारांचा, संकल्पांचा व अल्पस्वल्प रीतीनें त्या संकल्पांच्या आचरणाचा जो अंकुर दृष्टीस पडतो, त्यावरून आमचा धर्मरूप वृक्ष अगदीं खुरटून गेला आहे, त्याला वाढ नाहीं व त्यांत कांहीं शक्ति राहिलेली नाहीं, अशी निराशा वाटण्याचें कांहीं कारण नाहीं, असें दिसून येईल. झाडाची बाहेरची साल अगदीं वाळून गेलेली व निर्जीव अशी आपणांस दिसते व हें झाड केवळ वठून गेलेलें असावें व सर्पणाच्या पलीकडे याचा कांहीं उपयोग होणार नाहीं अशी वर वर पाहतांना समजूत होते; परंतु वरच्या सालीचा ढलपा उकलून आंत काय कृति चालली आहे, हें जर आपण पाहिलें, तर आंतील गाभ्यास तेज, रस व जीवन मिळत आहे व वृक्षाची वृद्धिच होत आहे, असें आपणांस कळून येईल व केवळ वर वर पाहण्यानें होणारी निराशा दूर होऊन मनास धीर वाटेल. आपणांपैकीं पुष्कळांना ही गोष्ट वर्तमानपत्राद्वारें समजलेली असेल कीं, मद्रासकडे यासंबंधाचे विचार सुरू आहेत व कांहीं क्रियाही घडत आहेत. हल्लींच्या काळास अनुरूप, देशास हितावह, ज्ञानसंग्रहास जरूर असा परद्वीपचा प्रवास करून येणाऱ्यांची अवहेलना न होतां त्यांचा संग्रह समाजांत व्हावा, अशा प्रकारचा विचार निघून श्रृंगेरी मठाचे स्वामी जे त्या प्रांतांत मुख्य धर्माध्यक्ष आहेत, त्यांची संमतीही या कृत्यास मिळण्याची खटपट झाली व बऱ्याच अंशांनीं त्यांची मान्यताही मिळाली आहे. या विचारापेक्षां दुसऱ्या एका विचाराच्या संबंधानें तिकडच्या लोकांनीं पुढें पाऊल टाकिलें आहे. तो विचार असा कीं, ज्यांच्या मातापितरांना परद्वीपांत जावें लागल्यानें, किंवा अशाच कांहीं दुसऱ्या कारणांनीं परधर्म स्वीकारावा लागला व त्यांच्या संततीस जर पूर्वीच्या आपल्या म्हणजे हिंदू धर्मांत यावेंसें वाटलें, तर त्यांचाही संग्रह आपल्या धर्मांत करून घेण्याची सोय असावी, याविषयींही धर्मगुरूंची संमति मिळविण्याचा यत्न झाला आहे. ज्या ठिकाणचीं मूळचीं धर्मबंधनें आपल्या प्रांतापेक्षां कमी शिथिल झालेलीं आहेत अशा मद्रास प्रांतांत हे विचार सुरू आहेत, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. बंगाल व उत्तर हिंदुस्थान या प्रांतांतूनही असे विचार सुरू आहेत. परंतु त्या सर्व ठिकाणची माहिती येथें सांगूं लागलों तर विस्तार होईल. आपल्या प्रांतांतही अशा प्रकारचे विचार चालू नाहींत असें नाहीं. जातिभेदाचे ज्या प्रांतांत अतिशय निर्बंध व जातीच्या पोटजाती व पोटजातींच्या पोटजाती होऊन संकुचित समुदायाची एक जात असे प्रकार जेथें झालेले आहेत, त्या गुजराथ प्रांतांतही थोड्या दिवसांपूर्वीं सुधारणा करण्याचा विचार निघाला,

इतकेंच नव्हे, तर त्या विचाराप्रमाणें कृतिही होऊं लागली आहे. पोटजातींचेही सूक्ष्म भेद होऊन जातीच्या संख्येंत संकुचितपणा आल्यामुळें शरीरसंबंधाच्या वगैरे कामीं फारच गैरसोय व अडचणी येऊं लागल्या, तेव्हां कांहीं सुधारणा करावी, असें कित्येक गृहस्थांच्या मनांत येऊन त्यांनीं सुधारणा केल्या आहेत व त्या चालू आहेत. या कामांत ज्या गृहस्थांनीं थोडेबहुत प्रयत्न केले आहेत अशा गृहस्थांपैकीं कांहीं मंडळी येथें हजर आहेत, तेव्हां याविषयींची जास्त माहिती करून घेण्याची कोणास इच्छा असल्यास सवड आहे. आपल्याही भागांत यासंबंधाचे विचार सुरू आहेत. थोडे दिवसांपूर्वीं येथील कित्येक गृहस्थांनीं लग्नाच्या वयाच्या व खर्चाच्या वगैरे संबंधानें निर्बंध असावे असें मनांत आणून जें विनंतिपत्र काढिलें त्यावर पुष्कळांची संमति मिळाली आहे. ही गोष्ट लेखी पुराव्यावरून सिद्ध करून देतां येईल. तेव्हां या सर्व हकीकतीवरून आपणांस घ्यावयाचें इतकेंच कीं, व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं विचाराचा, संकल्पाचा व संकल्पाप्रमाणें आचरणाचा प्रयत्न सुरू आहे. अगोदर विचार व संकल्प व नंतर त्यांचें रूपांतर कृतींत होणें, हा धर्म आहे. तेव्हां एकदम संकल्पाप्रमाणें क्रिया दृष्टीस जरी पडली नाहीं, तरी त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. आपण वरील पापुद्रा जरा एकीकडे सारून जर या पुरातन धर्म व आचारवृक्षाचा गाभा पाहिला, तर त्यांत तेज आहे, रस आहे, जीवन आहे व तो वठून गेला आहे, असा जो भास होतो तो चुकीचा आहे, असें आपणांस दिसेल. हालचाल चालू आहे, राष्ट्रांतील प्रत्येक भागांत विचार होत आहे, व्यक्तिशः कांहीं तरी संकल्पाच्या रूपानें प्रयत्न चालू आहे, असें आपणांस कळून येईल. राजकीय गोष्टीच्याच विचाराकडे या देशांतील लोकांचा सर्वस्वीं कल आहे व धर्म आणि आचार यांविषयीं कांहीं विचार चालू नाहीं, असें जें कित्येकांच्या म्हणण्यांत येतें तेंही सर्वांशीं बरोबर नाहीं, असें सूक्ष्म विचारांतीं दिसेल. बाह्य देखाव्यांत राजकीय उन्नतीची चळवळ विशेष स्पष्टपणानें दिसते, येवढ्यावरून केवळ राजकीय उन्नतीकरितांच पुष्कळ लोकांची आस्था आहे व धर्म आणि आचारसंबंधी विचार कोणी करीत नाहीं, असें कदाचित कोणास वाटेल; परंतु वस्तुतः प्रकार तसा नाहीं. धर्म आणि आचार यांत सुधारणा झाली पाहिजे, केवळ अनाचार होऊन न राहतां व्यवस्थित मार्गानें कांहीं तरी गोष्टी घडल्या पाहिजेत, असें मानणारे व यासंबंधी विचार करणारे बरेच लोक सापडतील. आतां, हा जो विचार चाललेला आहे म्हणून सांगितलें तो विचार केवळ तारायंत्राच्या जलदीनें चाललेला आहे, असें कित्येकांस वाटतें व कित्येकांस तो अति थंडाईनें व मंदपणानें चालला आहे असें वाटतें. एक दुसऱ्यांला उतावळे व दुसरे पहिल्यांला थंडे असें म्हणून एकमेकांना एकमेकां दूषणें देत असतात. केवळ आवेशानें व अधीरपणानें कोणत्याही गोष्टीकडे अवलोकन केल्यानें जे दोष घडतात तेच दोष या दोन्ही बाजूंच्या विचार करणारांत आहेत. एकाला वाटतें कीं, हे विचार करणारे विमानांत बसून कोठें आकाशांत भरारी मारतात कोण जाणे. दुसऱ्याला वाटतें कीं, विचार करणारे इतके मंद व शिथिल आहेत कीं, कांहींच सुधारणा झाली नाहीं म्हटलें तरी चालेल. या दुसऱ्या पक्षाच्या म्हणण्याप्रमाणें शिथिलता किती आहे हें लक्षांत येण्याकरितां, मी एक लहानपणीं ऐकलेली गोष्ट सांगतों.

कोल्हापुरास एका महादेवापुढें नंदी आहे, तो ॐकारापासून कोल्हापुरास आला, अशी आख्यायिका आहे. तो कोणच्या प्रमाणानें आला याचें गणित असें आहे कीं, तो एका वर्षांत गहूंभर पुढें आला व सातूभर मागें गेला; म्हणजे गहूं आणि सातू यांमधील जें अंतर तितका प्रवास घडला. व तशाच दिरंगाइनें धर्म व आचारविषयक गोष्टींचा विचार चालू आहे, असें म्हणणारे कांहीं आहेत. एवढा मोठा देश जलद जा म्हटल्यानें तो जलद चालत नाहीं, किंवा जागच्याजागीं राहा म्हटल्यानें कांहीं एकाच जागीं धरणें धरून बसत नाहीं. समुद्राला भरती येत असतांना पहिली लाट जी जमिनीकडे येते, ती परत गेली म्हणजे पूर्वींच्या ठिकाणापेक्षांही मागें जाते व येवढ्यावरूनच आपण जर कल्पना केली व तिसरी लाट येईपर्यंत वाट पाहिली नाहीं, तर समुद्रास ओहोटी लागली आहे, असें आपणांस वाटेल. तेव्हां अधीरपणानें विचार करणारांस जी थंडपणाची स्थिति वाटते तशी स्थिति वस्तुतः नाहीं व केवळ विमानांतून उडून जाण्याइतकी जलदी चालली आहे असें जें वाटतें, तितकी जलदीही नाहीं. एवढा मोठा समाज जितक्या रीतीनें हालावयाचा तितक्या रीतीनें जरी हालला नाहीं, तरी तो हालत आहे. एकंदरीनें जर पाहिलें, तर त्याचें पाऊल पुढें पडत आहे, हें

अगदीं उघड आहे. आतां थंडे व उतावळे येवढेच मतांतराचे भेद आहेत असें नाहीं. तर आणखीही भेद आहेत, ते भेद कोणते तें सांगण्याचा मी प्रयत्न करितों. ते भेद सांगतांना अमुकच पक्ष चांगला व अमुकच वाईट असें आपल्यासारख्या श्रेष्ठ मंडळीपुढें सिद्धान्त-पूर्वक सांगण्याचा माझा अधिकार नाहीं, किंवा कोणत्याही पक्षाची निंदा, किंवा विटंबना करण्याचा माझा स्वभाव नाहीं व प्रार्थनासमाजाचें ठिकाणही तसें नाहीं. आमच्या प्रार्थनासमाजपंथाचा विशेष गुण हाच आहे कीं, सर्व धर्मगुरू, सर्व धर्मपुस्तकें आम्हांस पूज्य आहेत व सर्वांत जें चांगलें असेल तें ग्राह्य करण्यास आमची हरकत नाहीं. बायबल व त्याच्यावर तुकारामाचा गाथा हीं पुस्तकें मेजावर ठेविलेलीं असतांना एके दिवशीं एक मिशनरी गृहस्थ माझे घरीं भेटण्यास आले. त्यांनीं विचारिलें कीं, हीं पुस्तकें कोणचीं, तेव्हां मीं त्यांस नांवें सांगितलीं. ते म्हणाले कीं, "तुकारामाचा गाथा वर कां व बायबल खालीं कां ?" तेव्हां मी म्हणालों कीं, तुम्हीच त्याचें कारण सांगा. ते म्हणाले, "गाथा लौकर हातास यावा म्हणून वर ठेविला आहे." मी म्हणालों कीं, त्या गाथ्याला आधार असावा म्हणून खालीं बायबल आधारास दिलें आहे, तेव्हां गाथा वर जरी असला तरी त्याला आधार देणारें बायबल आहे. मला त्या गृहस्थाशीं उगीच वितंडवाद करावयाचा नव्हता, तेव्हां वरील उत्तर देऊन मीं वेळ मारून नेली. ही गोष्ट येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, कोणचा धर्म किंवा धर्मगुरू नीच किंवा हलका असें मुळींच न मानतां, सर्वांच्या योग्यते-प्रमाणें त्यांस मान द्यावयाचा व ग्रहणीय जो भाग असेल त्याचा स्वीकार करावयाचा, असा प्रार्थना-समाजपंथाचा अभिप्राय आहे. असो. थंडे व उतावळे या दोन भेदांशिवाय आणखी जे भेद आहेत त्यांविषयीं आतां दिग्दर्शन करितों. कोणाला असें वाटतें कीं, जुन्या धर्मगुरूंना शरण जाऊन त्यांच्याकडून नवीन सुधारणा अमलांत आणाव्या. दुसऱ्या पक्षास असें वाटतें, कीं जुन्या धर्मगुरूंचीं उत्पन्नें व इतमाम ज्या बहुजनसमाजाच्या खुषीवर अवलंबून आहेत त्यांचे हातून त्या समाजास नाखूष होण्यासारिखें वर्तन कदापिही होणार नाहीं व त्यांचे हातून नवीन सुधारणा होण्याची आशा नाहीं. धर्मरूप वृक्षाच्या वरची ही जी जुनी साल झालेली आहे ती तशीच राहूं द्यावी व आंतील गाभ्यांत जोम वाढत चालला म्हणजे भोंवतालचें कवच हें कांहीं दिवसांनीं आपोआप गळून पडेल, त्याच्या भानगडीस आज लागूं नये. या दोन्ही पक्षांच्या म्हणण्यांत अंशतः ग्राह्यांश आहे व दोन्ही अगदीं त्याज्य आहेत असें कांहीं नाहीं. कित्येक सुधारणा धर्मगुरूंना वश करून घेतां येण्या-सारख्या जरी आहेत, तथापि कांहीं सुधारणा अशा आहेत कीं, त्या अमलांत आणण्यास धर्मगुरूंचें साह्य उपयोगी होईल, असा संभव नाहीं. जुन्या धर्मगुरूंनीं समजुतीवर येऊन नवीन काळास अनुसरून अशा सुधारणा केल्याचीं उदाहरणें मुळींच नाहींत, असें जरी नाहीं, तरी तीं फार थोडीं आहेत. वल्लभ, रामानुज, वैष्णव वगैरे नाना पंथ जे निघाले त्यांचे प्रवर्तक निरनिराळे झाले व पूर्वीच्या धर्मगुरूंनीं नवे पंथ काढले, असें कांहीं झालें नाहीं. धर्मगुरूंचें साह्य घ्यावें याविषयीं जसा मतभेद आहे, त्याचप्रमाणें धर्मपुस्तकांचाही आधार घेण्याविषयीं मतभेद आहे. कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं, तुम्हांला जे नवीन आचार स्थापावे असे वाटत असतील त्यांस जुन्या पुस्तकांचा आधार घ्या, जुन्या पुस्तकांचे अर्थ तुम्ही निराळे लावा, पाहिजे तर एखाद्या जागीं **आहे** असें असेल तेथें **नाहीं** असा अर्थ घ्या ! परंतु जुन्या धर्मपुस्तकांची परंपरा सोडूं नका ! उलट पक्षाचें असें म्हणणें आहे कीं, जुन्या धर्मपुस्तकांचे हवे तसे वेडेवांकडे अर्थ काढावयाचे व वेदांतूनही आगगाड्या आणि तारायंत्रें असल्याचे पुरावे घ्यावयाचे, म्हणजे ती गोष्ट हास्यास्पद होते व सत्याचा अपलाप केल्यासारखें घडतें. तर त्या भानगडींत न पडतां, जुन्यांत जेवढा ग्राह्य भाग असेल तेवढा घ्यावा व नसेल तर तो नाहीं असें म्हणून, हल्लींच्या काळास अनुरूप असणारे नवीन आचार चालू करावे. या दोन्ही पक्षांच्या म्हणण्यांत त्या त्या बाजूचीं कारणें आहेत. जुन्या धर्मगुरूंची जरी परंपरा सुटली, तरी जुन्या धर्मपुस्तकांची परंपरा न सोडतां त्या पुस्तकांचेच अर्थ करून, किंवा त्यांवर टीका करून, आपल्या पंथांस अनुकूल करून घेतले अशीं उदाहरणें आहेत. रामानुज, वल्लभानुयायी, वैष्णव वगैरे जे पंथ आहेत त्यांचा इतिहास अशाच प्रकारचा आहे. आतां उलट पक्षाचें जें म्हणणें आहे, त्यासही सबळ कारणें आहेत. प्रथम जुन्या ग्रंथांतून हवे तसे अर्थ काढावयाचे, म्हणजे यांत सत्याचा अपलाप होतो व शिवाय थट्टेसही ती गोष्ट

कारण होते. दयानंदजी येथें आले होते त्या वेळीं वेदांतून त्यांनीं तारायंत्रें काढिलीं, ही गोष्ट थट्टेस कारण झाली, हें आपणांस माहीत आहेच. शिवाय आमचे जुने ग्रंथ म्हणजे कांहीं लहानसहान प्रकरण नव्हे. मुसलमानांचें कुराण, ख्रिस्त्यांचें बायबल येवढींच काय तीं प्रमाणपुस्तकें. त्या पुस्तकांचे आपल्या पंथास अनुकूल अर्थ करून घेऊन मुसलमानांतही निरनिराळे भेद झालेले आहेत. परंतु आमचे धर्मग्रंथ म्हणजे अगदीं पुरातन काळच्या वेदांपासून तों पुराणापर्यंत, येवढेंच नव्हे, तर कालच्या सत्यनारायणाच्या पोथीपर्यंत आमचे सर्वच धर्मग्रंथ ! तेव्हां इतक्या सगळ्या धर्मग्रंथांची व्यवस्था लावण्याचें काम कठीण आहे, हेंही खरें आहे. आमच्या लोकांना परंपरेची आस्था आहे, परंपरा सोडून एकदम वळण्यास ते धजत नाहींत; पंधरा दिवसांनीं एकादशी करावयाची, असा एकदा नियम घालून दिला, कीं सर्व देशावर, सर्व ठिकाणीं, एका काळीं लोक उपोषण करितांना आढळतात. तेव्हां परंपरेची सांगड होतां होईल तोंपर्यंत ठेवावी, असें म्हणणारांच्या बाजूसही सबळ कारणें नाहींत, असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. हे दोन जसे भेदाचे प्रकार सांगितले तसा तिसरा भेदाचा प्रकार असा आहे कीं, कांहीं लोक असें म्हणतात कीं, तुम्ही कांहीं उगीच गडबड व बडबड करूं नका; आगगाड्या व तारायंत्रें झालीं आहेत, तीं तुमचा जातिभेद मोडतील, अनेक वेड्या कल्पना नाहींशा करतील, सर्व कांहीं होईल; तुम्ही दहा-वीस वर्षे डोळे मिटून स्वस्थ बसा कसे ! कित्येक कामें अशीं आहेत कीं, तीं स्वस्थ बसून पाहाण्यासारखीं आहेत. परंतु येवढा मोठा समाज केवळ डोळे मिटून स्वस्थ बसल्यानें आपोआप हालचाल करील व योग्य मार्गानें जाईल, असें म्हणणें हाही दोष होईल. आगगाड्या-तारायंत्रें आहेत तीं सर्व करतील, असें म्हणणाऱ्या वर्गास काय नांव द्यावयाचें याचा विचार मी आज सकाळीं करीत होतों, परंतु मला कांहीं चांगलेंसें नांव सुचलें नाहीं, म्हणून, तूर्त **आगगाड्या-तारायंत्रवाली मंडळी** असें आपण त्यांना सोईकरितां नांव देऊं ! आगगाड्या व तारायंत्रें आहेत खरीं पण तीं कोणाचीं ? तुम्हांआम्हांला आगगाडी चालवितां येत नाहीं, तार लावतां येत नाहीं, त्या तुम्हींआम्हीं आगगाडी-तारायंत्राची गोष्ट घेऊन केवळ डोळे मिटून बसावें व आगगाडी आम्हांस नेईल तिकडे जाऊं, तारायंत्र सांगेल तें ऐकूं, असेंच केवळ म्हणून धर्म व आचारविषयक विचारांत कसें चालेल ? आपणांस ज्या मार्गाकडे जावयाचें आहे त्या मार्गासच सुरक्षितपणें व कांहीं अव्यवस्था न होतां आपण जाऊं, असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. तेव्हां आगगाड्या-तारा-यंत्रवाले मंडळीच्या म्हणण्यांत जरी सत्याचा थोडासा अंश असला, तरी त्यागाचा भाग बराच आहे. या तीन प्रकारांशिवाय आणखी एक चौथा मतभेदाचा प्रकार आहे तो असा कीं, कित्येक लोक असें म्हणतात कीं, जे आचार आणि पंथ नवीन असावे किंवा सुधारणा व्हावी असें वाटेल, ते तुम्ही पाहिजे तर करा. व्यक्तिश: ज्याचा त्यानें आपापल्या ठिकाणीं विचार करून पाहिजे ते आचार ठेवावे; परंतु सभा भरवून आणि व्याख्यानें देऊन आणि वर्तमानपत्रांतून निबंध लिहून तुम्ही उगीच लोकांना कां त्रास देतां ? या पक्षांचें म्हणणें आपणांस कदाचित सकृद्दर्शनीं चुकीचें वाटेल; परंतु त्यांत घेण्यासारखा भाग बराच आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला योग्य वाटेल तसें त्याच्या हातून घडूं लागलें, तर पर्यायानें सर्व समाज सुधारला, असेंच म्हणतां येईल. परंतु या पक्षाच्या म्हणण्यांत कांहीं त्याज्य भागही आहे; तो असा कीं, ज्याचें त्यानेंच आपल्या ठिकाणीं आचरण करूं म्हटलें व दुसऱ्याच्या साह्याची पर्वा केली नाहीं, तर कित्येक कामीं त्याचें चालणार नाहीं. लग्नाचेंच उदाहरण जर आपण लक्षांत आणिलें तर निदान दोन कुटुंबांची तरी एकमेकांस गरज असते व ज्याचा त्यानें आपलाच हेका धरला, तर चालणार नाहीं, हें उघड आहे. तेव्हां व्यक्तिश: आचरण करावें, या म्हणण्यांत जरी ग्राह्य भाग बराच आहे, तरी आपल्याबरोबर दुसऱ्यांनींहीं सुधारणेच्या मार्गास लागलें पाहिजे, हीही गोष्ट जरुरीची आहे व तत्प्रीत्यर्थ प्रयत्न केले पाहिजेत. हे चार मतभेदाचे प्रकार सांगितले. यांशिवाय एक पांचवा प्रकार आहे. कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं तुम्हीं या बुद्धिवादाच्या गोष्टी लोकांस सांगून काय उपयोग ? कांहीं नियम करा, कायदा करा, म्हणजे लोक त्याप्रमाणें आपोआप वागूं लागतील. तुम्हीं कंठशोष केलात आणि दुसऱ्याचा करविलात म्हणून कांहीं उपयोग होणार नाहीं. या म्हणण्यांत सत्याचा अंश आहे. उपदेशानेंच कित्येक गोष्टी होत नसतात. सती जाण्याची चाल जर कायद्यानें बंद झाली नसती, तर तो प्रकार अजूनही

अनुक्रमणिका

कांहीं अंशानें तरी चालला असता. त्याचप्रमाणें देवी काढणें वगैरेविषयीं जे कायदे आहेत, त्यांचाही असाच प्रकार आहे. म्युनिसिपालिटीचा डॉक्टर घरोघर गेला आणि देवी काढणें चांगलें असा त्यानें उपदेश केला, तरी पोरें लपवून ठेवून देवी न काढूं दिल्याचीं उदाहरणें सांपडतील. बाप म्हणेल पोर आजारी आहे, भाऊ म्हणेल लहान आहे, मावशी म्हणेल आपल्या आजोळीं गेलें आहे, कोणी म्हणेल, देवी आमच्या घरांत मानवत नाहींत, अशा अनेक सबबी निघतील; परंतु कायदा झाला व शासन असलें, म्हणजे मग शितळादेवी रागावत नाहीं, कोणाचाही देव रुसून बसत नाहीं, कांहीं नाहीं, मुकाट्यानें मुलें डाक्टरापुढें हजर होतात ! असा जरी प्रकार आहे, तरी सर्वच कामांत केवळ कायद्याचें दडपण असावें, असेंही कोणी म्हणणार नाहीं. आमच्या कित्येक आचारांच्या सुधारणेसंबंधानें कायद्याचा आधार घेतला, तर चालेल असें वाटून कांहीं दिवसांपूर्वीं जो उद्योग चालला होता, त्यास लोकमताची अनुकूलता असावी तशी दिसली नाहीं, म्हणून येथील कांहीं मंडळीनें स्वखुशीनें आपणास वाटेल तें बंधन ज्याचें त्यानें करून घ्यावें, असा उद्योग चालविला आहे व तो चांगला आहे. 'कां हो ! तुम्ही कायदा पाहिजे म्हणत होतां आणि आतां स्वेच्छेनें होणारी तजवीजही बरी म्हणतां तेव्हां तुमच्या वागण्यांत विरोध दिसतो' असें जर कोणी म्हणतील, तर त्यांस माझें असें सांगणें आहे कीं, ज्या तजविजीनें एकादें कार्य घडेल, असें पूर्वीं वाटत होतें, ती तजवीज जर आज होण्यासारखी नसली, तर इतर जे सुधारणेचे मार्ग आहेत त्यांचें अवलंबन करण्यांत कांहीं विरोध नाहीं. असो. तेव्हां उतावळे व थंडे येवढेच मतभेदाचे प्रकार आहेत असें नाहीं, तर आणखीही अनेक मतभेदाचे प्रकार आहेत. धर्म व आचारांच्या सुधारणेचा विचार जरी सर्वत्र देशभर सुरू आहे, तरी आतां सांगितलेल्या अनेक प्रकारच्या मतभेदांनीं सुधारणेचा मार्ग जितका सुलभ व्हावयाचा तितका तो होत नाहीं. मनुष्यामनुष्यांत मतभेद हा जरी असावयाचाच, तरी निरनिराळ्या मतांच्या लोकांनीं आवेशास चढून आपलेंच मत तेवढें योग्य असें म्हणून, दुसऱ्याच्या मताची अवहेलना व विटंबना न करितां, जर युक्तिवाद केला, तर कुत्सितपणा आणि मत्सर वाढणार नाहींत. ज्यानें त्यानें आपापल्या ठिकाणीं निरनिराळ्या मतभेदांचा शांतपणें विचार करून, जो मार्ग ज्या कामीं अनुसरणें इष्ट वाटेल तेवढा मार्ग अनुसरावा, म्हणजे एकजुटीनें कार्यभाग होण्याचा संभव आहे. तेव्हां धर्मविचाररूपी वृक्ष अगदीं कुच-कामाचा झाला आहे व त्यांत कांहीं जोम राहिला नाहीं, कलियुगांत परमेश्वर आपणांस सोडून गेला आहे व जिकडे तिकडे अनवस्था, अनाचार पसरण्याचा हा काळच आहे, अशी आपली समजूत करून न घेतां तुकारामबावांनीं म्हटल्याप्रमाणें, परमेश्वर संकटाचे वेळीं आपलें रक्षण, पोषण आणि पालन करण्यास सिद्ध आहे, हें मनांत वागवून, आपण सर्वांनीं आपलें आचरण ठेवावें. आपला देश फार पुरातन व आपला धर्मही अनादिकालाचा आहे. कोणचा देश सातशें वर्षें, कोणचा हजार वर्षें, अशी जशी गणती सांगतां येईल, तशी गोष्ट कांहीं आपल्या या पुरातन देशाची नाहीं. तेव्हां इतका टिकलेला व पाय धरून राहिलेला धर्मवृक्ष अगदीं वठून जाईल असें कांहीं नाहीं. परमेश्वर धर्मरक्षणाचे कामीं आपणांस हातीं घेऊन वागवील, असा भरंवसा ठेवावा, इतकें सांगून आपला बराच वेळ मीं घेतला याबद्दल माफी मागून खालीं बसतों.

* *










# लूथरचा काळ व सध्याचा काळ यांची तुलना

या देशांत सुधारणेचें बीं रुजविण्याची जी खटपट चालली आहे ती व्हावी तशी फलद्रूप होत नाहीं, असें कांहीं गोष्टींवरून कधीं कधीं आपल्या मनांत येऊं लागतें. तेव्हां ही जी आपल्या मनाची कधीं कधीं निराशेकडे प्रवृत्ति होते, तिच्या यथायोग्यतेविषयीं दोन शब्द बोलण्याचें आज माझ्या मनांत आहे. व तें करण्यास अन्य ठिकाणीं अन्य काळीं सुधारणेसंबंधानें जे प्रयत्न झाले ते व आपले प्रयत्न, त्यांची व आपली स्थिति वगैरे गोष्टींची जर आपण तुलना केली, तर आपल्या प्रयत्नांच्या व सिद्धीच्या बरेवाईटपणाबद्दल आपणांस कांहींशी अटकळ करितां येईल. असा अन्य ठिकाणचा प्रसंग म्हटला म्हणजे ' रेफर्मेशन ' या नांवानें प्रसिद्ध अशी जी युरोप खंडांत धर्मक्रांति झाली, ती होय. ह्या धर्मक्रांतीच्या आरंभास आज चार-पांचशें वर्षे होऊन गेलीं आहेत व आपल्या इकडील सुधारणेच्या प्रयत्नांस सुमारें पन्नास-साठ वर्षें झालीं आहेत. तेव्हां चार-पांचशें वर्षांपूर्वींची पश्चिम युरोपाची स्थिति व आपली सध्याची स्थिति यांची आपणांस तुलना करून पाहिली पाहिजे. या काळचा पश्चिम युरोपाचा इतिहास पाहिला असतां, त्यांत आपणांस असा एक विशेष भेद दिसून येतो कीं, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली वगैरे देश जरी राष्ट्रत्वानें, राज्यव्यवस्थेनें व भाषेनें त्या वेळीं परस्परांपासून भिन्न होते, तथापि धर्मदृष्टीनें पाहतां त्या सर्वांत ऐक्य होतें. ते सर्व एका धर्माध्यक्षाच्या अमलाखालीं असून त्याची आज्ञा त्यांस शिरसावंद्य असे. आपल्या इकडे पाहातांही साठ-सत्तर वर्षांमागें असाच प्रकार होता. हिंदुस्थानचा विस्तार पश्चिम युरोपापेक्षां कमी नसून, भाषा, राष्ट्रत्व वगैरेंनीं प्रांताप्रांतांत जरी भेद असला, तथापि हिमालयाच्या पायथ्यापासून तों कन्याकुमारीच्या टोंकापर्यंत बहुतेक सर्व लोकसमूहास एकच धर्मबंधन होतें व आहे. आम्हांत राष्ट्रैक्य नाहीं म्हणून नेहमीं प्रतिपादन करणारे लोकही आम्हांतील धर्मैक्य कबूल करतात. तात्पर्य, या धर्मैक्यासंबंधानें चार-पांचशें वर्षांपूर्वीचा पश्चिम युरोप व सध्याचा आपला देश यांत बरेंच साम्य आहे, असें दिसून येईल. परंतु या साम्यांतही एक भेद आहे. धर्मसंबंधानें साऱ्या पश्चिम युरोपावर जसें एकटद्या पोपाचें, म्हणजे धर्मगुरूचें साम्राज्य होतें, तसें आपल्या इकडे धर्मसंबंधाने साऱ्या देशावर ज्याचें एकाधिपत्य आहे असा अधिकारी नाहीं. तेव्हां धर्मैक्याच्या दृष्टीनें जरी त्या वेळचा पश्चिम युरोप व व आतांचें हिंदुस्थान यांत साम्य आहे, तथापि त्या त्या धर्माच्या एकछत्रत्वासंबंधानें उभयतांत वैषम्य आहे, असें दिसून येईल. प्राचीन ग्रंथ व त्यांतील मतें यांचें जसें त्या वेळीं सर्वांवर प्राबल्य होतें, त्याप्रमाणेंच येथेंही आहे. ठरींव मतांच्या विरुद्ध जाणारांची जशी त्या वेळीं पांखाड्यांत गणना होत असे तशी आजही होते. धर्मसंरक्षणाचें काम ज्यांच्या हातीं होतें त्या वर्गामध्यें जसे बिशप, मंक, क्लर्जी वगैरे होते, तसे इकडेही धर्माधिकारी, भिक्षुक, बैरागी, गोसावी वगैरे आहेत. त्या वेळीं लोक जसे अज्ञानी, धर्मभोळे व चेटकें, फलज्योतिष, दैविक चमत्कार वगैरेंवर विश्वास ठेवणारे होते, तसे इकडेही आहेत. या अज्ञानी लोकसमूदायावर जसें त्या वेळच्या धार्मिक वर्गाचें पूर्ण वजन असे, तसें सध्या येथेंही आहे. 'तुमच्या पापांची क्षमा झाली आहे' अशा अर्थाचे धर्माधिकाऱ्याच्या सहीशिक्यांचे बिल्ले आपणांस मिळाले, म्हणजे आपण पापविमुक्त होऊं, असा लोकांचा पूर्ण विश्वास असल्यामुळें, धर्माधिकाऱ्यांनीं पैशाची जरूर लागली असतां ' इन्डलजन्सेस ' म्हणून पापविमोचनपत्रें काढून धर्मभोळ्या लोकांपासून कसे पैसे उकळले, हें इतिहासवाचकांस माहीत असेलच. उत्तरोत्तर या धार्मिक वर्गाची निरपेक्ष बुद्धि लयास जाऊन त्यांची लोभबुद्धि जागृत झाली. व कालेंकरून ते इतके संपन्न झाले कीं, त्यांच्या संपत्तीचा लोकांस मत्सर वाटूं लागला. जमिनीपैकीं सुमारें एकतृतीयांश भाग या धार्मिक वर्गाच्या हातीं होता, इतकें सांगितलें म्हणजे त्यांच्या स्थितीची सहज कल्पना करितां येईल. आपल्या स्वतःच्या इलाख्यांत या बाबतींत जरी विशेष साम्य दिसण्यास मार्ग नाहीं, तथापि बंगाल व उत्तर हिंदुस्थान यांमध्यें असाच प्रकार आहे. अनायासें घरबसल्या सहज प्राप्त होणाऱ्या संपत्तीच्या मागून अर्थातच स्वकर्तव्यपराङ्मुखता व अनाचार यांस सुरुवात

झाली. तिकडील मंक जसे ब्रह्मचर्यव्रतापासून भ्रष्ट झाले, तसे इकडेही नांवाचे गोसावी असून घरेंदारें करून सुखांत नांदणारे लोक आहेतच. त्या वेळीं तेथें जशी मूर्ति व साधू यांची पूजा जारीनें सुरू होती, तशी आजही येथें आहे. उपवास, व्रतें, यात्रा वगैरेकडे जशी त्या वेळच्या तिकडील लोकांची प्रवृत्ति होती, तशी इकडेही प्रस्तुत आहे. तात्पर्य, चार-पांचशें वर्षांपूर्वीची पश्चिम युरोपाची स्थिति व आजकालची हिंदुस्थानची स्थिति यांत बरेंच साम्य आहे, असें कोणासही वाटल्यावांचून राहणार नाहीं.

अशा प्रकारें युरोप खंडाची स्थिति असतां मुसलमान लोकांनीं कान्स्टंटिनोपल जिंकलें. हे मुसलमान लोक ग्रीक विद्येचे द्वेष्टे असल्यामुळें अर्थातच तेथील ग्रीक विद्वानांस आपापल्या पुस्तकांसुद्धां पूर्वेकडून पश्चिमेकडे प्रयाण करावें लागलें. या नवीन विद्येचा लोकांमध्यें जसजसा प्रसार होऊं लागला, तसससा त्यांच्या विचारांत फरक पडूं लागला. या पूर्वी आरिस्टाटल हाच काय तो 'एकमेवाद्वितीयं' मताचा उपदेष्टा मानला जात होता; परंतु हळूहळू साक्रेटीस, प्लेटो वगैरे मंडळी त्याच्या साम्राज्यास वांटेकरी झाली. या सुमारास त्या त्या ठिकाणच्या देशभाषा बऱ्याच उर्जित दशेस आल्या असल्यामुळें या ग्रीक विद्येचा विशेष जोरानें फैलाव होत जाऊन नवीन विचारांस अंकुर फुटले व लूथरसारखे लोक त्या विचारांच्या समर्थनार्थ धैर्यानें पुढें आले. प्राच्य विद्येचा अशा प्रकारें पश्चिम युरोपांत प्रवेश होऊन तिच्या योगानें तेथें जशी विचारक्रांति झाली त्याप्रमाणेंच पाश्चात्त्य विद्येचा हिंदुस्थानच्या सुदैवानें येथें प्रवेश होऊन, तिचाही आमच्या ठरींव मतांवर परिणाम होण्यास सुरुवात झाली.

असो; येवढा वेळपर्यंत धर्मक्रांतीच्या पूर्वीची युरोप खंडाची स्थिति व सध्याची आपली स्थिति यांचें दिग्दर्शन केलें, त्यावरून दोन्ही स्थितींत पुष्कळ साम्य आहे, असें दिसून येतें व असें असूनही युरोपाप्रमाणें येथें सुधारणेचें बीं वाढीस कां लागत नाहीं, असा प्रश्न मनांत येणें साहजिक आहे. व त्याचें समाधान न झाल्यास निराशा उत्पन्न व्हावी यांतही नवल नाहीं. परंतु या दोन स्थितींतील साम्याचा जसा आपणांकडून विचार होतो, तसा वैषम्याचाही विचार झाल्यास, या निराशेस जागा राहील, असें वाटत नाहीं. दोन्ही देशांत धर्मैक्यासंबंधानें जरी साम्य आहे, तथापि दोहोंतील एक विशेष पूर्वी दाखविलाच आहे. धर्मसंबंधानें सर्व अधिकार रोममध्यें एकवटलेला असल्यामुळें त्यावर निशाण धरलें म्हणजे इतर ठिकाणीं त्यासंबंधानें फारसे परिश्रम करण्याची आवश्यकता नसे. तसा प्रकार इकडे मुळींच नाहीं. विद्यासागरासारख्यांनीं बंगाल्याकडे सुधारणेसंबंधानें जे प्रयत्न केले, त्यांचा आम्हांवर मुळींच परिणाम होत नाहीं. फार तर काय, परंतु असे गृहस्थ बंगाल्याकडे होते हेंही आमच्याकडे सर्वांस माहीत नाहीं. तात्पर्य, सुधारणेचें निशाण अमुक ठिकाणीं रोंवलें, म्हणजें बाकीचीं ठिकाणें अनायासेंच हस्तगत होण्याची जशी युरोपांत सवड होती, तशी इकडे नाहीं. दुसरा एक महत्त्वाचा विशेष म्हटला म्हणजे युरोपांत झालेली चळवळ वास्तविक रीतीनें धर्मविषयक नसून, राज्यविषयक होती. पोपचा सर्व राष्ट्रांवर जो अनियंत्रित अधिकार होता, तो सर्वांसच दुःसह झाला होता, यास्तव सुधारकांनीं सुरू केलेलें काम त्यांच्या हातून आपल्या हातीं घेण्यास तेथें जसे राजे व सरदार पुढें आले, तसें होण्यास येथें मार्ग नाहीं. व एकापक्षीं तसें नाहीं, हेंच इष्ट होय. लूथरला रोमच्या न्यायासनापुढें जबाब देण्यास बोलावलें असतां ड्यूक ऑफ् साक्सनीचें त्याला जें पाठबळ मिळालें व जर्मनीचा बादशाहा पांचवा चार्लस, इंग्लंडचा राजा आठवा हेन्री, यांजकडून सुधारणेच्या प्रसारार्थ जी मदत झाली, तिचें महत्त्व या दोन स्थितींची तुलना करतांना विसरतां कामा नये. युरोपांत जी सुधारणा झाली, ती केवळ सुधारकांच्या प्रयत्नानें लोकमतांत फरक होऊन अस्तित्वांत आली असें नाहीं. बौद्ध धर्माचा हिंदुस्थानांत प्रसार झाला, तोही एक-दोन लोकांच्या परिश्रमाचें फळ नसून, राजाश्रयाचा परिणाम होय. या सर्व विचारांवरून लूथरसारख्या युरोपियन सुधारकांची व आपल्या देशांतील सुधारकांची मी बरोबरी करतों, असें कोणीं समजूं नये. त्यांचे दीर्घ प्रयत्न, त्यांनीं सोसलेली गांजणूक यांची आमच्यांतील सुधारकांच्या प्रयत्नांशीं व स्वहितत्यागाशीं कधींच तुलना करतां येणार नाहीं, हें मला कबूल आहे. पण आमचे प्रयत्न तितक्या कसोशीनें न होण्यास कारणेंही नाहींत असें नाहीं. तसेंच तेथें जो विद्येचा प्रसार झाला होता त्या मानानें आपण अजून किती तरी मागें आहों; त्यांच्यावर झालेले पूर्वपरंपरासंस्कार फार तर हजारएक वर्षांचे होते; आम्ही ज्या

पूर्वपरंपरेचे गुलाम बनून गेलों आहों ती निदान पांच हजार वर्षांहून कमी नाहीं, ह्याही गोष्टी विसरतां कामा नये. युरोपांतील सुधारणेस राजाश्रय होता म्हणून सांगितलें, येवढ्यावरून दुसऱ्या गोष्टींचें तेथें अस्तित्व नव्हतें असेंही नाहीं. तेथील लोकांच्या मनाची स्थिति सुधारणाभिमुख झाली नसती, तर सुधारकांचे प्रयत्न व राजाश्रय यांचा फारसा उपयोग झाला नसता, हें उघड आहे. शिवाय विद्याप्रसाराच्या योगानें लोकांचीं मनें सुधारणेस अनुकूल झालीं असून, लूथरसारखे स्वसुखनिरभिलाप सारथी सुधारणेचा गाडा हांकीत असून व रोमचें आपल्या मानेवरील जूं फेंकून देण्याच्या उद्देशानें राजेरजवाड्यांकडून सुधारणेच्या पक्षास विशेष बळकटी आली असूनही, प्राटेस्टंट पंथाचा प्रसार काय तो जर्मन जातींतच झाला व लॅटिन जाती रोमनकॅथलिक पंथासच धरून राहिल्या, ही गोष्ट विशेष लक्षांत धरण्यासारखी आहे. स्वित्झर्लंड-सारख्या देशांत जर्मन संस्थानें प्राटेस्टंट पंथानुवर्ती असावीत व लॅटिन किंवा इटालिअन संस्थानें रोमन कॅथलिक पंथानुयायी असावींत, यापासून आपणांस पुष्कळ बोध होण्यासारखा आहे. असो; कोणत्याही कारणानें कां होईना, तेथील सुधारकांच्या मानानें आपल्या सुधारकवर्गाची निःसत्वता, तेथील लोकांच्या मानानें विद्या प्रसाराच्या कामीं आपली न्यूनता, त्यांच्या पूर्वपरंपरेपेक्षां आपल्या पूर्वपरंपरेची प्राचीनता व त्यापासून उत्पन्न होणारी मनाची नैसर्गिक सुधारणा-पराङ्मुखता, आणि राजेरजवाड्यांकडून सुधारणेस साह्य मिळण्याची अशक्यता वगैरे गोष्टींचा विचार केला असतां, गेल्या पन्नास-साठ वर्षांच्या अवधींत आपणां-कडून कांहींच झालें नाहीं म्हणून निराश होण्याचें कारण आहे, असें मला मुळींच वाटत नाहीं. आतां आपल्या सुधारणेची गति मंद आहे हें खरें; परंतु तसें होणें अपरिहार्य आहे. घोड्याच्या अंगांत शक्ति असल्यावांचून केवळ आपल्या इच्छेकरितां तो भरधाव सुटणें शक्य नाहीं. व तसें होणें इष्टही नाहीं. पूर्वींची परंपरा व पुढच्या आशा यांचें संमेलन होऊन जेणेंकरून मध्यें फूट पडलेली दिसणार नाहीं अशा रीतीनें आपण आपल्या प्रयत्नाची दिशा राखली पाहिजे. तात्पर्य, आतां दिग्दर्शन केलेल्या इतिहासाचें शांतपणें अध्ययन व मनन केलें असतां, आपणांस निराश होण्याचें कारण नाहीं, असाच बोध त्यापासून मिळेल, अशी मला आशा आहे.

* *

# प्रार्थनासमाजाची आवश्यकता काय आहे ?[1]

ह्या शहरांत प्रार्थनासमाजमंदिर बांधलें जाऊन त्याचा नुकताच प्रवेशसमारंभ झाला व त्यांत हल्लीं आपण जमलों आहों. तेव्हां ह्या मंदिराकडे पाहून येथील लोकांच्या मनांत सहजीं असा प्रश्न येणार आहे व अन्य ठिकाणींही लोक असा प्रश्न करितात कीं, अशा मंदिरांची आवश्यकता काय आहे ? पण, हा वास्तविक प्रश्न नव्हे. समाज जर आहे, तर समाजमंदिरही पाहिजेच. तेव्हां मूळ प्रश्न असा निघतो कीं, प्रार्थना-समाजाचीच आवश्यकता काय आहे ? तुम्हांस जर धर्मसुधारणा करणें आहे, तर त्याकरितां आजपर्यंत काय थोड्या व्यवस्था झाल्या आहेत ? अनेक देवळें आहेत; अनेक उपदेशक आहेत; अनेक पंथ आहेत. तेथें जाऊन आपला कार्यभाग तुम्ही साधून घेण्याचें सोडून, ही नवी समाजस्थापनेची खटपट कां करितां ? असा पूर्वपक्ष लोकांकडून वारंवार होत असतो व तो होणेंही रास्त आहे. ह्या पूर्वपक्षाचा उत्तरपक्षही लोकांनींच योजून ठेविला आहे ! पण, तो मात्र यथार्थ रीतीनें योजिलेला नाहीं. तो योजण्यांत लोक बरीच उतावीळ करितात, असें म्हणणें भाग आहे. लोकांनीं ह्याचा उत्तरपक्ष असा योजिला आहे कीं, हें केवळ "अनुकरण" आहे. हल्लीं जे लोक आमच्यावर राज्य करीत आहेत, त्यांचें हें अनुकरण आहे. ते लोक देवळांत जाऊन प्रार्थना करितात, व्याख्यानें देतात, त्याप्रमाणेंच ह्या मंडळीला करावयास पाहिजे म्हणून

---

१. १८८७ सालीं अहमदनगर येथील प्रार्थनासमाजमंदिराचा प्रवेशसमारंभ झाल्यानंतर हें व्याख्यान त्या ठिकाणीं झालें. सं०

ही समाजस्थापनेची खटपट आहे. हा उत्तरपक्ष कितपत खरा आहे, हें जाणण्याकरितां मी आपणांस असें सुचवितों कीं, ही अशी नवीन धर्मव्यवस्था आज ह्या समाजानेंच फक्त केली आहे, किंवा इंग्रज लोक मुळीं ह्या देशांत आलेही नव्हते त्या वेळीं, तसेंच इंग्रजी विद्येचा गंधही नव्हता अशा लोकांनींही, अशा नव्या धर्मव्यवस्था केल्या होत्या किंवा नाहीं, हें पाहावें. जर पूर्वीं अशा अनेक व्यवस्था झालेल्या आहेत, तर त्यांसही अनुकरण म्हणावयाचें कीं काय? फार जुने पंथ कशाला? पण, अलीकडील पाउणशें वर्षांत गुजराथेंत जो स्वामीनारायण पंथ निघून पुष्कळ फैलावत चालला आहे तो अनुकरणाकरितांच काढणारानें काढिला काय? असें म्हणणें म्हणजे मोठाच प्रमाद करणें होईल. तेव्हां जशीं योग्य कारणें इतर पंथांच्या लोकांस दिसलीं, तशींच योग्य कारणें ह्या समाजांच्या स्थापकांस दिसलीं, म्हणून ह्या समाजांची चोहोंकडे स्थापना होत आहे. प्रचारांत असलेल्या व्यवस्थेंत विशेष न्यूनता दिसून तिजमुळें चित्तास शांति प्राप्त होईनाशी झाली, म्हणजे नवीन पंथाची स्थापना होत असते. तशाच कारणांनीं प्रार्थना व ब्राह्मसमाजांची स्थापना झालेली आहे.

आतां, अनुकरणाच्या आरोपासंबंधानें इतका विचार पुरे आहे. निरनिराळ्या पंथांच्या उत्पत्तीसंबंधानें जे दोन शब्द सांगण्यांत आले आहेत, त्या पंथांच्या उत्पत्तीपासून लाभ आहे किंवा हानि आहे, ह्याचा आतां आपण विचार करूं. खरें म्हटलें, तर पूर्ण विचारानिशीं निरनिराळे पंथ निघणें, म्हणजे धर्मविचाराच्या दिशा वाढणें व तितकी धर्मविचारांत भर पडणें होय. ह्याच्या स्पष्टीकरणासाठीं दोन-तीन उदाहरणें घेऊं. हिंदुधर्म हा गंगानदीप्रमाणें आहे. गंगा नदी मूळ उगमापाशीं अतिशय लहान असतां, मुखापाशीं एखाद्या समुद्राप्रमाणें विस्तीर्ण झाली आहे. मुखाचे अंगास तिचें पात्र पाहिलें असतां लोकांत तिजविषयीं जी पूज्यबुद्धि आहे ती व्यर्थ आहे, असें म्हणतां येत नाहीं. पण, गंगेस जें येवढें महत्त्व आलें तें कशानें आलें? तिच्या मूळच्या प्रवाहापासून नव्हे, तर तिला वाटेंत अनेक नद्यानाले मिळाले त्यांच्यायोगें. हे अनेक अन्य प्रवाह मिळाले नसते, तर आज सरस्वती नदीची जी अवस्था आहे, तीच गंगेची झाली असती. सरस्वतीस अन्य प्रवाहांची भर न मिळाल्यामुळें ती वालुकामय प्रदेशांत शोषली जाऊन, जमिनीवर तिचा मागमूसही राहिला नाहीं. आपल्या हिंदुधर्माचीही स्थिति तीच आहे. त्याच्यांत जर अनेक पंथांच्या निरनिराळ्या विचारांची भर पडली नसती, तर त्याला आज आहे येवढें सामर्थ्य कधींही आलें नसतें. आज सूक्ष्म दृष्टीनें पाहाणारास हिंदुधर्मांत मुसलमानी धर्माचाही अंश मिसळल्याचें दिसून येईल. तो कबीरासारख्या साधूंच्या द्वारें आला आहे. वैदिकधर्मानंतर जो जबर प्रवाह ह्या देशांत आला, त्यालाही हिंदुधर्मानें आपल्या प्रवाहांत सामील करून घेतलें आहे. **अहिंसा परमो धर्मः** हें जें वचन आज हजारो लोकांच्या तोंडून निघतें आहे, त्याला बौद्धधर्माच्या पूर्वीं स्थान नव्हतें. अलीकडच्या काळांत पाहिलें, तरी बंगाल्यांत चैतन्यादि, पंजाबांत नानक व आपल्या प्रांतीं ज्ञानदेव, एकनाथ, रामदास, तुकारामादि साधूंनींही धर्मप्रवाहास पुष्कळ भर घातली आहे, असें दिसून येईल. ज्या कोणास आपल्या धर्माचा अभिमान असेल, त्यांनीं हा धर्मविचाराचा ओघ सतत वृद्धि पावेल, असाच यत्न केला पाहिजे. ज्यांस त्याची अवस्था सरस्वती नदीसारखी करणें असेल, त्यांनीं पाहिजे तर ती खुशाल करावी. पण, ते धर्मरक्षक व प्रसारक न होतां धर्मविध्वंसक मात्र होतील.

दुसरा दृष्टान्त आपण केळीच्या झाडाचा घेऊं. केळीचा खुंट प्रथम लावावा, त्यास एकच लहानसें पान येतें; पण, झाड जसें जोरावत जातें, तसतशीं त्यांस एकामागून एक अधिकाधिक जोरदार व विस्तीर्ण अशीं पानें येत जातात. प्रत्येक पान पूर्वींच्यापेक्षां अधिक मोठें आलें, तरच झाड चांगल्या स्थितींत आहे, असें समजावें. कोणी जर ह्या विस्ताराचा कंटाळा करून झाडास एकच पान असलें, तरी समाधान मानून स्वस्थ राहाण्याची इच्छा करील, तर आपण त्यास कोणत्या वर्गांत घालूं? समंजस लोकांच्या वर्गांत कधींही घालणार नाहीं. हिंदुधर्माची वाढ वैदिक कालापासून आजपर्यंत केळीच्या झाडाप्रमाणें उत्तरोत्तर होत आली आहे व ती होणें आपणांस इष्टच आहे.

तिसरा एक दृष्टान्त आपण वटवृक्षाचा घेऊं. वटवृक्षास नव्या नव्या पारंब्या फुटून त्या जमिनींत जाऊन त्यांचींच पुढें मोठमोठालीं खोडें होतात. व तींच त्या वृक्षास आधारभूत अशीं होतात. ह्या नव्या खोडांच्या आधाराशिवाय येवढा मोठा वृक्ष कधींही उभा राहूं शकणार नाहीं. जसा मुख्य वटवृक्षाचा व

त्यास फुटणाऱ्या नव्या पारंब्यांचा संबंध, तसाच हिंदुधर्माचा व ह्या नवीन दिसणाऱ्या पंथांचा आहे.

तेव्हां मुख्य मुद्दा जो प्रार्थना अगर ब्राह्मसमाजाचा पंथ कां निघत आहे, ह्याचें उत्तर ह्या पूर्व विवेचना-वरून उघडच निघत आहे, तें हें कीं, धर्मव्यवस्था सतत वृद्धि पावत राहावी, म्हणून ह्या पंथांचा उद्भव होत आहे. आतां, कोणी असा प्रश्न करितील कीं, धर्मविचारास अशी नवी भर घालण्यासारखे साधु पुरुष तुमच्यांत कोणी आहेत काय ? ह्या प्रश्नास आमचें उत्तर असें आहे कीं, जुन्या धर्मव्यवस्थेचें स्वरूप बदलून नवी व्यवस्था अमलांत आणावी, असें जरी सामर्थ्य आम्हांमध्यें नसलें, तरी जे कांहीं अल्प विचार आमच्या मनांत आले आहेत ते जागृत ठेवणें हें आमचें कर्तव्य आहे. अग्नीची लहान ठिणगी असते तीच फुंकून फुंकून जागृत ठेविली, तर तीच भोंवतालच्या इंधनाचा थोडाथोडा अंश व्यापीत जाऊन, पुढें मोठा अग्नि करिते. त्याप्रमाणें ही धर्मविचाररूपी नवी ठिणगी जागृत ठेवण्यास पुढें तसाच कोणी सत्पुरुष निर्माण होऊन तिला प्रज्वलित रूप देईल. आज आम्ही आपल्याकडे तो अधिकार घेऊं इच्छित नाहीं. आमच्या अल्प सामर्थ्याप्रमाणें कर्तव्य बजावण्यास मात्र आम्ही सिद्ध आहों.

कोणी कोणी आम्हांस उतावीळपणाचा दोष देत असतात. त्यांचें म्हणणें असें असतें कीं, आम्ही एकदम फार पुढें चाललों आहों. पण, आम्ही त्या दोषास मुळींच पात्र नाहीं. आम्ही उलट प्रकारच्या दोषास मात्र पात्र आहों ! तो दोष हा कीं, आम्ही कांहीं केल्या जागचे म्हणून हालतच नाहीं ! तोंडानें मात्र बोलतों; पण हातून तशी कृति मुळींच होत नाहीं. कितीही वर्षांनीं पाहिलें, तरी आम्ही आपले जागच्याजागीं आढळतों. तेव्हां तुम्ही जागचे हालतही कसे नाहीं ? असा दोष आम्हांस दिल्यास तो यथायोग्य होईल. घाई करून फार पुढें जाण्याची मुळींच भीति नको ! कारण, आपण सर्वच लोक असे मठ्ठ आहोंत कीं, कोणतीही गोष्ट अमर्याद वेगानें होण्याची भीति नको ! उलट आमच्यामध्यें जी शिथिलता आहे, तिला घालविण्याचा प्रयत्न मोठ्या प्रमाणानें व्हावयास पाहिजे. तेव्हां विचारपूर्वक पाहाणारास दिसून येईल कीं, लोक जे समाजावर आरोप घेत असतात ते केवळ गैरसमजा-मुळें घेत असतात. समाज त्या आक्षेपांस मुळींच पात्र नाहीं. समाजाचा उद्देश आपल्या सर्वांच्या हिताचाच आहे व त्यास साह्य करणें, हें प्रत्येक विचारी हिंदूचें आद्य कर्तव्य आहे.

* *

# ख्रिस्तीधर्म व [1]हिंदुधर्म

आज ह्या उत्सवाच्या निमित्तानें विद्वान् व होतकरू अशा मंडळीचा समाज येथें जमलेला पाहून मला फार आनंद वाटतो. व्यवहारांतील इतर विषयांची जशी आपण चर्चा करितों तशी धर्मविषयाचीही करणें अवश्य आहे; म्हणूनच सर्व मित्रमंडळीस प्रतिवर्षीं येथें बोलावण्यांत येत असतें. त्याप्रमाणें आज हा आनंद-कारक प्रसंग आला आहे. आज आपल्या विचाराकरितां मीं जो विषय आपल्यापुढें मांडण्याचें योजिलें आहे, तो असा आहे :

विलायतेंत रे० चार्ल्स व्हायसे म्हणून एक धार्मिक गृहस्थ आहेत. हे हल्लीं तेथें एकेश्वरीमंडळीचे पुढारी आहेत. पूर्वी हे चर्च ऑफ् इंग्लंड नांवाच्या ख्रिस्ती-पंथाचे मिशनरी होते. परंतु पुढें त्यांनीं तो धर्म सोडून, [3]एकेश्वरीपंथाची स्थापना केली व त्या पंथाचे काम

१. सन १८८७ सालीं मित्रमेळ्याच्या उत्सवाचे वेळीं दिलेलें व्याख्यान.

२. विलायतेंतील व अमेरिकेंतील युनिटेरिअन मंडळी व रे० व्हायसे ह्यांचा पंथ हीं एक नव्हेत. रे० व्हायसे हे "बायबला"स आद्यस्थान द्यावयास तयार नाहींत. व युनिटेरिअन मंडळी बायबल जरी ईश्वर-दत्त मानीत नाहींत, तरी ख्रिस्तास प्रमुख गुरू मानितात व एकंदरीनें बायबलाकडे त्यांचा ओढा फार आहे. रे० व्हायसे ह्यांचें "थिइस्टिक चर्च" अद्याप चालू असून प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज आणि रे० व्हायसे ह्यांचें चर्च ह्यांत बरेंच साम्य आहे. सं०



अनुक्रमणिका

तेथें हळूहळू चालू आहे. लंडन येथें प्रसिद्ध होणाऱ्या 'फॉर्टनाइट्ली रिव्ह्यू' नामक मासिकाच्या कर्त्यांनीं रे० व्हायसे ह्यांस आपल्या मतान्तराचीं कारणें काय तीं कळविण्याची विनंति केली. रे० व्हायसे ह्यांनीं तीं दिल्यावर तीं ( कारणें ) त्यांनीं एका ख्रिस्ती धर्मोपदेशकाकडे पाठविलीं. आणि त्यांवर त्यांचें उत्तर काय होतें तें मागितलें. त्यांनीं आपल्या उत्तरासह रे० व्हायसे ह्यांचा निबंध परत पाठविला. तो सदर पुस्तककर्त्यांनीं उत्तरासह आपल्या पुस्तकांत छापला आहे. हा निबंध व हें उत्तर कांहीं दिवसांपूर्वी माझ्या वाचण्यांत आलें, त्या आधारावर आज एका विषयासंबंधानें बोलण्याचा माझा विचार आहे.

रे० व्हायसे यांचा निबंध व त्यावरील उत्तर हीं दोन्ही मनोरंजक, उपयुक्त व बोधपर आहेत. रे० व्हायसे ह्यांच्या निबंधांत दर्शविलेली धर्मविचाराची बाजू व आमच्या देशांतील ह्या प्रार्थना व ब्राह्मसमाजांची बाजू ह्या सारख्या आहेत. रे० व्हायसे ह्यांच्या मतांत अंतर पडण्यास कारण असें झालें कीं, त्यांची पत्नी आजारी पडून मरणोन्मुख झाली. त्या वेळीं हे तिच्या शेजारीं बसले असतां, मनुष्याची मरणोत्तर स्थिति काय होणार ह्याविषयीं त्यांच्या मनांत विचार घोळूं लागले. ख्रिस्ती धर्मांत जी मनुष्याची मरणोत्तर व्यवस्था सांगितली आहे, तिच्यापासून त्यांचें समाधान होईना. नंतर ख्रिस्ती धर्माचें परीक्षण करितां करितां एकुणचाळीस तत्त्वांपैकीं त्यांस अठरा मुळींच मान्य होईनात. तीं तत्त्वें कोणतीं असावींत ह्याची कल्पना आपणां सर्वांस सहज होणार आहे. १. ट्रिनिटी, २. ख्रिस्ताचा अवतार, ३. मनुष्यें पापी झाल्याची गोष्ट, ४. देवाचा राग, ५. आजन्म शिक्षा, ६. ख्रिस्ताच्या मध्यस्थीनेंच पापापासून सुटका, ७. ख्रिस्ताचें प्रायश्चित्त, ८. स्वर्गारोहण, ९. त्याचा लोकांस उपयोग, १०. कित्येकांची सुटका व कित्येकांचा नाश, ११. प्रीडेस्टिनेशन, म्हणजे अमुक मनुष्यें तरावयाचीं व अमुक नरकास जावयाचीं असा ईश्वरी पूर्वसंकेत इत्यादि मतें रे० व्हायसे ह्यांस मान्य होईनात. ह्यांच्या निबंधास ख्रिस्ती धर्मोपदेशकाकडून जें उत्तर आलें आहे, त्यांत ह्यांनीं काढलेल्या सर्व हरकती मान्य केल्या आहेत; परंतु समाधान अशा रीतीनें करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, अशा हरकती असल्या तरी धर्म सोडण्याचें कांहीं कारण नाहीं. पदार्थविज्ञानशास्त्रांतील सिद्धान्तांवरही शंका घ्यावयास जागा असते. पदार्थांत शक्ति आहे, असें आपण म्हणतों; पण, शक्ति पदार्थाहून भिन्न असते, पदार्थ आणि गुण हे कधीं निराळे होऊं शकत नाहींत. अशा शंका आल्या म्हणून त्या शास्त्राचा अभ्यास कोणीं सोडला आहे काय ? आजपर्यंत हजारो लाखो लोकांचें जर ह्या धर्मापासून समाधान होत आलें आहे, तर तो सोडण्याचें कांहीं कारण नाहीं. शास्त्रीय, किंवा ऐतिहासिक भागांविषयीं शंका आल्या, तर तेवढे भाग पाहिजे तर मानूं नयेत. पण, अंत:करणास जेणेंकरून समाधान होतें ते भाग मानण्यास हरकत नाहीं. ह्या समाधानावर रे० व्हायसे ह्यांचें असें म्हणणें आहे कीं, सोळाव्या शतकांत जी धर्मक्रांति झाली ती पुरी झाली नाहीं, तिचें काम अर्धेंच राहिलें. पोपचा जो विशेष अंमल होता, तेवढा मात्र कमी झाला; पण, जुन्या मतांकडे पूर्वींप्रमाणेंच अत्यंत कल आहे. तो अवश्य कमी व्हावयास पाहिजे आहे.

अशी तिकडील धर्मविचारांची व्यवस्था आहे. पुष्कळ समुदाय एका बाजूस आहे; थोडे लोक दुसऱ्या बाजूस असून जुन्या लोकांवर हल्ला करीत आहेत व जुने लोक आपला आग्रह कांहीं कांहीं बाबतींत सोडीत आहेत. रे० व्हायसेप्रमाणें धर्मांतर जरी केलें नाहीं तरी ख्रिस्ती धर्मांतील पुष्कळ गोष्टी अमान्य करणारे मोठमोठे शेंकडो लोक आहेत. आतां आपल्या इकडील कशी स्थिति आहे हें पाहूं गेल्यास, साधारणपणें तिकडच्याप्रमाणेंच इकडे प्रकार असल्याचें आढळून येणार आहे. मात्र तितका जोर नाहीं; जोर फार कमी आहे. ख्रिस्ती धर्मामध्यें हा एक फार मोठा भेद आहे कीं, तो धर्म दोहोंकडून बांधून गेला आहे, तशी स्थिति हिंदुधर्माची नाहीं. ख्रिस्ती लोकांचीं कौन्सिलें भरून धर्माच्या मर्यादा अगदीं ठरवून टाकिल्या आहेत. आमच्या इकडील बौद्ध धर्माचींदेखील कौन्सिलें भरून त्या धर्माचाही असाच प्रकार झालेला होता. महंमदी धर्माचीही व्यवस्था अशीच आहे. पण, हिंदुधर्माची वाढ सदा सुरू आहे. भूतपिशाच्चांची पूजा, मूर्तीची पूजा, अनेक देवतांची पूजा, एकेश्वरीमत, असा सुधारणेचा क्रम सतत चालू आहे. आमच्या इकडे सर्व मतें आहेत. पंजाबांत गेल्यास शीख लोकांचा धर्म पाहा. त्यांच्यांत उत्तम प्रतीची धर्मश्रद्धा दिसेल; पण, एकही मूर्ति दृष्टीस पडणार नाहीं. इकडे पंढरपुरास जा; तेथें जरी देऊळ आहे, आंत मूर्ति आहे, तरी हजारो यात्रेकरू

लोक मूर्तीच्या दर्शनासही न जातां, नदीच्या वाळवंटांत मोठ्या प्रेमानें भजन करण्यांतच संतुष्ट असतात. बंगाल्यांत साधु चैतन्याचे जे अनुयायी आहेत, त्यांचाही प्रकार असाच आहे. देशाच्या कोणत्याही भागांत गेलें, तरी धर्मसंबंधानें परकेपणा वाटत नाहीं; सहज ऐक्य होतें. हा एक हिंदुधर्मांत फार उत्तम गुण आहे. ज्या आमच्या लोकांस ह्या धर्माचें रहस्य कळलें आहे ते कधीं तरी धर्माचा त्याग करितील, असें कोणास वाटेल, तर ती त्याची मोठी चुकी होणार आहे. आमच्यामध्यें धर्माविषयीं कधीं हट्ट नव्हता व हल्लींही नाहीं. केव्हां केव्हां थोडेबहुत वादाचे प्रसंग घडले, तरी शेवटीं ऐक्य होतें. ख्रिस्ती लोक इतर लोकांस अनंत काळच्या नरकांत लोटतात; पण, हिंदुधर्म तसें करीत नाहीं. ह्या धर्मांत आणखी एक समाधान मानण्यासारखी गोष्ट आहे. ती ही कीं, आमचीं धर्मपुस्तकेंही मर्यादित नाहींत. त्यांचा ओघ सतत वाहात आहे. श्रुति, स्मृति, पुराणें ह्यांपासून तों हल्लींच्या प्राकृत ग्रंथांपर्यंत हा ओघ चालू असून, पुढेंही तो खुंटून राहणार आहे, असें नाहीं. विलायतेंत हल्लीं जी वर सांगितलेली धर्मसंबंधानें चळवळ सुरू आहे तिच्यांत व आमच्या इकडील नव्या व्यवस्थेंत हा भेद आहे कीं, त्यांच्या चळवळीस तिकडील धर्मांत जागा नाहीं; ती अगदीं निराळी पडल्यासारखी आहे. तसा प्रकार आमचा नाहीं. आमच्या सर्व नव्या दिसणाऱ्या विचारांस आमच्या धर्मांत स्थान आहे. दुसरी एक संतोषाची गोष्ट अशी आहे कीं, जातिभेद मानणें, मूर्तिपूजा करणें, स्पर्शास्पर्शाचा बाजार घालणें, अशांपैकीं कोणतीही गोष्ट खऱ्या हिंदुत्वास आवश्यक नाहीं. निरनिराळ्या गोष्टींत भेद असूनही मुख्य तत्त्वाकडे दृष्टि ठेविल्यानें ऐक्य होऊं शकतें. बुद्धाचा धर्म जरी दुर्दैवानें आज आमच्या देशांतून गेल्यासारखाच आहे, तरी तोही हिंदु धर्माचाच एक भाग आहे व त्याचे आमच्यावर घडलेले संस्कार अद्याप जागृत आहेत. आमच्या धर्मामध्यें मनुष्याच्या जीवित्वाचा उद्देश येथें सुखोपभोग घेणें, किंवा पूर्वजन्मींच्या पातकांची शिक्षा भोगणें असा मानिलेला नाहीं, तर हें सर्व जग शाळेप्रमाणें मानिलेलें आहे. येथें येऊन मनुष्यानें आपल्या पुढील श्रेष्ठतर जीविताची तयारी करणें आहे. दुसरींही कित्येक मतें आहेत; पण, तीं गौण मानिलेलीं आहेत. नास्तिक मतास तर आमच्या देशांत एका काळीं सर्वत्र मुळींच थारा मिळालेला आढळावयाचा नाहीं. त्याचा आमच्या देशांत कोणी प्रसार करूं पाहील, तर ती त्याची मोठी चुकी होईल. श्रद्धा ही आमच्या इकडे मुख्य आहे. ती पायाशुद्ध असावी, असे प्रयत्न चाललेले आहेत. असली पायाशुद्ध श्रद्धा असली, म्हणजे दुसरे कितीही भेद असले, तरी आमचे लोक कोणाशीं तंटा करीत बसणार नाहींत. अशी ह्या धर्माची स्थिति असल्यामुळें कालानुरूप व परिस्थितीस अनुरूप योग्य फेरफार करणें, हें त्यास मुळींच बाधक व विरुद्ध नाहीं. ह्या समाजाची व ह्याच्यासारख्या अन्य संस्थांची जी खटपट आहे, ती हिंदुधर्माच्या पायावरच आहे; ती करणारी मंडळी कितीही अशक्त असली, पापी असली, लोभी असली, तरी त्यांचा उद्योग सत्य मार्गानेंच होत आहे, म्हणून त्यांचा कोणी विरोध करण्याचें कारण नाहीं.



अनुक्रमणिका

# ज्ञानेश्वर[1]

मला फार आनंद वाटतो कीं, रा. रा. राजारामशास्त्री भागवतांनीं हा प्रसंग घडवून आणिला आहे. विद्येच्या संस्काराबरोबर साधु पुरुषांच्या ठायीं विद्यार्थ्यांचा पूज्यभाव असावा, अशी शिक्षा त्यांना देण्याचा शास्त्रीबावांचा विचार आहे. चार वर्षें त्यांनीं हा प्रकार चालविला आहे. तूर्तचा प्रसंग साधूंत साधु, वंद्यांत वंद्य अशा ज्ञानेश्वरांच्या पुण्यतिथीचा आहे. आळंदीस तीन दिवस ह्या साधु पुरुषाचें नामसंकीर्तन करण्यांत येतें. आपण अनेक व्यवसायांत गुंतलेले असल्यामुळें आपणांला तेथें जातां येत नाहीं. पण, मानसिक रीतीनें त्यांना आपणांस ह्या ठिकाणीं आणितां येईल. त्यामुळें आपणांस समाधान व विश्रांति मिळेल व त्यांच्या प्राप्तीसाठीं हा सांवत्सरिक प्रकार चालू आहे.

आतां, साहजिक असा विचार मनांत येण्यासारखा आहे कीं, येवढें ज्ञानेश्वरांचें माहात्म्य तें काय ? त्यांना होऊन सहाशेंपेक्षां अधिक वर्षें झालीं; तरी त्यांना अजून आपण कां स्मरतों ? त्यांचे आपणांवर असे काय उपकार झाले ? त्यांच्यामुळें आपला इतिहास, स्वभाववळण ह्यांवर काय परिणाम झाला आहे ? ह्या प्रश्नांचा उलगडा त्यांच्या चरित्रज्ञानावरून सहज होणार आहे. येथें आलेल्या गृहस्थांस त्यांचें चरित्र अवगत नसेल, असें म्हणणें ठीक नाहीं. यांचें चरित्र ज्याला ठाऊक नाहीं, तो महाराष्ट्राच्या बाहेरचा, असें म्हटलें पाहिजे. तें चरित्र म्हणजे फार मोठें आहे असें नाहीं. सारें वीस-बावीस वर्षांचें चरित्र. त्यांत म्हणजे राजेरजवाडे, सरदार व मानकरी अगर मोठे राजकारणी पुरुष ह्यांच्या चरित्रांतल्यासारख्या गोष्टी नाहींत. तें अगदीं साधें आहे. ज्ञानेश्वरांचे वडील **विठ्ठलपंत** हे व्रतस्थ राहून दिवस काढीत असत. त्यांना विवाह करण्याविषयीं दृष्टान्त झाला. त्यावरून त्यांनीं विवाह केला. पण, त्यांना संसाराचा कंटाळा आला म्हणून ते **काशी** मुक्कामीं संन्यास धारण करण्याकरितां गेले. तेथें त्यांच्या गुरूनें संप्रदायाला अनुसरून त्यांना असा प्रश्न विचारला कीं, आई, बाप किंवा बायको ह्या तिघांपैकीं कोणाची तुझ्या ठायीं इच्छा नाहीं ना ? त्यावर त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, संन्यास धारण करण्याची मला सर्वांची परवानगी आहे. मग गुरूनें त्यांना संन्यासदीक्षा दिली. पुढें एके दिवशीं अशी गोष्ट घडली कीं, ज्ञानेश्वरांची मातुश्री व त्यांच्या पित्यांचे गुरू ह्यांची आळंदी येथें गांठ पडली. त्यांनीं तिला आशीर्वाद दिला. ती म्हणाली कीं, आपला आशीर्वाद विसंगत आहे. कारण, पति वैतागून संन्यासी बनले आहेत. तिचा पति, तो आपलाच शिष्य, असें समजल्यावर त्यांनीं विठ्ठलपंतास असें सांगितलें कीं, स्वगृहीं पत्नी असंतुष्ट स्थितींत असतां संन्यासधर्म यथार्थ नाहीं; तेव्हां आपण संसार करावा. संसार करूं लागल्यावर लोकापवाद झाला. लोकवस्तींत आल्यावर त्यांना तीन मुलें झालीं. पुढें लोकापवाद टळेना, म्हणून विठ्ठलपंत प्रयाग येथें गेले व तेथें त्यांनीं देहत्याग केला. मग तीं तीन मुलें ब्रह्मवृंदाला शरण जाऊन आपणांस व्रतबंधाला अधिकृत करण्यास्तव त्यांची विनवणी करूं लागलीं. त्यांनीं त्यांस असें सांगितलें कीं, क्षेत्राचा दाखला आणाल, तर तुम्हांला अधिकृत करूं.

तेव्हां मुलें पैठण येथें गेलीं व तेथें त्यांनीं अद्भुत चमत्कार केले, अशी कथा आहे. पैठणकरांनीं त्यांना असा उपदेश केला कीं, आपण जो भजनाचा मार्ग स्वीकारिला आहे तो सोडूं नका. त्यांचा उपदेश असा आहे :– "अनन्यभक्तीतें अनुसरा." तेथून तीं मुलें स्वतःच्या गांवीं आलीं व सात वर्षेंपर्यंत त्यांनीं आपला क्रम चालू ठेविला. त्या अवधींत ज्ञानेश्वरांनीं गीतेवरील टीका, अमृतानुभव व स्फुट ग्रंथ बरेच रचिले; पण, त्यांचें समाधान होईना. तेव्हां ते नामदेवांबरोबर तीर्थाटनाला गेले. भक्तीविषयीं नामदेवांची फार ख्याती होती, ती ज्ञानेश्वरांनीं त्यांच्याजवळून साध्य करून घेऊन जन्मकार्य सफळ झालें असें समजून, इतर साधु पुरुष जमवून समाधी घेतली.

ह्या चरित्रांत त्यांनीं राज्य घेतलें नाहीं, किंवा मोठी लढाई मारिली नाहीं; वीस-बावीस वर्षांचें साधें चरित्र. तरी अल्प काळांत देहसार्थक झालें असें वाटून

१. ज्ञानेश्वरांच्या पुण्यतिथिनिमित्त १८९३ सालीं झालेलें व्याख्यान. **सं०**



अनुक्रमणिका

ज्ञानेश्वरांनीं देह ठेविला, हें कसें? ह्याची एक कसोटी आहे. शास्त्रपुराणांत कसोट्या पुष्कळ आहेत; पण, त्यांची आम्हांला हल्लीं जरूर नाहीं. आपली कसोटी ही आहे कीं, ज्ञानदेवांचें चरित्र आपल्या चरित्राशीं ताडून पाहावें. येथें वीसी-बावीशीच्या घरांत व साठीच्या घरांत आलेले बरेच गृहस्थ असतील. त्यांनीं आपल्या चरित्रांशीं हें चरित्र ताडून पाहावें. जरी त्यांत वीर, करुणा व शृंगार हे रस नाहींत, तरी वीराहून वीर, करुणाहून करुण व शृंगाराहून शृंगार असें कांहीं ह्या चरित्रांत आहे. तेव्हांचीं साधनें व आतांचीं साधनें पाहा. हल्लीं शाळा व पाठशाळा आहेत, तशा तेव्हां नव्हत्या. तरी हल्लींच्या मराठीला जी थोरवी व भारदस्तपणा आला आहे त्याचे मूळ कारागीर ज्ञानेश्वर होत. कित्येक असें गाऱ्हाणें करितात कीं, मराठींत आपले विचार चांगल्या रीतीनें प्रदर्शित करितां येत नाहींत. पण, मराठींत अर्थगांभीर्य किती आहे हें पाहाणें असल्यास ज्ञानेश्वरीचें अध्ययन करावें. त्यांत त्यांना असें दिसून येईल कीं, मोठीं गूढ प्रमेयें, त्या वेळच्या प्राकृत, तत्सम, तद्भिन्न शब्दांनीं अगदीं सोप्या भाषेंत प्रदर्शित केलीं आहेत. इतकी ज्यांनीं भाषेला योग्यता आणिली त्यांनीं भाषेवर थोडे उपकार केले काय? पण, श्रद्धावान व आस्तिक लोक असें म्हणतील कीं, मग तुम्हांला गीतेंत गम्य नाहीं. त्यांतलें रहस्य तुम्हांला कळलें नाहीं. असें गीतेंत काय रहस्य आहे? गीतेंत जें म्हणून रहस्य आहे तें काय हें मी पुढें सांगतों– तें ज्ञानेश्वरांच्या चरित्रांत आहे. ज्ञानेश्वरांचें चरित्र व गीताग्रंथही अल्पच आहे. त्यांचें चरित्र वीस-बावीस वर्षांचें, गीतेचे अध्यायही अठरा. महाभारतादि ग्रंथांप्रमाणें गीताग्रंथ विस्तृत नाहीं. तरी त्यांत उत्तम रहस्य आहे व तें जगाला दाखविण्या-करितां ज्ञानेश्वरांचा अवतार होय. तुम्हीं-आम्हींपण अवतारच घेतले आहेत. पण आपल्यापैकीं कोणाचा लोभाचा अवतार, कोणाचा कामाचा अवतार, कोणाचा आळसाचा अवतार व कोणाचा व्यसनाचा अवतार असें निरभिमानपणें आपण शोधूं लागलों, तर आपणांस दिसून येईल. सारांश, जगाला व्यसनाचे अनिष्ट परिणाम दाखविण्याकरितां आपले अवतार असतात व त्यापासून आपणांला बोधही घेतां येईल. आतां, आपण तो बोध घेत नाहीं हा भाग निराळा. पण, ज्ञानेश्वरांनीं अवतार घेण्याचें कारण हें आहे कीं, गीतेंतील विचारांचा व शब्दांचा जनांवर चांगला ठसा उमटावा. श्रीभगवान् निजधामाला गेले व साधूसंत नाहींसे झाले, तेव्हां गीतेचा अवतार झाला. आतां मी अर्धा-एकतास गीतारहस्याविषयीं जें सांगणार तें आपल्या मनावर या काळांत चांगलें ठसेल इतका माझा अधिकार नाहीं, तथापि आपण जें येथें ऐकाल त्याविषयीं चांगल्या अनुभवशील माणसांजवळून खात्री करून घ्या व त्याविषयीं सतत विचार करा.

आतां गीतारहस्य तें काय हें पाहूं. अर्जुन जेव्हां अडला होता तेव्हां त्या अडचणींतून त्यानें आपली सुटका करून घ्यावी म्हणून श्रीकृष्णानें त्याला बोध केला होता. अर्जुनासारखे प्रसंग आपणां सर्वांना यावयाचे नाहींत. पण, संसारांत अडण्याचा प्रसंग सर्वांवर येणारा आहे. ज्याच्यावर तसा प्रसंग येणार नाहीं, त्याच्यासारखा अभागी कोणी नाहीं. अडचणीचा प्रसंग आला, म्हणजे आपण कर्तव्यपराङ्मुख होऊन जातों. आपल्या ठिकाणीं वास करणारे वैरी मोठे प्रबल आहेत, आपले पांडव अगदीं क्षुद्र आहेत; व कौरव बलाढ्य आहेत. घटकाभर खऱ्या कौरवांची लढाई बरी, पण आपल्या इंद्रियरूपी कौरवांबरोबरची लढाई कठीण. त्या वैऱ्यांच्या नाशार्थ जसा श्रीकृष्णाचा बोध उपयोगीं पडला, तसा ह्या कौरवांच्या नाशार्थ गीताबोध उपयोगीं पडणार आहे. श्रीकृष्णानें ज्ञान व धर्म आदिकरून गोष्टींची अर्जुनाला एकवाक्यता करून दाखविली व कांहीं प्रश्न अंगावर घेऊन व सोडवून अर्जुनाला गीतारूपी बोध केला, तदनुसार चरित्र करणें फार कठीण आहे. गीतेचा बोध करणें फार सोपें आहे. पांच-सहा विद्वान एकत्र ठिकाणीं जमून त्यांना तसें सहज करितां येणार आहे. पण आम्हांला चरित्र पाहिजे. भरतभूमीचें भाग्य म्हणून तसें चरित्र ज्ञानेश्वरांनीं करून दाखविलें; अल्पशा काळांत त्यांनीं सर्व गोष्टी संपादून समाधी घेतली. हें सर्व अवतारकृत्य आहे. कारण, ज्ञानादिकरून प्राप्तीच्या गोष्टी कालाधीन आहेत. एकएका तपाच्या अवकाशानें त्यांची प्राप्ति होण्याचा संभव आहे. पण, त्या सर्व गोष्टी ज्ञानेश्वरांनीं वीस-बावीस वर्षांत संपादिल्या. तेव्हां परमेश्वरानें तशीच कांहीं योजना केली होती हें खरें. ज्याप्रमाणें सप्तसूर एकत्र होऊन एक आठवा साफ निराळा सूर बनतो, किंवा सात रंग एकत्र होऊन आठवा निराळा रंग बनतो, त्याचप्रमाणें भक्ति, ज्ञान, वैराग्य, योग, नैष्कर्म्य, विनय, शांति व क्षमा ह्या सर्व

अनुक्रमणिका

वृत्ति वीस-बावीस वर्षांत एक बनून त्यांतून दुसरीच वृत्ति निष्पन्न झाली. हें एक शाळा किंवा पाठशाळा ह्याचें साधन नसणाऱ्या, लोकांनीं निर्भर्त्सना केलेल्या, कुळकर्ण्याच्या मुलानें साधिलें. येणेंप्रमाणें बालपणांत समाधान व विनय प्राप्त करून घेऊन तुकाराम, रामदास व एकनाथ ह्या साधु पुरुषांकडून ज्ञानेश्वरांनीं धन्य म्हणवून घेतलें. नेपोलिअन किंवा अलेग्झांडर, ज्यांनीं लोकांचे गळे कापिले, यांनीं जगावर खरे उपकार केले नाहींत, तर ज्ञानेश्वरांनीं केले. ज्ञानेश्वरांवर आलेले नाना प्रसंग त्यांना गीतारहस्य शिकविण्यास कारणीभूत झाले. ज्ञानप्राप्ति होत नाहीं म्हणून ज्ञानेश्वरांनीं नामदेवांची ज्या भक्तीविषयी आख्या होती ती भक्ति अशा रीतीनें संपादिली : एके दिवशीं ज्ञानेश्वरांनीं भक्तीची प्राप्ति करून घेण्याकरितां नामदेवांस असें सांगितलें कीं, मला तुमच्या सहवासांत राहून तीर्थयात्रेस जावेंसें वाटतें. त्यावर नामदेवांनीं असें उत्तर दिलें कीं, मी ठाकुरद्वारांतून देवाची आज्ञा घेतों. असें म्हणून दोघेही ठाकुरद्वारीं गेले. देवाज्ञा घेतांना नामदेवांचे डोळे पाण्यानें भरून आले, पण ज्ञानेश्वरांच्या डोळ्यांत पाण्याचा एक थेंब नाहीं. हा भक्तीचा प्रभाव. पुढें नामदेवांबरोबर तीर्थयात्रा करून ज्ञानदेवांनीं भक्ति संपादिली. तेव्हां त्यांना देहसार्थक झालें असें वाटलें व ते देवाच्या सहवासांत राहण्यास पात्र झाले, इतका अधिकार प्राप्त झाल्यावर ह्यांनीं समाधी घेतली. असें हें चरित्र गीतेच्या प्रमेयांचा पडताळा दाखवितें; म्हणून त्याचें माहात्म्य विद्यार्थ्यांस सांगण्याची रा. रा. राजारामशास्त्र्यांनीं विनंति केली. त्याप्रमाणें मीं तें काम यथामति केलें आहे.

* *

# रामदास

कांहीं दिवसांपूर्वीं ज्ञानेश्वरांच्या चरित्रांत ग्रहण करण्याजोगें काय आहे, ह्याचें मीं अल्पमतीनें विवेचन केलें होतें. त्या व्याख्यानांत मीं असें सांगितलें होतें कीं, श्रीमद्भगवद्गीतेचा बोध ग्रंथरूपानें लोकांच्या मनावर चांगला ठसत नाहीं, चरित्रानें चांगला ठसतो, यास्तव, ज्ञानदेवांनीं अवतार घेतला. ज्ञानदेवांनंतर दोनशें-तीनशें वर्षें जो काल गेला तो ह्या प्रांतांत, देशावर व कोंकणांतही मोठा काळजी वाटण्यासारखा काळ होता. त्या काळाकडे तेव्हांच्या लौकिकरीतीनें अवलोकन केलें असतां, पुराणांत वर्णन केलेल्या कलियुगाचा तो काळ आहे, असें वाटत होतें; व त्या वेळच्या लोकांस ( हल्लींच्या लोकांप्रमाणें ) उन्नति प्राप्त करून घेण्याचा आपल्या अंगीं पराक्रम नाहीं, असें वाटत होतें. इतिहासावरून असें आढळून येईल कीं, ज्ञानेश्वरांचे समकालीन नामदेव वगैरे झाल्यानंतर विज्ञानेश्वर ( ह्यांनीं याज्ञवल्की मिताक्षरा टीका लिहिली आहे), हेमाद्रि (ह्यांना हेमाडपंत म्हणण्याचा परिपाठ आहे, हे देवगिरीच्या जाधव घराण्याचे प्रधान), रामदास, कल्याण, हे होतपर्यंत तीनशें वर्षें इतिहासांत खळगा आहे; म्हणजे धनुर्विद्येंत, आयुर्विद्येंत व शास्त्रांत कोणी फारसे उदयाला आले नाहींत. सूर्याला खग्रास लागण्यापूर्वीं जसा तो दिसतो, तसा तो एका तासानें दिसत नाहीं– जेथेंतेथें काळोख होऊन जातो,– तसें झालें; त्यामुळें आपलें स्वराज्य गेलें, आपला पराक्रम नाहींसा झाला व आपण बुद्धिभ्रष्ट झालों. तेव्हां आपली स्थिति सुधारेल किंवा नाहीं, असें विचारिलें असतें, तर निराशेचेंच उत्तर मिळालें असतें. त्या वेळीं मोठा योद्धा, राजा व शिल्पकार वगैरे फारसा कोणी झाला नाहीं. पुढें दोनशें वर्षांनीं सर्व हिंदुस्थानभर उदयकालाचीं चिन्हें दिसूं लागलीं. बंगालप्रांतांत–आपणांस ऐकून माहीतच असेल–चैतन्य झाले, काशींत कबीर, कमाल झाले व पंजाबांत नानक झाले. हा समकालीन साधूंच्या उदयाचा प्रकार मोठा विलक्षण आहे. साधुत्व, पुरुषार्थ, पराक्रम, साहस व विनय, असे जे खरा मनुष्यपणा येण्यास थोर गुण लागतात, त्यांचा समुद्भव एकाएकीं सर्वत्र दिसूं लागला. तो एकाच प्रांतांत दिसला असतां, तर नवल नाहीं. तेव्हां मुसलमानी अंमल जारीनें सुरू असतां हिंदुस्थानांत सर्वत्र साधू, शास्त्री, कवि, सरदार, मुत्सद्दी व शिपाई उत्पन्न झाले आणि अभ्युदय दिसूं लागला.



अनुक्रमणिका

त्यांपैकीं विशेष रीतीनें स्मरणांत ठेवण्यास ज्यांचे गुण कारणीभूत झाले, त्या रामदासांचा (ह्यांचें मूळचें नांव नारायण) जन्म शके १५३० त झाला. असो.

वाईट स्थितींतून सुटका करणारे, किंवा उन्नतीचा मार्ग दाखविणारे ते त्या काळचे वाटाडे, किंवा दर्शक, किंवा अग्रेसर होत. अशा काळांत ज्यांच्याजवळ हे गुण नसतात ते निरर्थक होत, हा अनुभव आहे. चितेचें स्वरूप सर्वांना ठाऊक आहे. तें अति उग्र असतें. गेल्या वर्षीं त्या स्वरूपाची थोडीशी दिशा प्रत्यक्ष पाहण्यांत आली. राजा तोच, सरकार तेंच, न्यायाधीश तोच व प्रजासुद्धां तीच, तरी तसा प्रकार दिसून आला. येथून शें-दोनशें कोसांवर, किंवा नर्मदेच्या उत्तरभागीं (तेथें आपणांपैकीं बरेच लोक गेले असतील) एक देऊळ आहे. ह्या देवळाएवढें एक देऊळ शहरांतसुद्धां सांपडणें मुष्कील. त्यावर शिखरही नाहीं. इंग्रजींत हिंदु देवळांवर शिखरें चढलीं. काशी, वृंदावन, गया, वगैरे ठिकाणीं तसेंच परवां आम्ही लाहोरला गेलों तेथें व हैदराबाद येथेंही कोंदट, लहान व बाहेरून तर हीं देवळें आहेत असेंसुद्धां वाटणार नाहीं, अशीं देवळें आहेत. चार-पांचशें वर्षांपूर्वीं देवळावर शिखर चढविण्याची हिंदूंची प्राज्ञा नव्हती. अशी देशाची, ज्ञानाची व योग्यतेची हीन स्थिति होती व त्या स्थितींतून लोकांची सुटका व्हावी, म्हणून समर्थ अवतरले. ह्यांना योगी म्हणा, साधु म्हणा, किंवा दुसरें कांहीं म्हणा, पण ह्यांना समर्थ म्हणण्याची वहिवाट आहे. ह्यांना समर्थ कां म्हणतात ? तुकारामांना कधीं कोणीं समर्थ म्हणतांना ऐकिलें आहे ? नाहीं.

आतां ह्यांना समर्थ कां म्हणावयाचें ? तर त्या वेळीं सामर्थ्याची जरुरी होती. सामर्थ्यरूपानें परमेश्वराची कृपा अवतरावयाची होती. कोणत्याही गुणांत सामर्थ्य पाहिजे होतें. तें कां पाहिजे होतें, हें मीं जो इतिहासाचा भाग सांगितला, त्यावरून आपणांस समजणारच आहे. कवि, साधु, ज्ञानी, राजे, मुत्सद्दी ह्यांची गरज होती; त्या सर्वांत सामर्थ्याची गरज अधिक होती. त्या वेळीं सर्वत्र भूक सामर्थ्याची लागली होती. मग ज्या देशावर परमेश्वराची कृपा आहे त्यांत गीतेंतल्या आश्वासना-प्रमाणें परमेश्वर आपल्या कृपेचा अवतार जेणेंकरून दृश्य होईल, असा कोणी तरी महात्मा उत्पन्न करितो. त्याचें लालन करितो, पालन करितो, त्याच्या अंगीं पराक्रम आणून त्याचा गौरव करितो. इतिहासावरून आपणांस ठाऊक आहेच कीं, देशाला नेबळेपणा आला, कीं त्याचा सामर्थ्यानें उद्धार व्हावयाचा. म्हणून परमेश्वरानें, ह्या वेळीं देशाला नेबळेपणा आला, तेव्हां रामदासांच्याद्वारें सामर्थ्याची योजना केली. तें सामर्थ्य एकटचा रामदासांनीं दाखविलें असें नाहीं. त्यांना बरेच जण साह्यभूत झाले. त्या सर्वांविषयीं सांगण्याचा हा प्रसंग नाहीं. तथापि ज्याचा रामदासांशीं उजवा, किंवा डावा हात आणि मस्तक असा संबंध त्या शिवाजीचा येथें उल्लेख केला पाहिजे. हे रामदासांच्या दहा-पांच वर्षांच्या अंतरानें झाले. आतां इतिहासाचा प्रस्ताव करीत नाहीं. समर्थ झाले व शिवाजी झाले, तरी ते एकटे काय करणार ? एका पाश्चात्त्य ग्रंथ-कारानें असें म्हटलें आहे कीं, जे अग्रेसर असतात ते स्वतः अग्रेसर न होतां समुदायाच्यापुढें येण्यानें अग्रेसर होतात. येथें इतिहासज्ञ बरेच बसले आहेत; त्यांना ठाऊकच आहे कीं, सोळा-सत्राव्या शतकांतील लोकांची नामावळी व अठरा-एकुणिसाव्या शत-कांतील लोकांची नामावळी केली, तर दुसरीपेक्षां पहिल्या नामावळींत जास्त पराक्रमी लोक सांपडतील. शिवाजी म्हणजे मुक्ताहारांतले शिरोमणि होते. आतां शिरोमणीचा अर्थ भलताच होतो. कारण, मुक्ताहार ज्याप्रमाणें, त्याप्रमाणें शिरोमणि ! तेव्हांच्या लोकांची व आपली तुलना केली, तर आपण फार मागसलेले आहोंत, असें दिसून येईल. त्या वेळीं बाजी प्रभू, तानाजी मालुसरे, रामदास, शिवाजी आदिकरून थोर मंडळी होऊन गेली. रामदासांची साह्यकारी मंडळी पंचवीसएक झाली. हल्लीं ज्याला शंभर वर्षांचें आयुष्य आहे त्याच्या बापानें रामदासांना पाहिलें असेल; म्हणजे रामदासांना होऊन फार वर्षें झालीं नाहींत.

त्या एका कालीं तापीपासून कृष्णा-तुंगभद्रेपर्यंत सर्वत्र साधू, शहाणे व मुत्सद्दी झाले. असा जो काळ झाला, त्यांत विशेष प्रसिद्ध शिवाजी व रामदास हे होत. अशा थोर पुरुषांचे पराक्रम, बुद्धिमत्ता व थोरवी आपण आठवूं नये काय? ह्या विषयावरील माझी आठवण ताजी करण्याकरितां मीं ही सोहनींनीं प्रसिद्ध केलेली बखर वाचली. ही लिहिणारे रामदास संप्रदा-यांतले होते. त्यांचें नांव हनुमानस्वामी. हे सातारकर महाराज यांच्या पदरीं होते.

रामदासांच्या चरित्राला बखर कां म्हणतात ? तुकाराम, ज्ञानेश्वर व एकनाथ ह्यांच्या चरित्रांस कोठें बखर म्हटल्याचें ऐकिवांत नाहीं. रामदासांच्या

चरित्राला बखर म्हणण्याचें कारण, ते राजकीय कामांत पडलेले पुरुष होते हें होय; त्यांनीं अन्य रीतीनें उपकार केले आहेत. ज्ञानेश्वरांनीं गीतार्थबोध चरित्ररूपानें दाखविला. तसा प्रकार रामदासांचा नव्हे. एका वर्तमानपत्रांतील लेखकाला अशी भीति पडली कीं, व्रतमाहात्म्याप्रमाणेंच ज्ञानेश्वरांचें माहात्म्य होईल. पण, थोरपणाला चोहोंकडून गुण लागतात हें त्यांना समजत नाहीं, हेंच त्यांचें खरें दुर्भाग्य. ज्या देशांत एकाच अंगचा थोरपणा आहे तो देश बाल्यदशेंत आहे, असें समजावें. पवित्रता, शूरत्व, ज्ञान, बल व दया यांहींकरून ज्या लोकांत थोरपणा असतो, तो देश खरा भाग्याचा. त्याच देशाचा उद्धार होतो. पण, एकदेशी थोरपणाला किंमतच नाहीं. मुसलमानांचा सर्वत्र अंमल असतां, महाराष्ट्र सर्व गोष्टींत थोर होऊन त्याचा गौरव व कीर्ति धवलित झाली. थोराला सर्व अंगांनीं थोरपणा साधितां येईल. पण, येथें एका माणसाच्या थोरपणाचा विचार करावयाचा नाहीं. राष्ट्रांतील लोक हे सर्व राष्ट्राचे रोम आहेत, ते थोर झाले पाहिजेत. ते तेव्हां प्रवृत्ति व निवृत्ति ह्या दोहोंतही सारखे होते; नुसत्या प्रवृत्तीच्याच मागें लागले नव्हते, जेवणाचाच उद्योग त्यांना ठाऊक होता, असें नाहीं. ह्या देशांत कांहीं काळापूर्वी ब्राह्मणसंस्थानिकांच्या पंक्तीला बसणारे ब्राह्मण होते. ह्यांची प्रौढी जास्त लाडू खाण्यांत व दूध पिण्यांत होती, हा दौर्बल्याचा प्रकार झाला. पण, तसा तेव्हां प्रकार नव्हता. वास्तविक पाहातां निवृत्ति व प्रवृत्ति ह्या दोन्ही मार्गांकडे लक्ष दिलें पाहिजे. प्रसंग आल्यास डगमगतां कामा नये व प्रसंग नसेल तर तो आणावयास कचरतां कामा नये; तेच लोक भाग्यवान् होत. हैदराबाद, कलकत्ता, मद्रास व लाहोर येथील लोक महाराष्ट्राचा गौरव करितात व तें नांव यथार्थ आहे असें म्हणतात. ज्या लोकांच्या सद्‌गुणांनीं महाराष्ट्राला मोठेपणा आला, त्यांच्याबद्दल आपण बढाई करितां कामा नये. कारण, तो मोठेपणा आपण मिळविलेला नाहीं. तो पूर्वार्जित आहे, त्यामुळेंच महाराष्ट्राला राज्यकारणी सामर्थ्य आलें व त्यामुळेंच तापीपासून तुंगभद्रेपर्यंत स्वराज्य झालें. पंडितांत वामनपंडित झाले, साधूंत तुकाराम झाले, नामांकित मुत्सद्दी व वैद्य झाले, आणि मोठमोठे किल्ले तेव्हांच बांधण्यांत आले. त्यांची बांधणी कशी केली, हें आतां आम्हांस परकियांना विचारावें लागतें ! त्या वेळीं द्रव्यसुद्धां विपुल होतें. अशी आपली तेव्हां स्थिति असल्यामुळें सर्वत्र आपणांला ओळखतात. तेव्हां ज्यानें मठींत बसून बाहेर अशी कृति केली, त्याला समर्थ म्हणावयाचें नाहीं तर काय तुम्हांआम्हांला समर्थ म्हणावयाचें ? म्हणून त्यांनाच समर्थ म्हणतात, हें अगदीं यथार्थ आहे. जे मोठे असतात त्यांची जन्मापासूनच विचित्र हकीकत असते, तुम्ही-आम्ही बगीच्या घोडयांप्रमाणें रुळलेले आहोंत. समर्थांसारखे मनुष्य गाडीवानाला न ऐकणारे असे असतात. समर्थ आठ-नऊ वर्षांचे असतां रिवाजाप्रमाणें त्यांच्यावर लग्नाचा प्रसंग आला. त्या वेळीं आपणांस सावधान केलें, तरी आपण अनवधान असतों. त्या वेळीं तुम्हांला-आम्हांला हा प्रश्नच सुचत नाहीं. पण समर्थांनीं पुरोहितास 'सावधान कशाचें' म्हणून विचारिलें. पुरोहित म्हणाले, तुझ्या पायांत बिडी पडणार. पुरोहिताचें उत्तर ऐकतांच, समर्थ आपल्या मातुश्रीला सोडून गंगातटाकीं गेले. तेथें त्यांनीं तप केल्यावर त्यांना साक्षात्कार झाला. 'साक्षात्कार मानणारे मूर्ख व त्यांना कित्येक शिकलेल्या लोकांत गणीत नाहींत', अशा अर्थाची टीका एका वर्तमानपत्रांत आली आहे. पण साक्षात्कारांत फरक आहे. घर बांधलें जाईल व नोकरी मिळेल असें स्वप्नांत दिसलें व त्याप्रमाणें झालें म्हणजे साक्षात्कार झाला असें नव्हे. खरा साक्षात्कार पुढें आहे. शिवाजीनें रामदासांना असा प्रश्न केला कीं, मला आपणांजवळ राहावेंसें वाटतें. रामदासांनीं असा उपदेश केला कीं, आपण माझ्याजवळ राहूं नये. आपण रायगडास राहावें. मी चाफळास राहीन. तेथून माझी भेट घेण्याची इच्छा आपल्या मनांत उत्पन्न झाल्यास, ती परिपूर्ण करण्याची मी एक युक्ति सांगतों. जी गोष्ट आपणास कर्तव्य असेल, ती करण्यापूर्वी देवावर हवाला ठेवून, उत्कंठित रीतीनें इच्छा करून, देवीसमोर निजत जा. मन शुद्ध असूं द्या. तें गढूळ असतां कामा नये. (शिवाजीचा शुद्धपणा घेण्यासारखा आहे. तरी तो चोर होता, बंडखोर होता, फलाणा होता, असें कित्येक म्हणतात !) नंतर पुढें समर्थांनीं शिवाजीला असें सांगितलें कीं, देवीजवळ निजल्यावर आपणास जें स्वप्न पडेल त्याप्रमाणें वागत जा. आतां सर्व बाबतींत साक्षात्कार चालेल, असें माझें म्हणणें नाहीं. आपली निर्धाराची स्थिति नाहीं म्हणून आपणांस साक्षात्कार होत नाहीं. देवाचा अंश म्हणजे अंतरात्मा व साक्षात्कार म्हणजे त्याची वाणी. (हिला लौकिकांत 'आकाशवाणी' म्हणतात व ही

अनुक्रमणिका

झाली असतां विजांचा गडगडाट होतो असें म्हणतात, पण खरोखरी तसा कांहीं प्रकार नाहीं.) हिलाच Voice of conscience किंवा Voice of God म्हणजे अंतःकरणाचा, किंवा देवाचा ध्वनि असें म्हणतात. मनुष्य निर्धारानें वागल्यावर त्याला तो साक्षात्कार होणार. मी निर्धारानें न वागल्यामुळें मला साक्षात्कार झाला नाहीं, म्हणून जो निर्धारानें वागेल त्याला मी हसणार नाहीं, असें तरी असावें. शिवाजीला समर्थांचा वरदहस्त होता. त्याला निर्धार करितां आला. आपणांस तसा निर्धार करितां येत नाहीं. शिवाजीच्या ऊर्जित दशेचें खरें कारण पुंडावा किंवा बंडाळी नव्हे. तर तें कांहीं विशेष आहे. तें हें कीं, रामदासांची बुद्धि व शिवाजीची कर्तव्यता. बंडाळीनें व पुंडाव्यानें देशचा देश धुळीस मिळेल. मराठ्यांनीं ब्राह्मणांचा, किंवा ब्राह्मणांनीं मराठ्यांचा द्वेष तेव्हां केला नाहीं. शिवाजीच्या अष्ट प्रधानांत ब्राह्मण, परभू, मराठे व शेणवी होते. साधूंतही तसा द्वेष नव्हता. हल्लीं सुतार, कासार व शिंपी ह्यांच्यांत साधु होऊं नये, असें कित्येकांस वाटतें म्हणतात. असा एकंदर महाराष्ट्राचा लौकिक-समुच्चय परिणामांनीं झाला. हा होण्यास कारण समर्थ होत. व त्यांचे अभंग व स्फुटें वाचलीं म्हणजे विशेष प्रकार काय, पुरुषार्थ काय, हें आपणांस चांगलें समजेल. मीं सांगावें व आपण ऐकावें अशानें कांहीं समर्थांची यथार्थ पूजा होणार नाहीं. ती करण्या-करितां काळ मोडला पाहिजे. तरी थोडक्यांत समर्थांच्या बोधाचें लक्षण सांगतों. जसें गीतारहस्य एका श्लोकांत सांगितलें आहे, तसाच समर्थांचा उपदेश अर्ध्या ओवींत आहे. ती अर्धी ओवी ही 'मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्रधर्म वाढवावा.' मराठा हा शब्द व्यापक आहे. शिवाजीच्या पदरीं ब्राह्मण, शेणवी, परभू आदिकरून सर्व प्रकारचे मराठे होते. महाराष्ट्रधर्म हा हिंदुधर्माहून भिन्न आहे. त्याच्या तोडीचा जेमतेम इंग्रजी शब्द Patriotism होईल. दासबोध, राजनीति व व्यवहार-नीति यांची eneyclopedia आहे. या ग्रंथाचें काळजीपूर्वक अध्ययन केलें, तर महाराष्ट्रधर्म म्हणजे काय हें कळेल.

* *

## एकनाथ

श्रोता आणि वक्ता ह्यांच्यांतील परस्परसंबंधा-विषयीं एकनाथी भागवतांत दोन ओव्या आहेत, त्या अशा :

**सप्रेम मीनलिया श्रोता ।**
**जें पूर्ण सुखावेना वक्ता ॥**
**तें तो जाणावा अवघाचि रिता ।**
**कथासारामृताची चवी नेणे ॥ १ ॥**
**सप्रेमभावार्थे मीनला श्रोता ।**
**मुक्तही उल्हासें सांगे कथा ॥**
**तेथील सुखाची सुखस्वादुता ।**
**जाणे जाणता सवर्म ॥ २ ॥**

वक्त्याकडे थोरपणा येतो कीं श्रोत्यांकडे, हें ह्या ओव्यांत स्पष्ट करून दाखविलें आहे. सप्रेम व भावशुद्ध श्रोता मिळाला असतां वक्ता सुखावतो. पण ज्या वक्त्याला तो आपल्या श्रोत्यास जी कथा सांगतो तिची चव नाहीं, तो रिता होय. ह्या ओव्यांवरून श्रोत्यांकडे मोठा अधिकार येत असल्याचें दिसून येईल. चांगला वक्ता व चांगले श्रोते ह्यांचा एके ठिकाणीं समावेश झाला म्हणजे जो आनंद होतो तो सवर्म जाणतो, त्यालाच मात्र कळेल. ह्या दोन गोष्टी झाल्या. तिसरी गोष्ट अशी कीं, ज्याच्याविषयीं श्रवण, किंवा कथन करावयाचें तो पुरुष असाधारण पाहिजे; म्हणजे वक्त्यापेक्षां श्रोते जास्त व श्रोत्यांपेक्षां चरित्रविषय जास्त. अशीं चरित्रें ऐकण्याचे प्रसंग शास्त्रीबावांनीं आणिले. दोन माझ्या हातून झाले. व एक डॉ. कुंटे ह्यांच्या हातून झाला. आज एक चौथें चरित्र स्मरण, मनन, पूजन व ध्यान करण्याजोगें आहे, त्याचेविषयीं मी दोन शब्द बोलणार आहें. कोणी असें म्हणतात कीं, ह्या असल्या चरित्रांत काय म्हणण्यासारखें आहे? कोठल्या एका चरित्रांत एका काळीं रामदास जन्मले.



अनुक्रमणिका

त्यांच्यामुळें पृथ्वी वाढली, कीं समुद्रांतील क्षार कमी झाला, किंवा आकाशांतील तारे वाढले ? ह्यांनीं देशाच्या एका कोपऱ्यांत वस्ती केली, ह्यांत काय मोठेंसें महत्त्व आहे ? ह्यांच्यावर ईश्वरी प्रसाद झाला असें जरी मानिलें, तरी त्याच्यायोगें देशाचें असें काय भाग्य उघडलें ? ह्या व अशा प्रकारच्या प्रश्नांचें उत्तर देण्यापेक्षां, ह्या पुरुषांनीं जे समकालीन उपकार केले त्यांची आत्यंतिक योग्यता जे जाणत नाहींत ते अभागी, असेंच म्हणावें, म्हणजे झालें. वाच्यता करून उत्तर देण्याचा प्रयत्न करण्यांत अर्थ नाहीं. ह्या साधु पुरुषांच्या हातून जीं मोठीं कार्यें झालीं तीं ईश्वरी प्रसादावांचून झालीं असें मानणारे किती अभागी आहेत, याचें वर्णन करितां येत नाहीं.

शास्त्रीबावांनीं जो हा तिसरा प्रसंग घडवून आणिला आहे, हा अखेरचा आहे. हें चरित्र देण्याचा उद्देश इतकाच कीं, वक्ता व श्रोता ह्यांच्यांतील अंतर्भाव जाऊन श्रोत्यांपासून वक्त्याला स्फूर्ति यावी व चरित्रविषयाची आठवण होऊन त्यांची जागृति व्हावी. एकनाथांविषयीं मी म्हणजे कांहीं नवीन माहिती सांगणार आहें असें नाहीं, सर्व कांहीं त्या एकनाथांच्या चरित्रपुस्तकांत आहे. तथापि त्यांत कांहीं लुप्त भाग आहे, तो प्रज्वलित केला पाहिजे. दोनशें वर्षांपूर्वी झालेल्या पुरुषांची आतां आपण आठवण व त्यांच्याविषयीं विचार करितों, असे पुरुष समाजांत असणें, हें सामान्य भाग्य नव्हे. आतां हें चरित्र सांगावयाचें म्हणजे श्रोते अडाणी, त्यांनीं तें वाचलें नाहीं असा माझा ग्रह नाहीं. हें चरित्र सांगणें म्हणजे ते अमुक सालीं जन्मले, त्यांनीं अमुक पराक्रम केले व त्यांचा जन्म अमुकांच्या कुळीं झाला, हें सांगणें नव्हे. त्या चरित्रांतलें विशेष काय तें घेतलें पाहिजे. आपण दहावीस स्नेही जमलों म्हणजे आपल्यांपैकीं प्रत्येकांत विशेष असतें तिकडे आपलें लक्ष असावें. बुद्धि, हात, पाय हे विशेष नव्हत; तर कोणाच्यांत वैराग्य विशेष, तर कोणाच्यांत निश्चय विशेष, असा प्रकार असतो. असें हें प्रत्येक साधूचें विशेष ओळखलें पाहिजे. ज्ञानदेवांचें व रामदासांचें विशेष काय तें मीं सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें एकनाथ महाराजांच्या चरित्रांतील विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्यांचा जन्म इ. स. १५४८ त झाला. हल्लींच्या भाषेप्रमाणें म्हटलें म्हणजे सोळाव्या शतकाच्या मध्यभागीं हे जन्मले व सत्रावें शतक लागतांना म्हणजे महाराष्ट्राला जेव्हां नवीन तेज प्राप्त झालें, तेव्हां पन्नास-साठ वर्षें राहून ह्यांचा पैठण येथें अंत झाला. रामदासांचें विशेष उद्योगसामर्थ्य त्या काळीं पाहिजे होतें; हल्लीं पाहिजे आहे व कोणत्याही काळीं तें पाहिजेच असणार. ज्ञानेश्वरांचें विशेष म्हटलें म्हणजे निरनिराळ्या संप्रदायांची एकवाक्यता करून दाखविणें हें होय. त्यांनीं चरित्र अवतरून दाखविलें.

एकनाथांचें चरित्रही विशेष योग्यतेचें आहे, हें कित्येकांना समजत नाहीं. ते म्हणतात कीं, ह्या चरित्रानें महाराष्ट्राचा काय भाग्योदय झाला ? जर तुमच्या म्हणण्याप्रमाणें ज्ञानेश्वरांचेंही विशेष पूजनीय व रामदासांचेंही विशेष वंद्य, तर परस्परविरोध येतो. विशेष आणि तें सारखें कसें ? रामदासांला नमस्कार करावयाचा आणि तुकारामांनाही वंदन करावयाचें, तरी दोघांचींही विशेषें अनुकरणीय कशीं ? वास्तविक पाहिलें, तर हे किंवा अशा प्रकारचे प्रश्न बुद्धीच्या संकोचामुळें पुढें आणण्यांत येत असतात. त्यांना ह्या प्रश्नांचें साहजिक उत्तर समजत नाहीं, हें त्यांचें दुर्भाग्य; दुसरें कांहीं नाहीं. आपण एका सुंदर वनांत गेलों, आणि तेथें भागीरथीसारखी नदी वाहतांना पाहिली, म्हणजे मन थंड व तन्मय होऊन जातें व ईश्वराचें कौतुक आपणांस नदीप्रवाहानें दिसूं लागतें. जरा वर झालों, म्हणजे हिमालयाचे डोंगर दिसूं लागतात. त्या डोंगरांच्या रांगा पाहून, पृथ्वीवर पृथ्वी रचण्यांत आली आहे कीं काय असें वाटतें व आत्मा तन्मय होऊन उन्नत होतो; व त्याला उपरति प्राप्त होते. आतां, येथें असा सहज प्रश्न उत्पन्न होणार आहे कीं, आपण नदीला कसे भुललों व पर्वतालाही लागलींच भुललों, हें कसें ? विशेष स्पष्टीकरणासाठीं आपण एखादी बाग घेऊं. एखादा मनुष्य एखाद्या फुलाचा वास घेऊन डुलूं लागतो, इतक्यांत दुसऱ्या वाटिकेंत जातो, तेथल्या फुलांचा वास घेऊनही सापासारखा डुलूं लागतो, हें पाहून त्याचा मित्र म्हणतो, "काय रे, त्या गुलाबाच्या फुलाचा वास घेऊन तुला आनंद होतो आणि त्या मोगरीच्या फुलाचा वास घेऊनही तूं आपला डुलूं लागतोस. ह्यावरून तुझ्यांत कांहीं तरी दोष आहे खास." ह्यावर फुलांचा भोक्ता उत्तर देईल कीं, "बाबा रे, हा सगळा दोष तुझाच आहे. तुला समुद्राची थोरवी कळत नाहीं व समुद्राचें अगाधत्वही समजत नाहीं. नदींत अवगाहन केलें म्हणजे






तेथेंच राहावेंसें वाटतें व समुद्राचा अपारपणा पाहिला म्हणजे तेथें मन रममाण होतें. ह्याला उपाय नाहीं." हाच प्रकार विशेषांसंबंधी आहे. विशेष चातुर्याची हीच खूण आहे कीं, एका गोष्टीसारखी दुसरी गोष्ट नाहीं. पात्रासारखी नदी नाहीं, नदीसारखें पात्र नाहीं. आपण येथें बसलेलीं माणसें डोंगरासारखीं नहोंत व आपण सर्व जरी माणसें आहोंत, तरी आपण भिन्न आहोंत. आपणां सर्वांत कांहींनाकांहीं तरी विचित्रपणा आहेच. त्याशिवाय चांगल्यांत व वाईटांत विचित्रपणा आहे, अशीच ही परमेश्वराची राहटी आहे. एकादशी अथवा द्वादशी ह्यांच्यासंबंधी जसा अर्थवाद आहे तसा ह्या शब्दांसंबंधी नाहीं. जेवणांत पराक्रम नाहीं. विरक्ति उत्पन्न व्हावी म्हणून एकादशा व द्वादशा करावयाच्या, त्यांपैकीं कोणाला एक मार्ग आवडतो तर कोणाला दुसरा आवडतो. त्याचप्रमाणें निरनिराळ्या साधूंचीं, निरनिराळ्या थोर पुरुषांचीं निरनिराळीं विशेषें आहेत. रामदासांचें विशेष महाराष्ट्रधर्म वाढवावा हें होय. तसें एकनाथांचें विशेष काय? तर **भागवतधर्म** हें एकनाथांचें विशेष. हा नवीन दिसणारा धर्म, तेव्हां सकृद्दर्शनींच अश्रद्धा उत्पन्न व्हावयाची. भागवतधर्म म्हणजे, संस्कृतांत जें भागवत आहे तें प्राकृतांत कळावें, म्हणून एकनाथांनीं प्राकृतांत लिहिलें, तो. भाविक लोक व बायका भागवत वाचतात तें भागवत पौराणिक होय. हें जें एकनाथांचें भागवत आहे तें तत्त्वविचारपरिपूर्ण आहे. तें पाहावें. त्यांतील विशेष भागांचें मनन करावें, म्हणजे आपली खात्री होईल.

हल्लीं लोकांना विचारलें कीं तुमचा धर्म कोणता, म्हणजे कोणी म्हणतात कीं, एकेश्वरी व कोणी म्हणतात कीं, आम्ही पुष्कळ देव मानणारे. परंतु आपल्या लोकांत एकच ईश्वर मानितात, तेव्हां दोहोंचा संभवच नाहीं. तेथें एक म्हणणें शब्दाचें वैयर्थ्य होतें. आम्ही स्वतःला भागवतधर्माचे म्हणतों. दहावीस वर्षांपासून आम्ही असें म्हणावयास लागलों. भागवतधर्माचीं लक्षणें पुढें सांगतों; पण, हा धर्म कोठून काढिलात, ह्या प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे. बीं रुजलें कीं प्रथम त्याचें टरफल वर आलेलें दिसूं लागतें. पहिल्यानें बीं उकलून मोड येतो, पुढें त्याचें झाड होतें व त्याला फांद्या, फुलें व नंतर फळें येतात. जसें बीज एका मुळापासून उत्पन्न होऊन त्याचा मोठा प्रभाव झालेला असतो, त्याचप्रमाणें धर्म अनादि कालापासून रुजत आलेला व त्याचें आत्यंतिक सार भागवतधर्म होय. त्याचा मूळ संबंध सोडतां कामा नये; तो विलायतेंतील झाडाप्रमाणें येथें आणिलेला नाहीं. त्याचीं पाळेंमुळें खोल गेलीं आहेत. त्याचा शोध अनादि कालापासून करावा लागेल. त्याचें फळ, वास, किंवा गोडी म्हटलें तर चांगलें कोणतें व त्याचें अधिकरण कोणतें? ह्या भागवताचें सारभूत कोणतें? कित्येक लोक असें म्हणतील कीं, तुम्ही सर्व मनांतल्या गोष्टी सांगतां. रामदास समर्थ कसले व एकनाथ भक्त कसले? हे गृहस्थ असून उदरपोषण करीत. सारांश, आपल्यासारखेच हे. पण तसें नाहीं.

आतां भागवतधर्म कोठें कथन केला आहे तें पाहूं. हा धर्म अमुक एक ठिकाणीं प्रविष्ट झाला ह्याविषयीं इतिहास आहे. तो थोडक्यांत सांगतों. दहावीस लोकांच्या समाजाला धर्म म्हणत नाहींत. तसेंच मूळ सोडतां कामा नये. फळाचा आस्वाद घेतला आणि मुळाचा कांहीं संबंध नाहीं, असें मानणें ठीक नव्हे. धर्मालासुद्धां संतति असते.

आतां भागवतधर्माचा इतिहास पाहूं. कलियुग समीप यावयाच्या वेळीं, म्हणजे द्वापाराच्या अंतीं, नारदानें हा धर्म श्रीकृष्णाच्या बापाला म्हणजे वसुदेवाला सांगितला. तो धर्म पुढें विदेहजनकाला नऊ वृषभ नामक ऋषींनीं सांगितला. ती कथा पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:– एकदा जनकाच्या येथें यज्ञ होता. त्या यज्ञाला विश्वामित्रवसिष्ठादिक ऋषि हजर होते; व ज्यांना नऊ वृषभ म्हणतात ते ऋषिसुद्धां त्या यज्ञाला आले होते. वृद्धाचा जसा कपिल, वस्तूचा राजा सिद्धार्थ, तसेच जैनांचे मुख्य वृषभ होत. (त्यांना जैन लोक ऋखभ म्हणतात.) ह्यांच्याविषयीं ज्या कल्पना आहेत त्या सार्थ आहेत किंवा नाहीं, हें पाहाणें नुसत्या शोध लावणारांचें आहे. त्यांना त्याची चाड असली पाहिजे. ह्या वृषभांना जनकानें असा प्रश्न विचारिला कीं, अत्यंत श्रेय कशांत? कोणाचा देश कसा घ्यावा, शत्रूला कसें मारावें, सोन्याचें रुपें व रुप्याचें सोनें कसें करावें (हल्लींच्या राजांना ही चिंता पडली आहे) तशी चिंता जनकाला पडली नव्हती. त्याला धर्म जाणण्याची चिंता पडली होती, म्हणून त्यानें वरील प्रश्न विचारिला. त्याचें उत्तर असें होतें कीं, आत्यंतिक श्रेय भागवतधर्मांत आहे. तो भागवतधर्म नारदानें वसुदेवाला सांगितला, शुकानें परीक्षितीला सांगितला, नऊ ऋषभांनीं जनकाला सांगितला,

अनुक्रमणिका

एकनाथांनीं आपणांस सांगितला व मी तुम्हांला सांगतों, असा भाग येतो. ज्या भागवतांत भागवतधर्म आहे, तें भागवत केव्हां लिहिलें, असा प्रश्न उद्भवतो. भागवतधर्म पांच हजार वर्षांपूर्वीचा असावा. पण, त्याच्या वयावर त्याची महती नाहीं. वयापेक्षां विचार अत्यंत श्रेयस्कर. गंगेची उत्पत्ति जशी आकाशांत अशी समजूत आहे, तशी विचाराची उत्पत्ति देवापाशीं. विचाराची उत्पत्ति परमेश्वराच्या समकालीन आहे. कारण, परमेश्वर चैतन्य–विचारक्षम आहे. हा भागवतधर्म ज्ञानेश्वरींत कोठेंकोठें आहे. पण, एकनाथांच्या प्राकृत ग्रंथांत जसा तो स्पष्ट आहे, तसा कोठेंच नाहीं. सांगण्यासांगण्यांत फरक असतो. जें कांहीं आपण सांगतों त्याचा प्रत्यय आपल्यांत असला पाहिजे, तरच तें सांगण्याचा आपणांस अधिकार. अशा लोकांचा उपदेश ते मेल्यावरसुद्धां लोकांच्या मनावर चांगला ठसतो. एकनाथांला आकाशवाणी झाल्यानंतर त्यांनीं बारा वर्षे अध्ययन करून बावीस हजार ग्रंथ लिहिला, अशी कथा आहे. त्यांच्या ग्रंथांत भागवतधर्म तर दिसलाच; पण, चरित्रांतही दिसला. भागवतधर्म चरित्रांत दाखविणें हें विशेष भाग्य एकनाथांचेंच होतें. हा भागवतधर्म सांगण्यास सोपा, पण आचरण्यास कठीण असा आहे. ज्ञानेश्वरांत गृहस्थाश्रम कमी, त्याचप्रमाणें रामदासांतही गृहस्थाश्रम कमी. ब्रह्मचाराच्या मार्गांत मोह कमी. परंतु एकनाथांनीं गृहस्थाश्रमीं राहून संसार वगैरे करून, भागवतधर्माचा प्रभाव विशेष रीतीनें दाखविला, हें विशेष आहे. त्यांचे चमत्कार व साक्षात्कार दुसऱ्या ठिकाणीं सांपडतील; पण, त्यांचा रोंख भागवतधर्माकडे होता व तो धर्म त्यांनीं स्वचरित्रांत दाखविला, हें आपण पाहावयाचें. त्यांच्या ओव्यांचीं कांहीं टिपणें येथें आणलीं आहेत, तीं वाचून दाखवितों, म्हणजे भागवतधर्म म्हणजे काय हें आपणांस समजेल.

इंद्रियें कोंडितां न कोंडती ।
विषय सांडतां न सांडती ।
पुढतपुढतीं बाधों येती ।
यालागीं हरिभक्ति द्योतली वेदें ॥ १ ॥
इंद्रियें कोंडावीं न लागती ।
सहज राहे विषयासक्ती ।
एवढें सामर्थ्य हरिभक्तीं ।
जाण निश्चितीं नपवर्गा ॥ २ ॥
योगी इंद्रियें कोंडिती ।
ते भक्त लाविती भगवंतीं ।
योगी विषय जे त्यागिती ।
ते भक्त अर्पिती भगवंतीं ॥ ३ ॥
योगी विषय त्यागिती ।
त्यागितां देहदुःखी होती ।
भक्त भगवंतीं अर्पिती ।
तेणें होती नित्यमुक्त ॥ ४ ॥
दारा सुत गृह प्राण ।
करावे भगवंतासी अर्पण ।
हे भागवतधर्म पूर्ण ।
मुख्यत्वें भजन या नांव ॥ ५ ॥

इत्यादि. पूर्वापार आपण असें मानीत आलों आहों कीं, इंद्रियनिरोध हा मुख्य आहे. तो साधण्याकरितां योगादि साधनें आहेत. तीं आपणांस साधतां आलीं नाहींत, म्हणून त्यांची निंदा करणें अन्यथा होईल. आपण इंद्रियें कोंडावयास लागावें, पण तीं कोंडत नाहींत व विषय सोडावयास जावें, पण तो सुटत नाहीं. ह्याकरितां ऋषींनीं हरिभक्ति हें साधन सांगितलें. दोघांचेंही (योगी व भगवद्भक्त यांचें) साध्य एकच, म्हणजे भगवत्प्राप्ति हें होय. परंतु मार्ग निराळे. इंद्रियनिरोध ही पूर्वापार चालत आलेली गोष्ट आहे व आपणांससुद्धां तिचा थोडाबहुत अनुभव आहे. आपण थोडासा निरोध करावयास जातों, पण आपणांला आकलन करितां येत नाहीं. ह्याविषयीं तुकारामांचे पुष्कळ अभंग आहेत. विरक्ति व वैराग्य हें त्यांनीं साधावें. पण, तुमची-आमची काय गति ? ' भाळींभोळीं कैशीं तरती ', हा विचार एकनाथांच्या मनांत होता. आम्ही लंगडीं व थोटीं माणसें. आम्हीं शास्त्राध्ययन करावें, तर पोटामागची काळजी सुटत नाहीं. अशी कोटचवधि प्रजा. तेव्हां अशा प्रजेच्या गतीचा एकच मार्ग आहे. तो हा कीं, हरिभक्ति. आम्हांला योगमार्ग नको, ज्ञानमार्ग नको, किंवा कर्ममार्गही नको. आम्ही ब्राह्मण आहों, पण शास्त्राचें अध्ययन करणारे फार थोडे. कारण, बऱ्याचजणांला पोटाकरितां आर्जव करावें लागतें. तेव्हां इंद्रियनिरोध होत नाहीं. ज्ञानाचा व कर्माचासुद्धां आम्हांला उपयोग व्हावयाचा नाहीं. तेव्हां ह्या मार्गापेक्षांही एक विशेष सुलभ मार्ग आहे, तो आम्हांला पाहिजे. तो एकनाथांच्या चरित्रांत जास्त आहे.

न करितां वेदशास्त्रव्युत्पत्ति ।
ऐशिया अज्ञाना निजात्मप्राप्ति ।
सुगम जोडे ब्रह्मस्थिति ।
यालागीं हरिभक्ति प्रकाशिली देवें ॥ १ ॥
तें हें राया भागवत जाण ।
मुख्यत्वें भक्तिप्रमाण ।
भावें करितां भगवद्भजन ।
अज्ञान जन उद्धरती ॥ २ ॥
स्त्रीशूद्रादि अघवे ।
घालूनियां ये नावे ।
एकेच खेपे स्वयें न्यावे ।
भजनभावें परतीरा ॥ ३ ॥
येथें पोहणेंयाविण उतरणें ।
प्रयासेंविण प्राप्ति घेणें ।
सुखोपायें ब्रह्म पावणें ।
यालागीं नारायणें प्रकाशिली भक्ति ॥४॥
भागवतधर्माची स्थिति ।
भाळींभोळीं भवाब्धि तरती ।
सुखोपायें ब्रह्मप्राप्ती ।
तेचि श्लोकार्थी विशद सांगे ॥ ५ ॥

स्त्रीशूद्रादिकांस हा मार्ग सुलभ आहे. कारण, ह्या मार्गानें एकाच खेपेस एकाच नावेंतून स्त्रीशूद्रादि अवघीं नेण्यांत येतात. कर्ममार्गी सांगतात कीं, चौऱ्यांशीं लक्ष फेऱ्यांतून आल्यावर ब्राह्मण नसलेत, तर ब्राह्मण होऊन ज्ञानी झाल्यावर, कालमर्यादा संपल्यावर, तुमचा उद्धार होईल; पण, ह्या समजुतीनें मनाची हुरहूर जात नाहीं. मनानें सांगितलें कीं, ह्या मार्गानें गेलें असतां बहुत कालांनीं आपण देवापाशीं सायुज्यता पावणार. तेव्हां कर्ममार्गानें मनाचें समाधान होत नाहीं. आम्हांला अशी नाव पाहिजे कीं, जी सागरांत चौऱ्यांशीं लक्ष फेऱ्यांत आम्हांला न फिरवतां एका खेपेस आमचा उद्धार करील. असें साधन कर्ममार्गी म्हणतात आमच्यापाशीं नाहीं. ज्ञानमार्गी म्हणतात, आहे; पण, जें महाभाग व योगमार्गी पुरुष तेच एका खेपेस पैलतिरास जातील. तेव्हां आमच्यासारख्यांची वाट काय ? अर्थात् भागवतधर्म. भागवतधर्म म्हणजे काय ? तो वैदिक, पौराणिक, ज्ञान, योग, कर्म किंवा तीर्थें, व्रतवैकल्यें इत्यादि करणें नव्हे.

व्यासांनीं पुराणें केलीं, पण त्यांना हुरहूर लागली. जेव्हां त्यांनीं भागवत लिहिलें, तेव्हां त्यांचें समाधान झालें. तें परीक्षित्यादिनीं वाचिलें, तेव्हां त्यांचेंदेखील समाधान झालें; तसेंच जर आपण वाचाल, तर आपलेंसुद्धां समाधान होईल. आमच्यासारखे अज्ञानी इंद्रियनिरोध करण्यास असमर्थ म्हणून त्यांच्याकरितां हा भगवंतानें सांगितलेला भागवतधर्म होय. ह्याच्या-संबंधानें वैष्णव व शैव ह्यांच्यांतील भांडणांसारखीं भांडणें नाहींत. भागवतांतील देव सर्व देवांचा देव आहे. तो एकनाथानें आपल्या चरित्रानें आपला केला. ज्ञानेश्वरांच्या चरित्रासारखें आपलें चरित्र होण्याची अपेक्षा करावयास नको. कारण, पहिली गोष्ट ही कीं, त्यांचा बाप संन्यासी होता, तुम्हांआम्हांला असे संन्यासी पदा करितां यावयाचे नाहींत. दुसरी गोष्ट ही कीं, त्यांचा तर काय, पण त्यांच्या दोघांही भावंडांचा व्रतबंध करूं दिला नाहीं. हा बोजाचा विचार झाला. आतां त्यांचा अधिकार तरी कसा आणावा ? तेव्हां आम्हांला हा मार्ग साध्य नाहींच. मग तुमची-आमची वाट काय ? आपण साधीभोळी मंडळी खरी व आपण आळशी आहों, तरी आपणांला भगवत्प्राप्तीची इच्छा होते. ज्ञानमार्गाचें अवलंबन केलें असतां ती परिपूर्ण होत नाहीं. ज्ञानमार्गाप्रमाणें पहिल्यानें ब्राह्मण असलें पाहिजे. नामधारी ब्राह्मण पुष्कळ आहेत. त्यांपैकीं ज्ञानप्राप्ति सर्वांसच करण्यास फुरसत कोठें असते ! पेन्शन घेतल्यावर तसें करावें, तर पेन्शन घेण्यापूर्वीच आमची मंडळी आटोपते ! काल आठले वारले व मागें पंडित वारले. हिंवाळ्यांत जशीं झाडांचीं पानें शुष्क होऊन गळतात, तशी आमची मंडळी एकामागून एक गळूं लागली आहे. सारांश, म्हणून पेन्शन घेण्यापूर्वीच ही गोष्ट संपादावयास अवकाश राहिला नाहीं. तेव्हां दहावीस वर्षांचा मक्ता घेतो कोण ? आमच्यामागें लचांडें भारी. म्हणून आम्हांला भक्तिमार्ग उत्तम होय. शांडिल्यसूत्रापासून तों एकनाथांपर्यंत हा मार्ग सांगण्यांत आला आहे. भक्तीचीं लक्षणें पुष्कळ आहेत, पण पुढील एका लक्षणाच्या पोटांत तीं सर्व आहेत. तें हें कीं, देवच काय तो आपला श्रेयस्कर. ह्यावरून एकनाथ हें नांव सार्थ आहे. देवावर आपलें आत्यंतिक प्रेम ठेवावें. वर्णाश्रमधर्म सोडून निरहंकृति राहिलें पाहिजे. अमुक एक वर्णांत मी जन्मलों, म्हणून मी थोर, असें मानितां कामा नये. मीं पांढरा अंगरखा व गुलाबी पागोटें घातलें आहे, म्हणून मीं त्यांचा अभिमान धरावा, हें ठीक नव्हे. वर्णादि प्रकार प्रासंगिक किंवा सहजगत्या

अनुक्रमणिका

आलेल्यांपैकीं आहेत. म्हणून त्यांचा अभिमान धरूं नये. तर निरहंकृति राहून भक्ति करावी. भक्तीच्या ठायीं प्रीति, मुक्ति, वैराग्य व सर्व कांहीं आहे. म्हणून भक्त म्हणतात कीं, आम्हाला मुक्ति नको, किंवा विरक्ति नको, भक्ति पाहिजे. हा भक्तिमार्ग सुलभही आहे व अवघडही आहे. देवावर प्रेम ठेविल्यानें हा मार्ग साधितां येणार आहे. असा भागवतधर्माचा अनुभव आहे. स्वर्ग व धर्म ह्यांच्यामधील हा पूल आहे. आपणांला संस्कृतांत सांगितलेला वस्तऱ्यांचा पूल नको. समजा, मुंबई व माहीम ह्यांच्यामध्यें वस्तऱ्यांचा पूल बांधिला, तर त्याच्यावरून जाणें अवघड होईल. आपणांला असा पूल पाहिजे कीं, त्यावरून म्हातारे व पोरेंबाळेंही सर्व जाऊं शकतील. सारांश, जनरस्ता पाहिजे. त्याचप्रमाणें आपणांस सर्वांस समजेल असें धर्मसार पाहिजे. आपलें मुख्य कर्तव्य भगवंताची ओळख व्हावी, हें आहे. ती कशी होईल ह्याविषयीं तुकारामांनीं व ज्ञानदेवांनीं सांगितलें आहे. पण, एकनाथचरित्रांत त्याची परिस्फुटता विशेष दिसून येते. ह्या पुरुषाची आठवण व्हावी म्हणून त्याची पुण्यतिथी केली पाहिजे. ह्यांच्यासारखे भाग्यवान् पुरुष इतर देशांत झाले असतील, नाहीं असें नाहीं. मोझेस झाले, ख्रिस्त झाले, महंमद झाले; पण आपणांला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. तर जे एका रक्तामासाचें, त्यांच्याविषयीं आम्हांला विचार करावयाचा. त्यांच्या शरीरांचें मांस जर आमच्यांत आहे तर त्यांच्या विचारांचें मांस आमच्यांत कां असूं नये ? गीतारहस्य सर्वांस सुलभ करण्याकरितां ज्ञानेश्वरांनीं अवतार घेतला, सामर्थ्य दाखविण्याकरितां रामदास जन्मले व तुम्हांआम्हांकरितां एकनाथांचा जन्म होय. त्यांनीं भक्त कसा असावा व देव कोणाला म्हणावें, ह्या गोष्टी भागवतांत सांगितल्या आहेत. त्यांत माझे विचार सांपडले म्हणून मी त्याची विशेष महती सांगतों, असें कोणीं समजूं नये. हें भागवत वाचलें असतां मनाला शांति वाटून कृतार्थता वाटेल. बायकांमुलांनीं जर विचारिलें कीं, आमचें कल्याण कशानें होईल, तर त्यांना सांगावें कीं भागवतधर्म पाहिल्यानें. सारांश, हरिभक्ति करावी साधुसमागम ठेवावा व ईश्वरावर निर्मळ प्रेम ठेवावें. असो. शेवटीं भागवतधर्म कसा आहे हें समजून घेण्याकडे आपली प्रवृत्ति व्हावी, असें मी इच्छितों.

* *

# स्थितप्रज्ञ कोणास म्हणावें ?

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ १ ॥**

हा श्लोक जरी संस्कृत आहे तरी त्याचा अर्थ सुलभ आहे. तो असा :–

" मुनि जे आहेत ते लोकांची ज्याविषयीं जागृति असते त्याविषयीं निद्रिस्त असतात; व लोक ज्याविषयीं निद्रिस्त असतात त्याविषयीं ते जागृत असतात."

साधारण भाषेंतील 'प्रज्ञाप्रतिष्ठित' ह्या शब्दाच्या अर्थाशीं हा अर्थ जुळतो. जो प्रज्ञ आहे, तो स्थिर असतो. ज्या गोष्टींविषयीं लोक निजलेले असतात त्यांविषयीं तो जागृत असतो. व ज्यांविषयीं लोक जागृत असतात त्यांविषयीं तो निजलेला असतो. आतां हें असें काय चमत्कारिक लक्षण आहे, असें कोणास वाटण्याचा संभव आहे. पण, ह्यांतील अगदीं साधा अर्थ घ्यावयाचा नाहीं. तसा अर्थ चोरास, दुर्व्यसन्यास लागू पडतो. ज्या वेळीं रात्र असते त्या वेळीं चोर व दुर्व्यसनी नेहमीं जागत असतात; पण, सर्व लोक अगदीं गाढ झोंपेंत असतात. म्हणून हा अर्थ घ्यावयाचा नाहीं. वास्तविक पाहिलें तर वरील अर्थ हा मुनींचें, थोरांचें, सत्पुरुषांचें लक्षण आहे. जो मुनी आहे, श्रेष्ठ आहे, त्याला लोकांची जागृति निशेसमान वाटते व ज्यांविषयीं लोक निद्रिस्त असतात त्यांविषयीं तो जागृत असतो. लोकांच्या निशेंत जागृति वाटणें, हा अधिकार प्रज्ञाप्रतिष्ठास असतो. कारण, ज्या गोष्टींविषयीं लोकांत उदासीनता असते त्या गोष्टींविषयीं हा काळजी वाहत असतो. तसेंच, ज्यांविषयीं लोक पर्वा करीत नाहींत त्यांविषयीं हा चिंतातुर असतो. परंतु प्रापंचिक जन ज्या गोष्टींविषयीं रात्रंदिवस चिंता करितात त्यांविषयीं

अनुक्रमणिका

हा निद्रिस्त असतो. म्हणूनच तो मुनी व श्रेष्ठ. ज्या गोष्टींविषयीं लोक काळजी वाहत नाहींत व हा काळजी वाहतो.

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् । तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ।।**

ह्या श्लोकांत ज्याच्या ठायीं सर्व कामनांचा प्रवेश होत आहे, पण, ज्याच्या ठायीं त्यांच्या भोगांची इच्छा नाहीं त्याला शांति प्राप्त होते असें म्हटलें आहे. अशांची फललाभाविषयीं उदासीनता असते. असो.

प्रज्ञाप्रतिष्ठिताविषयीं कल्पना आपणांस आपल्या रोजच्या व्यवहारावरूनही होण्यासारखी आहे. एखाद्या मोठ्या कुटुंबांत कर्ता स्त्री किंवा पुरुष असतो. तिची किंवा त्याची स्थिति काय असते ? घरांत पुष्कळशीं मुलें असलीं व तीं खेळत असलीं, म्हणजें ह्या कर्त्या स्त्रीची झोंपेची किंवा विश्रांतीची वेळ. पण मुलें निजलीं म्हणजे ही जागी असावयाची. हा आपला नेहमींचा अनुभव आहे. त्याचप्रमाणें कर्त्या पुरुषाची गोष्ट. घरांत कोणी मनुष्य दुखणाईत असला, म्हणजे ह्याला झोंप नसावयाची. कुटुंब फार मोठें असलें म्हणजे त्यांतील सर्व माणसांस ज्याविषयीं मुळींसुद्धां चिंता नसते त्याविषयीं हा चिंतातूर असतो. ज्याविषयीं त्यांच्या ठायीं उदासीनता नसते त्याविषयीं हा इकडे उदासीन असतो. असाच प्रकार विश्वाचें जें हें मोठें कुटुंब त्यांतही आहे. जे स्थितप्रज्ञ आहेत त्यांस सगळ्या जगाची काळजी, चिंता असते. साधारण लोक त्यांस, तुम्ही जगाच्या भाकरी कशास भाजतां, लोकांच्या उठाठेवी तुम्हांस कशास पाहिजेत, असें म्हणत असतात. पण, वास्तविक पाहिलें, तर ह्या रिकाम्या भाकरी भाजणें, किंवा उठाठेवी करणें नव्हे. त्यांचें हें कर्तव्य असतें ; आणि तें ते करीत असतात. तुमचा-आमचा प्रकार मात्र अगदीं निराळा. साधारण लोकांचें जें म्हणणें तें एकार्थी आम्हांस बरेंच लागू पडतें. आमचें सर्व लक्ष प्रयत्नाच्या फलाकडे असतें. आमच्या मनांत दुसरें कांहीं नसतें. म्हणून आमची जगाच्या कल्याणाची इच्छासुद्धां व्यर्थ. आपल्याला विनाकारण शीण मात्र होत असतो. ह्याबद्दल निश्चय पूर्वींच झालेला असतो. कारण, जो स्थिर आहे, प्रज्ञाप्रतिष्ठित आहे, भक्त आहे, तो ह्या गोष्टीकडे कधींच पाहात नाहीं. त्यांचें लक्ष एकसारखें आपल्या कर्तव्याकडे असतें. त्यासदेखील अनुकूलता मिळाली, तर ती हवी असते. पण, तिच्यासाठीं तो खोळंबून राहात नाहीं. अत्यंत त्रास, अडचणीं वगैरे सर्व सोसून तो आपलें काम चालवीत असतो. सर्व देशांतील श्रेष्ठांत व कनिष्ठांत दुसरे फरक असतील; पण, सर्वांत मोठा हा कीं, ज्याविषयीं इतर लोक जागृत असतात त्याविषयीं हे उदासीन असावयाचे व ज्याविषयीं लोकांची गाढ झोंप त्याविषयीं ह्यांची जागृति. म्हणजे ज्याविषयीं लोक निद्रिस्त असतात, शंकित असतात, त्याकडे हे लक्ष न पुरवितां यांचें लक्ष दुसऱ्याच विशेष गंभीर गोष्टींकडे असतें. हाच भाव पारमार्थिक स्थितींत आहे. कुटुंबाच्या स्थितीचा अनुभव हा अगदीं लहान अनुभव. पण, हीच स्थिति कुटुंबाप्रमाणें राष्ट्राची काळजी वाहाणारांची. प्रत्येक कुटुंबाप्रमाणें राष्ट्राची काळजी वाहणारांची योग्यता लोकांना जास्त वाटत असते. हे समाजासंबंधानें धार्मिक व सामाजिक सुधारणेच्या बाबतींत कां खटपट करीत असतात ? होत आहे, चाललें आहे, उगाच फिरवाफिरव करण्याची आवश्यकता ती काय ? आपण धर्मांत वाढत आलों आहों व वाढत चाललों आहों असें समजून स्वस्थ असावें असें त्यांस वाटत असतें. ह्यांत कांहीं नवल नाहीं. त्यांचें सर्व लक्ष सांसारिक गोष्टींकडे असतें. धर्मसुधारणा अगर सामाजिक प्रगति यांकडे कधीं पाहावयाचीसुद्धां त्यांस इच्छा नाहीं. धर्ममार्गाविषयीं यांची अत्यंत निद्रावस्था असते.

जे लोक धर्ममार्गाकडील असें आपणांस म्हणवीत आहेत त्यांचें लक्ष बाहेरील परिस्थितीकडे फार. केवळ श्रद्धावान् भावानें सर्व साधत नसतें. साधतें असें म्हणणें ही एक निद्राच होय. श्रीकृष्णानेंदेखील ही निद्रा सांगितली आहे. देवळांत जा, मशिदींत जा, मंदिरांत जा, सर्वत्र असाच प्रकार आहे. ज्याविषयीं जागृति असावयास पाहिजे त्याविषयीं ती नाहीं. सर्व प्रकार नेहमीं वरवर चालावयाचे. उत्सव करावयाचा म्हणजे प्रथम दिव्यांकडे, मंदिर सुशोभित किती झालें आहे तें पाहण्याकडे लक्ष. बाहेरचा हा सुशोभितपणा पाहिजे, नाहीं असें नाहीं. पण, त्यापेक्षां अंतर्यामीं जास्त निर्मलता पाहिजे. जसा बाहेर उत्सव तसा आंत उत्सव पाहिजे. बाहेर उत्सव आहे, पण आंत कांहीं नाहीं, अशी स्थिति असणें, हा अत्यंत शोचनीय प्रकार. श्रद्धा कोणत्याही धर्माविषयीं असेना का. पण ती खरी श्रद्धा पाहिजे. तुकारामबावांनीं म्हटल्याप्रमाणें भक्तिसुखाचा

अनुक्रमणिका

अनुभव आला पाहिजे. त्यांची अशी स्थिति असे. पण, आमची मात्र तशी नाहीं. आमची स्थिति फार वाईट आहे. ते सतत त्या मार्गास अनुरूप उद्योग करीत असत. आमचा प्रकार मात्र उलट आहे. आम्ही शांत आहों असें लोकांस सांगतों मात्र. पण, आमची स्थिति निराळी. असे लोक आहेत कीं ते परलोक नाहीं, असें मानतात. जें कांहीं आहे तें येथें असें मानणारे व आपण सर्व पंचतत्त्वास जाऊन मिळणारे असें प्रतिपादणारे लोक आहोंत. पण, त्यांतील आपण नाहीं. आपली श्रद्धा निराळी आहे. पुढें कांहीं स्थिति आहे, अशी आपली श्रद्धा आहे. आपलें वर्तन मात्र ह्या श्रद्धेच्या अगदीं उलट असतें. प्रत्येक क्रियेंत, वचनांत, दुसऱ्या असंख्य गोष्टींत ह्या गोष्टीचा विचार असावा तसा नाहीं, हा प्रत्येकाचा अनुभव आहे. म्हणून ही आमची निद्रा होय. पण स्थितप्रज्ञ जे आहेत त्यांची स्थिति अशी नसते. जो स्थितप्रज्ञ आहे त्याला ह्या गोष्टीविषयीं अत्यंत चाड असते. तुकारामांला आपल्याला देवाचें दर्शन व्हावयास विलंब कां होत आहे, असें वाटत होतें. आपणांस असें कधीं वाटतें काय ? पंधरा, वीस, पंचवीस वर्षें झालीं. ह्या मार्गाचें अवलंबन आपण केलें आहे, नेहमीं येथें येत आहों; परंतु यापासून प्रगति काय झाली ? ज्याला तुकारामांसारखी आपली स्थिति झाली असें विचार करून वाटत असेल व त्याप्रमाणें वस्तुस्थिति असेल, तर तो धन्य. पण, तुमची-आमची स्थिति निराळी आहे. आपण आपल्या खऱ्या कल्याणाविषयीं उदासीन आहों. खऱ्या कल्याणाचा प्रसंग आला म्हणजे आपण निद्रिस्तावस्थेंत असतों. त्या वेळीं आपणांस गाढ झोंप लागलेली असते. ज्या गोष्टीविषयीं आपण वास्तविक उदासीन असलें पाहिजे त्याविषयीं आपण अति दक्ष असतों. सारांश, कुटुंबात तसाच प्रकार आणि धर्मांतही तोच प्रकार.

मग अशा रीतीनें हाल सोसून आपण कां वागावें ? मनुष्याची वस्ति जर अनंतकाळपर्यंत ह्याच ठिकाणीं असती व त्याला पुढें कांहीं स्थिति नाहीं असा प्रकार असता, तर गोष्ट निराळी. पण, अनंतकाळानंतर स्थिति आहे ही आपली श्रद्धा आहे. प्रत्येकाला हें असें वाटत असतें. वास्तविक प्रकार काय तो कांहीं कोणी तेथून पाहून आलेला नाहीं. सर्व धर्मांत अशा तऱ्हेचा उपदेश होत आहे. मात्र उपदेश फलप्रद व्हावा तसा होत नाहीं. आपला अनुभवही असाच आहे कीं, उपदेश फलप्रद असा फार विरळा होतो.

* *

# एका मित्राच्या मृत्यूवरून सुचलेले विचार

[ रा. रा. केशव पांडुरंग गोडबोले हे बरींच वर्षें पुण्याच्या प्रार्थनासमाजाचे चिटणीस होते. ते म्हणजे मोठे असाधारण विद्वान् पुरुष होते असें नाहीं. अगदीं साधारण स्थितींतील कुटुंबांत पुण्यास त्यांचा जन्म झाला व त्यांचें शिक्षणही तेथेंच झालें. प्रथम कांहीं दिवस त्यांनीं सरकारी नोकरी केली. पण, पुण्यास राहणेंच त्यांस श्रेयस्कर वाटल्यामुळें एका मिशन स्कूलमध्यें त्यांनीं नोकरी धरिली; पण, ती शाळा फार दिवस चांगल्या स्थितींत राहिली नाहीं. आणि ती बंद झाली तेव्हां त्यांची नोकरीही गेली. नंतर समाजाचे उद्देश सफळ करण्याकरितां त्यांनीं डॉ. भांडारकर, न्या. मू. रानडे वगैरे मंडळींच्या साह्यानें पुण्यासच एक शाळा काढिली. ह्या शाळेंत नीति व धर्मशिक्षण देण्यांत येत असे. पण, लोकांस असल्या तऱ्हेच्या शिक्षणाचें महत्त्व मुळींच कळत नसल्यामुळें ती शाळा फार दिवस चालली नाहीं व अखेरीस बंद करावी लागली. शाळेचा हा नाद सोडून कांहीं दिवस मुंबईस ते छापखान्याच्या धंद्यांत शिरले, तेथेंही त्यांचें नुकसान झालें व अखेरीस ते शारदासदनांत शिक्षक होते. सारांश, ह्यांना कोठल्याही धंद्यांत यश म्हणून आलें नाहीं; तरी पण ह्यांनीं आपल्या मनाची शांति कधीं ढळूं दिली नाहीं. पुण्याचा समाज स्थापन झाल्यापासून त्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें, आस्थेनें व कळकळीनें त्या समाजाची सेवा करून आपल्या ठायीं असलेली सहनशीलता, अत्यंत शुद्ध आचरण, देवावरीलदृढ श्रद्धा, काम करण्याची उत्सुकता, धर्मसंशोधन इत्यादि गुण सर्वांच्या नजरेस आणून दिले. मृत्यूपूर्वी चार महिने ते इंदापुरास गेले होते. त्या वेळीं त्यांनीं डॉ. भांडारकरांस आपल्या त्या वेळच्या मनाच्या स्थितीसंबंधानें लिहितांना


अनुक्रमणिका

एका मित्राच्या मृत्यूवरून सुचलेले विचार–

जेथें जातों तेथें तूं माझ्या सांगातीं ॥
चालविशी हातीं धरोनियां ॥

हा अभंग योजिला होता. ह्यावरून धर्मांतच सदासर्वदा ते कसे तल्लीन झाले होते तें दिसतें. असो. सं० ]

**हे करुणामय दीनसख्या नत दास उभा तव द्वारीं ॥ध्रु०॥**
**तुजविण दीना कवण प्रभु तारी दुस्तर या संसारीं ॥१॥**
**संपद विषमय तुजविहीन जीवन मृत्युसमान ।**
**विपद संपद तवपदलाभें मृत्यु अमृतसोपान ॥ २ ॥**

केशवरावजींच्या चरित्रासंबंधानें विचार केला असतां तुमच्या-आमच्यासारख्या मध्यम वर्गांतील धार्मिक उन्नतीच्या मार्गांत असणाऱ्यांमध्यें त्यांचा नंबर वराच वर लागेल. परमेश्वर भक्तांची परीक्षा करितो. तशी त्यांची परीक्षा झाली व तींत ते चांगले टिकलेही. " विपद संपद तवपदलाभें मृत्यु अमृतसोपान " ह्या चरणांत कवीनें म्हटल्याप्रमाणें ज्या गोष्टी विपत्तीला कारण त्याच त्यांचे ठायीं संपत्तिरूप झाल्या. जी गोष्ट ज्या हेतूनें करावी तो हेतु सिद्धीस न जातां ती उलट अंगावरच येणें, हा विपत्तीचा अर्थ. त्याचप्रमाणें संपत्ति म्हणजे अमुक द्रव्य असेंच नव्हे. योजिलेल्या हेतूंप्रमाणें फळप्राप्ति होणें हीच संपत्ति होय.

बाह्यतः नानाप्रकारची विपत्ति भोगीत असतांही त्यांच्या चित्तांत अढळ शांति वास करीत असे. केशवरावांशीं ज्यांचा विशेष संबंध असे, त्यांस सांसारिक बाबतींत त्यांचा ( केशवरावजींचा) विशेष श्रेष्ठपणा कसा असे तो आढळून येत असे. या जगामध्यें आपण करावयास जातों एक, आणि होतें भलतेंच, असा प्रकार नेहमीं होतो. अशा वेळीं मनाची स्थिरता व उल्हासयुक्त स्थिति असूं देणें फार कठीण असतें. पण, हा गुण केशवरावांत होता. एकदा नोकरी सुटल्यावर त्यांनीं आपली सगळी पुंजी एका धंद्यांत घातली. व ती सगळी बुडाली. त्या वेळेस ते मजकडे आले होते व ह्या गोष्टीसंबंधानें एखाद्दुसरें वाक्य काय तें ते बोलले. बाकीचा वेळ त्यांनीं इतर गोष्टी बोलण्यांत घालविला. अशा प्रकारची मनाची समता ठेवणें फार थोड्यांना साधतें.

ही स्थिति त्यांनीं पुष्कळ श्रमानें व धर्मसाधन करून संपादिली होती. खरी धार्मिक स्थिति म्हणजे कालच्यापेक्षां आज आपल्या स्थितीमध्यें, विचारांमध्यें व मनोवृत्तींमध्यें चांगला बदल घडवून आणण्याकरितां प्रयत्न चालू ठेवणें हीच होय. कित्येक आम्ही आहों तसेच आहों, आमच्यामध्यें मुळींच कांहीं बदल झाला नाहीं, असें मोठ्या प्रौढीनें सांगतात; पण, अशा प्रकारचें आयुष्य, कीं ज्यामध्यें वर्षानुवर्ष अज्ञान स्थितीमध्यें राहून ज्यांची थोडीदेखील उन्नति होत नाहीं, तें आयुष्य खरोखर विपन्न होय.

केशवरावांचे अंगीं खराखरा करारीपणा होता कित्येकांचा करारीपणा दुसऱ्यांस भोंवतो, म्हणजे त्या करारीपणापासून देशाला, किंवा समाजाला नुकसान सोसावें लागतें. खरा करारीपणा स्वतःसच बाधावा. म्हणजे त्याचेपासून नुकसान झालें तर आपलेंच व्हावें, दुसऱ्याचें होऊं नये. अत्यंत निस्पृहपणा, समता न बिघडूं देतां प्रसंगास शरण जाणें, चांगल्याच स्थितींत ईश्वरानें आपणांस ठेवावें असा आपला काय अधिकार आहे असें मनास वाटणें व सहजसमाधानवृत्ति, अशा स्थितीला स्थितप्रज्ञता म्हणतात. ही जी आपणांस अत्यंत दुःसाध्य स्थिति ती त्यांनीं प्राप्त करून घेतली होती.

केशवरावजी यांस विपत्ति संपत्तिरूप भासत होती, इतकेंच नव्हे, तर धर्ममार्गाकडे त्यांचें लक्ष निरंतर असल्यामुळें त्यांनीं मृत्यूस अमृतसोपान करून ठेविलें होतें. या जगामध्यें समाजाला मात्र अमृतत्व आहे. व्यक्तीला अमृतत्व नाहीं. या संसारामध्यें नानाप्रकारच्या घडामोडी चाललेल्या आहेत. या दोनतीन वर्षांत विशेषतः इलाख्याच्या या भागावर, जे प्रसंग गुदरले आहेत. त्यांचे योगानें सहस्रावधि प्राण्यांचा संहार झालेला आहे. ज्याचा इष्टमित्र किंवा नातेवाईक कोणी गत झाला नाहीं असा माणूस क्वचितच सांपडेल. पण, याच शहरांत एखादा परकीय माणूस जर आला, आणि शहराच्या कोणत्याही रस्त्यानें जाऊं लागला, तर सर्व सृष्टीचे व्यापार नीट चालले आहेत, असें त्यास दिसून येईल. मी परवां उत्तर हिंदुस्थानांत जाऊन आलों, तेथें गंगेच्या प्रवाहाकडे पाहून हा देश धन्य आहे असें मला वाटलें; परंतु मनांत विचार आला कीं, गंगा तरी शाश्वत आहे काय ? प्रवाहाच्या रीतीनें शाश्वत स्थिति आहे, परंतु बिंदु, किंवा

व्यक्तीच्या रीतीनें मरण, नाश, घडामोड चालली आहे. कालचा सूर्य आज नाहीं. त्याच्या स्थितींत एका दिवसांत बदल झालेला असतो. त्याचे कालचे किरण आज नाहींत.

समाजाच्या रीतीनें शाश्वति आहे, एकत्वाच्या किंवा व्यक्तीच्या रीतीनें नाहीं. क्रम मात्र अव्याहत आहे. आपला व्यवहार बिंदूशीं असतो. गंगेचा प्रवाह शाश्वत असेल. परंतु बिंदूचें रूप व धर्म हीं नष्टप्राय होत असतात. जगाची रहाटी चाललेली आहे; परंतु आपले इष्टमित्र नाहींसे होत असतात.

माणसांची घडामोड लक्षांत न घेतां समाजाकडे पाहिलें, तर कांहीं अंतर आहे असें दिसत नाहीं. बाजार-हाट, खेळ, करमणूक, नाटकें, हसणें, बोलणें इत्यादि व्यापार चाललेलेच आहेत; परंतु आपणांस ह्या सर्वांत कांहीं शून्यता आहे, उदास आहे, असें वाटतें. आपल्या ओळखीचें कोणी राहिलें नाहीं म्हणून खेद होतो. धर्म-संबंधानें वृद्धीला अनुकूल अशी जी जनता तीच आपल्याला विशेष हितकर व ती नष्ट झाली म्हणजे आपल्याला उदास वाटणें, शून्यता भासणें साहजिक आहे. जिच्या संस्कारांत आम्ही वाढलों त्याच जनतेकडे आपण पाहतों; आपली इच्छा अशी असते कीं, तोच संस्कार आपल्याला नेहमीं होत असावा व त्याच्या अभावामुळें आपण क्षुधित होत आहों, भुकेनें व्याकुळ होत आहों, प्रतिक्षणीं आपल्याला चिमटा बसत आहे. दोनतीन वर्षें असेच प्रसंग वारंवार येत आहेत. पहिल्यानेंच हे एकाच घावावर अनेक घाव बसत आहेत.

हेंच आयुष्य पूर्ण आहे, मागेंपुढें कांहीं नाहीं असें कांहीं लोक समजतात. माझेपण माझ्या संततींत राहतें व हीच माझी शाश्वति असें कांहीं मानतात.

ह्या दोन्ही रीतींनीं आपलें सांत्वन होत नाहीं. आपण भाकरी मागावी व आपणांस कोणीं वरवंटा द्यावा त्याप्रमाणें हें होतें.

खरें समाधान, खरी तृप्ति ह्या तिसऱ्या कल्पनेंत आहे. अशी जागा आहे कीं, जेथें येथल्यापेक्षां आपली जास्ती प्रगति होईल, आपणांस सामर्थ्य येईल व तें ह्या जगांत किंवा पुढल्या जगांत होवो, किंवा अन्यत्र कोठें होवो. ज्या अर्ध्या वाटा आपल्या पडल्या आहेत त्या फिरून आपल्याला चोखाळतां येतील. हा भरंवसा, हा विश्वास मृत्यूला अमृतसोपान करितो; ही कल्पना कल्याणप्रद आहे, इतकेंच नाहीं, परंतु वस्तुस्थितीला धरून आहे.

* *

# सुधारकांचे चार वर्ग

एकंदरींत पाहतां गेलें साल ( १८९० ) फार महत्त्वाचें होतें, असें आपणांस दिसून येईल. हिंदु-स्थानच्या एका टोंकापासून तों दुसऱ्या टोंकापर्यंत, जिकडे तिकडे सर्व हिंदु लोकांचें मन एका गोष्टीकडे अगदीं वेधून गेलें होतें. त्या एका गोष्टीपुढें बाकीच्या सर्व गोष्टी अगदीं मागें पडल्या होत्या. या एका प्रश्नाच्या विचारांत लोक इतके गढून गेले होते कीं, त्यामुळें सर्वांस इष्ट व महत्त्वाचा असा जो राष्ट्रीय-सभेचा प्रश्न तोही कांहीं कालपर्यंत अगदीं काना-कोपऱ्यांत पडून गेला होता. पंजाब, सिंध, प्रयाग, काशी, कलकत्ता, मद्रास, दिल्ली, वऱ्हाड व दुसऱ्या अनेक ठिकाणीं चाललेल्या चळवळीची जी मीं नुकतीच माहिती मिळविली, व जी आपणांसही माहीत असेलच, तीवरून माझ्या म्हणण्याचा आपणांस प्रत्यय येईल. स्वतः आपल्याभोंवतीं चालत असलेल्या गोष्टी तर आपणां सर्वांस मशहूर आहेतच. मुंबई येथें कांहीं इंग्रज स्त्रियांच्या मदतीनें दोन हजार सुशिक्षित स्त्रियांनीं राणी सरकाराकडे पाठविलेला अर्ज, येथील तुळशी-बागेच्या प्रचंड सभेकडून झालेली खटपट, त्याच्या उलट दुसऱ्या पक्षाच्याही लोकांनीं केलेली खटपट, साताऱ्यांतील तशाच पद्धतीचे प्रयत्न, वगैरे गोष्टींच्या इतिहासावरून एकंदरींत आपलें पाऊल पुढेंच पडत आहे, हें चांगलें व्यक्त होतें. व ही गोष्ट खचित मोठी समाधानकारक आहे. आतां या ठिकठिकाणच्या चळवळींपासून सर्वांशीं इष्ट असे परिणाम झाले नाहींत, यापासून सुधारणेस प्रतिबंध मात्र होणार,

असें कित्येकांचें म्हणणें पडतें; परंतु माझी समजूत तशी नाहीं. 'लष्करच्या भाकरी कोण भाजतो' या न्यायानें, कोणीं कांहींही बोलो, कांहींही करो, जोंपर्यंत त्यापासून आपलें व्यक्तिदृष्टचा प्रत्यक्ष व तात्कालिक नफानुकसान दिसत नाहीं, तोंपर्यंत त्या गोष्टीच्या म्हणून वाटेस जावयाचें नाहीं, ही स्थिति वास्तविक पाहतां फार भयंकर व अनर्थावह मानली पाहिजे. या औदासीन्यापासून जितकें नुकसान होतें त्यापेक्षां प्रत्यक्ष प्रतिबंधापासून फारच थोडें नुकसान होतें. सुधारणेस पहिली व मुख्य अडचण म्हटली असतां, तिजविषयीं उदासीनता ही होय. तें औदासीन्य नाहींसें होऊन लोक सुधारणेविषयीं एकदा विचार करूं लागले, म्हणजे मग सुधारणेस अडचण काय ती कालावधीची. लोकांनीं एकदा विचार करण्यास आरंभ केला, म्हणजे मग थोडक्याच कालानें ते योग्य विचार करण्यास लागतील, यांत संशय नाहीं. तेव्हां तात्पर्य काय कीं, सामाजिक गोष्टींविषयीं गेल्या वर्षीं ठिकठकाणीं जी चर्चा चालू होती, त्यापैकीं कित्येकांची दिशा चुकली असली तथापि त्याबद्दल खेद मानण्यापेक्षां मुळीं चर्चेस आरंभ झाला याबद्दलच विशेष आनंद मानला पाहिजे. ज्या गोष्टीपासून उद्यांच आपलें स्वतःचें व्यक्तिदृष्टचा हिताहित नाहीं, अशा सामाजिक गोष्टीविषयीं वाटाघाट करण्यास तुळशीबागेंत पांच हजार लोकांनीं जमावें, हेंच मुख्यतः अभिनंदन करण्यासारखें आहे. सभांतून ठिकठिकाणीं होणारीं भाषणें ज्यांच्या कधीं कानीं पडलीं नाहींत व वर्तमानपत्रांतून होत असणारी चर्चा ही ज्यांच्या कधीं डोळ्यांखालून गेली नाहीं, अशा वर्गांतील लोकांचा येवढा मोठा समुदाय सामाजिक वाटाघाटीकरितां एका ठिकाणीं जमावा व त्यांनीं क्षणभर आपल्या पायांपुरतेंच पाहण्याच्या क्षुद्र वृत्तीचा अव्हेर करून उच्च भरारी मारावी व सामान्य जनसमूहाच्या सुखदुःखाचा विचार करण्यास प्रवृत्त व्हावें, हें मनुष्यत्वाच्या उच्च कर्तव्यपरायणतेचें व्यंजक होय. या वृत्तीचा मनुष्याच्या अंतःकरणांत प्रादुर्भाव होत असतां, त्याचें शारीरिक अस्तित्व भासमान न होतां, त्याच्या आत्मिक अस्तित्वाची जागृति होत असते, व खऱ्या धार्मिकतेच्या श्रेष्ठ मानास तो पात्र होऊं लागतो. जोपर्यंत मनुष्य ईश्वरदत्त बुद्धीचा उपयोगच करण्याचें मनांत आणित नाहीं, तोंपर्यंतची स्थिति मात्र खरोखर निराशेची होय. परंतु एकदा त्या बुद्धीचा मनुष्य उपयोग करूं लागला, म्हणजे मग निराशेचें अगदीं कारण नाहीं. प्रथम प्रथम चुका होतील, परंतु लौकरच त्या बुद्धीचा योग्य उपयोग होऊं लागेल, याविषयीं तिळमात्र संदेह नाहीं. ईशेच्छेनें आपला व पाश्चात्त्य राष्ट्रांचा जो निकट संबंध झाला आहे, तो एक मोठी शक्ति आहे. व ही जबरदस्त शक्ति ईश्वरानें आपल्या दयालुत्वानें आपल्या बऱ्याकरितां योजिली आहे यांतही शंका नाहीं. आणि एकदा डोळे उघडून पाहण्याची, व बुद्धि खर्चून विचार करण्याची लोकांस संवय लागली, म्हणजे त्या शक्तीचा लोकांच्या डोळ्यांवर व बुद्धीवर योग्य व इष्ट संस्कार होणें, हें फक्त कालावधीवर अवलंबून राहणार. लोक विचार करूं लागेपर्यंत केवळ निराशेची मात्र स्थिति असते. परंतु ते एकदा विचार करूं लागले म्हणजे निराशेचा लय झाला म्हणून समजावें. पुढें प्रश्न काय तो 'आज का उद्यां' एवढाच राहिला. व मीं सांगितलेल्या शक्तीची महती ज्यांस माहीत आहे, त्यांस हा काल फारसा लांब नाहीं हेंही सहज दिसून येणार आहे.

आतां, आजच्या प्रसंगीं सुधारकांचे चार वर्ग आपल्यापुढें मांडावेत असा माझा मानस आहे. चार वर्ग म्हणजे कालाच्या किंवा महत्त्वाच्या क्रमानुसार केले आहेत, असा भाग नाहीं. परंतु माझा आशय आपणांस स्पष्ट कळावा म्हणून हे केलेले आहेत. त्यांपैकीं अमुकच एक चांगला, किंवा अमुक अधिक महत्त्वाचा, किंवा अमुक आजच्या काळास योग्य असा निर्णय करीत बसण्याचा माझा मुळींच विचार नाहीं. त्यांचा फक्त निर्देश करावा इतकीच माझी इच्छा आहे. या चार वर्गांपैकीं सुधारकांचा पहिला वर्ग म्हणून मी ज्यास म्हणतों त्यास 'परंपरारक्षक सुधारक' असें नांव देतां येईल. या वर्गांतील लोकांचें असें म्हणणें पडतें कीं, आमच्या सुखदुःखाचा ज्यांत संबंध आहे, अशा गोष्टींविषयीं आम्हांस नव्यानें विचार करण्याची आवश्यकता नाहीं. आमचे पूर्वज फार शहाणे होते, व त्यांनीं लावून दिलेल्या मार्गापेक्षां अधिक कल्याणकारक व अनुकरणार्ह असा दुसरा मार्ग असणें मुळीं शक्यच नाहीं. तेव्हां या परंपरारक्षक सुधारकांच्या मतें सुधारणा म्हणजे, जेथें आपली पूर्वपरंपरा सुटली असेल, तेथें ती फिरून स्थापन करण्यास प्रयत्न केला म्हणजे आपलें काम झालें. उदाहरणार्थ, ब्राह्मणांनीं भिक्षान्नावर निर्वाह करून उपदेश करावा, ही आपली पूर्वपरंपरा सुटली, यापासून आपलें नुकसान होत आहे. करितां ब्राह्मणांनीं

पूर्व पद्धतीनुसार भिक्षावृत्तीचें अवलंबन करून उपदेशकांचें कर्तव्य बजावण्यास लागावें. क्षत्रियांनीं शस्त्र धारण करून रणांगणाचा आश्रय करावा, वैश्यांनीं व्यापारधंदा करूं लागावा व शूद्रांनीं एकनिष्ठपणें त्रिवर्णांची शुश्रूषा करून आपल्या जन्माचें सार्थक करून घ्यावें व हें पूर्णपणें होऊं लागलें म्हणजे सुधारणेची परमावधि झाली. याहून सुखतर स्थिति असणें सर्वस्वीं असंभाव्य होय.

सुधारकांचा दुसरा वर्ग म्हणून ज्यास मी म्हणतों, त्यामध्यें व पहिल्या वर्गामध्यें एका प्रकारचें साम्य आहे, व कांहीं भेदही आहे. प्राचीन धर्मग्रंथांवर जशी पहिल्या वर्गांतील लोकांची पूर्ण श्रद्धा आहे, तशीच या दुसऱ्या वर्गांतील लोकांचीही आहे. तात्पर्य दोघांचाही पाया एकच आहे. परंतु या पायावर उभारल्या जाणाऱ्या इमारती मात्र परस्परांहून भिन्न आहेत. उदाहरणार्थ, समुद्रप्रयाण घ्या. पहिल्या वर्गांतील लोकांस जसें हें सदोष वाटतें, तसेंच दुसऱ्याही वर्गास वाटतें. पण ते म्हणतात कीं, समुद्रप्रयाणासंबंधाचें जें वचन आहे, त्याचा अर्थ पहिल्या वर्गांतील लोक करतात तसा नाहीं. त्या वचनाचा अर्थ असा आहे कीं, हिंदूनें नाविकाचा धंदा केला, तर मात्र दोष सांगितला आहे. बाकी नाव चालविण्याचें काम न करितां नुसता समुद्रप्रवास केला, तर त्यांत अगदीं दोष नाहीं. तेव्हां या दुसऱ्या वर्गांतील सुधारकांस प्राचीन धर्मग्रंथ मान्य व आधारभूत आहेतच. परंतु त्यांचा अर्थ मात्र लोक करितात तसा नव्हे. तेव्हां त्याच वचनांचा योग्य अर्थ करून त्याप्रमाणें वागल्यास सर्व आवश्यक सुधारणा होण्यासारखी आहे. परंतु खऱ्या अर्थास अनुसरून वागावें म्हणजे झालें. पंचवीस वर्षांपूर्वी झालेला पुनर्विवाहाचा वाद व दयानंद सरस्वतीचे प्रयत्न हीं दोन्हीं या दुसऱ्या वर्गाचीं उदाहरणें होत.

तिसऱ्या वर्गांत ज्या सुधारकांचा मी समावेश करतों, त्यांस वरील दोन्ही मार्ग पसंत नाहींत. ते म्हणतात कीं, पहिल्या वर्गांतील सुधारकांच्या समजुतीप्रमाणें सुटलेली परंपरा पुनः सुरू केली, तथापि त्यापासून आमचा कार्यभाग होणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर उलट तसें करितां येणेंच शक्य नाहीं. ब्राह्मणांनीं पुनरपि भिक्षांदेहीचा आश्रय करावा व शूद्रांनीं केवळ सेवावृत्तींत समाधान मानून राहावें हें जसें अयोग्य आहे, तसेंच हें सांप्रतकालीं घडवून आणण्याची खटपट करणें म्हणजे किती वेडेपणाचें आहे, हें भोंवतालच्या स्थितिकडे पाहिलें असतां, कोणासही कळणारें आहे. आम्ही आमच्या सदसद्विवेकशक्तीच्या अनुरोधानें चालणार. समुद्रांतून प्रयाण करण्यांत आम्ही एकादें पातक करतों, असें जर आमची मनोदेवता सांगत नाहीं, तर तें करण्यास प्रत्यवाय काय म्हणून असावा ? तसेंच, नुसतें समुद्रांतून प्रयाण न करितां नाविकाचा धंदा केला तथापि त्यांतही दोषाचा कांहीं एक भाग नाहीं. मग मूळ वचनाचा अर्थ दुसऱ्या वर्गांतील लोक– ज्यांस 'व्युत्पत्तिसुधारक' म्हणतां येईल– जसा करितात, तसा केला तथापि त्यापासूनही आमचा उपयोग होत नाहीं. शिवाय, आपल्यास पाहिजे तसा अर्थ करणें एका अर्थी गौण आहे. जर ऋषिवचनें आपणांस आधारभूत धरावयाचीं असतील, तर त्यांचा अर्थ त्या ऋषींच्या मनांत होता, तोच घेतला पाहिजे. त्याहून वेगळा अर्थ करूं पाहणें हें अन्यायाचें आहे. आणि हे व्युत्पत्तिसुधारक करतात तोच योग्य अर्थ असला, तथापि आम्हांस इष्ट असणाऱ्या सर्व सुधारणा या व्युत्पत्तीचा आश्रय करून होण्यासारख्या नाहींत. आम्हांस हे दोन्ही मार्ग प्रशस्त वाटत नाहींत. स्त्री आणि पुरुष या उभयतांसही जर एकच मनोवृत्ती आहे हें खरें आहे, तर मग एकानें वाटेल तेव्हां व वाटेल तितक्यांदा लग्न करावें व दुसऱ्यानें मात्र करूं नये, हा उघड अन्याय होय. मग धडधडीत ज्यांत अन्याय आहे, अशा गोष्टीविषयीं कोणीं पूर्वपरंपरा पुढें आणली, किंवा व्युत्पत्तीचा आश्रय केला, तथापि ते दोन्ही प्रकार आम्हांस मान्य नाहींत. प्राचीन परंपरेंत जें ग्राह्य असेल, तें घेण्यास आम्ही तयार आहों. परंतु ज्या गोष्टी सदसद्विवेकास सोडून आहेत, त्या मात्र आम्ही टाकणार व आमच्या मनोदेवतेस योग्य दिसेल, असें आचरण ठेवणार. प्रार्थनासमाज, ब्राह्मसमाज वगैरे संस्था या तिसऱ्या वर्गाचे निदर्शक होत.

आतां राहिला चौथा वर्ग. यांतील लोक म्हणतात कीं, तुमची परंपरा उपयोगीं पडत असेल, तर तितक्यापुरती ती तुम्ही घ्या. व्युत्पत्तीचेंही साह्य योग्य प्रकारें घेण्यासारखें असेल तर तेंही घ्या. व तुमच्या सदसद्विवेकशक्तीचाही तुम्ही पूर्ण उपयोग करा. त्याबद्दल आमचें कांहीं म्हणणें नाहीं. परंतु आज पुष्कळ दिवसपर्यंत तुम्हीं या गोष्टींचा अनुभव घेतला आहे. व त्यापासून म्हणण्यासारखा उपयोग झाला नाहीं. लोकांची विवेकशक्ति जागृत करून, त्यांजकडून योग्य गोष्टींचा

स्वीकार करविण्याकरितां पुष्कळ खटपट झाली, परंतु त्यापासून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. विवेकशक्ति जोंपर्यंत प्रचलित असते, तोंपर्यंत, अमुक गोष्ट योग्य आहे, अमुक न्याय्य आहे, हें सारे कबूल करितात. परंतु विवेकानें योग्य दिसणाऱ्या गोष्टी अमलांत आणण्याचा प्रसंग आला, म्हणजे लोक तो विवेक विसरतात व विकारास वश होतात. त्यांचे सारे उन्नत विचार एका बाजूस राहतात व तूर्तापुरती नजर देण्याची क्षुद्र बुद्धिच प्रबळ होते. याकरितां ज्या गोष्टी लोकांस योग्य वाटतात, त्या त्यांच्याकडून प्रत्यक्ष होऊं लागण्यास, त्यांच्यावर जबरदस्तीच केली पाहिजे, त्यावांचून इलाज नाहीं. या बाह्य शक्तीचा आश्रय केल्यावांचून विवेकग्राह्य गोष्टींची अंमलबजावणी होणें नाहीं. याजकरितां योग्य व न्याय्य सुधारणा प्रत्यक्ष सुरू करणें असेल, तर बडग्याचाच उपयोग केला पाहिजे.

आतां येवढा वेळ जे मीं सुधारकांचे चार वर्ग सांगितले, तशा प्रकारचे वर्ग आपल्या व इतर देशांतही वेळोवेळीं झाले, हें इतिहासावरून समजणारें आहे. ख्रिस्ती धर्म, बौद्ध धर्म, व मुसलमानी धर्म, यांच्या इतिहासांत हे चारी प्रकार दृष्टीस पडतात. मक्केंतून महंमदानें जेव्हां मूर्ति नाहींशा केल्या, तेव्हां त्याजकडे संख्येचें बहुमत नव्हतें. तर शक्तीच्या बहुमतानेंच त्यानें ती सुधारणा केली. आपल्या म्युनिसिपालिटचांचाही इतिहास असाच आहे. रस्ते साफ करणें, त्यांवर दिवे लावणें, लोकांच्या आरोग्यार्थ व्यवस्था करणें, वगैरे गोष्टी परंपरेला धरून असोत वा नसोत, त्या विचारास संमत असोत वा नसोत, त्या अवश्य आहेत असें ज्यांस दिसून आलें, त्यांनीं बहुमताच्या भरीस न पडतां, सत्तेच्या जोरावर त्या सुरू केल्या, व आज त्याच म्युनिसिपालिटचा आम्ही बंद करणार, असें सरकार म्हणूं लागल्यास, आम्हांस तें खपावयाचें नाहीं. व त्या आम्हांस पाहिजेत म्हणून आम्हीच अर्ज करूं लागूं. तात्पर्य, हा चौथा प्रकार लागू करण्याचेही प्रसंग व स्थळें असतात. व कांहीं बाबतींत या चौथ्या उपायाचा आश्रय करण्यासारखा सध्याचाही प्रसंग आहे.

आतां या चारही प्रकारच्या सुधारकांपासून सुधारणेस साह्यच होत जातें, हें आपणां सर्वांस कबूल केलें पाहिजे. एकमेकांचा एकमेकांवर परिणाम घडल्यावांचून राहात नाहीं. पुनर्विवाहाबद्दल आजपर्यंत झालेले प्रयत्न व्यर्थ गेले नाहींत. हे प्रयत्न झाले नसते तर आज, 'पूर्वीचे लोक चुकले, ऋतुमती होण्यापूर्वी विधवेचें लग्न करावें अशी ते खटपट करते, तर साध्य झाली असती', असे जे परंपरासुधारकांच्या तोंडून शब्द निघतात ते खचित निघाले नसते. त्याप्रमाणेंच तुळशीबागेसारख्या सभांपासून नुकसान होतें असें जरी कित्येकांस वाटतें, तथापि एकंदरींत या सर्व चळवळीचें निदान आपणांस श्रेयस्करच होईल, यांत शंका नाहीं. मी असें ऐकतों कीं, यापूर्वी स्त्रियांकडून गेलेल्या अर्जाविरुद्ध अर्ज करण्याकरितां पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांची एक सभा तुळशीबागेंत जमणार आहे. हें ऐकून मला मला फार आनंद होत आहे. परवांच्या सभेप्रमाणें पांच हजार स्त्रिया तुळशीबागेंत जमून एकमेकांच्या सुखदुःखांचा विचार करूं लागल्या, तर मग सुधारणा लांब नाहीं. त्या तेथें जमून आपापल्या स्वतःच्या समजुतीप्रमाणें वाटेल ते ठराव करोत, तो एक अश्रुतपूर्व सुदिन होय, असें मी मानीन. आपल्या सुखदुःखांविषयीं आपणांस काय वाटतें, तें कळविण्याची संधी जर स्त्रियांस पुणेंकरांकडून मिळेल, तर मग आपल्याला फार दिवस सुधारणेकरितां थांबावयास नको. वर जो जबरदस्तीचा मार्ग सांगितला, त्यास स्त्रियांकडूनच शेवटीं मदत मिळणारी आहे. व स्त्रियांनीं बंड केल्यावर पुरुषांचें कांहीं चालेनासें होऊन त्यांच्या म्हणण्यास निमूटपणें मान वांकवावी लागते, याचा अनुभव आपणां सर्वांस आहेच ! असो; एक गोष्ट मात्र सर्वांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. मी म्हणतों तेंच खरें असा आग्रह धरून दुसऱ्यास प्रतिबंध करण्यास प्रवृत्त होणें, हें कोणासही शोभत नाहीं. आपल्यास जो योग्य मार्ग दिसेल त्याचा आपण अवलंब करावा हें योग्य आहे. परंतु दुसऱ्यास तो पसंत नसल्यास त्याच्यावर तुटून पडणें, किंवा त्यास योग्य वाटत असलेल्या मार्गांत विघ्न आणणें, हें सर्वांसही अनुचित होय. क्रोधद्रोहादि मनोविकारांच्या तावडींत सांपडून मनुष्यत्वास विसंगत असें कोणाचेंही आचरण नसावें. आपल्या समजुतीप्रमाणें आपण वागावें, व दुसऱ्याच्या समजुतीप्रमाणें दुसऱ्यास वागूं द्यावें. नाहीं तर बखेडा मात्र होऊन सर्वांसच अपाय होण्याचा संभव आहे, हें विसरूं नये, म्हणजे झालें.

अनुक्रमणिका

# ख्रिस्ती धर्माविषयीं कांहीं विचार[1]

हिंदु व ख्रिस्ती धर्मांचा प्रार्थनासमाजाशीं एका रीतीनें मेळ पडणें शक्य आहे. परंतु हिंदु धर्माचा भाग सोडून ख्रिस्ती धर्माच्याच संबंधानें आज आपल्याला विचारकर्तव्य आहे. ख्रिस्ती धर्माच्या संबंधानें एक साधारणपणें चमत्कार वाटण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, आपल्या देशांत जितके लोक ख्रिस्ती झाले आहेत ते सर्व ख्रिस्ती धर्माच्या ज्या ज्या मंडळ्या धर्मप्रसारार्थ इकडे आल्या आहेत, त्यांपैकीं कोणत्या तरी एका पंथास धरून आहेत. त्यांच्या अनेक पंथांपैकीं हा पंथ चांगला, कीं तो पंथ चांगला, अशा तऱ्हेचे त्यांचे विचार चालतात; परंतु त्याच धर्माच्या ज्या पंथाचे मिशनरी लोक इकडे नाहींत, त्या पंथाविषयीं कधीं ते विचार करीत नाहींत असें दिसतें. कारण, त्या पंथाचा स्वीकार केलेले असे फारसे कोणीच येथें आढळत नाहींत. उदाहरणार्थ, युनिटेरिअन ख्रिस्ती पंथ घ्या. त्या पंथाचे मिशनरी इकडे कोणी नाहींत यामुळें त्याचा स्वीकार केलेलेही येथें स्वदेशीय ख्रिस्ती नाहींत. यावरून असें दिसतें कीं, ख्रिस्ती धर्माविषयीं स्वतंत्रपणें कोणी विचार करीत नाहींत, ही फार खेदकारक गोष्ट आहे. ह्या गोष्टीबद्दल युरोपिअन, किंवा अमेरिकन ख्रिस्ती लोकांस दोष देतां येत नाहीं. कारण, त्यांच्या देशांत जे निरनिराळे पंथ झाले त्यांचा तिकडील कित्येक ऐतिहासिक गोष्टींशीं संबंध आहे व त्यामुळें त्या लोकांत त्यासंबंधानें थोडा-बहुत अभिमान उत्पन्न झालेला असतो, तो एकाएकीं जाणें कठीण आहे. परंतु इकडील ख्रिस्ती झालेल्या लोकांची गोष्ट तशी नाहीं. त्यांनीं स्वतंत्रपणें विचार करणें अवश्य आहे. अशा प्रकारचा स्वतंत्र विचार सुरू होईपर्यंत ख्रिस्ती धर्माचा बळकट पाया ह्या देशांत पडला, असें सहसा म्हणतां येणार नाहीं. जसा एखादा वृक्ष परदेशांतून आणून इकडे लाविला आणि त्या देशांतील हवापाण्याप्रमाणें इकडे कृतीनें हवापाणी तयार करून त्यास दिल्यानें जरी तो चांगला वाढलासें दिसतें, तरी जोंपर्यंत तो ह्या देशांतील स्वाभाविक हवापाणी घेऊन त्यांवर जीव धरूं लागला नाहीं, तोंपर्यंत तो वृक्ष लागला, असें समजतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच ह्या देशांतील ख्रिस्ती धर्माची स्थिति समजली पाहिजे. स्वदेशीय लोकांनीं ऐरिश प्रेस्‌बिटीरिअन पंथ चांगला, किंवा फ्रीचर्च ऑफ् स्कॉट्‌लंडचाच पंथ चांगला अशा तऱ्हेनें विचार न करितां, ख्रिस्ती धर्माच्या मुख्य तत्त्वांचा विचार करून त्यास एतद्देशीय धर्मविचारास अनुरूप असें स्वतंत्र स्वरूप दिलें पाहिजे.

आपण सर्व लोकांनीं ख्रिस्ती धर्माचा विचार करणें योग्य आहे. कारण, हल्लीं सर्व सुधारलेल्या व उद्योगी लोकांचा तो धर्म आहे. तेव्हां त्यांचें व आपलें धर्मैक्य झाल्यास संतोषाची गोष्ट आहे. परंतु ख्रिस्ती धर्माविषयीं विचार करूं लागलें असतां प्रथम एका मोठ्या गोष्टीविषयीं शंका येते, ती ही कीं, मुख्य देवामध्यें पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा असे तीन अंश त्यास धर्मांत मानिले आहेत, त्याचा उलगडा नीट होत नाहीं. अलीकडे एका ख्रिस्ती धर्मवेत्त्यानें ह्या गोष्टीची एका तऱ्हेनें व्यवस्था लाविली आहे, ती थोडी विचार करण्यासारखी आहे. नुसत्या बाह्य जड जगतापासून जी परमेश्वराविषयीं कल्पना उत्पन्न होते तीस पितृस्थानीं मानावें; नुसत्या जड जगतापासून परमेश्वराच्या सर्व गुणांचें ज्ञान होत नाहीं याजकरितां परमेश्वरानें ख्रिस्ताच्या द्वारें आपल्या जास्त गुणांचें ज्ञान जगास करून दिलें, त्यास पुत्र मानावें; ह्याहीपेक्षां जास्त ज्ञान व्हावयास पाहिजे म्हणून मनुष्याच्या सद-सद्विवेकशक्तीच्या द्वारें तें करून दिलें, ह्या शक्तीस पवित्र आत्मा असें म्हणावें. ह्याच दृष्टीनें पाहिलें असतां ह्या पुत्रस्थानीं केवळ ख्रिस्तासच मानावें असें नाहीं, तर सर्व देशांत जे मोठमोठाले साधु होऊन गेले त्या सर्वांस मानावयास कांहीं हरकत नाहीं, असें म्हणतां येईल. अशा रीतीनें व्यवस्था केली असतां ती ग्राह्य होण्यासारखी आहे. ख्रिस्ती धर्माच्या

१. हें व्याख्यान पुण्यास सन १८८० सालीं डिसेंबर महिन्यांत देण्यांत आलें होतें. मूळ व्याख्यान इंग्रजींत होतें. त्याचा हा अत्यल्प सारांश आहे. सं०



अनुक्रमणिका

संबंधानें दुसरी हरकत येते ती प्रायश्चित्ताची. जगांतील सर्व मनुष्यांच्या पापांबद्दल येशू ख्रिस्तानें प्रायश्चित्त केलें व तें सर्वांच्या उपयोगीं पडतें ही गोष्ट मान्य करतां येत नाहीं. कारण, प्रत्येक मनुष्यानें आपल्या पापाबद्दल ख्रिस्ताप्रमाणें प्रायश्चित्त केलें पाहिजे. जसे ख्रिस्तास त्रास देणारे व त्याचा छळ करणारे फ्यारीसीस् लोक होते त्याप्रमाणें आपल्यास कामक्रोधादि षड्रिपु व शिवाय आपली हेलना करणारे लोकही आहेत. त्या सर्वांचा जाच सोसून आपण आपल्या अंतःकरणरूप क्रूसावर ख्रिस्ताप्रमाणें शासन भोगावें. अशा रीतीनें ख्रिस्ती मतांची व्यवस्था लाविली असतां एकेश्वरी मतांचा व त्यांचा मेळ पडण्यासारखा आहे.

* *

# पं. वा. वामन आबाजी मोडक, सी. आय. ई.

तुकारामबावांस मृत्यूचें भय मुळींच वाटत नव्हतें, याविषयीं त्यांच्या कांहीं अभंगांत फार सुरेख वर्णन आहे. आणि त्यांच्या चरित्रावरून आपणांस हें दिसून येईल कीं, जीवंतपणीं त्याचप्रमाणें मृत्यूनंतरही त्यांची कीर्ति अजरामर झालेली आहे. जीवनाचें जें आदिकारण जगच्चालक परमेश्वर त्यांत ते अगदीं लीन झाले होते, असेंच आपणांस दिसून येईल. हेच शब्द आमचे प्रिय मित्र वामनरावजी मोडक ह्यांस यथार्थपणें लागू होतात. वास्तविक म्हटलें तर आज चार वर्षें त्यांचा आत्मा या मृण्मय देहांतून निघून जाण्याच्या मार्गास लागला होता; आणि आपण आपल्या दयामय पित्याच्या चरणासन्निध जावें या पवित्र इच्छेनें देहाविषयीं अगदीं उदासीन होत्साता मृत्यूची मार्गप्रतीक्षा करीत होता. ज्यांच्या आध्यात्मिक कर्तव्यास नुकताच कोठें प्रारंभ झाला होता आणि जे ईश्वराच्या नांवाचा जयजयकार करण्यासाठीं उमेदीनें झटत होते व सर्व प्रकारचीं दुष्कृत्यें होऊं नयेत म्हणून सतत प्रयत्न करीत होते, अशा बऱ्याच बंधूंवर गतवर्षी निर्दय मृत्यूचा घाला पडला आहे. या सर्व लहानथोर बंधूंस अशा रीतीनें वागण्याच्या कामीं आमचे शूर बंधु वामनरावजी यांच्या आचरणावरून आणि उपदेशानेंच स्फुर्ति मिळाली होती. वामनरावजींस पक्षघाताचा झटका पहिल्यानें चार वर्षांपूर्वी झाला. परंतु या चार वर्षांत त्यांची सर्व मानसिक शक्ति ईश्वराच्या सेवेंत मग्न झाली होती. महाभारतांतील प्रसिद्ध योद्ध्याप्रमाणें ते शरपंजरीं पडले होते व त्यांवर मृत्यु चाल करीत होता; तथापि एकही दुःखाचा उद्गार त्यांच्या तोंडावाटे निघाला नाहीं. त्यांचा आत्मा शांत होत्साता परमात्म्याच्या चिंतनांत रत झाला होता आणि जे त्यांचें समाधान करण्यासाठीं त्यांचेकडे येत, त्यांना स्वतःच्या साठ वर्षांच्या मिळविलेल्या अनुभवाचा अप्रतिम उपदेश करण्यांत त्यांचा बहुतेक काल जात असे.

आपणां सर्वांस फार आशा होती कीं, वामनरावजी आणखी कांहीं वर्षें तरी आपणांमध्यें राहून मार्गदर्शक-दीपाप्रमाणें योग्य प्रकाश देतील; परंतु भवितव्यता निराळीच होती. तथापि भगवदिच्छा त्यांना आमच्यामधून नेण्याची होती याबद्दल आम्हीं कुरकूर करतां कामा नये. आपलें कर्तव्य बजावण्यासाठीं ते आमच्यामध्यें बरेच दिवस राहिले. एवढ्यावरच आम्हीं आपलें समाधान करून घेतलें पाहिजे. त्यांनीं शिक्षकाचें काम तीस वर्षें केलें. तेवढ्या मुदतींत शेंकडो-हजारो शिष्यांनीं त्यांच्या चरणांपाशीं बसून ज्ञानसंपादन केलें. या शिष्यांच्या, आणि गेलीं चाळीस वर्षें माझ्याप्रमाणें ज्यांना त्यांच्या सहवासाचा लाभ झाला त्यांच्या हृदयांतून वामनरावजींची गंभीर, आनंदी, प्रेमळ, भाविक, धार्मिक मूर्ति कधींही ढळण्यासारखी नाहीं. वामनरावजींच्या उदात्त सहवासाने आपल्या मनावर काय परिणाम होतो याची प्रतीति ज्यांस पाहावयाची असे त्यांस फक्त एकवार जाऊन त्यांच्याशीं सहज भाषण करण्याचा प्रसंग आला म्हणजे त्यांची खात्री होत असे. त्यांजकडे जे येत त्यांच्या मनांत वामनरावजींविषयीं आदर व पूज्यबुद्धि उत्पन्न होणें हा पहिला परिणाम होय. पुढें त्यांच्याशीं संभाषण करण्याचा योग आला म्हणजे त्यांच्या साधेपणाचा आणि उदात्त व परिपक्व

विचारांचा परिणाम मनुष्याच्या मनावर इतका होई, कीं तो कसाही कठोर मनाचा असला, तरी त्यांच्या गंभीर मधुर स्वरानें आणि मराठी सुरस वाणीनें श्रोत्याच्या मनास पाझर सुटून, आपण केवळ स्वर्ग-सुखाचा अनुभव घेत आहों असा भास होऊन, आपली चिंता, क्षुल्लक हेतु आणि निराशा यांचा विसर पडल्याविना राहात नसे. इंग्रजी भाषेवर त्यांचा पगडा बराच होता, परंतु केवळ इंग्रजी भाषेवरच त्यांची भिस्त नसे. ते आपल्या मधुर स्वभाषेंत बोलूं लागले म्हणजे त्यांची बरोबरी करणारा एकही नसें. त्यांचा आवाज इतका गोड व गंभीर होता, कीं तो श्रोत्याच्या अंत:करणांत आपला प्रवेश करून त्यांतील क्षोभ अगदीं नाहींसा करून, शांत वृत्ति उत्पन्न करीत असे. शब्दांवरून विचारांची कल्पना होते. जेथें स्वभाव इंद्रिय-दमनाच्या संवयीनें स्थिरावलेला नाहीं तेथें विचारांस महत्त्व नसावयाचें. ज्यांना त्यांची प्रत्यक्ष माहिती असे ते जाणत असत कीं, वामनरावजींच्या अंगीं सहिष्णुता, प्रेम व भूतदया आणि धर्मापासून उत्पन्न होणारी पूज्यबुद्धि, आदर व सत्यनिष्ठा– हे गुण उपजत असून इंद्रियदमनाच्या संवयीनें ते इतके वृद्धिंगत झाले होते कीं, त्या सर्वांच्या संमेलनानें त्यांना एकप्रकारचें पूर्णत्व आलें होतें. हल्लींच्या पिढींत स्वत:विषयीं अभिमान म्हणून कांहीं नाहीं असें म्हणणारे कित्येक लोक आहेत. मला तर असें वाटतें कीं, आमच्यांत खरा स्वाभिमानी पुरुष जर अलीकडे कोणी झाला असेल, तर वामन-रावजी हेच ते होत. परंतु त्यांचा स्वाभिमान दुसऱ्यास त्रास देणारा नव्हता. केव्हां केव्हां त्यांच्या ठायीं असंतोष-वृत्ति उत्पन्न होत असे. परंतु ती स्वत:पुरतीच असे. दुसऱ्यांच्या संबंधानें जणूं काय ते प्रेमाची व माधुर्याची मूर्तिच असत.

तीस वर्षांपूर्वीं विधवाविवाहासंबंधी चळवळ उडाली होती त्या वेळीं त्या सत्कार्यार्थ वामनराव एकटे अगदीं जुन्या मतांच्या ब्राह्मणसमुदायांत भांडत होते. त्यामुळें सर्व बाजूंनीं जरी त्यांचा छळ होत होता, तरी ते मुळींसुद्धां न डगमगतां सर्व छळ सोसून, दंड ठोकून शूरा-सारखे या सत्कार्यार्थ झटले. इतकें असूनही क्रोधाचा चकार शब्द त्यांच्या मुखावाटे निघाला नाहीं. आणि जे त्यांस सतत त्रास देत असत त्यांच्याविषयींसुद्धां त्यांच्या मनांत प्रेमाशिवाय दुसरी भावना कधींही उत्पन्न झाली नाहीं. हाच स्वाभिमान या भरतभूमींतील साधु-संतांच्या आचरणांत दिसून आला आहे आणि त्याचेंच अनुकरण सध्याच्या कालास अनुसरून आमच्या मित्रानें केलें होतें.

वामनरावजींसंबंधानें एक अत्यंत अनुकरणीय गोष्ट ही कीं सामाजिक आणि धार्मिक सुधारणांच्या झगड्यांत त्यांनीं आपली सत्यनिष्ठा यत्किंचितही ढळूं दिली नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या कृत्यांत किंवा भाषणांत दोषाचा भाग म्हणून कधीं कोणास सांपडलाच नाहीं. आणि जेव्हां हें युद्ध संपलें तेव्हां निदान एका गोष्टी-विषयीं सर्वांची एकवाक्यता झाली. ती ही कीं, वामनरावजी हे भांडणारांपैकीं सुधारक असून, सोसणारांपैकींही होते.

त्यांच्या मृत्यूमुळें आपल्या प्रांतांतील सुधारणे-संबंधाच्या निरनिराळ्या चळवळींची फार हानि तर झालीच आहे. परंतु धर्मसंबंधी बाबतींत त्यांनीं आपलें बहुतेक आयुष्य खर्च केलें असल्यामुळें आणि सरकारी नोकरीचें पेन्शन घेतल्यानंतर त्यांचे सर्व विचार आध्यात्मिक विषयांत गढून गेलेले असल्यामुळें व राहिलेलें आयुष्य धर्मप्रचारार्थ घालवावयाचें ह्या त्यांच्या निश्चयास त्यांनीं आचरणाचें स्वरूप द्यावयास सुरुवात केलीही होती म्हणून, झालेल्या हानीनें आम्हांस फारच तळमळ वाटत आहे. धर्माच्या बाह्य स्वरूपाकडे त्यांचें फारसें लक्ष नसे. परंतु त्यांचें मन धर्माच्या अंतर्गत स्वरूपांत व भक्तींत अगदीं लीन असें. खरा धर्म म्हटला म्हणजे हाच आहे. त्यांची स्थिती अशी होती म्हणून धार्मिक बाबतींत मार्गदर्शक होण्यास ते पात्र झाले होते. स्वभावत: भक्तिमान असल्यामुळें त्यांचीं उत्तम श्रद्धा-युक्त व भाविक अशीं पदें आपल्या संगीतांत आहेत. त्यांचेसंबंधानें ईश्वराचें सान्निध्य ही केवळ मानीव गोष्टींपैकीं एक गोष्ट नव्हती. तर ती एक प्रत्यक्ष अनुभवाची असून, तोच एक त्यांचा मोठा ठेवा असे. त्यांनीं बराच प्रवास करून आध्यात्मिक ज्ञान संपादन केलें होतें. केशव चंद्रसेन यांनीं ब्राह्मसमाजास प्रगतीची जी दिशा दाखविली तिजविषयीं त्यांच्या मनांत पूर्ण सहानुभूति असे. तथापि त्यांच्यासंबंधानें शेवटीं शेवटीं ज्या गैरसमजुतीच्या कल्पना तेथील लोकांत वाढल्या होत्या त्यांविषयीं त्यांना फार वाईट वाटे. यामुळें जरी त्यांच्या या शेवटच्या स्थितीविषयीं त्यांना सहानुभूति नसे, तरी त्या महाथोर ब्राह्मप्रचारकाविषयीं त्यांच्या मनांत पूर्ण प्रेम व आदर भरलेला असे. ईश्वरेच्छेनें

वामनरावजी आणखी कांहीं वर्षें जर राहिले असते, तर आज बंगाल्यांत महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर यांस जो मान मिळत आहे तो यांना या बाजूस मिळाला असता. इतकेंच नव्हे, तर जिकडे जिकडे त्यांची लोकांस माहिती आहे तिकडेही मिळाला असता यांत संदेह नाहीं. स्वभाव आणि इंद्रियनिग्रहाची संवय या बाबतींत बंगाल्यांतील इतर धर्मप्रचारकांपेक्षां महर्षि देवेंद्रनाथ यांच्याशीं त्यांचें फार साम्य असे.

संस्कृत भाषेंत ते स्वतः प्रवीण असून त्यांनीं कांहीं उपनिषदांचें भाषांतरही केलें आहे. तथापि स्वभाषेच्या सेवेंत त्यांच्याकडून कधींही दुर्लक्ष झालेलें नाहीं. ते नेमस्तपणा राखण्यास शिकवीत; पण, तो धाकदपटशानें न शिकवितां गोडीनें व प्रेमानें शिकवीत. हा गुण वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं ओळखला होता म्हणून मुंबईतील एका मुख्य विद्यापीठावर त्यांची योजना करण्यांत आली होती. अशा मुख्य हुद्द्यावर हेच पहिले देशी कामदार झाले. त्यांच्या दहा वर्षांच्या कारकीर्दींत त्यांनीं शाळा इतक्या उत्तम स्थितीस आणिली, कीं ती सर्व लोकांच्या स्तुतीस पात्र झाली. सर्व इलाख्यांतील हजारो विद्यार्थी त्यांना आपण होऊन मान देत आहेत, एवढ्यावरूनच सरकारानें त्यांना एवढा मोठा हुद्दा दिला तो योग्य होता याची साक्ष पटत आहे.

देशाच्या राजकीय प्रगतीकरितां जे प्रयत्न चालले आहेत त्यांविषयीं गुरुवर्य मोडक यांस कळकळ नव्हती असें कोणींसें म्हटलेलें मला आठवतें. आतां, या बाबतींत जर कोणाला बोलण्याचा कांहीं अधिकार असेल, तर तो खचित मला आहे. ते सामाजिक आणि धर्मसंबंधी सुधारणेत सर्वथैव गुंतले होते ही गोष्ट खरी. पण, राजकीय सुधारणेविषयीं बेपर्वा होते असें म्हणणारे त्यांच्यासंबंधानें अन्याय करीत आहेत, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. ते आम्हांपैकीं सर्वांत जास्त व कळकळीनें राजकीय बाबतींचा विचार करीत असत. परंतु राजकीय चळवळींसंबंधीं ज्या विचारांस कांहीं लोक गैरसमजुतीनें स्वदेशाभिमान समजतात, तसले वरपांगी आवेशी विचार त्यांस माहीत नव्हते. राजकीय बाबतींतही योग्य संवय लावून घेऊन आणि नियमनानें आपणांस योग्यतेस आणलें पाहिजे अशा मताचे ते होते. उगीच कसा तरी वृक्ष तर वाढू द्या, मग त्याचे कांहींही होवो असें म्हणणारांपैकीं ते नव्हते.

साधारणपणें अशा प्रकारचा आमच्या परलोकवासी मित्रांचा जीवनक्रम असे. त्यांच्या मृत्यूमुळें झालेली हानि अंशतःही भरून येण्यासारखी नाहीं. त्यांची प्रिय पत्नी, जी सतत त्यांच्याबरोबर फिरत असे, तिच्या मधुर स्वभावाच्या योगानें त्यांना आपल्या आयुष्यांत आलेल्या अनेक अडचणी सोसून घेण्यास बरेंच साह्य मिळालें. आपल्या लोकांच्या घरांत प्रेमभाव आणि पतिनिष्ठा नाहीं असें म्हणणारे जे कोणी परकीय लोक असतील, त्यांनीं या मोडकबाईंनी सतत चार वर्षें चालू असणाऱ्या दुखण्यांत कशी एकनिष्ठेनें पतिसेवा केली इकडे जरा लक्ष दिलें म्हणजे पुरे आहे. अशा बाईविषयीं आपल्या स्त्रियांस अभिमान वाटणें स्वाभाविकच आहे. आपल्यावर दुःखाचा डोंगर कोसळणार हें या बाईंस समजून चुकलें होतें. परंतु आपलें दुःख बाहेर उमगूं न देतां दुखणाइताची सर्व प्रकारें बरदास्त राखण्यांत व त्यांस आनंदित ठेवण्यास त्या झटत असत. त्यांच्या मुलांचीही वृत्ति त्याचप्रमाणें असे. अशा स्थितींत कुटुंबांतील सर्व माणसें जवळ असतांना त्यांचें प्राणोत्क्रमण या शहरांत त्यांच्या सर्वांत जुन्या मित्राच्या घरीं झालें. त्यांच्या आत्म्यास शांति अथवा धन्याची सेवा करण्यास त्यांस अधिक अवकाश मिळेल असें स्थळ त्यांस प्राप्त होवो, अशी परमेश्वरापाशीं आपली प्रार्थना असावी.

* *



अनुक्रमणिका

# भागवतधर्ममीमांसा[१]

## सत्, चित् आणि आनंद

सुमारें तीन हजार वर्षांपूर्वी, एके दिवशीं उत्तर हिंदुस्थानांतील एका पुरातन अरण्यांत वरुणाचा मुलगा भृगु आपल्या बापाजवळ गेला आणि म्हणाला कीं, " बाबा, ब्रह्म म्हणजे काय तें मला शिकवा– ज्यापासून सर्व जीवांची उत्पत्ति होते, ज्याच्या योगानें त्यांना स्थिति असते, ज्याकडे त्यांची गति असते व शेवटीं ज्यामध्यें त्याचा लय होतो असें जें ब्रह्म तें काय तें मला सांगा." प्रथम वरुणानें त्याला सांगितलें कीं, ब्रह्म म्हणजे अन्न. कारण, अन्नामुळें जीवाची उत्पत्ति होते, अन्नामुळेंच जीव जगतो आणि मृत्यूनंतर पुढच्या पिढींचें अन्न उत्पन्न करण्याकडे देहाचा विलय होतो. भृगूनें या गोष्टीचें चांगलें मनन केलें. परंतु ही व्याख्या व्यापक आणि पूर्ण झाली, अशी त्याची खात्री होईना. बापाकडे पुनःपुन्हा जाऊन त्यानें तोच तोच प्रश्न विचारला आणि वरुणानें त्यास, ब्रह्म म्हणजे प्राण; ब्रह्म म्हणजे मन; ब्रह्म म्हणजे विज्ञान, अशीं क्रमानें उत्तरें दिलीं. भृगूनें पुनः विचार करावा आणि कोणचेंच उत्तर त्यास पटूं नये. परंतु शेवटीं सर्व विश्व व्यापून जो आनंद व जें कल्याण राहिलें आहें तेंच ब्रह्म असें जेव्हां वरुणानें त्यास सांगितलें, तेव्हां मात्र त्या तरुण विद्यार्थ्याच्या सर्व शंकांचें समाधान झालें.

ह्या गोष्टींत विचाराच्या तीन अवस्थांचा, किंवा प्रकारांचा निर्देश होत आहे. सदासर्वकाळ ह्या तीनही प्रकारांचें मनुष्यांच्या मनावर प्राबल्य चालत आलें आहे. सर्व सजीव व निर्जीव सृष्टीचें कारण **सत्**, म्हणजे जड द्रव्य आहे असें मानणें, हा पहिला प्रकार. **चित्** म्हणजे आपलें मन आणि विज्ञान हेंच सृष्टीचें कारण आहे असें मानणें, हा दुसरा प्रकार. विश्वांत **आनंद** भरला आहे, विश्वाची रचना कल्याणकारक आहे, म्हणून विश्वाचें कारण आनंदरूप ब्रह्मच आहे असें मानणें, हा तिसरा प्रकार. आनंद व कल्याणरूप असें म्हणून वरुणानें ज्या ब्रह्माचें वर्णन केलें तें ब्रह्म सर्व विश्व व्यापून राहिलें आहे असेंही त्यानें आणखी सांगितलेंच आहे. दुसऱ्या एका उपनिषदांत म्हटलें आहे कीं, जर विश्वांत आनंदतत्त्व नसतें, तर या जगांत कोण जन्मता किंवा जगता? आणि तें खरें आहे. आपलें मन पापरहित आणि निर्भय व्हावें मात्र, कीं देव आनंदाचें आणि शांतीचें भातुकें देण्याला तयार असतो. मी आपल्यापुढें आज जो विषय मांडणार आहें त्यांतलें प्रमेय हेंच आहे.

कित्येकांना असें वाटत असतें कीं, जन्म आणि मृत्यू, आत्मा आणि अमरत्व, पाप आणि शासन हे जुन्या अज्ञान काळचे विषय आतां पुरे झाले; ह्यांत जेवढें कांहीं कळण्यासारखें होतें तेवढें आधींच कळून चुकलेलें आहे व त्यांत पहिले थोडे सिद्धान्त सोडून बाकी सारीं अंध अनुमानें आहेत. ह्या मृगजळाच्या पाठलागापासून लोक परावृत्त होतील तर बरें, अशी त्यांची इच्छा असते. व ह्या औदासीन्यजनक शास्त्राचें परिशीलन करणारे म्हणजे अकालीं वार्धक्य पावलेले लोक अशीं ते नांवें ठेवीत असतात. आणि त्यांचें म्हणणें काय असतें; तर सामान्य जन ज्यांना सुखें असें समजतात, तीं आधिभौतिक सुखें ज्याच्या योगानें प्राप्त होतील असल्या कांहीं फलप्रद उद्योगाला आम्हीं लागावें. परंतु आपल्या राष्ट्राचें वळण जर पाहिलें, तर तें अगदीं निराळें असल्याचें दिसून येईल. मनुष्याजवळ जो कांहीं अर्थसंचय असेल ती त्याची खरी संपत्ति नव्हे, त्याच्या आत्म्याची उन्नति, किंवा उन्नतीची शक्यता, हीच त्याची खरी संपत्ति, हा दृढ विश्वास आपल्या राष्ट्राच्या इतिहासाचें विशेष लक्षण आहे; ही दृढ श्रद्धाच आपलें भूषण आहे व सोसलेल्या दुःखांचें आपणांस मिळालेलें फल आहे. आजपर्यंत भरतखंडानें हेंच तत्त्व शिकविलें व कालाच्या अखेरपर्यंत हेंच तत्त्व प्रतिपादित राहील. ख्रिस्ती लोकांच्या किंवा युरोपियनांच्या हृदयांत पुरुषार्थाविषयीं ज्या कांहीं उदात्त कल्पना आहेत त्यांतही याहून विरुद्ध मताला मुळींच आधार मिळत नाहीं. आधिभौतिक सुख व तें मिळविण्याचीं

१. Philosophy of Indian Theism ह्या व्याख्यानाचें हें रूपांतर आहे. **सं०**

अनुक्रमणिका

साधनें ह्यांची वृद्धि व्हावी हा एवढाच ख्रिस्ती धर्माचा व सुधारणेचा किंवा नागरिक वृत्तीचा हेतु आहे असें जे समजत असतील, त्यांना ह्या दोहींचें मर्म किंवा रहस्य बिलकूल कळलें नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे. दुसऱ्या तत्त्वाविषयीं दोन्ही धर्मांचें जसें श्रेष्ठ शिक्षण सर्वांशीं सारखें आहे, तशी ह्या मतासंबंधानेंही दोन्ही धर्मांची एकवाक्यताच आहे. धर्मोपदेशक सेंट पॉल जेव्हां अथेन्स येथें गेला तेव्हां अथीनियन लोकांनीं ज्याकरितां स्थंडिल स्थापिलें होतें, त्या अज्ञात देवाची करुणा भाकून पॉलनें त्यांना उपदेश केला. त्यांत त्यानें जें ब्रह्माचें वर्णन केलें आहे तें मीं जें उपनिषदांतील वचनाचें अवतरण घेतलें आहे त्याचाच केवळ अनुवाद आहे. तो म्हणाला, "त्याचेच ठायीं आपला प्रभव होतो, आपण राहतों व वागतों. त्याच्याबाहेर जीव नाहीं, गति नाहीं व प्रभवही नाहीं."

पौर्व व पाश्चिम विचारांचा एकमेकांवर परिणाम होऊन आर्यांच्या दोन्ही शाखांची श्रेष्ठ उन्नति होण्याचा किती संभव आहे हें ज्यांच्या ध्यानांत येत नाहीं, त्यांना जगांतील घडामोडींत ईश्वराची काय योजना असते ती कळलीच नाहीं असें म्हणावें लागतें. प्रभातकाळचा प्रकाश तर आपल्यावर आलाच आहे. व एकमेकांचें सामर्थ्य व श्रेष्ठता समजण्याची व त्यांचें अभिनंदन करण्याची जी आपल्यांत शक्ति आली आहे, तीवरून पुढें लौकरच होणाऱ्या उज्ज्वल प्रकाशाची साक्ष पटण्यासारखी आहे. थिआसॉफिकल पंथ व चळवळी ह्या तर आहेतच. विशेष सांगावयाचें म्हणजे, इतके दिवस केवळ दुसरे देश आपणांकडे कळवळ्यानें हजारो धर्मोपदेशक पाठवीत आले व त्यांच्या मतांप्रमाणें सत्यधर्माचा प्रसार करण्याकरितां ते झटत आहेत. परंतु आतां त्यांच्या ऋणाचे उतराई होण्याकरितां व आपली सहानुभूति प्रगट करण्याकरितां पुष्कळ शतकांच्या निद्रावस्थेनंतर आपलेही धर्मोपदेशक इतर देशांत जाऊं लागले आहेत व ही गोष्ट आपल्या डोळ्यांदेखत घडत आहे. इंग्लिश व जर्मन पंडितांच्या परिश्रमाला नवी दिशा मिळत आहे; गिफर्ड व हिबर्ट ह्या नांवांखालीं व्याख्यानमालांचे उपक्रम सुरू झाले आहेत. अमेरिकेंत सर्व धर्मांची परिषद नुकतीच भरली होती. ह्या साऱ्या गोष्टी प्रगतीचा ओघ कसा आहे हें दर्शवितात. त्याकडे डोळेझांक करून आपलें चालावयाचें नाहीं, किंवा दुर्लक्ष करण्यांत आपला कोणता फायदाही नाहीं. धर्ममीमांसेवर डॉ. फ्रेजर यांनीं जीं व्याख्यानें दिलीं आहेत, त्यांमुळें ह्या दिशेनें होणाऱ्या प्रयत्नांत बरीच भर पडली आहे. हिंदुतत्त्वशोधकाच्या दृष्टीनें मीं आज त्याच व्याख्यानांचा थोडक्यांत सारांश देण्याचें योजिलें आहे. हें विद्यापीठ म्हणजे पाश्चिमात्यांच्या थोर औदार्याचें आपल्या देशांत दिसणारें मूर्तिमंत स्वरूप आहे. मीं जो आज विषय घेतला आहे, त्याच्या विवेचनाला ह्या विद्यालयाच्या मंदिरापेक्षां (विलसन कॉलेज) अधिक योग्य स्थल मिळेल असें मला वाटत नाहीं.

तर मग धर्ममीमांसेनें सोडविण्यास घेतलेला जो प्रश्न तो कोणता आहे हें आपण आतां पाहूं. डॉ० फ्रेजर यांनीं तो प्रश्न ह्या रीतीनें मांडला आहे :– विषयग्राहकता व विज्ञानबुद्धि जागृत झाल्यापासून आपला ज्या अनंत विश्वाशीं निरंतर संबंध येतो व संघटन प्राप्त होतें त्या विश्वाविषयीं अत्यंत व्यापक व यथार्थ अशी कोणती भावना करून घेणें शक्य आहे ? कोणत्या प्रकारच्या परिस्थितींत व कोणत्या प्रयोजनासाठीं माझें जीवित आहे ? क्षणोक्षणीं स्वरूप बदलून दाखविणारें हें विश्व आहे तरी काय ? ह्या रूपांतराच्या अक्षय प्रवाहाचा उगम आणि पर्यवसान कशांत आहे ? ह्या सर्व व्यापारांचें अखेर नियमन करणारें तत्त्व न्यायी व विश्वसनीय आहे, किंवा अनवस्थित आणि भ्रामक आहे ? मनुष्याला त्या तत्त्वाचें ज्ञानच कधीं व्हावयाचें नाहीं आणि त्याच्याशीं आपला मेळ घालतां यावयाचा नाहीं, असें आहे कीं काय ? गूढ ब्रह्मांडाचा अंश जो मी त्या माझें प्रस्तुत कर्तव्य व माझी भवितव्यता ह्यांविषयींचा मला बोध कसा व्हावयाचा ?

ज्यांना ह्या प्रश्नांचें महत्त्व कळत नाहीं त्यांची गोष्ट निराळी. बाकी सर्वांच्या ध्यानांत लागलेंच येईल कीं, हे सारे प्रश्न मनुष्यस्वभावास अनुरूपच आहेत. हे जर जिव्हाळ्याचे प्रश्न नसते, किंवा ह्यांत जर "रस" किंवा ज्ञानमय आनंद नसता, तर सर्व काळांत व सर्व देशांत श्रेष्ठ लोकांचीं मनें हें गूढ उकलण्याचे नादास काय म्हणून लागलीं असतीं ? ह्या गूढाचें गूढत्व आम्हांस पूर्णपणें भासतें आणि त्याकडे आमचें मन वेधलें जातें, हाच तर आमचा मोठा अधिकार, मोठें भाग्य आहे. नरजन्माचें ह्यांतच साफल्य आहे आणि हाच परमार्थ आहे. ह्या गूढानें उत्पन्न होणाऱ्या विस्मययुक्त पूज्य बुद्धींत सर्व धर्मांचें बीज आहे. अनंताचें ज्ञान संपादन करावें, हा जो

मनाचा हव्यास त्यानेंच तत्त्वज्ञानास प्रेरणा मिळते. ह्या ज्ञानाच्या प्रगतीच्या ज्या चढत्या पायऱ्या त्यांनीं शास्त्र-परंपरा सिद्ध होते. इहलोकीं जें अनिष्ठ व पाप आहे त्यामुळें व मृत्यूनंतर आपली स्थिति काय होत असावी हे विचार जागृत झाल्यानें ह्या वरच्या प्रश्नांचें मानवी हितसंबंधाचें स्वरूप विशेष स्पष्टत्वानें प्रत्ययास येतें. व शेक्सपिअरप्रमाणेंच स्तिमित होऊन आपणांस विचार करावा लागतो, कीं मृत्यू म्हणजे झोंप असेल का स्वप्न असेल, किंवा मृत्यू म्हणजे नश्वर देह टाकून देणें इतकेंच ? सर्व प्रश्नांतला जो हा मुख्य प्रश्न त्याला जें आपण उत्तर देऊं त्यावर व्यक्तीची व तशीच समाजाची सुस्थिति आणि कल्याण अवलंबून आहे. नीतीच्या नियमांचें स्वरूप ह्या उत्तराप्रमाणें बदलतें. ह्या उत्तरानेंच अनुशासन व राज्यव्यवस्था ह्यांना वळण मिळतें. याज्ञ-वल्क्योपनिषदांत म्हटल्याप्रमाणें "विश्वावर जर आनंद-तत्त्वाची सत्ता नसती, तर ह्या जीवकोटींत कोण जन्मला असता, किंवा जगला असता ?"

ज्या प्रश्नाला उत्तर देण्याचें धर्ममीमांसेनें अंगी-कारलें आहे तो प्रश्न आपल्यापुढें मांडला व त्याचा मनुष्याच्या हिताहिताशीं किती निकट संबंध आहे हें दर्शविलें. आतां, विश्वाचें स्वरूप निश्चित करावें, ह्या हेतूनें काय प्रयत्न झाले आहेत, हें आपणांस पाहावयाचें आहे. विचारमात्राच्या मुळाशीं, 'मी' आणि माझ्याहून पर किंवा विचारकर्ता आणि विचारविषय हीं दोन तत्त्वें सिद्ध असतात. सापेक्ष किंवा सान्त अस्तित्वाचा हा धर्म आहे. ह्या दोन्हीं तत्त्वांचें यथार्थ व पूर्ण ज्ञान आपणांस आहे असें नाहीं. तीं गूढच आहेत. शिवाय विषय आणि विषयी एवढाच भेद करून चालत नाहीं. कारण, जेव्हां अनंत व शाश्वत तत्त्वाचें हृदयांत उद्‌बोधन होऊं लागतें तेव्हां विषय आणि विषयी ह्या दोन्हीं तत्त्वांच्या आंत व बाहेर असून, दोहोंचा समन्वय किंवा संकलन करणारें, अथवा ज्याचे ठायीं व ज्याच्याच प्रभावानें आपण जन्मतों, क्रिया करितों व जगतों असें तिसरेंही परम थोर तत्त्व असावें, असें मनांत वाटूं लागतें. रामानुजपंथाच्या वेदान्तमीमांसेंत चित् किंवा जीवात्मा, अचित् किंवा जड परमाणु व ब्रह्म किंवा परमात्मा ह्या तिन्हीं तत्त्वांचा संग्रह आहे; व अव्यक्तावस्थेंत चित् आणि अचित् ह्यांना ब्रह्मापासून वेगळें अस्तित्व नाहीं; व्यक्तावस्थेंत तीं भिन्नत्वानें प्रकट होतात असें प्रति-पादन आहे. हिंदुस्थानांतील इतर दर्शनांत ह्याच मतावर निरनिराळ्या तऱ्हेनें जोर दिला आहे. कांहींत तीन स्वतंत्र तत्त्वांचें अस्तित्व मानलेलें आहे; कांहींत दोहोंचें व कांहींत वास्तविक सत्यत्व एकाच तत्त्वाला आहे असेंही प्रतिपादन आहे. युरोपांतही तत्त्ववादाच्या निरनिराळ्या पंथांचे भेद ह्या तिहींपैकीं एका तत्त्वाला प्राधान्य देऊन दुसऱ्या दोन्ही तत्त्वांना वास्तविक सत्यत्व नाहीं, असें मानण्यामुळें झालेले आहेत. तरी साऱ्या पंथांत एक सर्वसाधारण गोष्ट दिसून येते. इंद्रियांच्याद्वारें सान्त किंवा मर्यादित सृष्टीचें जें ज्ञान आपणांस होतें, तें ज्ञान विषय आणि विषयी ह्या स्वरूपानें होतें; तेवढ्यानें मनुष्याच्या मनाचें समाधान होत नाहीं. सान्ताचा **अनंता**शीं कोणत्या तरी प्रकारचा संबंध आहे, असा प्रत्यय यावा ही उत्कंठा मनाला असते. हा प्रत्यय श्रद्धेनें प्राप्त होणारा असो किंवा बुद्धीनें मिळणारा असो, भक्तीनें साध्य असो किंवा योगबलानें असो, मागला कांहीं आश्रय किंवा आधार आहे असें मानल्याशिवाय आपल्या स्वतःच्या अस्तित्वाचा मनुष्यास यथार्थ बोध नाहीं. तसेंच ह्या क्षणोक्षणीं बदलणाऱ्या सृष्टीला ज्याच्यांत कांहीं बदल नाहीं, स्थैर्य आहे, अशाचा आधार आहे असें मानिल्या-शिवाय तिचेंही स्वरूप कळत नाहीं. हें आधारभूत अनंत व अचल तत्त्व जड आहे कीं शक्तिरूप आहे, चैतन्य आहे किंवा आनंदरूप ब्रह्म आहे, ह्या मुद्द्यांवर मीमांसेनें निरनिराळ्या उपपत्ति व सिद्धान्त काढले आहेत. आत्मा व जडसृष्टि ह्यांच्या यथार्थ भावनेंत जो संशयाचा भाग आहे त्याहून ह्या तिसऱ्या तत्त्वाचें यथार्थ ज्ञान विशेष संशयात्मक आहे असें नाहीं. एकाच्या स्वरूपाचा बोध आपल्याला दुसऱ्यापेक्षां अधिक स्पष्ट होतो असें नाहीं. आपण आहोंत व आपल्या-बाहेर कांहीं आहे ही जाणीव आपणांस असते. **अनंताचा** प्रत्यय दृढ झाला म्हणजे आपलें अस्तित्व व आत्मभिन्न वस्तूंचें अस्तित्व विशेष सुबोध होतें.

ज्यांचें ज्ञान स्वतःसिद्ध आहे अशीं जीं हीं तीन पृथक् तत्त्वें त्यांचें एकसमयावच्छेदेंकरून ग्रहण करतां न आल्यामुळे मूढ श्रद्धेचे व जडवादाचे आणि चिद्वादाचे सारे भ्रम उत्पन्न होतात. एका तत्त्वाला प्राधान्य देणें व दुसऱ्याचें निराकरण करणें, हें यथार्थ नाहीं. एकाच स्थळांत किंवा काळांत ईश्वराचें अध्यारोपण करणें आणि असाधारण गोष्टींशी किंवा स्थळाशीं ईश्वराचा संबंध जोडणें हें मूढ श्रद्धेच्या प्राबल्याचें निदर्शक आहे.

त्यानें आपल्या मनाची समता ढळते. चैतन्यशक्तीचें महत्त्व जास्ती लेखण्याचें पर्यवसान चिद्वादांत किंवा बाह्यशून्यवादांत होतें. जेव्हां सृष्टि व तिचीं भिन्न स्वरूपें ह्यांच्या योगानें आपण वाजवीपेक्षां जास्ती चकित होतों, व चैतन्यशक्तीस क्षुद्र मानतों तेव्हां आपण जडवादी बनतों. या तीन तत्त्वांपैकीं एकास प्राधान्य देणाऱ्या व त्यामानानें त्याच्याशीं नित्य संलग्न असणाऱ्या अशा दुसऱ्या तत्त्वांस डोळ्यांआड करणाऱ्या तत्त्ववादांच्या पंथांत एकदेशीय सत्याचा किती भाग आहे, हें पाहणें हितप्रद आहे. परमाणूंच्या शक्तीच्या चरणीं लीन होणारा व सृष्टि आणि तिचें सामर्थ्य ह्यांचें स्तोम माजविणारा **भौतिकशास्त्रवाद** किंवा **जडवाद** आपण प्रथम विचारांत घेऊं. आपल्या देशांत कधीं मिळालें नाहीं असें अग्रस्थान ह्या मताला गेल्या कांहीं शतकांपासून युरोपांत मिळालें आहे. आपल्या देशांतही कपिलाचें सांख्यमत व कणादाचा परमाणुवाद हीं सहांपैकीं दोन दर्शनें अंशतः किंवा पूर्णपणें जडवादीच आहेत. अतिदिशेस गेलेल्या चिद्वादास योग्य मार्गावर आणिलें ही ह्या जडवादाची विशेष कामगिरी होय. मनुष्यजातीवर ह्याचा दुसरा उपकार म्हटला म्हणजे पृथ्वी विश्वाच्या मध्यस्थानीं आहे व मानवी प्राण्याकरितांच हें जग आहे ह्या कल्पनेचें निवारण ह्या वादानें केलें. चंद्र, सूर्य आपल्याला तेज देण्याकरितां प्रकाशतात, ग्रह फिरतात व तारे चमकतात तेही मनुष्याकरितांच हा श्रम घालविला. जुन्या काळच्या एका महाकुलपतिप्रमाणें नररूपधारी ईश्वर मनुष्यांवर व वस्तूंवर सत्ता चालवितो, मनुष्यांचे विकार व बल ह्यांहून त्याचें सामर्थ्य थोर व विकार जास्ती प्रबल, परंतु त्याच प्रकारचे; कधीं कधीं ईश्वरांत मानवी दोषही दिसून येतात; असली ईश्वराविषयीं कल्पना हल्लींच्या शास्त्रांच्या शोधांनीं नाहींशी झाली आहे. ज्योतिष व भगर्भशास्त्रांच्या उत्कर्षानें पृथ्वीचें क्षुद्रत्व व प्राण्यांपैकीं एक प्राणी ह्या दृष्टीनें मनुष्याची वास्तविक योग्यता सिद्ध झाली आहे. कालाच्या व आकाशाच्या अनंतत्वाचें ग्रहण मनुष्यास होण्यासारखें नाहीं हें समजून आलें आहे. उत्क्रांतिशास्त्राच्या उत्कर्षामुळें सचेतन व अचेतन सृष्टीच्या उत्पत्तिव्यापाराच्या क्रमाच्या कल्पना खोल व विस्तृत झाल्या आहेत. एका शक्तीचें रूपांतर दुसऱ्या शक्तींत होऊं शकतें, व शक्तींचीं भिन्न स्वरूपें तत्त्वतः एकच आहेत, ह्या शोधांमुळें शास्त्रीय सिद्धान्तांना विशद स्वरूप येण्याचा मार्ग बराच सुलभ झाला आहे. ह्या परिणामांच्या तेजानें दिपून गेलेलें मन मूढ श्रद्धेपासून परावृत्त झालें हें खरें. परंतु विश्वामध्यें चैतन्य व मन कांहींच नाहीं, असें सिद्ध करण्याची हांव तें धरूं लागलें. पदार्थविज्ञान आणि रसायनशास्त्रांनीं सृष्टीच्या स्वरूपाचें उपपादन होतें असें समजणें, हा केवळ भ्रम आहे. त्यामुळें एक-दोन पावलें पाठीमागें जाऊन सृष्टीचें थोडेंसें पूर्ववृत्त पाहतां येतें हें खरें, परंतु तेथील अंधकारांत आपण जास्तीच भांवावतों. कार्यकारणरूप सिद्धान्तांनीं सृष्टिव्यापाराचें थोडेंसें ज्ञान होत; परंतु आदिकर्ता आणि आदिकारण हीं अज्ञात राहतात तीं राहतातच. पर्वताच्या शिखरावर ज्यानें तेज पाहिलं व ईश्वरी आदेश मिळविला त्या मोझेसाला आदिकारण जितकें अगम्य वाटलें तितकेंच भौतिक शास्त्रांनाही तें अगम्यच आहे. जडवादानें पूर्वापरसंबंध स्पष्ट होतो, पण कार्यकारणभाव स्पष्ट होत नाहीं. परमाणु यदृच्छेनें एकत्र झाले व अस्ताव्यस्ततेमधून व्यवस्था आपोआप होत गेली, ह्या पूर्वापरसंबंधाच्या स्पष्टीकरणानें, शोधकाचें समाधान बिलकूल होत नाहीं. शंकराचार्यांनीं आपल्या भाष्यांत परमाणुवाद्यांच्या कोटद्या त्यांच्या गळ्यांत फार चातुर्यानें घातल्या आहेत.

द्रव्याचा मुख्य गुण म्हणजे जडता असें तर आपलीं इंद्रियेंच आपणांस सांगतात. बाहेरून कोणत्या तरी शक्तीचा परिणाम घडून या जडतेचा नाश होतो. ही शक्ति म्हणजे काय आहे, हें, चैतन्याइतकेंच किंवा मनाइतकेंच अजून गूढ आहे. सदासर्वकाल आकाशाच्या कोणत्याही भागांत हे परमाणू एकाच रीतीनें एकमेकांकडे आकर्षिले जावे, किंवा त्यांनीं एकाच नियमानें एकमेकांपासून परावृत्त व्हावें हें कशामुळें घडत असावें ? शिवाय सृष्टींत मन व चैतन्य यांचा वास नसेल, तर यदृच्छेनें घडलेल्या परमाणुसंहति पाहून प्रथम जीव, नंतर चैतन्य, तदनंतर विचार आणि विज्ञान आणि अनुबंधमूलक– म्हणजे पाप-पुण्य हें जिचें फल आहे अशी– स्वतंत्र इच्छा अशा उत्तरोत्तर श्रेष्ठ होणाऱ्या परिणामांच्या क्रमानें परिमाणुसमुदायाचें पर्यवसान कां होत असावें ? ह्या क्रमाला तरी निदान यादृच्छिक असें म्हणतां येत नाहीं. क्रम म्हणजे हेतुमूलकच असला पाहिजे. जेथें वास्तविक सयुक्तिक उपपादनाची आवश्यकता तेथें तर ह्या मीमांसेला मौन धरावें लागतें. योजिलेले हेतू सिद्धीस नेण्याकरितां सृष्टींत

नियामक तत्त्व नाहीं, ही कल्पना बुद्धिग्राह्य होत नाहीं. यापेक्षां नररूपधारी अत्यंत श्रेष्ठ राजा, अशी ईश्वराविषयीं जुनी कल्पना विचाराशीं जास्ती जुळते. मनुष्य व सृष्टि म्हणजे काय, तर कोणाच्याही संकल्पाशिवाय सहज एकत्र आलेले व फिरून केव्हांही विस्कळित होतील अशा परमाणूंचा यादृच्छिक संघ, एवढेंच जर आपण समजूं लागलों, तर समाजसंस्था, कायदेकानू, आचारविचार, कवित्व, कला व अध्यात्मविद्या हीं सारीं निष्फळ व विसंगत होतात. विश्वामध्यें जो कांहीं नियम व व्यवस्था आपण पाहतों तिचें हें कांहीं यथार्थ स्वरूपबोधन नाहीं, असें आपणांस सहजगत्या वाटतें.

जडवाद्यांच्या उपपत्तीनें समाधान न पावून मनुष्य आपल्याच अंतर्यामाकडे दृष्टीचा ओघ वळवितो, व कल्पना करूं लागतो, कीं सार्वत्रिक वस्तुप्रवाहांत कांहीं सत्य नाहीं. सत्यवस्तु तेवढी आपलें मन व आत्मा, हीं होत. वस्तूंचें ज्ञान मला होतें व तेवढ्याचपुरतें वस्तूंना अस्तित्व आहे. रंग-रूप, प्रधान किंवा अप्रधान गुण ह्यांची माझ्या ठायीं जी संवेदना, तिच्याबाहेर वस्तूंना वास्तविक अस्तित्व नाहीं. व ह्या सिद्धान्तापासून असेंही पुढें अनुमान काढलें जातें कीं, पारमार्थिक सत्यत्व केवळ जीवात्म्यालाच आहे. म्हणजे एकंदर आत्मप्रत्यय हेंच सान्या विचाराचें नियामक तत्त्व होऊन बसतें. कांहीं विवक्षित प्रांतांत त्यानें आपणांस मार्ग दिसतो हें खरें; परंतु मर्यादेबाहेर तें गेलें तर आत्मघातक होतें. स्वतःच्या अस्तित्वाची खात्री बाळगण्यास विज्ञान हें चांगलें प्रमाण आहे, परंतु जडसृष्टि कांहीं नियम पाळते किंवा आपल्या भावनेबाहेर तिला कांहीं स्थिति आहे, अशी खात्री पटविण्यास विज्ञान असमर्थ आहे. शास्त्रसिद्धान्तांना मनानें उत्पन्न केलेल्या सृष्टीबाहेर स्थान नाहीं, मला जें वाटतें त्याच्याबाहेर सचेतन भूतांनासुद्धां अस्तित्व नाहीं, अशी विचारानें दिशा घेतली, म्हणजे शास्त्राच्या इमारतीला पाया राहात नाहीं. जीवात्मा हेंच तेवढें एक व अंतिम प्रमाण असें ज्या मीमांसेंत मानलें जातें त्या मीमांसेचा वर निर्दिष्ट केलेला फलितार्थ अनिवार्यपणें निघतो. शिवाय एका आत्म्याचा दुसऱ्या आत्म्याशीं संबंधच राहिला नाहीं, तर आपली सदाचार वृत्ति लोपून जाते. मनुष्याच्या अंतःकरणाची साक्ष ह्या चिद्वादाच्या विरुद्ध आहे. जडसृष्टीचें अस्तित्व जरी सिद्ध करून दाखवितां आलें नाहीं, तरी माझा जन्म होण्यापूर्वी ती होती व मी आणि मनुष्यजाति जरी नाहींशीं झालीं, तरी जडसृष्टी राहिलंच, असा त्यास सहजगत्या भरवंसा वाटत असतो. आपल्या मनाच्याच योगानें विश्वाला अस्तित्व आहे; पण, वास्तविक पाहतां त्याला अस्तित्व नाहीं, ह्या मतानें, ज्याचें डोकें फिरलें आहे त्याचेंच मात्र, समाधान होईल. आपल्या देशांत किंवा युरोपांत ह्या मताचें प्रतिपादन करणारें दर्शन किंवा पंथ निघाला नाहीं, हें मनुष्यजातीस भूषण आहे. विरुद्ध मताचें खंडण करण्याचे कामीं एक प्रबळ शस्त्र म्हणून ह्या मताचा कांहीं तात्त्विकांनीं उपयोग करून घेतला आहे, इतकेंच.

सृष्टीच्या चरणीं लीन होऊन, किंवा मनुष्याच्या मनाला देव कल्पून ( जडवादानें किंवा चिद्वादानें ) विश्व काय आहे ह्या प्रश्नाचा पूर्ण खुलासा होत नाहीं; अशी खात्री झाली, म्हणजे राहिलेलें जें तिसरें तत्त्व त्याला प्राधान्य देण्याच्या भरीस मनुष्य पडतो. आणि कल्पना करूं लागतो कीं, परमात्म्यालाच तेवढें अस्तित्व आहे, सृष्टि आणि मनुष्य हीं त्याच्या व्यक्त रूपाचीं बिंबें असून तत्त्वत: त्याच्यापासून वेगळीं नाहींत, व अज्ञानामुळें किंवा मायेमुळें तीं भिन्नत्वानें भासतात, अशी तो समजूत करून घेऊं लागतो. पुढें पुढें जे ग्रीक व स्टोइक पंथ निघाले त्यांत व अर्वाचीन काळीं युरोपांत, व विशेषत: जर्मनींत, वर सांगितलेल्या मतांचे अभिमानी दृष्टीस पडतात. परंतु भरतखंडच ह्या मताचें मुख्य स्थान आहे. बाकी आपल्याकडील विश्वदेववादाचें स्वरूप, इतर देशांतील मतांहून जरासें भिन्न आहे.

अन्य मतांपेक्षां ह्या मतांत कांहीं विशेष गुण आहेत. आपल्याभोंवतीं अनंत द्रव्यें व शक्ति आपण पाहतों, त्यांच्या अनंतत्वाचें समर्पक स्पष्टीकरण ह्या मतानें होतें; आणखी, वस्तूंचा उद्भव कोठून आहे, सृष्टि कोणीं केली, किंवा तिची उत्क्रान्ति कशी झाली, ह्या प्रश्नांच्या विवेचनाची आवश्यकता राहात नाहीं. ह्या मतांत कांहीं सत्याचा अंश आहे; व तो हा कीं, ईश्वराचा सर्व सजीव व निर्जीव भूतांचे ठायीं वास आहे. ईश्वराविषयीं ही कल्पना बरीच श्रेष्ठ व यथार्थ आहे. दुसऱ्या अनेक धर्मपंथांत ईश्वराविषयीं जी कल्पना व्यक्त होते ती इतकी श्रेष्ठ व यथार्थ नाहीं. कारण, ईश्वर हा जीवांपैकींच एक जीव, फक्त त्याचें सामर्थ्य विशेष व ज्ञानही विशेष असें मानण्याकडे व ईश्वराला सृष्टि व मनुष्य यांहून पृथक् करण्याकडे

अनुक्रमणिका

इतर धर्मपंथांची प्रवृत्ति असते.

युरोपांत विश्वदेववादाचें प्रतिपादन करणारे तत्त्वज्ञ आहेत व आपल्याकडेही आहेत. परंतु त्या दोहोंत जो एक ठळक भेद आहे त्याचा विचार करण्यापूर्वी परकी लोकांची जी एक नेहमीं चुकी होत असते तिचा उल्लेख केला पाहिजे. वेदान्तसूत्रावरील भाष्यांत शंकराचार्यांनीं जें अद्वैत मताचें समर्थन केलें आहे, तेवढेंच हिंदुस्थानांतले विश्वदेववादाचें मुख्य प्रतिपादन असें समजण्याचा प्रघात आहे; परंतु खरें पाहतां आचार्यांच्या पूर्वी व नंतर रामानुजांनीं स्वीकारलेलें जें विशिष्टाद्वैत मत त्याचें हिंदुस्थानांतील तत्त्ववादांत विशेष प्राबल्य आहे. ह्या विशिष्टाद्वैत मतामुळेंच देशभर वैष्णवपंथ निघाले व त्यांचा उत्कर्षही झाला. वैष्णवपंथांनीं धर्माचें जेवढें श्रेष्ठ व खरें स्वरूप ओळखिलें, तेवढें चालू पंथांपैकीं दुसऱ्या कोणींही ओळखिलेलें नाहीं. असो. युरोपांत व इकडे विश्वदेववादाच्या स्वरूपांत भेद आहे म्हणून जें म्हटलें तो भेद हा आहे कीं, शंकराचार्यांच्या दर्शनांत, बाह्य सृष्टीला मुळींच अस्तित्व नाहीं, असें प्रतिपादिलेलें नाहीं. जीवात्मा आणि परमात्मा यांच्या अस्तित्वाविषयीं निश्चित ज्ञान आपणांस असतें. परंतु सृष्टीविषयीं अस्तित्ववाचक किंवा अभाववाचक कोणतेंच विधान खात्रीपूर्वक करितां येत नाहीं, असें त्यांचें म्हणणें आहे. शिवाय ब्रह्माला म्हणजे परमात्म्याला विश्वोत्पत्तीची कल्पना झाली कीं, त्याच विचारानें तो ईश्वर म्हणजे स्रष्टा होतो आणि नंतर जें कांहीं सर्व उत्पन्न झालें त्याला व्यावहारिक अस्तित्व प्राप्त होतें, असें शंकराचार्यांनीं प्रांजलपणानें कबूल केलें आहे, व म्हणून एकंदर व्यवहारासंबंधानें हें मत ईश्वरवादीच आहे. युरोपांतील तत्त्ववेत्त्यांनीं ह्या मताचा इतका अतिरेक केला आहे कीं, ईश्वराव्यतिरिक्त दुसऱ्या तत्त्वांना अस्तित्वच नाहीं असें म्हणण्यापर्यंत त्यांची मजल गेली आहे.

सर्व 'सान्त' किंवा मर्यादित वस्तूंच्या व मनुष्याच्या बदलणाऱ्या रूपांच्या मुळाशीं असणारें जें केवळ एक तत्त्व किंवा अर्थ तोच ईश्वर, असें पाश्चिमात्य विश्वदेववादी म्हणतात. परंतु सर्व अचेतन वस्तू व व्यक्तींचीं मनें ह्यांचें त्या तत्त्वाशीं तादात्म्य असून दोहोंची व्याप्ति किंवा विस्तार एकच आहे, अथवा वस्तू व मनें ह्यांविषयीं जें जें विधान करतां येईल तें तें विधान त्या तत्त्वासंबंधानेंही करितां येतें, असें समजण्यांत त्यांची एक चुकी होते. व यामुळें तें केवल तत्त्व अनंत आणि सान्त, पदार्थ आणि क्रियारूप, अविकारी व भिन्न रूपें घेऊन परिच्छिन्न झालेलें आहे अशी अनवस्था प्राप्त होते. आपल्या थोर आचार्यांनीं विश्वदेववादाचें जे पंथ स्थापिले आहेत त्यांत हे दोष टाळले आहेत. जर विशिष्ट वस्तु आणि पुरुष ह्यांचा लोप केला, म्हणजे तीं नाहींत असें मानलें, व भिन्न स्वरूपांचें ज्ञान होणें हा निवळ आपल्या कल्पनेचा भ्रम आहे असें समजलें, तर त्याचा परिणाम असा होतो कीं, आत्यंतिक सत्त्वाचीं दोनच स्वरूपे राहतात. तीं दोन स्वरूपे सत्ता व ज्ञान हीं होत व त्यांचा आपल्या मीमांसेंत सत् आणि चित् ह्या पदांनीं निर्देश केला आहे. आनंदमय जें तिसरें परमस्वरूप त्याला स्थानच राहात नाहीं. व त्याशिवाय ईश्वर म्हणजे रसविहीन पदार्थ एवढेंच शिल्लक राहतें. शिवाय ईश्वरानेंच उत्पन्न केलेले जीव हे जर त्याच्याच सत्त्वाचीं मायेमुळें भासणारीं रूपें आहेत असें मानलें तर जीवांचा ईश्वराशीं अध्यात्मिक संबंध राहात नाहीं. अशा रीतीनें विश्वदेववादाची जडवादाबरोबर किंवा चिद्वादाबरोबरच वाट लागते. कारण, त्यांतही असलेंच विश्वाच्या स्वरूपाचें निरूपण केलें असतें कीं, त्या उपपत्ती, आपली बुद्धि, विज्ञान म्हणजे सदसद्विवेक शक्ति आणि आत्मा ह्या सर्वांच्या अनुभवाशीं जुळत नाहींत. कारण, आपण एकमेकांपासून भिन्न आहोंत, आपण परतंत्र आहोंत व कांहीं अंशानें स्वतंत्रही आहोंत, हा अनुभव आपणांस असतो. चांगलें कोणतें व वाईट कोणतें हा विवेक आपणांस करितां येतो व स्वतः होऊन केलेल्या कृत्यांच्या पापपुण्याचे अधिकारी आपण आहोंत हेंही ज्ञान आपणांस असतें; परंतु कालानें, दिशेनें व कार्यकारणभावानें मर्यादित असणाऱ्या साऱ्या वस्तूंचा जर आपण अनंतांतच समावेश केला, अनंताहून त्या वस्तू निराळ्या नाहींत असें मानलें, तर परिणाम असा होतो कीं, ही वस्तु पूर्वींची व ती नंतरची, ही जवळची व ती दूरची, किंवा हें कार्य व तें कारण, असले संबंधच राहात नाहींत. गोष्ट घडली असें नाहीं, तर ती सदासर्वकाळ नियततत्वानें, किंवा अनिवार्यपणें आहेच. कांहीं नवीन झालें असें नाहीं व कशांत बदलही नाहीं; मनुष्यासंबंधानें किंवा वस्तुसंबंधानें, पूर्ण, अपूर्ण, बरें, वाईट वगैरे कांहींच म्हणतां येत नाहीं अशी स्थिति येते. दृश्य विश्व हा निवळ कल्पनेचा खेळ आहे, सत्य तेवढें ब्रह्म, असें मानल्यानें हे सारे परिणाम

होतात. सारांश, विश्वदेववादांत सृष्टि व मनुष्यें ह्यांचें ईश्वराशीं निर्विकल्प व निर्गुण ऐक्य आहे, असें सांगून विश्वाची जी उपपत्ति केली आहे, तिच्या योगानें आपल्या विज्ञानयुक्त आत्म्याचें निरंतर समाधान राहात नाहीं. व हें ऐक्याचें प्रतिपादन एक चमत्कारिक कल्पनेचा तरंग आहे, इतकेंच होऊन राहतें. त्या प्रतिपादनाचा मनुष्याच्या मनावर व वृत्तीवर कांहीं एक कायमचा संस्कार घडत नाहीं. कदाचित् कवित्वाच्या आनंदभरांत कोणाला हें ऐक्य प्रत्यक्ष होत असेल, तर न कळे. व ह्या आनंदसम्मोहांतच युरोपांतल्या व हिंदुस्थानांतल्या विश्वदेववादाचें पर्यवसान होत असतें.

ज्यांचें ज्ञान स्वतःसिद्ध आहे अशीं जीं, तीन पृथक् तत्त्वें त्यांचा कोणत्या तरी एका तत्त्वांत समावेश करून पाहण्याचे प्रयत्न निर्फल झालेले पाहून मनुष्याच्या मनानें हल्लींच्या काळीं निराशेनें संदेहांत किंवा अश्रद्धेंत ठाव घेतला आहे. ह्या संदेहाचें किंवा अश्रद्धेचें स्वरूप उग्र नाहीं. तें फार दीन आहे. धर्माचे जे मोठाले विषय आहेत त्यांच्यासंबंधानें निश्चयात्मक ज्ञान होणें शक्य नाहीं असें म्हणून स्वस्थ राहणारी ही अश्रद्धा आहे. अर्वाचीन काळीं पाश्चिमात्य विचारांना हें नवीन स्वरूप प्राप्त झालें आहे. व त्याला **अज्ञेयवाद** असें म्हणतात. ह्या वादाचा निष्कर्ष काय निघतो, तर आपण सान्या धर्मविषयक विचारांचा संपर्क टाळावा, आपल्या मनाचा संकोच आंतल्याआंत करावा, पक्षघात झाला असतां शरीराची जशी अवस्था होते तशी मनाची अवस्था करावी; हे असे सिद्धान्त मान्य करून मनुष्याच्या मनाला स्वस्थ राहतां येईल कीं काय, हें आतां पाहणें आहे. अज्ञेयवाद्यांच्या ग्रंथांचें परिशीलन करणाऱ्याला एक सर्वसाधारण लक्षण आढळून येतें तें हें कीं, ह्या लोकांना तर्कशास्त्राच्या नियमाप्रमाणें गोष्टी सिद्ध करून दाखविल्या पाहिजेत! आत्मप्रत्ययानें जें मनुष्यांस सत्य वाटतें, किंवा ज्याविषयीं प्रमाणांशिवाय मनाची खात्री आपणांस पुरीशी वाटते, तेवढ्यानें ह्यांची तृप्ति होत नसते. असेंही कदाचित् असण्याचा संभव आहे कीं, केवलाचें म्हणजे ईश्वराचें ज्ञान करून घेण्याचे मार्गांत कोणत्या तरी द्वारानें झालेला मनाचा दृढ विश्वास पुरेसा असूं शकेल व म्हणून तेवढेंच सत्य आपल्या मानसिक सामर्थ्यास साध्य होणारें असेल व तशी स्थिति असतांना ईश्वराचें अस्तित्व तर्कशास्त्रानेंच सप्रमाण सिद्ध करून दाखवा, असें म्हणणें वेडेपणाचें आहे. धर्मविषयासंबंधानें जर आपल्या मनाची खात्री होते, आपल्या चित्तांत दृढ विश्वास उत्पन्न होतो, तर जरी आपणांस आपल्या खऱ्या वाटणाऱ्या गोष्टी दुसऱ्यांना सप्रमाण सिद्ध करून दाखवितां आल्या नाहींत, तरीदेखील असा कांहीं ठाम निश्चयार्थ निघत नाहीं कीं, त्या गोष्टींसंबंधानें निश्चयात्मक ज्ञान होणेंच शक्य नाहीं. एखाद्या गोष्टीच्या खरेपणाबद्दल खात्री असणें आणि ती गोष्ट सिद्ध करून दाखवितां येणें, या दोन निराळ्या गोष्टी आहेत; त्या एकच आहेत असा समजुतीचा घोटाळा केल्यामुळें ईश्वराचा साक्षात्कार आपल्या हृदयास होणें दुर्घट झालें आहे. असो. तत्त्वज्ञान किंवा धर्म ह्या विषयांतच वर सांगितलेली मनाची असमर्थता अनुभवास येते व दुसऱ्या विषयांत येत नाहीं असें नाहीं. शास्त्रांतही असे पुष्कळ भाग आहेत कीं, जेथें सप्रमाण सिद्ध करून दाखविणें शक्य नसतें, म्हणून खालोखाल जें उत्तम साधन त्यावरच आपण निर्वाह करतों; ज्ञानाच्या ऐवजीं आपण श्रद्धेचा आश्रय घेतों, त्या श्रद्धेच्या धोरणानें चालतों व नुकसान सोसण्यास तयार असतों. आपल्या पृथ्वीनें किंवा सूर्यमालेनेंही सारें विश्व कांहीं संपत नाहीं व आपला काळही अनंत नाहीं. तरी, दिशांनीं व कालानें मर्यादित झालेल्या वस्तूंना अनंताचा आधार आहे, आश्रय आहे, असें जेव्हां आपल्या प्रत्ययास येतें तेव्हांच त्या वस्तूचें सम्यग्ज्ञान आपणांस होतें. कार्यकारणपरंपरेचें अवलोकन करूं लागलों, म्हणजे ज्याच्यामुळें ही सारी कार्यकारणरूप सांखळी जुळून राहिली आहे त्या आदिकारणाची स्फूर्ति हृदयांत अनिवार्यपणें होते. बाह्य सृष्टि सोडून आपण अंतःसृष्टीकडे वळलों, तर आपणांस असें आढळून येतें कीं, जेव्हां एखाद्या वस्तूचें ज्ञान आपणांस होतें, तेव्हां त्या ज्ञानाच्या मुळाशीं आपणांस क्षणभर झालेलें संवेदन किंवा इंद्रियप्रत्यक्ष आणि तत्क्षणींच उद्भवणारा विचार ह्यांशिवाय आणखी कांहीं असतें; वस्तूच्या विशिष्ट ज्ञानाचीं मुळें विस्तृत आहेत. ज्ञान हें इंद्रियप्रत्यक्ष आणि विचार ह्यांचा परिणाम आहे; तरी ज्ञानशक्तीचे जे स्थायी परिणाम स्मरणशक्तीनें संकलित केलेले असतात, व ज्यांचें संकलित रूप आपण 'हा मी आहें' ह्या प्रत्ययानें ओळखितों, तो अहंभाव व आपले पूर्वींचे अनुभव हे विशिष्ट ज्ञानाचे ठायीं कारणरूपानें असतात. आणखी पुढें, दुसऱ्याच्या ज्ञानाशीं आपल्या ज्ञानाची सांगड घालून,

अनुक्रमणिका

आपण सार्वत्रिक मानवी ज्ञानाच्या पायावर आपल्या ज्ञानाची इमारत उभी करतों. दुसरा कोणता मार्ग जर आपण पत्करिला, कीं आपली ज्ञानगति खुंटून जाईल. सृष्टीच्या शाश्वततेविषयीं, किंवा तिच्या नियमांच्या अप्रतिहततेविषयीं आपल्या मनांत विश्वास वागत असतो; तो वर सांगितलेल्या रीतीनेंच झालेला असतो. त्या विश्वासाला काय प्रमाणें आहेत तीं सिद्ध करून दाखवा, असें जर कोणीं म्हटलें, तर आपणांस तसें करतां यावयाचें नाहीं. शास्त्राच्या स्वरूपाचें जर सूक्ष्मपणें आपण निरीक्षण केलें, तर असें दिसून येतें कीं, विश्वाचीं स्वरूपें निरंतर बदलत असलीं तरी विश्वांत सत्य आहे, विश्वसनीयता आहे. ह्या श्रद्धेवरच शास्त्रें वाढलीं आहेत. विश्वासबुद्धि उत्पन्न होण्यास फार काळ लागला आहे. तरी ज्यांना आपण शास्त्रसिद्धान्त असें समजतों त्यांच्यां मुळाशीं ती श्रद्धा आहे. जर शास्त्रानें ह्या श्रद्धेचा त्याग केलेला नाहीं, तर केवलाच्या मीमांसेंत तिला स्थान का असूं नये ?

सृष्टींत विश्वसनीयता आहे. तिच्या नियमांची शाश्वती बाळगतां येते अशी जी श्रद्धा आपल्या मनांत वागत असते, त्या श्रद्धेला अनुरूपच सृष्टीची रचना किंवा व्यवस्था आहे. ह्या अनुरूप रचनेमुळें, ज्या विश्वांत मनुष्य जन्मतो, वागतो-सवरतो, आणि आयुष्य वेंचतो त्या विश्वाशीं त्याची संगत जुळली जाते. पाण्यांतून माशाला बाहेर काढलें, किंवा आकाशांत उंच उडणाऱ्या घारीला जर जमिनीवर चालविलें, तर त्यांना जसें वाटेल, तसें आपणांस विश्वाचे ठायीं वागतांना वाटत नसतें. आपलें मन किंवा विचार आणि सृष्टीचे व्यापार ह्या दोहोंत जी एकतानता आहे ती सृष्टींत जो दैविक अंश आहे त्याचें द्योतक आहे. सृष्टींत ईश्वराचें अस्तित्व आहे असा आपणांस बोध ह्या एकतानतेमुळें होतो. ही अनुरूपता आम्हांला विज्ञानामुळें भासते, किंवा जड द्रव्यापासूनच ती उत्पन्न झाली आहे, असें नाहीं. ह्या एकतानतेमुळें सृष्टीशीं जसा आपला संबंध जडला जातो, तसा सृष्टीचा आणि आपला परमात्म्याशींही संबंध उत्पन्न होतो. आणि देवाच्या चातुर्याचे आणि दयेचे, प्रेमाचे आणि सामर्थ्याचे जे संकल्प आहेत ते आपल्या श्रद्धेला आणि बुद्धीला गम्य होतात. एकूण शास्त्रानें जी श्रद्धारूप दीपिका हातीं धरली आहे, तिच्या योगानें धर्माच्या गूढ तत्वांवरही प्रकाश पडतो. ही जर दीपिका मालवली, किंवा तिचा आपण अव्हेर केला, तर धर्माचेंच नुकसान होईल असें नाहीं, तर त्याबरोबर शास्त्राचें शास्त्रत्व नाहींसें होईल. कारण, विश्वांत सत्यता आहे, सृष्टीच्या नियमांत आणि व्यापारक्रमांत शाश्वती आहे, ह्या भरंवशाचा शास्त्रांना मूळ आधार आहे.



ह्या विवेचनावरून असें स्पष्ट होतें कीं, ज्याविषयीं आपणांस उपजत ज्ञान आहे, अशीं जीं तीन तत्वें, तीं जरी पृथक् आहेत, तरी तीं संलग्नही आहेत. कोणच्या तरी एका तत्वांत त्यांचा समावेश करावा, किंवा त्यांचें ऐक्य स्थापावें यासंबंधीचे सारे प्रयत्न निष्फळ होतात. आणि ते तसे व्हावयाचेच. परंतु एखादी कृत्रिम रचना मोडली म्हणजे तिचे भाग जसे स्वतंत्र होतात, तसला पृथक्पणा ह्या तीन तत्वांना नाहीं. हीं तत्वें भिन्न जरी आहेत, तरी एकही आहेत. परमात्म्यानेंच सृष्टीचा आणि मनुष्यांचा स्वतःशीं योग जुळवून आणला आहे. ह्या दोहोंवर त्याची सत्ता चालते. सृष्टीचा आणि मनुष्यांचा जो संबंध आहे तो अधीनतेचा संबंध आहे. हे संबंध काय आहेत ते ओळखावे, त्यांचें स्वरूप निश्चित करावें, हाच धर्ममीमांसेचा मुख्य विषय आहे. सृष्टीच्या व्यापरांत सामर्थ्य आणि ज्ञान, सौंदर्य आणि प्रेम हीं व्यक्त होतात, असें अज्ञेयवाद्यांनाही मान्य आहे. परंतु हा प्रभाव आणि ही योजना एकाच अदृश्य कारणाचे आणि इच्छेचे परिणाम आहेत अशी कल्पना, शास्त्रें जेव्हां बाल्यावस्थेंत होतीं तेव्हां, होत नसे. ज्यांचें मनुष्याहून सामर्थ्य मोठें आहे आणि ज्यांचा सृष्टीवर विशेष सूक्ष्मत्वानें अंमल चालतो अशा चांगल्यावाईट देवतांच्या ह्या लीला आहेत, अशी समजूत असे. ह्या देवतांना देवदूत, यक्ष, राक्षस, पिशाच्च, पुराणांतील देव आणि देवता, किंवा जातिविशिष्ट व स्थलविशिष्ट देवता अशीं नांवें मिळत असत. विचाराची ही अवस्था होती म्हणून अनेक देव मानण्याकडे आणि मूर्तिपूजेकडे मनाची प्रवृत्ति होई. सृष्टीच्या नियमांना कधींच कोठें बाध येत नाहीं. हा शास्त्राचा सिद्धान्त ज्यांना कळत नाहीं, असे लोक आपल्याकडे व अन्य देशांत आहेत. त्यांचे ठायीं विचाराची हीच अवस्था अजून दिसून येते. ह्यानंतरच्या काळांत, चांगले देवदूत व वाईट देवदूत, देव आणि दैत्य, अहिर्मन व अहुर्मस्त अशा प्रकारें सृष्टींतल्या कर्तृत्वांचें वर्गीकरण करावें असें शास्त्रानें शिकविलें व अशा रीतीनें दुष्ट तत्वांच्या आणि दुष्ट तत्वांच्या साम्राज्याखालीं राहणाऱ्या

अनुक्रमणिका

लहानथोर देवतांच्या राज्यांची कल्पना उत्पन्न झाली. ही गोष्ट हिंदूंच्या व पार्श्यांच्या धर्माच्या मूल स्वरूपांत चांगली दिसून येते. महमदी आणि ख्रिस्त्यांच्या धर्मपंथांत ह्या अवस्थेचीं चिन्हें अजून राहिलींच आहेत. शेवटीं शास्त्रांचा जेव्हां उत्कर्ष झाला तेव्हां जडकोटि आणि मनुष्यकोटि व्यापून एकच सामर्थ्य, ज्ञान आणि योजना राहिली आहे अशा कल्पनेचा मनुष्यांच्या मनांत उदय झाला; आणि पूर्वीचे देव आणि देवता, सुष्ट आणि दुष्ट तत्वें मागें पडलीं. ही कामगिरी भागवतधर्मानें केली. ईश्वर म्हणजे अन्य विभूतींसारखीच एक विभूति आहे आणि विश्वरूपी घड्याळास बाहेर राहून गति देणारा किंवा चालू करणारा तो शिल्पक, किंवा यांत्रिक आहे, अशी जुन्या कांहीं धर्मपंथांत ईश्वराविषयीं समजूत असे. भागवतधर्माची तशी समजूत नाहीं. सर्वभूतीं ईश्वराचा वास आहे, तोच विश्वाचें नियमन करतो, विश्वाच्या मर्यादांनीं त्याचें माप होत नाहीं, किंवा विश्वांत त्याचें सारेंच सामर्थ्य व्यक्त होत नाहीं. पुरुषसूक्तांत म्हटल्याप्रमाणें, तो अनंत विश्वांहूनही मोठा आहे, चराचर सारी सृष्टीं त्यानें व्यापिली आहे व त्याहून त्याचा विस्तार फार मोठा आहे, अशी भागवतधर्माची कल्पना आहे. उपनिषदांत देवाच्या ह्याच स्वरूपाचें वर्णन आहे आणि हेंच उपनिषदांचें विशेष भूषण आहे. त्याच्या भयामुळें वायु वाहतो, सूर्य उदय पावतो व इंद्र, अग्नि आपआपलीं कामें करितात, असें म्हटलें आहे. एका उपनिषदांत एक सुंदर कथा आहे. एकदा अग्नि, इंद्र इत्यादि देवतांनीं परब्रह्माशीं विरोध केला कीं, कोणाचें सामर्थ्य श्रेष्ठ आहे तें पाहावें. ह्या प्रयत्नांत त्यांचा पराभव झाला आणि त्यांना परब्रह्माची आज्ञा शिरसावंद्य करावी लागली. परमात्म्यानें मनन केलें, किंवा त्यास स्फूर्ति झाली आणि चराचर वस्तूंसह जगाची उत्पत्ति झाली. जुन्या करारांतही असेंच वर्णन आहे. विश्वांत व्यवस्था आहे असें आपण म्हणतों, त्याचा अर्थच हा कीं, विश्वांत मन, विज्ञान, अथवा इच्छा आहे. सृष्टींत जी व्यवस्था आणि योजना आहे असें आपण पाहतों व ज्यामुळें सृष्टीला जीवन आहे, त्यावरून सृष्टींत ईश्वराचा वास आहे, असें आपणांस कळून येतें.

वर जी विश्वाच्या उत्पत्तीची व्याख्या आली आहे तींत, उत्पत्तिक्रिया अमक्याच एका काळांत झाली असा अर्थ होत नाहीं. सृष्टि म्हणजे परमात्म्याच्या विचाराचा विकास आहे, त्याला कधीं काळांत आरंभ झाला असें नाहीं, असा अर्थ उत्पन्न होतो. परंतु आज जें विश्वाचें व्यवस्थित आणि नियमबद्ध स्वरूप आपण पाहातों त्याला आरंभ आहे, तें अपूर्णापासून पूर्णाप्रत विकसित किंवा उत्क्रांत झालें आहे, त्यांत एकरूप साध्या जीवांपासून सूक्ष्म व संमिश्र जीवांप्रत विकास झालेला आहे, असें भूगर्भ व ज्योतिषशास्त्र सिद्ध करून दाखवितात. उत्पत्ति केव्हां झाली हा प्रश्न जरी आपण सोडून दिला तरी उत्पत्ति ही कार्यरूप आहे, ती कारणांचा परिणाम आहे, हीच महत्वाची गोष्ट ह्या दुसऱ्या मतांत ध्यानांत घेण्यासारखी आहे. अनंतकालांत आणि आकाशांत आदिकारण जागृत किंवा क्रियाशील आहे, असें स्पष्ट होत आहे, तर हा खुलासा आपल्याला व्यवहारांत सत्य मानून चालावयास पुरेसा आहे.

वास्तविक पाहातां नैसर्गिक कारणें आहेत असें जें आपण म्हणत असतों तें म्हणणें यथार्थ नाहीं. कारण, जडता हेंच द्रव्याचें लक्षण आहे. ज्यांना आपण नैसर्गिक कारणें असें समजतों तीं केवळ सूचक चिन्हें आहेत. नियम आणि व्यवस्था, सौंदर्य आणि प्रेम, सामर्थ्य आणि ज्ञान ह्यांची योजना परमात्मा कशी काय करीत असतो ह्याचीं तीं द्योतकें आहेत. सृष्टींत ईश्वराचा वास आहे असें जेव्हां आपण म्हणतों, तेव्हां त्या वाक्यानें वर सांगितलेल्या ईश्वरी कर्तृत्वाचाच आपणांस बोध होतो. सृष्टींतील व्यापाराचें स्वरूप आपणांस कळतें, त्याचे ठायीं काहीं नियम आहे, शाश्वति आहे, अशी आपणांस खात्री असते. ती काय म्हणून असते ? तर त्या ईश्वराच्याच क्रिया आहेत, जिला ताळ नाहीं अशा यदृच्छेच्या त्या कांहीं घडामोडी नाहींत, असा आपला भरंवसा असतो म्हणून. वास्तविक पाहातां सृष्टीच्या व्यापारांच्या योगानें, तारायंत्राप्रमाणें सर्व कालांत व सर्व स्थलांत ईश्वराचे संदेश मनुष्याचे मनाला पोंचत असतात. आतां हे संदेश शास्त्रसिद्धांताच्या रूपानें असोत कीं धर्मतत्वांच्या रूपानें असोत, मनुष्याला त्यांचा अर्थ लावतां येतो, एवढें खरें. याप्रकारें सृष्टींत नांदत असलेल्या सत्तेशीं मनुष्याचा संवाद होत असतो. सर्व सृष्टीच्या व्यापारांच्या मुळाशीं ईश्वर आहे, तोच सृष्टीला चैतन्य देतो आणि तिचें नियमन करतो, ह्या ईश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान विश्व आपणांस करून देत असतें.

या दृष्टीनें पाहिलें असतां सृष्टींत सर्वत्र ईश्वरी



अनुक्रमणिका

तेज प्रत्यक्ष अनुभवास येतें. मनुष्यांतही तसाच ईश्वरी अंश आहे. त्याचें स्वरूप काय आहे तें आतां आपण पाहूं. इतर प्राण्यांहून मनुष्याचें विशेष लक्षण हेंच कीं, त्याला विज्ञान आहे, आणि एखादी गोष्ट करावी कीं न करावी, ह्याविषयीं काहीं निश्चित मर्यादांच्या आंत त्याला पूर्ण इच्छास्वातंत्र्य आहे. तसें इच्छास्वातंत्र्य पशुकोटींत नाहीं. त्यांचा सारा व्यवहार उपजतबुद्धि आणि देहधर्म ह्यांच्या प्रेरणेनें होत असतो. वास्तविक पाहातां त्यांच्या कृत्यांबद्दल त्यांचेकडे जबाबदारी येत नाहीं. चांगलें-वाईट, सुष्ट-दुष्ट, ह्यांपैकीं एकाची निवड करण्याची स्वतंत्रता मनुष्यालाच ईश्वरानें दिलेली आहे. स्वतः होऊन निश्चय करावा आणि क्रिया घडवून आणावी, हें सामर्थ्य फक्त मनुष्यालाच तेवढें आहे. हीं जीं मनुष्याचीं विशेष लक्षणें आहेत त्यांत त्याचें थोर वैभव व मोठी जबाबदारी आहे. ह्या लक्षणांमुळें कायदा आणि राज्यव्यवस्था, आचारनियम आणि चालीरीति, सामाजिक आणि कुटुंबाच्या संस्था, वाङ्मयात्मक आणि शास्त्रीय शिक्षण व धर्म आणि उपासना– ह्या सर्वांचा उदय होतो. ह्या सर्व गोष्टींना मनुष्याचीं विशेष लक्षणें आधारभूत आहेत. एकंदर सृष्टींत–पशुकोटींतसुद्धां–जी क्रिया आपण पाहातों ती दोन विरुद्ध शक्तींचा जोर चालून जो परिणाम होईल त्याच्या प्रमाणांत असते. अशाच प्रकारचा नियतीचा तो एक गुलाम, अशी मनुष्याची स्थिति नाहीं. त्याचा अधिकार मोठा आहे. असें असून सर्व सृष्टीच्या नियंत्यानें आपल्याशीं मनुष्याच्या अधीनतेचा संबंध ठेविला आहे तो कसा, हा प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर असें कीं, इच्छास्वातंत्र्याचा योग्य उपयोग करण्याविषयीं आपण जबाबदार आहोंत, असें त्याला सदसद्विवेकशक्ति जाणवते व त्याद्वारें त्याचे परमात्म्याशीं जे आध्यात्मिक संबंध आहेत ते व्यक्त किंवा प्रत्यक्ष होतात. दुर्वर्तन केलें असतां टोंचणाऱ्या व सद्वर्तन करीत असतां योग्य मार्ग दाखवून साहाय्य करणाऱ्या सद्सद्विवेकशक्तीच्या द्वारें, सृष्टीच्या अंतर्गत जें चैतन्य आहे तें मनुष्याच्या हृदयांतही वास करितें, असा त्याला बोध होतो. दुर्विकारांस वश होऊन वागलें असतां त्याला तीव्र उद्वेग होतो आणि कर्तव्य बजाविलें असतां त्याला समाधान वाटून कृतार्थता वाटते; हा उद्वेग आणि हें समाधान त्याच्या आत्म्याच्या अंतरात्म्याशीं त्याच्या आत्म्याचा संबंध उत्पन्न करितात. ईश्वराचा हा जो मनुष्याशीं संवाद होत असतो त्याच्या योगानें जेथें प्रेम आणि न्याय ह्यांचें पूर्ण राज्य आहे अशा श्रेष्ठ परलोकाचीं द्वारें त्यास खुलीं होतात. बुद्धिपुरस्सर स्वतः होऊन निश्चय करावा व कर्तव्य काय आहे तें ओळखून व आपली जबाबदारी जाणून क्रिया करावी, हाच मनुष्यांतला दैविक अंश आहे. सृष्टींत ईश्वराचें एकप्रकारचें रूप प्रकट होतें हें खरें. तरी मनुष्याचा ईश्वराशीं जो आध्यात्मिक संबंध आहे व ज्यामुळें त्याच्या आचरणांचें नियमन होत असतें, त्या ह्या संबंधांत ईश्वराचें फारच श्रेष्ठ स्वरूप व्यक्त होत आहे. हें स्वरूप ओळखणें म्हणजे ज्ञान व श्रद्धा यांची एकवाक्यता होणें आहे. अथवा ज्ञान हेंच श्रद्धेच्या श्रेष्ठपदाला पावलें असें होतें; व त्या श्रद्धेमुळें मर्त्यावस्था टाकून अमरपदाची प्राप्ति मनुष्याला होते. ह्या गूढासंबंधानें जितकें पूर्णज्ञान व्हावें असें आपणांस वाटतें, तितकें होणें जरी शक्य नाहीं, तरी सृष्टि व मनुष्य ह्यांच्या ठिकाणीं ईश्वराचीं जीं स्वरूपें व्यक्त होतात त्यांवरून आपणांस बोध करून घेणें आवश्यक आहे; तो हा कीं, दृश्य जग हें परमात्म्याच्या विभूतीची प्रतिभा किंवा छाया आहे व मनुष्याच्या शुद्ध बुद्धीचा विकास व्हावा व त्याचें प्रेम वाढावें ह्याकरितां हें जग म्हणजे ईश्वराची एक शाळा आहे व हीच दृश्यविश्वासंबंधी भावना अत्यंत खोल व यथार्थ आहे. असें जरी आहे, तरी मनुष्याचे दोष वगळून त्याच्या गुणांचा अनंतपट विस्तार केला कीं, आपणांस ईश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान मिळालें असें समजावयाचें नाहीं. हीच चुकी बुद्धाच्या धर्मानें केली. पुराणांत ज्या देवता म्हणून ज्यांचें वर्णन आहे त्यांहून जो पूर्णज्ञानी आहे तो श्रेष्ठ, असें ह्या धर्मानें शिकविलें व कांहीं अंशानें; सृष्टींत चैतन्यरूप ईश्वरच नाहीं, असा भ्रम उत्पन्न केला. ईश्वराला मनुष्यत्व देण्याचा जो हा प्रकार तोही एक प्रकारची मूर्तिपूजा, किंवा विशिष्ट स्वरूपानें पूजा आहे. व तिचा सर्व धर्मांनीं, विशेषतः आर्यधर्मानें, निषेध केला आहे. ज्याला वाटतें कीं, ईश्वराचें रूप आपणास कळलें त्याला तें बिलकूल कळलें नाहीं व ज्याला आपणास तें कळलें नाहीं असें वाटतें, त्यालाच तें खरें समजलेलें असतें असें उपनिषदांत म्हटलें आहे. ईश्वराचें वर्णन कसें करावें ह्याविषयी निराश होऊन वाणी मागें फिरते. मनुष्याच्या मनाला त्याचें आकलन होत नाहीं. ईश्वराची उपासना भक्ति, भाव व प्रेम ह्यांनींच होऊं शकते.

अनुक्रमणिका

मनुष्याला अंत:प्रेरणेनें ज्या धर्मतत्वांचा बोध होतो तीं हीं धर्मतत्वें आहेत. त्यांत ऐतिहासिक धर्मांच्या मुळाशीं जीं धर्मतत्वें असतात त्यांचीही भर घातली पाहिजे. ज्या देशांत व कालांत ऐतिहासिक धर्मांच्या तत्वांचा उदय झाला त्याप्रत्वें जरी तीं भिन्न आहेत, तरी त्या तत्वांचे भोंवतीं परिस्थितीचें जें आवरण आहे त्याचें महत्व कालांतरानें नाहींसें होणार आहे. व प्रत्येक धर्माच्या न्यूनतेची पूर्तता होऊन कांहीं कालानें एक सार्वत्रिक धर्म सिद्ध होणार आहे. जगांतील सर्व देशांहून हिंदुस्थानचें एक विशेष भाग्य आहे, तें हें कीं, भागवतधर्माचीं मुख्य लक्षणें कायम राहून, सर्व धर्मांचें संमेलन प्रत्यक्ष चालू असलेलें या देशांत दिसून येत आहे. आपल्या धर्मविचारांचा ओघ कधींच कुंठित झालेला नाहीं. या देशांतील किंवा अन्य देशांतील साधूंच्या चरित्रांपासून, उपदेशांपासून आपल्या धर्मविचारांत भर पडली आहे. पूर्वी सृष्टींत जीं महाभूतें दिसतात त्यांचें ठिकाणीं देवत्व कल्पून आराधना करण्याचा प्रघात होता. नंतर त्या महाभूतांचें नियमन करणाऱ्या तत्वाची किंवा सामर्थ्याची पूजा प्रचलित झाली. नंतर ह्या सामर्थ्याचे ठिकाणीं नीतिविषयक गुणांचा अध्यास किंवा आरोप होऊं लागला आणि जुने देव आणि देवता मागें पडल्या. नंतर आत्म्याच्या शक्तीकडे लक्ष लागलें व उपनिषदांत आत्म्याचें ठिकाणीं ईश्वरी अंश आहे असें सिद्ध झालें; इतकेंच नव्हे, तर आत्मा आणि ईश्वर ह्यांत फरकच नाहीं असें समजण्यापर्यंतही मजल गेली ! नंतर **बौद्ध** धर्माचा उदय झाला. या वेळीं आचरणशुद्धतेचें महत्व दृढपणें मनांत बिंबलें गेलें. पशूंचे यज्ञ बंद झाले. आपल्या पशुवृत्तीचा यज्ञ करणें हा उपासनेचा श्रेष्ठ मार्ग, तेंच परमार्थाचें श्रेष्ठ साधन, असें सिद्ध झालें. नंतर महंमदाच्या धर्माची लाट आपल्या देशावर आली. त्यांतही आपल्या हिताचा एक भाग होता. बुद्धीनें एकेश्वरी मताचें ग्रहण केलें म्हणजे पुरेसें नाहीं; त्या मताचा आचरणांतही परिणाम दिसला पाहिजे, हें आपण तेव्हां शिकलों. आणि आतां ख्रिस्ताच्या धर्माचे संस्कार आपल्या मनावर होत आहेत. एकत्र जमून काम करण्याचें सामर्थ्य, पापाविषयीं तिरस्कार, अन्याय वगैरे हे चालावयाचे, अशाप्रकारें औदासीन्य जाऊन अन्यायाचा द्वेष, स्त्रीपुरुषांच्या वास्तविक योग्यतेचें ज्ञान, औदार्य आणि बंधुप्रेम, आचारविचारस्वातंत्र्य— हे सारे जे ख्रिस्ताच्या धर्माचे गुण आहेत ते आपल्या राष्ट्रांच्या अंगस्वभावांत सामील करणें, हें सध्याच्या कालचें आपलें कर्तव्य आहे. आणि तें काम सर्व देशभर चालू आहे. भागवतधर्माचें ख्रिस्ती धर्माशीं पुष्कळ गोष्टींत साम्य आहे. परमात्मा हा चैतन्यरूप सागर असून त्याचेच ठिकाणीं आपलें जीवन आहे. अशाच रीतीनें परमात्म्याचें स्वरूप दोनही धर्मांत ओळखलें जातें. त्यांच्यांत अशी **ट्रिनिटी** आहे तसें आपल्यांत हें **सृष्टि, जीवात्मा** आणि **परमात्मा—** यांचें त्रिकूट आहे. मुक्ति मिळाली कीं, आत्मा परमात्म्याचे स्वरूपांत मिळून जातो ही जी हिंदूंची कल्पना तीच Transubstantiation मध्यें मूर्त स्वरूपानें दिसते. दोनही धर्मांत अवतार मानले आहेत; भेद इतकाच कीं, अनेक अवतार आहेत कीं एकच आहे. दोहोंतही यज्ञाची विशेष मातबरी गणली जात असे. हीं जरी साम्यें आहेत तरी कांहीं ठळक भेदही आहेत व त्यांकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. ज्या लक्षणांमुळें भागवतधर्माचें वैशिष्टय कायम राहिलें आहे तीं लक्षणें कधींच नाहींशीं होणार नाहींत. तीं लक्षणें हीं कीं, भागवतधर्म हा ऐतिहासिक धर्माप्रमाणें मर्यादित धर्म नाहीं. अमक्या साधूनें उपदेशिला तो भागवतधर्म असें त्यांत नसून, सर्व साधूंच्या उपदेशांला त्यांत स्थान आहे. अमकाच एक ग्रंथ प्रमाण असें त्यांत नाहीं, तरी सर्व धर्मग्रंथांतील चांगला भाग घेण्यास भागवतधर्मास हरकत नाहीं. त्याच्या धर्मविचाराचा ओघ सतत वाढत जाणार आहे. तो कधीं कुंठित व्हावयाचा नाहीं. आणि सर्वांत मुख्य लक्षण हेंच कीं, जीवात्म्याचा परमात्म्याशीं साक्षात् संबंध आहे, साक्षात् संवाद होत असतो. हें तत्व भागवतधर्माला आधारभूत आहे. एकाच जन्मांत जी काय आत्म्याची उन्नति होईल तीच तेवढी सार्थकता, असें त्याचें मत नाहीं. दैववादाहून कर्मविपाकाचें तत्व भिन्न आहे. त्या तत्वांच्या योगानें पूर्वींच्या, सध्याच्या व पुढच्या जन्मांचे संबंध जोडले जातात. ह्या तत्वाचें रहस्य आपल्या देशांत जितकें हृदयारूढ झालें आहे तितकें दुसरीकडे कोठें नाहीं. ह्यांत दोषाचा जो कांहीं भाग असेल तो सोडला म्हणजे झालें. आपल्या देशाचें वळण धार्मिक व आध्यात्मिक आहे. व त्यामुळें हें जगच सर्वस्व आहे व संपत्ति व सत्ता ह्यांतच पुरुषार्थ आहे, अशी मनाची वृत्ति होऊन राहात नाहीं. परलोक हेंच खरें आपलें वसतिस्थान हा विचार कधींही सुटत नाहीं.

अनुक्रमणिका

भागवतधर्माचें आणखी लक्षण म्हटलें म्हणजे त्यांत विश्व ही ईश्वराची कृति एवढीच समजूत नाहीं, तर ईश्वर हा विश्वाचा आत्मा, तो त्यांत अंतर्गत आहे व त्यास चेतना देतो, अशी भावना आहे. आणि शेवटीं, परधर्मसहिष्णुता, स्वार्थत्याग, मनुष्याविषयींच प्रेम नव्हे, तर सर्व जीवमात्राविषयीं प्रेम ह्याविषयींचें शिक्षण देणें, हें भागवतधर्माचें प्रधान अंग आहे. व म्हणून डॉ. मिलरनें मद्रासेंत एका व्याख्यानाचे प्रसंगी ख्रिस्ती लोकांना जो उपदेश केला, तो अगदीं यथार्थ आहे. प्राटेस्टंट किंवा कॅथलिक धर्मोपदेशकानें हिंदुस्थानांत पाय ठेवण्याचे पूर्वीही ह्या देशावर ईश्वराचें प्रेम होतें व हिंदु धर्मांत जरी दोष असले, तरी त्यांत उत्तम धर्मतत्वें आहेत, हें ख्रिस्त्यांनीं नेहमीं मनांत वागविलें पाहिजे. **ख्रिश्चिन्वर्ल्ड** पत्रांत ह्या उपदेशावर टीका करितांना विधान केलें आहे कीं, कितीही ख्रिस्ती संस्था येथें आल्या, तरी हिंदुस्थान आपली धर्मविचारपद्धति सोडणार नाहीं. परंतु दुसऱ्या धर्मांत जो कांहीं ईश्वरी अंश असेल, तो आपल्या धर्मांत सामील करून घेईल. हें म्हणणें यथार्थ आहे.

सभ्य गृहस्थ हो, आजच्या व्याख्यानाचा जो मुख्य उद्देश त्याहून माझें विषयांतर झालें, ह्याबद्दल आपण मला क्षमा कराल, अशी मी आशा बाळगतों. युरोपांत विचाराला जें नवीन स्वरूप आलें आहे तें डॉ. फ्रेजरच्या व्याख्यानांत दिसून येतें. आपल्याकडील विचारपद्धतीला अनुरूप त्या व्याख्यानांचा सारांश मीं आपल्याला सांगितला आहे व आपल्या जुन्या ग्रंथांतून आधार घेऊन विवरण केलें आहे. पौर्व व पाश्चिमात्य विचार-पद्धतींत जें साम्य आहे तें फार सूचक आहे. जर ह्या विषयांचें अध्ययन करावें अशी तुम्हांला ह्या व्याख्यानानें प्रेरणा होईल, तर माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें मी समजेन.





अनुक्रमणिका






# एका एकेश्वरवाद्याची कैफियत

न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे

अनुवादक – वसंत पळशीकर

जगभर अस्तित्वात येणाऱ्या एकेश्वरवादी संघटनांच्या, आणि विशेषत: या देशातील एकेश्वरवादी समाजांच्या संबंधात अनेकदा अशी तक्रार केली जाते की, मानवजातीच्या ज्या धर्मविषयक उत्कट गरजा आहेत त्यांची पूर्तता करण्याची क्षमता हे समाज प्रसृत करीत असलेल्या आचारविचारांमध्ये नाही, आणि त्यामुळे प्रस्थापित धर्मांविरुद्धच्या त्यांच्या झगडचात त्यांना कायमचे यश मिळण्याची सुतराम आशा नाही. एकेश्वरवादाची मूलभूत तत्त्वे मोजकी व अनिश्चित आहेत; जीवन व अनाद्यंत विश्व यांच्या आकलनाच्या संदर्भात पडणाऱ्या मुख्य व मोठ्या प्रश्नांना त्यात देण्यात येणारी उत्तरे स्वीकारण्यात अनेक अडचणी आहेत. ती निखळ व नि:संदिग्ध नाहीत; एकेश्वरवादाच्या उदय व उत्कर्षाच्या ओघात वैराग्यशील भक्ती व उदात्त आत्मयज्ञ यांची प्रेरक उदाहरणे आढळत नाहीत; मानवजातीच्या धार्मिक वृत्तींचे समाधान करण्याइतका अधिकार व वजन एकेश्वरवादाच्या शिकवणुकीत, आश्वासनांमध्ये आणि त्याने जागृत केल्या जाणाऱ्या आशाआकांक्षामध्ये नाही. प्रस्थापित धर्मांचे अनुयायी गर्वाने असे सांगत असतात की, कोणत्याही मोठ्या जनसमुदायाने आजवर विशुद्ध एकेश्वरवादाचा अंगीकार केलेला नाही, आणि भविष्यात लोक मोठ्या संख्येने त्याचा स्वीकार करतील असे कोणतेच चिन्ह दिसून येत नाही. या नवजात चळवळींच्या प्रवक्त्यांचे म्हणणे आपण जसेच्या तसे स्वीकारले, त्यांच्या प्रतिपादनाच्या खोलात आपण शिरलो नाही, स्वत: चिंतन, मनन केले नाही तर, एक ना एका प्रस्थापित धर्माच्या आश्रयाखाली ज्यांना सुरक्षित वाटते, आणि जे आपली छोटी जीवननौका संदिग्ध विचारांच्या स्वैरलहरींच्या प्रवाहात लोटण्यास नकार देतात अशांकडून प्रकट होणारा गर्व व आत्मविश्वास अनेक कारणांनी समर्थनीय आहे असे म्हणण्याकडे कल होतो. सर्व माणसे ही एका ईश्वराची लेकरे असून त्यांचे परस्परांशी बंधुभावाचे नाते आहे ही दोनच तत्त्वे मानवजातीचा धर्म म्हणून एकेश्वरवाद हा प्रस्थापित होण्यास आवश्यक अशी पायाभूत तत्त्वे आहेत, हे दोन सिद्धान्त श्रद्धेने स्वीकारणे पुरेसे आहे असे ब्राह्म समाजाचे अनेक उत्साही नेते बुद्धिपुरस्सर ठासून उद्घोषित करीत असतात हे आपण ऐकलेले आहे. या दोन आणि फक्त या दोनच बाबी अढळ श्रद्धेने ग्रहण करणे तेवढे नितान्त आवश्यक आहे, आणि तसे केल्यास पुनरुत्थान घडून येईल व मोक्ष साध्य होईल असे सांगितले जात आले आहे. एकेश्वरवादी चळवळीच्या बाल्यावस्थेत या दोन सिद्धान्तांवर सारा भर दिला जात होता. या चळवळीस पन्नास वर्षे होऊन गेल्यावरही त्यांचीच पुनरावृत्ती करीत राहण्यात आपले नेते समाधान मानीत आहेत असे दिसते. धर्मांच्या उदयापासून श्रद्धेने जीवन व्यतीत करताना लोकांना खोलवर जाऊन पोचणाऱ्या ज्या धार्मिक पेचांनी नेहमीच भेडसावलेले आहे, आणि ज्यामुळे लोकांना ( प्रेपितांकरवी प्रकट झालेल्या ) ईश्वराच्या वाणीचा, ' श्रुतीं 'चा आश्रय घेण्यास उद्युक्त केले आहे त्या पेचांना पूर्ण गांभीर्याने सामोरे जाण्याचा प्रयत्न झालेला नाही. एकेश्वरवादी चळवळीतल्या जुन्या वा नव्या कोणत्याच प्रवाहांना असे सामोरे जाण्याची काही गरज असल्याचे यत्किंचितही भान असल्याचे आढळत नाही. त्यांच्या समजुतीप्रमाणे धर्माचे अधिष्ठान केवळ एक भावनेत आहे. अडचण समाधानकारक आकलन होते की नाही ही नसून, धर्म श्रद्धेने स्वीकारण्याचीच बाब आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. हिंदुस्थानात धार्मिक प्रबोधनाचे जे कार्य आज चालू आहे त्याचे महत्त्व कमी लेखावे हा येथे केल्या जाणाऱ्या विवेचनाचा हेतू अजिबातच नाही. जगातल्या सर्वश्रेष्ठ प्रज्ञावंत व्यक्तींनी शेकडो वर्षांच्या काळात उत्कटपणे खोलवर जाऊन केलेल्या तात्त्विक मंथना-

मधून जे अनेकानेक धार्मिक सिद्धान्त विकसित केले त्यांचे ब्राह्म समाजाच्या नेत्यांचे आकलन जुजबी व सीमित आहे ही वस्तुस्थिती आहे. यांच्या प्रतिपादनावर विभिन्न प्रस्थापित धर्मांचे अनुयायी टोकदारपणे जे आक्षेप घेतात त्यात मोठ्या प्रमाणावर तथ्य आहे असा वर जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो योग्य असल्याचीच ही वस्तुस्थिती निदर्शक आहे. प्रार्थना समाजाचेच उदाहरण घ्यावयाचे तर, ईश्वर एकच आहे या एकाच श्रद्धेच्या भोवती बांधलेली धर्मप्रणाली आमच्या मित्रांचे पूर्णपणे समाधान करते असे दिसते. आज हिंदूंमध्ये प्रचलित असलेली मूर्तिपूजा ही एक घृणास्पद बाब आहे, ते एक पाप आहे, मूर्तिपूजेमुळे हिंदू धर्माला आजचे अवनत व भ्रष्ट रूप प्राप्त झाले आहे या सिद्धान्ताची जोड आवर्जून दिली जाते. मूर्तिपूजेचा विशेष निषेध आमचे मित्र करीत असतात. अशा अत्यंत निरुंद अशा श्रद्धेच्या पायावर काळाच्या ओघात एक नवा, सर्व मानवांना सामावून घेणारा धर्म उभारण्याची उत्कट आशा आमचे मित्र बाळगतात. धार्मिक विचारविश्वाचा थांग लावण्यासाठी एखादा प्रांजळ व गंभीर साधक प्रस्थान ठेवतो तेव्हा त्याला ज्या मोठ्या जटिल पेचांचा सामना करावा लागतो त्यांची कोणतीच दखल नसणे, त्यांची उपेक्षा करणे ही वैशिष्ट्ये, कमीअधिक प्रमाणात, युरोप व अमेरिकेतील एकेश्वरवादी चळवळींमध्येही आढळतात. युनिटेरियन चर्चचा याला अंशतः अपवाद आहे. प्रस्थापित धर्मांच्या सिद्धान्तांचे कडवे, साचेबंद प्रतिपादन, त्यांची आक्रमकता, आचारविचारांचा भला मोठा पसारा, कर्मकांडी तपशील यांचा उबग आलेली मूर्तिभंजक वृत्ती ही या सर्व चळवळींची जननी होती. प्रस्थापित धर्मप्रणालींविषयी त्यांच्या ठायी जी घृणा उत्पन्न झाली ती अत्यंत तीव्र होती. प्रतिक्रियेमधून उत्पन्न झालेल्या या चळवळी म्हणून अनिवार्यतः एकांगी, असंतुलित होत्या. त्या अवस्थेमधून कोणतीच एकेश्वरवादी चळवळ बाहेर पडलेली नाही. माणसांच्या भावनांना आवाहन करण्यात प्रस्थापित धर्मांना रस आहे, भावनांचे समाधान हे धर्म करतात या प्रकारे सत्चरित्र व धर्मशील व्यक्ती जी आत्मसंतुष्टता प्रकट करतात त्याचे याच आधारे स्पष्टीकरण होऊ शकते. आजचे प्रस्थापित धर्म बुद्धीला वगळून केवळ हृदयाला तेवढा हात घालतात असे ते म्हणतात. ज्या धर्मांचे खंडन ते करतात त्या धर्मांपासूनच सर्वसंग्राहक मधुकर वृत्तीने त्यांनी त्यांची बौद्धिक सैद्धान्तिक तत्त्वे उसनवारीने ग्रहण केलेली असतात ही गोष्ट अलाहिदा. फरक इतकाच की, शब्दांना पावित्र्य प्रदान करणाऱ्या परमतत्त्वाचे प्रामाण्य नाकारून फक्त कोरडे शब्द ते उचलतात.

हे न्यून दूर करण्यासाठी प्रामाणिक प्रयत्न करण्याची वेळ आली आहे असे आमचे मत आहे. विशुद्ध एकेश्वरवाद हा कोणत्याही मोठ्या लोकसमूहाने श्रद्धेने स्वीकारलेला धर्म आहे असे आज म्हणता येणार नाही, ही गोष्ट खरी आहे. पण भविष्यात मानवजात एकेश्वरवादाच्या भूमिकेवरच येणार आहे हा दावा त्यामुळे खोटा ठरत नाही. नाना विधींद्वारा मूर्तिपूजा, देवदेवतांना संतुष्ट करण्यासाठी बलिदान, पाखंडी मत बाळगणाऱ्यांचा छळ, या व इतर अनेक समजुती व व्यवहार सर्व प्राचीन धर्मांचे गाभ्याचे भाग राहिले आहेत ही गोष्ट खरी. पण दीर्घकाळ पावेतो धर्माची ही मुख्य शिकवण म्हणून उपदेशिली व आचरली गेली असतानाही, आजच्या काळातल्या सर्व प्रगत धर्मांमधून त्यांचे शेवटी उच्चाटन झालेले आपण पाहतोच. मानवजातींच्या धार्मिक भावना व श्रद्धा यांच्यामध्ये काळाच्या ओघात विकास, उन्नयन झालेच नाही असे सरसकट विधान करणे सत्याला धरून होणार नाही. आणि भविष्यात मानवजात एकेश्वरी निष्ठेच्या दिशेने वाटचाल करणे शक्यच नाही असा ठाम सिद्धान्त प्रतिपादन करण्यास कोणताच आधार नाही. इतकेच नाही तर, पूर्वी कधी नव्हे इतकी आज प्रकट चिन्हे दिसत आहेत की, नजीकच्या भविष्यकाळात ईश्वराचे राज्य भूतलावर अवतरेल.

अनेकानेक धर्मपंथ व संप्रदाय यांच्या जागी त्या एका जगदीश्वराचे राज्य पृथ्वीतलावर प्रस्थापित होण्याचा काळ समीप आला आहे ही श्रद्धा सोडून द्यावी अशी इतिहासाची साक्ष एकेश्वरवाद्यांच्या विरोधात निघते असे मानण्याला काही आधार नाही. जगात सर्वत्र एकेश्वरवादी चळवळी उदयास येत आहेत, फोफावत आहेत हा तसा जग कोणत्या दिशेने भविष्यात वाटचाल करणार आहे याचा पुरेसा सबळ पुरावा आहे. समाजातील उच्च कोटीची बुद्धिमत्ता व जाण असलेल्या सर्व व्यक्तींचे देशातील प्रस्थापित धर्माच्या शिकवणुकीने व व्यवहारांनी समाधान होत होते असे इतिहासातील कोणत्याच कालखंडात आढळून येत नाही. विशुद्ध

प्रेरणा आणि उन्नत, पवित्रतर ज्ञान यांची साधना करणाऱ्या साधकांची संख्या नेहमीच मोठी राहिलीय. या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करण्याचे कोणतेच कारण नाही. या वस्तुस्थितीपासून योग्य बोध घेतला तर, मानवजातीच्या जन्मजात धार्मिक प्रवृत्तींचे समाधान आमच्या धर्मप्रणालीच करू शकतात आणि अंतरात्म्याला पडणाऱ्या सर्व कूट प्रश्नांची अंतिम समाधानकारक उत्तरे आमचे धर्मशास्त्रच देते असा मोठ्या गर्वाने दावा करणाऱ्या, प्रस्थापित धर्मांच्या धर्ममार्तंडांचे म्हणणे वस्तुस्थितीच्या आधारे सिद्ध होत नाही, हे बुद्धीला पटण्यात कोणती अडचण पडणार नाही. बाहेरून वरवर जुजबी स्वरूपात पाहणाऱ्याला हे प्रस्थापित धर्म जेवढे भक्कम व भरीव भासतात तेवढे ते आतून नाहीत, आणि प्रारंभिक अवलोकनाच्या वेळी हे नूतन एकेश्वरी धर्म तुलनेने फार क्षीण आहेत, यांना भवितव्य नाही असे डोळ्यांना जे वाटते ते तसे वस्तुतः नाही, हाही विश्वास उत्पन्न होईल.

धर्माच्या क्षेत्रात जे अनेक कूट प्रश्न पडतात त्या सर्वांची प्रमाण म्हणून जी सारी उत्तरे दिली जातात ती वस्तुतः प्रमाण वा अंतिम उत्तरे नाहीत; किंबहुना, ती कोणत्याही अर्थाने उत्तरे म्हणता येत नाहीत हे बारकाईने छाननी केली असता दिसून येते. मानवी बुद्धीच्या, क्षमतांच्या मर्यादाच अशा आहेत की, त्यातले काही प्रश्न हे कूटच राहणार, आणि जेथे बुद्धीची झेप उत्तरांपर्यंत पोचू शकत नाही तेथे, श्रद्धेचे पंख लावून ती अनुल्लंघनीय दरी लांघली जाऊ शकत नाही. अडाणी समजुतींच्या जागी अशी प्रस्थापित केली जाणारी श्रद्धाळू उत्तरे म्हणजे खरे तर श्रद्धा या गोष्टीला सवंग बनविणे होय. श्रद्धेचे स्वतःचे एक प्रयोजन आहे, आणि श्रद्धेचे अपार महत्त्व आम्ही कमी लेखू इच्छित नाही. ज्या गोष्टी मुळातच अनाकलनीय आहेत त्या समजायला सोप्या करण्याच्या व्यर्थ खटाटोपात यश संपादन करण्यासाठी श्रद्धेला आवाहन करणे, तिचा आधार घेऊ पाहणे हे सर्वस्वी अनुचित आहे.

मानवी बुद्धीला अनाकलनीय राहणारी ही गूढे कोणती, ती गूढे उकलण्याचे सारे प्रयत्न का सदैव असफलच ठरणारे आहेत, त्या दिशेने प्रगती करणे का अशक्य आहे, तथाकथित श्रद्धेच्या आधारे ती गूढे उकलतात असे मानणे ही आत्मवंचना कशी आहे, ती दैवी प्रकटनांच्या साहाय्याने उकलतात हे म्हणणेही तेवढेच आत्मवंचनापर का आहे, याची स्पष्टता आम्ही करण्याचे योजिले आहे. धर्माचे तत्त्वज्ञान या विषयात प्रथमच आम्ही या गोष्टी मांडीत आहोत, हे या विषयाला आमचे अभिनव योगदान आहे असा आमचा दावा नाही. आपल्यापैकी अनेकांच्या मनःचक्षूंसमोर अधूनमधून तरळून जाणारे विचार एका सूत्रात ओवण्याचा हा केवळ प्रयत्न आहे. अशा चिकित्सेमध्ये सत्याचा किती काटेकोर आग्रह राखणे आवश्यक असते, वा राखणे शक्य कोटीतले असते, हे स्पष्ट करण्याचा मानस आहे. आजच्या प्रस्थापित प्रमुख धर्मांपैकी या ना त्या धर्माने सकृद्दर्शनी ज्या कूटांची उकल अंतिम उत्तरांच्या स्वरूपात केली आहे त्यांचा आढावा घेण्याचा, आणि ज्या सिद्धान्तांमुळे मनात अंतर्विसंगतींचा एक गुंताडा निर्माण होऊन त्यात माणूस पार गुरफटतो अशा इतर अनेक सिद्धान्तांपासून, ज्या सिद्धान्तांच्या संदर्भात पक्के ज्ञान होणे शक्य आहे, आणि ज्या ज्ञानाबद्दल एकवाक्यता होणे संभवनीय आहे असे सिद्धान्त वेगळे करण्याचेही येथे योजिले आहे.

ऐतिहासिक अन्वेषण पद्धतीचा अंगीकार करून आम्ही ही तपासणी करणार आहोत. म्हणण्याजोगे परिणाम या पद्धतीच्या अंगीकारानेच हाती येण्याची शक्यता आहे. आमच्या स्वतःच्या वैयक्तिक विचारांचा नमुना डोळ्यांसमोर ठेवून, प्रागनुभविक (a priori) तत्त्वांपासून आरंभ केल्यास, विषयाची उकल होण्याऐवजी गुंताच जास्त वाढेल. माणसाची बुद्धी व त्याचे हृदय, दोन्हींची निष्ठा संपादन करण्याचा दावा सांगणारी कोणतीही एक धर्मप्रणाली घेतली तर, तिने कोणकोणत्या मुद्द्यांची सांगोपांग, व्याप्ती व खोली दोन्ही दृष्टया, मांडणी केली पाहिजे त्या सर्व मुद्द्यांची नोंद घेण्यापासून सुरुवात केल्यास आमच्या मनातील अर्थ स्पष्ट होईल. निसर्ग व मन यांच्याशी निगडित शास्त्रांशी धर्मशास्त्र निगडित आहे; धर्मशास्त्राचे क्षेत्र कोठे संपते व कोठे भौतिक, सामाजिक शास्त्रांचे क्षेत्र सुरू होते त्याची भेदरेषा अद्यापि निश्चित झालेली नाही. त्या त्या शास्त्रांच्या क्षेत्रात, पुराव्यांनिशी सिद्ध झाले या अर्थाने, जे ज्ञान प्रमाण मानले जाते ते सत्य म्हणून आम्ही स्वीकारणार आहोत. आमचे निष्कर्ष शक्यतोवर त्यांच्याशी मेळ खाणारे असतील याची दक्षता घेऊ.

धर्माच्या शास्त्राच्या क्षेत्रमर्यादांच्या सीमारेषा

कोणत्या आहेत ? त्या सीमांमध्ये अंतर्भूत क्षेत्रात येणाऱ्या गोष्टी कोणत्या ? जगातील एक ना एका प्रस्थापित धर्मामध्ये वा ईश्वरप्राप्तीच्या साधनमार्गांमध्यें (theosophies) जे प्रश्न उपस्थित केले गेले आहेत, एक ना एका प्रकारे चर्चिले गेले आहेत, आणि बुद्धीच्या उपयोगाने वा अधिसत्तेच्या जोरावर ज्यांची उत्तरे दिली गेली आहेत त्या प्रश्नांचे स्वरूप व आशय काय आहे ? या अंगाने स्पष्टता करण्याआधी दोन प्रारंभिक मुद्दे उपस्थित करावयास हवेत. या धार्मिक कूटांच्या सोडवणुकीच्या संदर्भात, ती कितपत निश्चितपणे सोडविली जाऊ शकतात ? त्या निश्चिततेच्या मर्यादा कोणत्या व तिचे स्वरूप काय ? हा पहिला मुद्दा होय. नीतिविवेक आणि विश्वविषयक तत्त्वचिंतन यांच्या दरम्यान धर्माचे 'मधले' स्थान आहे; या अर्थाने की आपल्या स्वभावप्रकृतीतल्या लौकिक-व्यावहारिक अंगाशी तसेच कल्पनाविहाराच्या वैशिष्टचाशी, दोन्हींशी धर्म निगडित असतो. या स्थानाविषयीचा मुद्दा दुसरा होय. अमूक गृहितकृत्यांपासून आरंभ केला तर अमूक उत्तर हमखास येणारच अशी गणिती पक्केपणाची, केवल स्वरूपाची निरपेक्ष सत्य अशी उत्तरे या विषयांमध्ये हाती येत नाहीत, येण्याची शक्यता नाही या वस्तुस्थितीची दैवी प्रकटनावर आधारित सर्व धर्म मोकळेपणाने, मनःपूर्वकतेने साक्ष देतात. उत्तरांना जी स्वीकृती दिली जाते ती जरी एका पातळीवर निःशंक असली, म्हणजे बहुधा कोणतीही शंका न काढता प्रमाण व निरपेक्ष सत्य म्हणून त्यांचा स्वीकार केला जात असला तरी, ही उत्तरे कदाचित चूकही असू शकतील या संभाव्यतेपासून ती मुक्त नसल्याचे एक भान आढळते. हे जे उणेपण आहे ते दूर करण्यासाठी, अधिसत्तेच्या शिक्कामोर्तबाद्वारा निश्चितता, निरपवादपण प्राप्त करून देण्यासाठी तर ती दैवी प्रकटनांच्या स्वरूपात समोर ठेवण्याची गरज मानलेली आहे. या विषयांमध्ये बुद्धीच्या साहाय्याने गवसणाऱ्या सत्यांचे सत्यत्व अगदी पक्के नसते, अनिश्चिततेची एक मर्यादा त्याला पडते याविषयी जी ही सहमती आढळते तो एक महत्त्वाचा पुरावा आहे. ही वस्तुस्थिती स्वतःपासून लपवून ठेवून आपण काही साध्य करीत नाही. हा अप्रत्यक्ष युक्तिवाद बाजूला ठेवला तरी, याच निष्कर्षाप्रत आपण अन्य सबळ कारणांनी पण येऊन पोचतो. असीम, अमर्याद व पारलौकिक गोष्टी, कालाची अनंतता, सर्व गोष्टींचा मूळ उद्गम, आध्यात्मिक अस्तित्वाचे स्वरूप व आशय, आणि दैवी अनुशासनाची तत्त्वे यांसारख्या मुद्द्यांशी धर्माला कर्तव्य असते. सामाजिक आणि मानसिक घटितांचे स्वरूप, त्यांचा आशय व्यामिश्र, जटिल असतो. धर्माच्या विषयातल्या मुद्द्यांचेही हे गुणवैशिष्टच आहे. सामाजिक व मानसिक घटनांचा, व्यवहारांचा थांग पूर्णपणे, निरपवाद निश्चिततेने, निःशेषपणे लागला आहे असे कधीच होत नाही, ती एक अशक्य गोष्ट आहे, हे सर्वमान्य आहे. धार्मिक कूटांच्या बाबतीत, कारक घटकांची व्यामिश्रता, जटिलता हा तर मुद्दा आहेच; पण हे सर्व मुद्दे पारलौकिक स्वरूपाचे असतात हीपण एक अधिकची गोष्ट आहे. प्रागनुभविक ( a priori ) सत्यांमध्ये एक साक्षातपण व बाळबोधपण असते : हे असे निरपवादपणे आहेच असे सरळ सांगितलेले असते. धार्मिक सत्येही, धर्मज्ञानही बव्हंशी या प्रकारचे असते. पण याचा अर्थ ते शंका व प्रश्न यांच्यापासून मुक्त असते असे नाही. ते पक्के व प्रमाण व एकमेव खरे ज्ञान आहे असे आश्वासन दिले जात असले तरी, मन शंकित होतच राहते, बुद्धीला पेच पडतच राहतात. प्रागनुभविक (a priori) तत्त्वांच्या आधारे मांडणी करणाऱ्या तत्त्वज्ञांच्या म्हणण्याप्रमाणे विचारांच्या ज्या विषयात वा क्षेत्रात सत्यज्ञान हे अनुभवावर अंशमात्रदेखील अवलंबून नसते त्या विषयात, क्षेत्रात ज्या ठामपणे, निरपवाद स्वरूपात केवल, निरपेक्ष सत्य हाती आले आहे असे म्हणता येते तसे धर्माचा विषय असलेल्या मुद्द्यांच्या बाबतीत म्हणता येत नाही. हा मुद्दा आपण मोकळेपणाने स्वीकारतो हे खरे असले तरी, त्याच वेळी, काही मुद्दे मात्र असे आहेत, जे एकेश्वरवादाच्या मध्यवर्ती, पायाभूत, कळीच्या तत्त्वांच्या स्वरूपाचे आहेत. त्यांच्याविषयी सत्य, प्रमाण ज्ञान प्राप्त होऊ शकते, होते हे आपण उच्च कोटीच्या निश्चितीने, हमखासपणे म्हणू शकतो, हे सांगायला हवे. किंबहुना, सामाजिक शास्त्रे, राज्यशास्त्र वा नीतिशास्त्र यांच्या विषयांमध्ये प्राप्त होणाऱ्या ज्ञानाच्या निरपवाद व एकमेव सत्यत्वाविषयी जेवढी हमखास खात्री आपण बाळगू शकतो त्यापेक्षाही काकणभर जास्त खात्री आपण वरील मुद्द्यांच्या संदर्भात बाळगू शकतो. लौकिक व्यवहाराशी संबंधित बहुतेक मुद्द्यांच्या बाबतीत कृती करण्यास ज्या दर्जाची निश्चितता, प्रामाण्य वा सत्यत्व हे पर्याप्त व समर्थनीय

प्रत्यक्षात मानले जाते त्यापेक्षा तर कितीतरी जास्त प्रमाणात वरील मुद्द्यांच्या बाबतीत प्राप्त होणारे ज्ञान हे सत्य, प्रमाण व निश्चित आहे असे खात्रीपूर्वक म्हणता येते. या बाबतीत सर्व प्रस्थापित धर्मांची साक्ष काढता येईल. सर्व धर्मांनी प्रसृत केलेली सर्व उदात्त सार्विक (universal) सत्ये, दैवी प्रकटने म्हणून त्यांचे सत्यत्व व प्रामाण्य अधिक दृढ व निःशंक केले जात असले तरी, स्वतंत्रपणे अर्थपूर्ण व मजबूत आहेत हे सर्वमान्य आहे. दैवी प्रकटनांद्वारा ती प्रतीत व प्राप्त झालेली आहेत असे म्हटल्याने त्यांच्या प्रामाण्याला जास्त बळकटी प्राप्त होते ही गोष्ट खरी. आधीच ओळख पटलेल्या आणि स्वीकृत झालेल्या सत्यांवर, ती सत्य व प्रमाण होत म्हणून शिक्कामोर्तब करण्यासारखा त्यांचा परिणाम असतो. 'दैवी प्रकटने' म्हणून ती सादर करण्याचे ते विशेष प्रयोजन म्हणता येईल. कोणत्याच प्रस्थापित धर्मांना पायाभूत असलेल्या दैवी प्रकटनांबद्दल, ती स्थलकाल, भाषा व लोकसमूह निरपेक्ष, सनातन प्रकटने आहेत असा दावा करता येत नाही. विशिष्ट भाषा बोलणाऱ्या, विशिष्ट लोकसमूहात, विशिष्ट भूप्रदेशात आणि काळी त्यांचा उदय झाला. त्यांच्या उत्कर्षाचा नि विकास-विस्ताराचा एकेक इतिहास आहे. कोणता धर्म खरा वा श्रेष्ठ यावरून त्यांच्यामध्ये कलह व चुरस आहे. 'दैवी प्रकटना'वर आमचा धर्म उभारलेला आहे हा दावा प्रत्येकाला इतरांच्या संदर्भात खपवून घेणे त्यामुळे भाग पडते. या समान पायावर प्रत्येक प्रस्थापित धर्माने आपापली वैशिष्ट्यपूर्ण इमारत उठविली आहे.

पुढे येणाऱ्या युक्तिवादाच्या ओघात हा मुद्दा अधिक चांगल्या प्रकारे स्पष्ट होईल. आमची दृष्टी व भूमिका स्पष्ट होण्याच्या दृष्टीने एवढे पुरेसे आहे. पुढील सर्व विवेचनाचे हे आधारसूत्र आहे असे म्हणायला हरकत नाही. माझ्या सर्व शंकांची समाधानकारक उत्तरे मिळाल्यावरच मी श्रद्धा स्वीकारीन यावर अडून राहणाऱ्या शंकेखोराला एवढे उत्तर पुरेसे आहे.

धर्माची दोन अंगे असतात. एक व्यावहारिक आणि दुसरे तात्त्विक. लौकिक, दैनंदिन जीवनात हरएक प्रसंगी कसे आचरण करावे, कोणते विधिनिषेध पाळावेत, कोणचे नियम अनुसरावेत हे धर्म जसे सांगतो तसेच मनात उठणाऱ्या सर्व प्रश्नांची औपपत्तिक, आधिभौतिक ( metaphysical ) उत्तरे संगतवार आपणाजवळ आहेत असेही प्रत्येक धर्माचे म्हणणे असते. हा मुद्दा स्पष्ट करून घेण्यासाठी आपण आत्ताच फार मोठा वेळ दवडण्याचे कारण नाही. धर्मचिकित्सा करणारे पुष्कळ वेळा असे गृहीत धरून चालतात की केवळ या औपपत्तिक, आधिभौतिक मांडणीचीच गंभीर चिकित्सा करणे पुरेसे आहे. तर, इतर अनेक, कर्तव्यपालनात मार्गदर्शनासाठी धर्माकडे वळत असताना धर्म आणि नीतिनियम ही एकच गोष्ट आहे, व्यावहारिक नीतिनियम म्हणजेच तेवढा धर्म, पुरस्कृत आचार, कर्मकांड, विधी यांचा समग्र संच म्हणजेच धर्मप्रणाली असे मानतात. या दोन्ही धारणा गफलतीच्या आहेत हे येथे आम्हाला स्पष्ट करावयाचे आहे. पुढील जंत्रीवरून नजर टाकणाऱ्या प्रामाणिक अभ्यासकाच्या ध्यानी येईल की, सर्व प्रस्थापित धर्मप्रणालींनी धर्माचे हे दुहेरी स्वरूप मान्य केलेले आहे. मानव म्हणून आपली जी समान आध्यात्मिक स्वभावप्रकृती आहे, ती आपणास एकाच वेळी व्यावहारिक वर्तणुकीचे यमनियम, आचारधर्म, कर्मकांड, विधिनिषेध यांच्या मांडणीला प्रवृत्त करते आणि दुसरीकडे अमूर्त, आधिभौतिक तत्त्वचिंतनासही उद्युक्त करते. त्या स्वभावप्रकृतीचा पिंडच असा अटळपणे दुहेरी आहे. प्रत्येक धर्मप्रणालीला ही दोन अंगे असतातच असतात. ही याची निदर्शक गोष्ट आहे.

एवढ्या प्रास्ताविक विवेचनानंतर विशुद्ध एकेश्वरवादाच्या प्रणालीवर ज्यांची पूर्ण निष्ठा आहे त्यांच्या धर्मश्रद्धेची प्रमुख तत्त्वे कोणती, त्यांची मांडणी करण्याकडे वळावयास हरकत नाही. सर्व धर्मांच्या मुळाशी वा गाभ्याशी एकेश्वरवादाची ही मुख्य तत्त्वे आढळतात. सर्व वंशांच्या व धार्मिक श्रद्धांच्या व्यक्तींची निष्ठा प्राप्त करण्याचा अधिकार या धर्मांना त्यांच्याच आधारे प्राप्त होतो. जेवढ्या मोकळेपणाने व काटेकोरपणे या मुख्य तत्त्वांची मांडणी आम्हाला करता येईल तेवढी करण्याचा यत्न करू.

१. आपल्या मानवी स्वभावप्रकृतीचा धार्मिक वा आध्यात्मिक प्रवृत्ती हा एक घटक भाग आहे. मानवी आत्म्याच्या काही आध्यात्मिक भुका असतात आणि त्याला काही आध्यात्मिक इंद्रिये असतात. त्यांच्या द्वारा त्याचा संबंध आत्म्यांच्या विश्वाशी प्रस्थापित होतो, आणि मनुष्य स्वभावतःच ईश्वरसन्मुख होतो, ईश्वराशी तादात्म्य पावण्यास प्रवृत्त होतो. सर्व कालखंडांमध्ये

अनुक्रमणिका

आणि सर्व देशांमध्ये आणि सर्व वंशांच्या मानवांमध्ये एक ना एका प्रकारची धार्मिक उपासना आढळत आलेली आहे. तसेच, स्वत:च्या अतीत असलेल्या एका गूढ व पवित्र शक्तीच्या कृपाप्रसादावर अवलंबून असलेला आपण एक जीव आहोत ही सर्व मानवांच्या ठायी वास करीत असलेली उत्स्फूर्त आंतरिक नैतिक जाणीव हाही अनुभवाचा, आत्मप्रत्ययाचा भाग आहे. मानवी स्वभावप्रकृतीला एक धार्मिक-आध्यात्मिक अंग आहे ही गोष्ट यावरून सिद्ध होते.

२. धार्मिक सिद्धान्तांच्या बाबतीत, गणिती सूत्रांच्या आधारे पायरीपायरीने सिद्ध करीत नेलेल्या निष्कर्षांच्या विषयी ज्या ठामपणे व खात्रीने आपण ते निष्कर्ष निरपवाद प्रमाण आहेत असे म्हणू शकतो तेवढा ठामपणा व खात्री धार्मिक सिद्धान्तांच्या बाबतीत बाळगता येत नाही, ही गोष्ट खरी आहे. पण आत्मप्रत्ययाच्या गोष्टींविषयी आपण जेवढ्या ठामपणे व खात्रीने बोलतो तेवढा ठामपणा व खात्री धार्मिक सिद्धान्तांविषयी प्राप्त होऊ शकते. धर्माच्या ज्या मध्यवर्ती व महत्तम बाबी आहेत त्यांच्या सत्यत्वाविषयी सामाजिक शास्त्रांच्या विषयांत शक्य असते त्यापेक्षा खूपच जास्त खात्री बाळगता येते. व्यवहारातल्या सर्वांत महत्त्वाच्या बाबींच्या संदर्भात कृती करण्यासाठी जेवढी निश्चितता माणसाला पुरेशी वाटते त्यापेक्षा तर कितीतरी अधिक निश्चितता धार्मिक बाबींच्या बाबतीत असते. धार्मिक मुद्दे / बाबी या व्यामिश्र, जटिल स्वरूपाच्या असतात. जशा सामाजिक व राजकीय घटना असतात तशा. त्यात पुन्हा धार्मिक मुद्द्यांचा संबंध पारलौकिक गोष्टींशी असतो. त्यामुळे, आपल्या दृष्टीची किंवा जाणून घेण्याच्या क्षमतेची मर्यादा ध्यानात घेता, या विषयांमध्ये लौकिक व्यवहाराच्या पातळीवर हेच नीतीला धरून होय असे म्हणण्याइतक्या ठामपणापेक्षा जास्त पक्के ज्ञान प्राप्त होणे शक्य कोटीतले नाही.

३. धर्माच्या विषयात मोडणारे काही प्रश्न अनाद्यंत स्वरूपाचे असल्याने ते अखेरपावेतो कूटच राहतात. मनुष्याचे मानस अशा एका विशिष्ट घडणीचे बनलेले आहे की, या प्रश्नांच्या उत्तरादाखल, अस्तिपक्षी वा नास्तिपक्षी, हीच भूमिका एकमेव, निर्विवादपणे खरी अशा निष्कर्षावर बुद्धी तर्काच्या शिडीवरून पोचू शकत नाही, पण या दोन टोकांमधील सुवर्णमध्याच्या स्वरूपातल्या भूमिकेवरही ते स्थिर होऊ शकत नाही. या कूट प्रश्नांचे हे एक वैशिष्ट्यच आहे. विश्वाची उत्पत्ती, मनुष्याची उत्पत्ती, निर्मित विश्व व ईश्वर यांच्यातील संबंध, द्रव्यपदार्थात्मक जड सृष्टी व मन वा आत्मा यांचा परस्परसंबंध हे असे काही कूट प्रश्न आहेत.

या कूट प्रश्नांची नि:शंक व निर्विवाद सोडवणूक करण्यास आपण असमर्थ आहोत, कारण सीमित क्षमतेच्या बुद्धीच्या आवाक्यापलीकडचे ते प्रश्न आहेत अशी प्रांजळ कबुली एकेश्वरवादी देतो. पण यांपैकी काही बाबींच्या विषयी तो दृढ नैतिक निष्ठा बाळगतो. जीवन व मरणोत्तर अस्तित्व यांच्या दृष्टीने त्या निष्ठा पर्याप्त आहेत.

४. शिवाय, इतरही काही प्रश्न आहेत ज्यांची सर्व अंगोपांगे व पूर्ण आवाका आपल्या आजच्या सीमित क्षमतांच्या कवेत येऊ शकत नाही. त्यांच्याविषयी कोणताच अंतिम निष्कर्ष काढता येत नाही अशा प्रकारची अगतिक अवस्था आपली होत नसली तरी, आपण केवळ अंतर्यामीच्या जाणिवेच्या ( intuitively ) आधारे निर्णय करीत नसलो तरी, आणि उपलब्ध पुराव्याच्या आधारे आपण एका या वा त्या दिशेने ठामपणे भूमिका घेत असलो तरी, आपला निष्कर्ष वा आपली भूमिका योग्य आहे याविषयी पूर्ण नि:शंकता आपणास प्राप्त होत नाही. आपणास पडणाऱ्या शंकांचे कायमचे निरसन अशक्यच राहते. ज्ञान प्राप्त करण्याची व श्रद्धा बाळगण्याची एक शर्त म्हणून एकेश्वरवादी ही शंकित स्थिती नम्रपणे स्वीकारतो, आणि स्वत:ला या स्थितीशी जुळवून घेतो. शारीर व नैतिक दुरिताचा उद्गम, माणसाच्या वाट्याला आलेले अपूर्ण स्वातंत्र्य, देहापासून वेगळे झाल्यावरची आत्म्याची नेमकी स्थितिगती, त्याचे पूर्व अस्तित्व ( देहात वास करीत नव्हता तेव्हाचे ) हे असे काही प्रश्न आहेत ज्यांची उत्तरे दिल्यावरही, न फिटणाऱ्या शंका मनात शिल्लक राहतातच.

५. मानवाच्या धार्मिक जाणिवेची दोन अंगे आहेत. एक बौद्धिक, चिंतनात्मक तत्त्वज्ञानाशी निगडित व त्या अंगाने प्रगत होत जाणारे. दुसरे व्यावहारिक. हे अंग आपल्या स्वभावातील नैतिक घटकाशी संलग्न आहे. धर्मशास्त्रे व नीतिप्रणाली अनेक आहेत. पण वस्तुत: एकाच धर्माचे व नीतीचे ते सारे विभिन्न आविष्कार आहेत. ईश्वराविषयीची भक्ती आणि मानवमात्रा-








विषयीचे प्रेम, या दोन गोष्टी वस्तुत: वेगळ्या करता येण्याजोग्या नाहीत; एकाच नाण्याच्या त्या दोन बाजू आहेत. तरी परंतु, आपल्या स्वभावप्रकृतीतील दोन वेगळ्या परंतु संलग्न घटकांपासून त्यांची निर्मिती होते. यांपैकी धार्मिक वृत्ती ही मनुष्य स्वभावात अधिक खोलवर व बलिष्ठ असल्याकारणाने, नैतिक आदर्शाच्या जडणघडणीवर तिचा मोठा प्रभाव आढळतो. व्यवहारी जीवनात नीतीला धरून वर्तन घडवून आणण्याच्या बाबतीत तिचे वजन व अधिसत्ता यांची महत्त्वपूर्ण भूमिका असते.

६. द्रव्यपदार्थात्मक जड सृष्टी आणि मानवाचे जीवन यांचे नियमन व नियंत्रण करणारी जी जगत्‌चालक शक्ती, तिच्या स्वरूपाविषयी माणसाच्या धार्मिक जाणिवेने जी कल्पना केलेली आहे तिचा क्रमश: धिम्या गतीनेच विकास होत जाणार आहे ही एकेश्वरवाद्याची श्रद्धा आहे. मानवी मन जसजसे अधिक अधिक प्रबुद्ध व प्रगल्भ बनेल, उच्च कोटीच्या कल्पना ग्रहण करण्याची क्षमता जशी प्राप्त होत जाईल तसतसे जगदीश्वर एकच आहे हे एकेश्वरवादातील मध्यवर्ती तत्त्व माणसे पायरीपायरीने जाणतील, ते त्यांच्या आवाक्यात येईल.

७. एका ईश्वराबद्दलच माणसाने पूज्य भाव, श्रद्धा व प्रेम बाळगावे याची शिकवण माणसाला देणे; आपल्या सहजप्रवृत्ती, बुद्धी, सदसद्‌विवेक, आणि धार्मिक भावना यांच्या माध्यमातून हाती लागणाऱ्या ईश्वरी नियमाचे माणसाने स्वेच्छया व जाणीवपूर्वक पालन करावे ही शिकवण माणसाला देणे; या पृथ्वीवरील वास्तव्यात माणसाने ईश्वराचा चांगुलपणा शक्यतोवर आत्मसात करून सदाचरणी बनावे ही शिकवण देणे; आणि उच्चतर अस्तित्वासाठी पात्रता कमावण्याची शिकवण देणे हे धर्माचे लक्ष्य व तोच धर्माचा विषय आहे अशी एकेश्वरवाद्यांची धारणा आहे.

८. या जगात आपण शेवटी असाहाय्य आहोत नि आपण परतंत्र आहोत ही माणसाच्या ठायी आढळणारी जाणीव, हे भान एका केवलस्वरूपी ईश्वराच्या अस्तित्वाची द्योतक आहे अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. त्या ईश्वरावर आपले जिणे अवलंबून असते. ईश्वराच्या अस्तित्वाची कल्पना, अशा रीतीने, अंतर्यामीची जाणीव व विवेक दोन्हींच्या द्वारे आपणास प्राप्त होते, आणि या अर्थाने ती स्वाभाविक, नैसर्गिक आहे. या नैसर्गिक जाणिवेची पुष्टी प्रागनुभविक तसेच अनुभवपश्चातगामी (a posteriori) ज्ञानप्रक्रियेद्वारा होते. इतिहासाची साक्षही ईश्वराच्या अस्तित्वाच्या बाजूने पडते. निसर्गसृष्टीच्या अवलोकनानेही तिची पुष्टी होते, आणि प्रबुद्ध सदसद्‌विवेकाचा निवाडाही ईश्वर अस्तित्वात आहे या बाजूने होतो.

ईश्वराच्या अस्तित्वाची कल्पना आणि माणसाचे आत्मभान यांचा एक अटळ अन्योन्यसंबंध आहे; माणसाचे आत्मभान अटळपणे ईश्वराचे अस्तित्व कल्पिते, आणि ती कल्पना केल्यावरच त्या आत्मभानाला परिपूर्णता व समाधान प्राप्त होते. यात कोणत्याही प्रकारचा अंतर्विरोध नाही. ईश्वराची जी कल्पना येथे समोर येते ती अशी : ईश्वर आहे; तो सचेतन व्यक्तित्व वा आत्मा आहे; तो सर्वश्रेष्ठ आहे; तो आदिकारण आहे; तो स्थलकालातीत व अनाद्यंत आहे, त्याला काळाचे वा अवकाशाचे बंधन नाही; तो या विश्वाचा सर्वोच्च अधिपती आहे व त्याच्याच कृपेच्या बळावर विश्वातील सर्व व्यवहार चालतात; तो सर्वशक्तिमान आहे, सर्वाधिक शहाणा आहे, चांगुलपणामध्ये तो सर्वाहून उजवा आहे, तो प्रेममय आहे, परमपवित्र व परमन्यायी आहे; सर्व मानवी आत्म्यांचा तो अधिपती, पिता, न्यायाधीश आणि नैतिक नियंता आहे.

९. ईश्वर ही एक केवळ शक्ती वा सत्ता नाही. द्रव्यपदार्थापासून निर्माण झालेली, उत्क्रांत होत गेलेली, आणि विकास पावलेली निसर्गसृष्टी म्हणजे ईश्वर नाही. ईश्वर म्हणजे या सृष्टीचे बीजरूप नव्हे; सृष्टीचा आकार धारण करण्याची क्षमता असलेले चैतन्य बीज किंवा स्रोत नव्हे. पृथ्वी, आप, तेज, वायू ही महाभूते, किंवा विश्वातील चंद्र, सूर्य, तारे म्हणजे ईश्वर नव्हे. किंवा निसर्गसृष्टीतले तत्त्व म्हणजे ईश्वर नव्हे. ईश्वर अनेक नाहीत. किंवा देवदेवतांची एक श्रेणी नाही. सुष्ट आणि दुष्ट अशा दैवी शक्ती नसतात. प्रकाश आणि तिमिर, द्रव्य नि चैतन्य, प्रकृती (माया) आणि पुरुष अशा दोन परस्परविरोधी तत्त्वांमध्ये गोष्टी विभागलेल्या नसतात. ईश्वर एकमेव आहे. एकाच्या जागी दोन वा अनेक नाहीत. ती त्रयी नाही की दुक्कल नाही. तो आत्मरत ब्रह्माही नाही, ज्याची समाधी लागलेली असते, आणि द्रव्य व चेतनरूप सृष्टीतल्या घडामोडींविषयी जो उदासीन असतो.

अनुक्रमणिका

१०. ईश्वर आणि भौतिक विश्व यांच्यातील संबंधाचे नेमके स्वरूप काय हे एक गूढ आहे; या रहस्याचा भेद करण्याइतके ज्ञान आपणास नाही. शून्यातून भौतिक विश्वाची निर्मिती झाली अशी कल्पना करणे शक्य नाही. आपल्या सीमित आकलनाच्या मर्यादेत आपण विश्व अस्तित्वात नव्हते अशा काळाची, किंवा विश्वाच्या जन्माच्या क्षणाची, किंवा ईश्वर व विश्व हे तेवढेच अनाद्यंत, सनातन आहेत अशी, यांपैकी कोणतीच कल्पना करू शकत नाही. हे विश्व हा केवळ ईश्वराच्या विस्तारित अस्तित्वाचा आविष्कार आहे वा विश्व हे ईश्वरापासूनच निर्माण झाले वा ईश्वराचाच तो एक विस्तार आहे असे आपण म्हणू शकत नाही. हे विश्व केवळ भासरूप आहे, केवळ माया आहे, त्याला खरे अस्तित्व नाहीच; आपल्या अविद्येमुळे आपणास ते वस्तुतः वेगळे आहे असे दिसते, असेही म्हणणे योग्य नाही. हे गूढ उकलण्यास आपण असमर्थ आहोत ही कबुली मोकळेपणाने देत असतानाच ईश्वरी इच्छेनुरूप या सृष्टीला आकार प्राप्त झाला आहे आणि तीच सृष्टीचे नियमन करते याविषयी त्याची खात्री आहे. या सृष्टीची रचना कौशल्याने केलेली आढळते. सजीव व निर्जीव द्रव्यपदार्थांची अनेकविध रूपे व कार्ये, त्यांचे अस्तित्व, त्यांचे जीवन व त्यांची गती, या सर्व गोष्टी असे दर्शवितात की कोणी एक प्रज्ञावान व्यक्ती सक्रियपणे या विश्वाच्या व्यवहारांचे सूत्रचालन करीत आहे आणि ही व्यक्ती परम कृपाळू व दयाळू आहे. सर्व व्यवहारांचे सूत्रचालन तो ईश्वर स्वतःच्या विचारे काही हेतूंच्या पूर्ततेसाठी करीत आहे. स्थलकालात सर्वत्र क्रियाशील स्वरूपात, प्राणभूत स्वरूपात त्याचा प्रभाव ओतप्रोत आढळतो. ईश्वर सदैव सर्वत्र उपस्थित असतो. जड सृष्टीत वृद्धी, क्षय ही प्रक्रिया अखंड चालू असते. जड सृष्टी नित्य नवनवोन्मेषशाली आढळते. ईश्वराच्या शक्तीचे आपल्या इंद्रियांना प्रतीत होणारे हे दर्शन आहे. द्रव्यपदार्थाचे अस्तित्व, जीवन व त्याची गती ईश्वरामुळे आहे. या भौतिक-सेंद्रिय व सचेतन सृष्टीतील विभिन्न पदार्थांच्या यदृच्छया घडणाऱ्या, यांत्रिक, रासायनिक, जीवनसंवर्धक, सहजप्रवृत्ती-प्रेरणात्मक, आणि बौद्धिक प्रकारच्या हालचालींद्वारा, क्रियाकलापांच्या द्वारा कमीअधिक प्रमाणात ईश्वरी प्रभावच प्रकट होत असतो. त्या त्या गोष्टीच्या ठिकाणी मुळात तिची निर्मिती करताना ईश्वराने जी क्षमता बहाल केलेली असेल त्यानुसार ईश्वरी प्रभाव प्रकट होत असतो.

११. मानवी देहात वास करीत असलेल्या मानवी आत्म्याचे स्वयंभू अस्तित्व असते; त्याला भौतिक स्वरूपाचा आकार नसतो वा भौतिक स्वरूपाच्या क्रिया तो करीत नाही अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. बोधना, तर्क व संकल्प या आत्म्याच्या विभिन्न शक्ती आहेत. आत्म्याला सुख व क्लेश/वेदना यांच्या संवेदना होतात, योग्य–अयोग्याचा एक उपजत विवेक आत्म्याच्या ठायी आढळतो इत्यादी. हीपण एकेश्वरवाद्याची धारणा असते. आत्मा अविनाशी असतो; मृत्यूमुळे देहापासून तो वेगळा होतो. मानवी आत्मा ईश्वराशी एकरूप असतो, वा तो ईश्वराचाच अंश असतो, आणि आत्मा व ईश्वर या गोष्टी केवळ अविद्येपोटी माणसाला वेगळ्या दिसतात अशी एकेश्वरवाद्याची धारणा नाही. मानवी आत्म्याचे स्वतंत्र पण गौण असे अस्तित्व आहे; तो ईश्वरापासून उत्पन्न होत नाही वा तो ईश्वराचेच रूप नाही ही एकेश्वरवाद्याची धारणा आहे. जेवढी माणसे आहेत तेवढे आत्मे आहेत अशी एकेश्वरवादी धारणा आहे. आत्म्याविषयीच्या या विभिन्न धारणांच्या व्यावहारिक सत्यत्वाप्रामाण्याविषयी खात्री बाळगण्याइतका पुरावा असला तरी, सर्व प्रकारच्या शंका व अडचणी निवारण्याची असमर्थता एकेश्वरवादी मोकळ्या मनाने स्वीकारतो. आत्म्याचा उद्गम, त्याचे अस्तित्व वा त्याचे अंतिम निवासस्थान, त्याचे ईश्वराशी असलेले नाते; आणि ईश्वराने आत्मा निर्माण केला का किंवा ईश्वर व आत्मा यांचे अस्तित्व सनातन आहे का, यांपैकी कोणत्याच गोष्टीविषयी परिपूर्ण व अचूक ज्ञान स्वतःला असल्याचा दावा एकेश्वरवादी करीत नाही. द्रव्यपदार्थाच्या सृष्टीत जसा ईश्वराचा प्रभाव सर्वत्र ओतप्रोत आढळतो तद्वतच आत्म्याच्या जगातही ईश्वराचा प्रभावच मानवी आत्म्याचे सारस्वरूप आणि जीवन घडवितो, आत्म्याच्या ठायी आढळणाऱ्या उच्च कोटीच्या आकांक्षा आणि त्याची उच्च कोटीची कार्ये ही ईश्वरी प्रभावाचीच द्योतक आहेत अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे.

१२. सर्वसमावेशक नि एकसारख्या दयाळू कृपादृष्टीच्या योजनेनुसार ईश्वरेच्छा जसे जड व अचेतन द्रव्याचे शासन व नियमन करते त्याचप्रमाणे

तीच ईश्वरेच्छा त्याच सर्वसमावेशक शिवाय त्याच वेळी विशेष स्वरूपाच्या दयाळू कृपादृष्टीच्या योजनेनुसार आत्मभानसंपन्न व स्वेच्छया वर्तन करणाऱ्या आत्म्यांचेही शासन व नियमन करते. दोन्ही ईश्वरी योजना ईश्वराचे माहात्म्य व श्री वाढविणाऱ्या आणि त्याच्या राज्यातील प्राणिमात्रांचे कल्याण करणाऱ्या आहेत. ईश्वरेच्छेची ही जी विशेष योजना आहे तिचे स्वरूप नैतिक अनुशासन या प्रकारचे आहे. नैतिक वर्तन केले तर आनंद वा समाधान प्राप्त व्हावे आणि अनैतिक वर्तन घडले तर दुःख व क्लेश वाट्याला यावेत या स्वरूपाची व्यवस्था आहे. या प्रकारे ते अनुशासन आपला अधिकार गाजविते. नैतिक वर्तन करणाऱ्याचा सदसद्विवेक समाधान पावतो, त्याची पुष्टी होते, तो उन्नत होतो; तर, अनैतिक वर्तन करणाऱ्याच्या सदसद्विवेकाला बोच लागून राहते, त्याचे अधःपतन होते, हाही अनुशासनाचाच एक भाग आहे. ईश्वर हा एक नैतिक शास्ता आहे ही, माणसाला स्वतःच्या इच्छेनुसार वागण्याचे एका मर्यादेपर्यंत स्वातंत्र्य आहे या वास्तवाशी विरोधी वा विसंवादी गोष्ट नाही. आपण जे वर्तन करतो त्याचे चांगले वा वाईट, कोणते परिणाम होण्याची शक्यता आहे हे जाणण्याची दूरदृष्टी माणसाला प्राप्त आहे, आणि चांगले परिणाम पदरात पडावेत व वाईट परिणाम भोगायला लागू नयेत यादृष्टीने एका प्रकारची कृती न करण्याची तर दुसऱ्या प्रकारची कृती करण्याची गोष्ट माणूस करू शकतो. ईश्वर शास्ता आहे म्हणून त्याची ही स्वतंत्रता मिटत नाही. या जगात नैतिक अनुशासनाचा दंड एकसारखेपणाने आणि पूर्णत्वाने काम करताना अनुभवाला येत नाही, पुष्कळदा परिणाम वाट्याला येण्यात काळ निघून जातो, अनैतिक कृत्ये माणसे बेधडकपणे करू शकतात व त्यांना कोणतीच सजा भोगावी लागत नाही, आणि पुष्कळदा नीतीने वागणाऱ्यांवर दुर्भाग्य ओढवते, या सगळ्या गोष्टी खऱ्या. यामुळे संभ्रम उत्पन्न होतो, मन शंकित होते ही गोष्टही बरोबर आहे. पण ईश्वरेच्छेची विशेष योजना नैतिक अनुशासनाच्या स्वरूपाची आहे या आमच्या ठाम श्रद्धेला त्यामुळे कोणतीही बाधा पोचत नाही.

१३. आपला सध्याचा जन्म, आपले वर्तमान आयुष्य हा एक कसोटीचा व पूर्वतयारीचा काळ आहे, सद्गुणी आणि पुण्यवान बनण्याची शिस्त अंगी बाणवून घेण्याचा हा उमेदवारीचा काळ आहे अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. मृत्यूने हे (पार्थिव) अस्तित्व संपुष्टात आल्यावरही अन्य क्षेत्रात व स्वरूपात आपले अस्तित्व हे टिकून राहणार आहे. या भावी अस्तित्वासाठी आपणास पात्र बनविण्यासाठी हे आयुष्य, हा जन्म आपणास लाभलेला आहे हा त्याच्या श्रद्धेचा भाग आहे. आपल्या हातून चुका होण्याची शक्यता असते. मार्गात अनेक मोहाचे प्रसंग असतात, काही आंतरिक तर काही बहिर्गत. कोणते वर्तन योग्य व सत् आहे याची जाणीव पुष्कळदा आपल्याला असते, आणि तरीदेखील आपण ती वाट सोडून भलत्या मार्गाने जाण्याच्या मोहात पडतो. या आयुष्यात आपली सत्वपरीक्षा केली जात असते, आपण पात्र बनतो आहोत की नाही हे पाहिले जात असते हेच यावरून दिसून येते. आपल्या वाटचालीत येणाऱ्या अडचणी, संकटे व पडणारे मोह यांच्यावर मात करण्यासाठी आपल्या ठायी संयम व स्वयंअनुशासन यांचे, भावी सुखासाठी आज क्लेश, दुःख सहन करण्याचे वळण अंगी बाणविण्याची गरज असते. म्हणून, आपली आत्ताची अवस्था ही केवळ सत्वपरीक्षेची नाही, ती स्वतःला शिस्त लावण्याची पण आहे. स्वानुभवाच्या आधारे स्वतःचा विकास घडवून आणण्याची, चांगल्या संवयी अंगवळणी पाडून घेण्याची व वाईट सवयी त्यागण्याची क्षमता माणसात आहे; त्याद्वारे स्वतःचे नैतिक अनुशासन तो करू शकतो, या वस्तुस्थितीने वरील निष्कर्षास बळकटी प्राप्त होते. सगळ्या सद्गुणांचे, ईश्वरेच्छेला भाविकपणे शरण जाण्याचे व्यावहारिक सूत्र नैतिक स्वयंअनुशासन हेच आहे. आपले वर्तमान आयुष्य सत्वपरीक्षेची आणि शिस्तीचे धडे घेण्याची अवस्था ठरण्यास विशेष अनुकूल व अनुरूप आहे. मोहांचे जे सापळे आपल्या इकडेतिकडे सर्वत्र लागलेले आहेत त्यांत आपण अडकू नये यासाठी आपण जे प्रयत्न करतो त्यांमधून स्वयंअनुशासनाचे वस्तुपाठ आपणास मिळतात, व आपले शिक्षण होते. व्यवहारी जगातल्या उणिवा, दोष यांचा जो अनुभव आपणास येतो त्यामुळे या भवसागरातून सुखरूपपणे तरून जाण्यासाठी आपण ईश्वराच्या कृपाप्रसादावर किती व कसे अवलंबून आहोत त्याची जाण आपल्या ठायी उत्पन्न होते. आणि सतत जे मोहाचे प्रसंग उत्पन्न होत असतात त्यामुळे चांगल्या नीतिमान सवयी अंगी बाणवून घेण्याची, त्या पक्केपणाने रुजवून

घेण्याची, आत्मसात करण्याची आपणास सुसंधी प्राप्त होते.

१४. आत्म्याच्या अमरत्वावर एकेश्वरवाद्याचा विश्वास आहे. या आयुष्यात त्याने केलेल्या कमाईनुसार परलोकामध्ये त्याच्या वाट्याला सुख वा दुःख येते हीपण त्याची धारणा आहे. ज्याच्या त्याच्या कमाईनुसार सुखदुःखाचा वाटा कसा पदरात टाकला जातो हे एक न उकलणारे गूढ आहे. या देहात वास करण्याअगोदर अस्तित्वाच्या आधीच्या अवस्थांमधून आत्म्याचा प्रवास झालेला असतो का, यानंतर अनेक पुनर्जन्मांमधून प्रवास त्याला करावाच लागतो का, आणि हे जन्म त्याला कोणत्या दर्जाचे प्राप्त होणार हे या आयुष्यातील त्याच्या वर्तनाच्या आधारे निश्चित होते का ? की पुनरुत्थान होण्याच्या दिवसापर्यंत आत्मा सुप्तावस्थेत टिकून राहतो, आणि त्या दिवशी त्याच्या मानवी देहामध्ये तो निवाड्यासाठी सादर होतो, की तो मध्यंतरीच्या काळात परिष्करणाच्या एका प्रक्रियेतून पार पडत असतो ? तसेच, आपल्या आत्म्यावर कोणत्या प्रकारचे सजीव आवरण मानवी देह गळून पडल्यावर चढविले जाते, आणि या आयुष्यानंतरच्या अस्तित्वाच्या काळामध्ये कोणत्या प्रकारच्या सुखदुःखांनी तो वेढलेला असतो ? या सर्व प्रश्नांच्या समोर एक असा पडदा आहे की जो दूर करून त्या प्रश्नांच्या उत्तरांचे ज्ञान संपादन करण्यास आपणास कायमची मनाई आहे. स्वर्ग आणि नरक यांच्या प्रदेशांविषयी कोणतीही कल्पना करण्यास आपण असमर्थ आहोत ही कबुली एकेश्वरवादी देतो. आपल्या ऐंद्रिय देहाच्या माध्यमातून अनुभवास येणारी सुखे व दुःखे आणि या प्रदेशांतील सुखे व दुःखे एकाच प्रकारची नसतात, आणि त्यामुळे आपणास त्यांची कल्पना करता येणे अशक्य आहे याविषयी त्याची खात्री पटलेली आहे. ईश्वरेच्छा म्हणजे मूर्तिमंत चांगुलपणा व दया असा त्याचा विश्वास आहे. आत्म्याच्या क्षमतांची वाढ घडवून आणणे आणि त्याच्या शक्ती परिपूर्णावस्थेस नेणे हेच उद्दिष्ट ईश्वरी शासनाचे असल्याने, कोणत्याही अस्तित्वात आलेल्या आत्म्याला निरंतर दुःखात ठेवणे, त्याला कायमचे नरकवासात लोटणे हे ईश्वराच्या कृपाळूपणाचे अंतिम फलित कोणत्याही प्रकारे नसणार अशीही त्याची श्रद्धा आहे. सान्त नश्वर जीवनातील पापांसाठी निरंतर शिक्षा भोगावी लागण्याचा सिद्धान्त एकेश्वरवादी नाकारतो. जो ईश्वर परम दयाळू, परम शहाणा व परम न्यायी आहे त्याच्या अस्तित्वाशी हा सिद्धान्त मेळ खात नाही असे एकेश्वरवाद्याचे म्हणणे आहे.

१५. स्वतःच्या कृत्यांची जबाबदारी माणसावर असण्याइतका माणूस स्वतंत्र आहे, आणि स्व-प्रयत्नांनी तो स्वतःवर विजय प्राप्त करू शकतो असा एकेश्वरवाद्याचा विश्वास आहे. त्याच वेळी, ज्या स्थलकालात त्याचा जन्म झाला त्या स्थलकालाच्या, तो ज्या समाजव्यवस्थेत जगतो त्या समाजव्यवस्थेच्या, त्याचे शिक्षण, त्याची संगत, त्याचा पिंड व त्याची वासनाविकारमय प्रकृती या सर्वांच्या प्रभावाने त्याच्या स्वातंत्र्याबर प्रत्यक्षात मर्यादा पडतात ही गोष्ट स्वीकारायला एकेश्वरवादी मोकळेपणाने तयार असतो. विभिन्न धर्मप्रणालींमध्ये या प्रभावाचे स्पष्टीकरण वेगवेगळ्या प्रकारे दिले गेलेले आहे. पूर्वजन्मांमध्ये केलेल्या कृत्यांचा प्रभाव– कर्म व प्रारब्ध– या प्रकारे, तसेच, द्रव्यपदार्थांच्या सात्त्विक, राजसिक व तामसिक अशा त्रिगुणात्मक प्रकृतीचा परिणाम, सुष्ट व दुष्ट या तत्त्वांमधील संघर्ष, देव व असुर यांच्यातील कलह, नशीब वा विधिलिखित या विभिन्न प्रकारे याचे स्पष्टीकरण दिले जाते. माणसाला अमर्याद स्वातंत्र्य असते हे एक टोक, तर सर्व काही विधिलिखिताप्रमाणेच घडून येते हे दुसरे टोक; या दोन्ही टोकांच्या भूमिका, सरळ सरळच, तपासणीत टिकणाऱ्या नाहीत. या दोन्ही टोकांच्या भूमिका टाळून एकेश्वरवादी मधली भूमिका घेतो.

१६. नैतिक दूरिताचे (evil) अस्तित्व जगात का असावे याचे बुद्धीला पटेल असे स्पष्टीकरण आपण देऊ शकत नाही याची कबुली एकेश्वरवादी मोकळ्या मनाने देतो. भौतिक दुरित म्हणजे ते की जे अपूर्ण ज्ञानाच्या कारणाने उत्पन्न होते; अज्ञानापोटी वा अर्धवट ज्ञानापोटी माणूस जी कर्मे करतो त्यातून ते अस्तित्वात येते. तर नैतिक दुष्टावा हा परिपूर्ण ज्ञान असतानाही, जाणूनबुजून केलेल्या वाईट कृत्यांपासून अस्तित्वात येतो. अशा स्वरूपाचे दुरितही जगात आढळते. ईश्वरी योजनेत याचे अस्तित्व का असावे याचे एकच समाधानकारक स्पष्टीकरण संभवते. ते असे की, माणसाची सत्वपरीक्षा घेण्यासाठी व त्याचे शील घडविण्यासाठी दुरिताचे अस्तित्व ईश्वराने योजिले आहे. जीवनाच्या मार्गावर दुरितांचा 'अडथळा' नसता तर सत्वपरीक्षा

वा शील घडणे या गोष्टी अशक्यप्रायच होत्या. नैतिक दुरिताकडे एकेश्वरवादी असे बघतो. एकेश्वरवादी माणूस स्वतःच्या इच्छेने स्वयंनिर्णयातून कृती करू शकतो याचा अर्थ त्याच्या हातून पाप घडणारच असे निष्पन्न होत नाही. तथापि, पाप नावाची गोष्ट वास्तवाचा एक भाग आहेच हे एकेश्वरवादी मान्य करतो. तो एक आभास आहे, किंवा पाप म्हणजे केवळ एक अभाव आहे, वा केवळ अपूर्णतेला वा अजाणता हातून घडलेल्या चुकीला दिलेले ते नाव आहे, किंवा द्रव्यपदार्थाचा तो एक गुणधर्म आहे, किंवा ते असत्य आहे, वा तो एक भ्रम आहे; थोडक्यात, ज्याला पाप म्हटले जाते ते पापच नाही, असे स्पष्टीकरण देऊन पाप या बाबीचा निरास होऊ शकत नाही ही एकेश्वरवाद्याची खात्री आहे. जगात जे पाप आढळते त्याचे प्रयोजन काय, त्याचा उद्‌गम कशात आहे आणि त्याचे अंतिम कारण ( final cause ) काय हे एक गूढ असून, ईश्वरी योजनेमागील हेतूंचे आकलन करून घेण्याच्या आपल्या दृष्टीची मर्यादा ध्यानात घेता, हे गूढ उकलेल ही गोष्ट केवळ अशक्य आहे.

१७. मानववंशाला जन्म देणाऱ्या मूळ जनकांनी केलेल्या आज्ञाभंगामुळे मनुष्याच्या आत्म्याला जन्मतःच पापाची कीड लागलेली असते, पाप त्याच्या मूळ पिंडाचाच एक अविभाज्य घटक आहे, आणि या अर्थाने त्याचे अस्तित्वच मूलतः पापाने डागाळलेले आहे या सिद्धान्ताला (doctrine of original sin) वास्तवात काही आधार नाही. आणि, ईश्वराच्या दरबारात केला जाणारा न्यायनिवाडा हा विशुद्ध व निष्पक्ष समत्वबुद्धीने केला जातो म्हणजेच तो परिपूर्ण नैतिक असतो या धारणेशी हा सिद्धान्त सुसंगत नाही अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे.

१८. काही आत्मे स्वर्गसुख अनुभवणार आणि काहींच्या वाटचाला कायम नरकयातना येणार हे पूर्वनिश्चितच असते, तो ईश्वरी निर्णय असतो आणि त्यात (माणसाच्या चांगल्या वा वाईट कृत्यांनी) काडीचाही फरक पडत नाही, या सिद्धान्ताला वास्तवात कोणताच आधार नाही, आणि ईश्वराच्या परिपूर्ण प्रतिमेशी तो विसंवादी आहे अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे.

१९. प्रार्थना हा एक सदाचार आहे, आणि मानवी अंतःकरणाच्या आध्यात्मिक उन्नयनासाठी नित्याचे कर्तव्य म्हणून रोज प्रार्थना करून ईश्वराशी लीन व्हावे ही माणसाची सर्वोच्च गरज आहे ही एकेश्वरवाद्याची श्रद्धा आहे. आयुष्यात जे पेच उत्पन्न होतात, ज्या आपत्ती ओढवतात त्यातून योग्य वाट काढता येण्यासाठी ईश्वराचे साहाय्य आपणास मिळावे, सदाचारी व पुण्यवान बनण्याची वाट आपणास दिसावी यासाठी, त्याच्या प्रकाशाने आपले जीवन उजळावे यासाठी आपण प्रार्थना केली पाहिजे. प्रार्थना करून आपण आपले कर्तव्य पार पाडावे. आपल्या कल्याणाच्या दृष्टीने सगळ्यात इष्ट काय हे जाणणाऱ्या ईश्वराच्या इच्छेवर प्रार्थनेचे फळ काय मिळणार ही गोष्ट पूर्णपणे सोपवावी.

२०. अंतःकरणपूर्वक झालेल्या व चिरस्थायी पश्चात्तापाने आत्म्याची शुद्धी होते. पश्चात्तापामध्ये हा गुण आहे ही एकेश्वरवाद्याची धारणा आहे. क्षणिक पश्चात्ताप वा मृत्युशय्येवरील पश्चात्ताप कोणताही चिरस्थायी परिणाम घडवून आणू शकत नसल्याने, अशा पश्चात्तापामध्ये सद्‌गुणाचा अंश असलाच तर फार थोडा असतो. पश्चात्तापाचा काही उपयोग व्हायचा असेल तर, त्यापोटी दृढ निर्धार उत्पन्न व्हायला हवा. मुळात ज्या दुबळेपणापोटी मोहाला बळी पडून आपल्या हातून गैरकृत्य घडलेले असते, आणि ज्याचे आपल्याला दुःख झालेले असते, तसा मोहाचा प्रसंग परत उपस्थित झाल्यास मोहापासून परावृत्त होण्याइतके बळ उत्पन्न करण्यात त्या पश्चात्तापाचा परिणाम दिसून यायला हवा. केलेल्या कृत्यांबद्दलचा विषाद व पश्चात्ताप यांनी आत्म्याची शुद्धी झाली असे आपण तेव्हाच म्हणू शकतो जेव्हा नंतरच्या काळात नीतीच्या मार्गावरून दृढपणे वाटचाल करण्याची शक्ती आपणात पुन्हा वाढली असल्याचे आपल्या प्रत्ययाला येते. आता पश्चात्ताप करण्यात काही अर्थ नाही, फार उशीर झाला, अशी परिस्थिती कधीच नसते. ईश्वराची कृपा ज्या अवचितपणे आपणास लाभते आणि तिचा जो प्रभाव पडतो त्याची आपण कोणीच आधी कल्पना करू शकत नाही. आपल्या हातून पाप घडते तेव्हा आपला उद्धार होण्यासाठी या कृपेचा हातभार प्राप्त व्हावा यासाठी आपण नित्य प्रार्थना केली पाहिजे.

२१. ईश्वराच्या कृपाप्रसादानेच माणसाला मोक्षप्राप्ती होते अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. ईश्वरावरील निष्ठा, त्याची भक्ती, प्रार्थना आणि ईश्वरेच्छा प्रमाण मानण्याची नम्रता; मानवमात्रा-

विषयी व ईश्वराविषयी प्रेमभाव, जो वरील गोष्टींनी आपल्या अंतःकरणात प्रमुदित होतो; आणि सदाचारी पुण्यशील वर्तन यांच्याद्वारा ईश्वराचा कृपाप्रसाद आपण प्राप्त करतो. प्रेम व भक्ती यांचा अभाव असतो तेथे केवळ पश्चात्ताप, दानधर्माची बाह्य कृत्ये, कठोर देहदंडात्मक साधना, आपल्या खऱ्या स्वरूपाविषयी व ईश्वराशी असलेल्या एकरूपतेविषयीचे ज्ञान, यज्ञयाग व पूजापाठ या गोष्टी सद्गुणस्वरूप असतात, त्यांचा मोक्षप्राप्तीच्या दृष्टीने मोठा उपयोग असतो यावर एकेश्वरवाद्याचा विश्वास नसतो. विभिन्न धर्मप्रणालींमध्ये मोक्षप्राप्तीची साधने म्हणून या व इतर साधनांच्या परिणामकारकतेवर फार भर देण्यात आलेला आहे. आणि, मोक्षप्राप्तीसाठी साहाय्यभूत म्हणून वरील सर्व गोष्टी करणे उपयोगाचे आहेही. तरी परंतु, ईश्वरभक्ती व मानवमात्रावर प्रेम यांच्या अभावी या सर्व साधने-उपाय यांची मौलिकता विशेष नाही अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे.

२२. सर्व स्त्री-पुरुष ही ईश्वराची सारखीच लेकरे आहेत, त्यांच्यात कोणत्याही प्रकारचा उच्चनीच, कमीजास्त असा भेदभाव नाही हे एकेश्वरवाद्याच्या निष्ठेचे एक मध्यवर्ती, प्राणभूत तत्त्व आहे. ईश्वराच्या कार्याला माणसाने आपल्या कल्पना वा इच्छा यांच्यानुसार बंदिस्त करू पाहणे अयोग्य आहे. पृथ्वीवरील सर्व चराचरांमध्ये, आणि प्रत्येक राष्ट्रात, ईश्वराचा संचार आहे. जो ईश्वराविषयी धाक बाळगतो आणि नीतीने वागतो त्याचा स्वीकार ईश्वर करतो.

२३. माणसाचा आत्मा स्वयंमनुशासन आणि ईश्वरशरणता यांच्या योगे सत्वपरीक्षा पार करतो व त्याला शुद्धावस्था प्राप्त होते. अशा परिशुद्ध आत्म्याचे शील असे घडते की त्यामुळे, देहात वास करीत असताना, आणि देह त्याग केल्यावर, देहाचे वासनाविकार व भोग यांच्या जंजाळात न अडकता, ईश्वराशी त्याचे अधिक जवळिकीचे नाते प्रस्थापित होते, ईश्वराचे ओतप्रोत अस्तित्व व त्याचे परमपावित्र्य हा केवढा मोठा कृपाप्रसाद आहे याचा त्याला रेखीव प्रत्यय येतो, आणि प्रेम व भक्तिभाव यांच्या पोटी माणूस ज्याच्या सेवेसाठी समर्पित आहे असा तो ईश्वर एकाच वेळी स्वामी, पिता व न्यायधीश आहे हे तो जाणतो. आत्म्याने ही अवस्था गाठणे म्हणजेच मोक्षप्राप्ती होय अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. कधीच न संपणाऱ्या ऐंद्रिय सुखोपभोगांमध्ये निरंतर रममाण होण्यासाठी स्वर्ग नावाच्या परलोकात जाणे, वा ईश्वर व आत्मा यांच्यात अद्वैत असते हे भान येणे, वा ईश्वरात विलीन होऊन जाणे, वा क्रमाक्रमाने एका निर्विकार निर्वाणावस्थेप्रत पोचणे म्हणजे मोक्ष अशी मोक्षाविषयी विभिन्न धर्मांच्या अनुयायांची वेगवेगळी धारणा आढळते. अति महत्त्वाकांक्षी दृष्टी वा सुखोपभोगी दृष्टी यांपैकी एका गोष्टीने या सर्व विभिन्न धारणांमध्ये दोष उत्पन्न झालेला आढळतो. आपल्या अंतर्यामी जी उपजत जाणीव वास करते तिच्याशी मोक्षविषयक या वेगवेगळ्या धारणा विरोधी आहेत.

२४. दैवी चैतन्य हे हाडामांसाचा मानवी देह धारण करते वा ते या पृथ्वीवर अवताराच्या रूपाने प्रकट होते, वावरते या समजुती बाळगणे अनावश्यकही आहे आणि त्या अविश्वसनीय कपोलकल्पना आहेत असे एकेश्वरवाद्याचे मत आहे. ज्यांच्यावर ईश्वराचा अनुग्रह होतो त्यांच्यावर ईश्वर कृपेची बरसात करतो. या व्यक्ती ईश्वरी कृपाप्रसादामुळे पुण्यवान व सद्गुणसंपन्न असतात. ईश्वरी प्रभाव त्यांच्या ठायी मूर्त झालेला आढळतो. सर्व पुण्यवान व्यक्ती, जगातील नैतिक आदर्श व हुतात्मे, ही त्या ईश्वराची निर्मिती आहे; जसे कुंभार मातीतून सुंदर मडके घडवितो तसे ईश्वराने यांना घडविलेले असते. ज्यांची ईश्वरी अवतार म्हणून आजवर गणना झाली आहे त्या सर्व व्यक्तींचे अवतारीपण या प्रकारे सुसंगतपणे व समाधानकारकपणे स्पष्ट करता येते. अवतारी व्यक्तींचा संभव नैसर्गिक, मानवी रीतीने झालेला नसतो, अयोनिसंभवाद्वारे ते जन्माला येतात यासारख्या खुळचट कल्पना बाळगण्याची मग गरज उरत नाही.

२५. ही बाह्य निसर्गसृष्टी, माणसाच्या मनाचे आंतरिक विश्व, आणि इतिहास यांच्या द्वारा ईश्वर स्वतःस प्रकट वा आविष्कृत करीत असतो अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. ईश्वराचे हे प्रकट रूप चिरसनातन व सार्वजनिक स्वरूपाचे आहे. विभिन्न कालखंडांमध्ये व देशांमध्ये, प्रेषिताची दृष्टी घेऊन, वा कवीची उत्कट स्फूर्ती घेऊन, किंवा थोर आचार्यांचे अत्यंत प्रभावी वक्तृत्व घेऊन, वा तत्त्वज्ञान्याचे शहाणपण घेऊन, वा हुतात्म्याची आत्मबलिदानाची ऊर्मी घेऊन जेव्हा विशेष गुणसंपदेची देणगी मिळालेली अलौकिक माणसे जन्माला येतात तेव्हा त्यांची दृष्टी

वा उत्कट स्फूर्ती वा वक्तृत्व वा शहाणपण वा बलिदानाची ऊर्मी यांचा स्रोत दैवी असतो, म्हणजे गुणसंपदेची देणगी ही ईश्वराची खास कृपा असते. ही माणसे जे दर्शन समोर ठेवतात ते दर्शन, ती ज्या भावभावना प्रकट करतात त्या भावभावना, ती जी शिकवण देतात ती शिकवण, त्यांचे संपूर्ण आयुष्यच हे एक प्रकारे उच्च कोटीचे व खऱ्या स्वरूपाचे ईश्वराचे प्रकट होणे, अवतरणे असते. या शब्दांचा अर्थ असा केला तरच तो टिकू शकतो. इतर सर्व प्रकारची दैवी प्रकटने ही केवळ प्रतिबिंबात्मक आहेत आणि ती स्वाभाविकपणे तात्कालिक व स्थानिक असल्याने त्यांचे मूल्य सापेक्ष व जुजबी राहते.

२६. भूताखेतांची, दगडाधोंड्यांची, निसर्गातील सजीव-निर्जीव पदार्थांची एकेकाळी माणसे पूजा करीत. त्यांच्या ठायी जादूटोणा, अभिचार यांची शक्ती आहे असे माणसास वाटे. माणसे अनेकानेक देवदेवतांची पण पूजा करीत आली. आपणा स्वतःवरून त्यांनी देवांची कल्पना केली, त्यांच्या मूर्ती घडविल्या, त्यांच्याविषयी कथाकहाण्या रचल्या. या अवस्था पार करून जाण्याइतके माणसाचे मन प्रगल्भ व प्रबुद्ध बनून, साऱ्या विश्वाचे एकच सर्वोच्च चैतन्यतत्त्व नियंतेपण करीत आहे याची जाण त्याला प्राप्त झाल्यावर इतःपर मूर्तिपूजा करणे असमंजस अडाणीपणाचे ठरते. मूर्तींची पूजा माणसाची श्रद्धा स्थिर करण्याच्या दृष्टीने उपयोगी पडते, अदृष्ट ईश्वराचे अस्तित्व मनात ठसठशीतपणे मूर्तीच्या आधारे रुजण्यास मदत होते या युक्तिवादांच्या आधारे मूर्तिपूजेचे समर्थन सामान्यपणे केले जाते. पण माणसाच्या मनाचा इतका विकास झाल्यावर, मानवाने इतकी प्रगती केल्यावर हा युक्तिवाद वस्तुनिष्ठ आहे असे म्हणता येत नाही. असे असले तरी, निसर्गातील द्रव्यपदार्थांच्या ठिकाणी शुभ-अशुभ शक्तीची कल्पना करून त्यांची पूजा करण्याची जी शुद्ध बाळबोध अवस्था होती तिच्या तुलनेत, ईश्वराच्या मूर्ती करून त्यांची पूजा माणसे करू लागली ही एक पुढची, सापेक्षतः उन्नत अवस्था होती, आणि या अर्थाने मूर्तिपूजा आजही एक मौलिक कार्य पार पाडीत आहे; माणसे पुन्हा रानटी स्थितीत अधःपतित होणार नाहीत याची हमी मूर्तिपूजेत आहे, ही गोष्ट एकेश्वरवादी मोकळ्या मनाने स्वीकारतो. तथापि, अगदी निम्नतम पायरी ओलांडून एकदा मानव वरच्या पायऱ्यांवर येऊन पोचल्यानंतर, जेव्हा माणसे विश्वाच्या एका चालक शक्तीची, परमेश्वराची कल्पना करण्यापर्यंत आली आहेत तेव्हा देवदेवतांच्या मूर्तींची पूजा करीत राहणे हा, काटेकोरपणे बोलावयाचे तर, एक पाऊल मागे खेचणारा, मागच्या पायरीवर नेऊन ठेवणारा विधी ठरतो. मूर्तिपूजेशी निगडित जे सहचरी भाव आहेत, नाना रिवाज व विधी आहेत त्यांमुळे ईश्वराचे मानवीकरण केले जाते. किंबहुना, ईश्वराचे पाशवीकरण घडून येते असे म्हणणे अधिक यथार्थ ठरेल. देवदेवतांच्या भोवती ज्या मिथ्य कथा निर्माण होतात त्या मिथ्य कथांमध्ये देवदेवतांचे होणारे वर्तन हे मानवी समाजात चालणाऱ्या सर्वाधिक स्वैराचारी वर्तनाचे प्रातिनिधिक असते. अशी चरित्रे असणाऱ्या देवदेवतांच्या पूजेमुळे सदसद्विवेक बोथट बनतो, बुद्धी जडशीळ बनते आणि सर्व प्रकारची उन्नत श्रद्धा नष्ट होते.

२७. नियमबद्ध नैसर्गिक रीतींचा भंग करून घडणाऱ्या घटना म्हणजे चमत्कार असे म्हटले तर, चमत्कार घडतात यावर विश्वास ठेवणे शक्यही नाही आणि असे चमत्कार घडण्याची आवश्यकताही नाही. अमूक अमूक चमत्कार घडले असे ज्यांच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून मान्य केले जाते त्यांच्या ऐकण्यात वा पाहण्यात त्यांची काही तरी भूल झाली असावी ही शक्यता जास्त; निसर्गाचा क्रम क्षणापुरता भंग केला गेला असण्याची, त्यात या प्रकारची ढवळाढवळ केली गेली असण्याची संभावना कमी. श्रद्धेच्या प्रांतात बाह्य चिन्हांची साक्ष फार किमतीची नसते, चमत्कार करून दाखविणारी व्यक्ती ही सत्याची शिकवण देणारी असतेच असे नाही, अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. सर्व प्रकारच्या परस्परविरुद्ध दिशांनी कार्य करणाऱ्या शक्तींच्या रस्सीखेचीत, समतोल प्रस्थापित करून द्रव्यपदार्थांची जड सृष्टी ही तिच्या नित्यनियमांनी बद्ध मार्गावरून चालत राहते हाच एकेश्वरवादाचे सत्यत्व सिद्ध करणारा, नित्य घडून येणारा मोठा चमत्कार आहे. याच्यापुढे केवळ मर्त्य व स्खलनशील मानवाच्या साक्षीच्या भरवशावर अवलंबून असणाऱ्या, निसर्गनियमांचा भंग या स्वरूपातल्या अगणित चमत्कारांची देखील काय महती ? पण बहुतेक सर्व प्रस्थापित धर्मांचा दैवी उगम सिद्ध करण्यासाठी या प्रकारच्या चमत्कारांचा हवाला देण्यात येतो.

२८. नाना प्रकारांनी देहदंड सोसण्याचा प्रकार,

अनुक्रमणिका








विरक्त संन्यस्त जीवनाचे गुणगान या जगातील आपल्या मानवी अस्तित्वाचे जे मुख्य लक्ष्य आहे त्याचा घात करणारे आहे. आपली एरवीच्या जीवनातील कर्तव्ये पार पाडीत समाजात राहण्याने आपले स्वयंअनुशासनाच्या दृष्टीने शिक्षण होते, त्याला आवश्यक ती शिस्त अंगी बाणते. इहलौकिक जीवनाला नाकारीत, बाजूला जाणारी विरक्ती सृष्टीच्या निर्मितीचे जे थोर ध्येय आहे ते साध्य करण्याच्या आड येते. एक सामाजिक संस्था म्हणून संन्यासधर्माला दिली गेलेली प्रतिष्ठा गैर आहे. ती एक चुकीची प्रथा आहे. व्यावहारिक जगातील ताण व संघर्ष ज्या व्यक्तींना झेपत नाहीत त्या व्यक्तींच्या दृष्टीने मोहाचे प्रसंग उपस्थित करणाऱ्या संसारी जीवनातून पळ काढणे ही एकच सुटका असेल, हे शक्य आहे. संसारी जीवनाचा त्याग करणारी अशी साधू-बैरागी व्यक्ती या मार्गाने स्वतःवर अनुशासन प्रस्थापित करीत असेल, आणि पुण्यशील जीवन जगत असेल तर अशा व्यक्तीच्या वर्तनावर टीका करण्याचे कारण नाही. लौकिक संसारी जगातल्या आपल्या सर्व जबाबदाऱ्या व कर्तव्ये पार पाडल्यानंतर, जीवनाच्या योग्य त्या टप्प्यावर, संसारामधून निवृत्त होणे हे माणसाचे कर्तव्यही ठरू शकेल. त्याच वेळी, ज्या समाजात माणसे चैन आणि सुखोपभोग यांचा अतिरेक करतात, सारा समाजच या प्रवृत्तीने ओतप्रोत असतो त्या समाजात निःस्वार्थी कार्यात आपले सर्व आयुष्य व कर्तृत्व व्यतीत करण्याची, त्यासाठी जे विरक्त, साधे गरिबीचे ब्रह्मचारी जीवन जगण्याची शपथ घेतात त्या व्यक्तींचे उदाहरण एक निषेधात्मक कृती म्हणून, चांगलीच म्हणावी लागते. अशा उदाहरणांचा समाजावर अतिशय उपकारक प्रभाव पडतो.

२९. सामूहिक प्रार्थनेवर एकेश्वरवाद्याचा विश्वास आहे. व्यक्तिगत उपासनांच्या जोडीला, भर म्हणून नेहमीच सामूहिक प्रार्थना करण्याचा रिवाज पाडायला हवा असे त्याचे मत आहे. इतरांच्यासह प्रार्थना करताना, त्यांच्या उदाहरणाने व्यक्तीची स्वतःची उत्कट श्रद्धा अधिक जिवंत होते, तिला स्फुरण मिळते, व्यक्तीला स्वतःविषयी वाटणारी गर्वाची भावना खाली येते. आपण सर्व त्याच एका ईश्वराची लेकरे या नात्याने ईश्वराच्या नजरेत आपणा सर्वांची पायरी तीच एक असते. पण दैनंदिन व्यवहारात कोणी श्रेष्ठ कोणी कनिष्ठ, कोणी थोर कोणी सामान्य, कोणी श्रीमंत कोणी गरीब असा भेद असतो. सामूहिक प्रार्थनेच्या जागी, प्रार्थना करीत असताना ईश्वरासमोर आपली जी एकमेव पायरी– त्याची लेकरे ही– त्या पायरीवर सारे जण असतात. यामुळे ईश्वर हा आपणा सर्वांचा पिता आहे, आणि ईश्वराची लेकरे या नात्याने सर्व मानवजातीशी आपले भ्रातृत्वाचे नाते आहे ही भावना सामूहिक प्रार्थनेच्या योगे आपल्या ठायी रुजते.

३०. पुरोहितांचा एक संघटित वर्ग ही धर्माचे हितसंबंध सुरक्षित राखण्याच्या, धर्मश्रद्धेचे संवर्धन करण्याच्या दृष्टीने मोठ्या उपयोगाची गोष्ट आहे अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. मात्र, जन्माधिष्ठित वंशपरंपरागत पुरोहित जातीचे संघटन, वा सर्वसामान्य जनसमुदायापासून वेगळे व विरोधी असे स्वतःचे विशेष हितसंबंध असलेल्या पुरोहितगिरी करणाऱ्या व्यक्तींची (बाहेरच्यांना प्रवेश नाकारणारी) बंदिस्त संघटना यामधून समाजाचा फार मोठा घात होतो. म्हणून शक्यतोवर अशा प्रकारचे पुरोहितांचे संघटन बांधले जाऊ नये हे पाहिले पाहिजे. ही बाब ही केवळ संरचना व शासन यांच्याशी संबंधित अशी बाब आहे, पुरोहितांचे संघटन अशा अशा तत्त्वांवर या प्रकारचे व्हावे अशा प्रकारचा ईश्वरी आदेश नाही, आणि धर्माच्या गाभ्याशी जाऊन पोचणारी ही बाब नाही, हे येथे ध्यानात ठेवले पाहिजे. पुरोहितपण हे वंशपरंपरेने कुटुंबात चालत यावे, की योग्य रीत्या अभिषिक्त केल्या जाणाऱ्या व्यक्तींकडे ते असावे, की श्रेष्ठ दर्जाच्या गुणसंपदेची देणगी असलेल्यांची या पदासाठी निवड व्हावी; पुरोहितवर्गाची बांधणी व संघटन कोणत्या पद्धतीचे असावे, त्याचा प्रकार कोणता असावा ही गोष्ट बऱ्याच प्रमाणात त्या त्या समाजाच्या विधायक गरजा ध्यानात घेऊन ठरविण्याची बाब आहे. पुरोहिताची भूमिका पार पाडण्यासाठी निवडलेल्या व्यक्तींचा एक संघ असावा, आणि त्यांनी आपल्याकडे आलेली भूमिका योग्य प्रकारे पार पाडण्यासाठी त्यांच्या आयुष्यातील ऐन उमेदीची वर्षे शक्तीबुद्धीनिशी खर्ची घालावीत, ही गोष्ट धर्माच्या महत्तम हिताच्या संवर्धनाच्या व पूर्ततेच्या दृष्टीने अत्यावश्यक आहे.

३१. सामूहिक प्रार्थनेसाठी मोठी, प्रशस्त व सुंदर प्रार्थनागृहे आणि देवळे असण्याची नितान्त आवश्यकता असते अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. सर्व उपासनेचे सारसर्वस्व हे मनःपूर्वक केलेल्या प्रार्थनेमध्ये आणि

ईश्वराविषयी कृतज्ञता प्रकट करण्यामध्ये असते या गोष्टी मनातून पुसून टाकण्यात पर्यवसान होणार नसेल तर, प्रसंगी, पूजेचा थाटमाट व ऐश्वर्य, कलात्मक सजावट नि संगीत या गोष्टी माणसांमधील भक्तिभावाची पुष्टी करण्यात, भक्तिभाव उत्पन्न करण्यात, आणि माणसांची मने सदभिरुची संपन्न बनविण्यात मोठी मदत करणाऱ्या असतात.

३२. समाजाच्या आजच्या अवस्थेत व परिस्थितीमध्ये प्रासंगिक सण-उत्सव, जयंत्या ( जन्मदिवस ) साजरे करण्याची प्रथा ही अत्यावश्यक आहे अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. असे प्रसंग माणसांच्या हृदयात विशेष भक्तिभाव जागृत करतात, प्रापंचिक गोष्टींमध्ये सतत रममाण असणारे मन काही काळासाठी का होईना बाहेर येते, आणि ईश्वराचे देणे त्याला आपण देत आहोत की नाही याचा स्वतःशी झाडा घेण्याची हे प्रसंग त्याला आठवण करून देत असतात. दैनंदिन जीवनातील काळज्यांनी आणि जबाबदाऱ्यांनी माणसे एरवी वाकून गेलेली असतात. त्यांच्या आत्म्याला उसंत मिळावी, धर्माच्या सावलीखाली काही थोडा काळ का होईना त्याला शांती व स्वास्थ्य लाभावे यासाठी सण-उत्सव, जयंत्या या रूपात सवड मिळावी, सांसारिक काळज्या व जबाबदाऱ्या यांच्यामधून मुक्त होऊन माणसांनी आनंद, जल्लोष अनुभवावा याची फार आवश्यकता आहे.

३३. जन्म, व्रतबंधासारखे संस्कार (initiations), विवाह आणि मृत्यू यांसारखे आयुष्यक्रमातील गंभीर प्रसंग हे धार्मिक विधींच्या साहाय्याने साजरे करून त्यांना मान्यता व प्रामाण्य प्राप्त करून देणे हे आपल्यावर बंधनकारक मानले पाहिजे. जे प्रसंग साजरे केले जातात त्यांच्या द्वारा कोणत्या गंभीर जबाबदाऱ्या आपण पत्करीत आहोत हे त्या प्रसंगांमध्ये सहभागी असणाऱ्यांच्या मनावर बिंबविण्यासाठी, त्यांना ईश्वराचे आशीर्वाद लाभावेत, ईश्वराचा कृपाप्रसाद त्यांच्यावर व्हावा असे आव्हान करणारे विधी व उपासना अशा प्रसंगी आवर्जून पार पाडल्या पाहिजेत. अशा प्रसंगी गोरगरीब व असाहाय्य लोकांना मुक्त हस्ते दानधर्म करून हे प्रसंग साजरे करण्याचीही प्रथा पाडली पाहिजे. या भूमिकेतून व वृत्तीने मृत व्यक्तींच्या सन्मानार्थ श्राद्धविधी प्रसंगी करण्यास, व त्या द्वारे चित्ताचे, आत्म्याचे उन्नयन साधण्यास हरकत नाही.

३४. स्वार्थाऐवजी परार्थ साधण्याकडे, ऐषआरामी जीवनाऐवजी साधे, व्रतस्थ जीवन जगण्याकडे, आणि अहंची पुष्टी न करता निरहंकारी बनण्यास प्रवृत्त करण्याकडे माणसाला घेऊन जाणाऱ्या सद्गुणांचा संस्कार माणसांवर करण्यावर धार्मिक शिकवणुकीचा मुख्य भर असला पाहिजे अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. दानधर्म, भूतदया, परोपकार, आत्मसंयम यांचा थोडा अतिरेक झाला तरी त्या अतिरेकाचे स्वागतच केले पाहिजे. कारण या बाबतीत अधूनमधून होणारा अतिरेक किंवा झुकाव दुरुस्त करण्याइतक्या माणसाच्या उपजत स्वार्थी प्रवृत्ती पुरेशा प्रबळ असतात. धार्मिक भावना उचंबळून येणे, ईश्वराच्या भक्तीत तहानभूक हरपणे ही इतकी दुर्मिळ अशी देणगी आहे की, तिचे आपण जितके कौतुक करू तितके हवेच आहे. ज्या ठिकाणी ही वृत्ती आढळून येईल तिथे तिथे तिची आपण पुष्टी केली पाहिजे. त्याच वेळी, ही गोष्ट खरी की, जर या भावनिक उत्साहाचे, उत्कट अभिव्यक्तीचे योग्य प्रकारे नियमन केले नाही तर, आंधळ्या व आक्रमक कडव्या धर्मवेडात त्यांची परिणती होण्याचा संभव असतो.

३५. लोक तीर्थयात्रांवर जातात त्यामागे स्थान माहात्म्याची कल्पना असते; या स्थान माहात्म्याच्या कल्पनेला बुद्धीचा आधार आहे अशी एकेश्वरवाद्याची समज आहे. अपरिचित जागा त्यांच्या निसर्गरम्यतेमुळे वा ऐतिहासिक पार्श्वभूमीमुळे अंतरात्म्याच्या ठायी उत्कट धार्मिक भावनांना व भक्तिभावनेला चालना देण्याच्या दृष्टीने जास्त अनुरूप असतात; अशी प्रेरणा परिचित स्थळांपासून माणसाला मिळू शकत नाही. धर्मवृद्धीसाठी हातभार लागू शकणाऱ्या तीर्थयात्रेसारख्या गोष्टींची व त्यांच्या बुडाशी असलेल्या स्थान माहात्म्याच्या कल्पनांची उपेक्षा करणे योग्य नाही. त्याच वेळी, स्थान माहात्म्याच्या कल्पनेच्या प्रभावाखाली जड वस्तू, निसर्गातले चित्रविचित्र आकार, स्थळे यांच्यामध्ये जादूकारक शक्ती असते या समजुतीने पूजा करण्याच्या जुन्या चालीरीतीच्या व समजुतीच्या गाळात आत्मा पुन्हा एकवार रुतेल याचा मोठा धोका संभवतो याचे भान राहिले पाहिजे, आणि म्हणून ही स्थान माहात्म्याची कल्पना व भावना योग्य नियंत्रणाखाली राखली पाहिजे.

३६. श्रेष्ठ व पवित्र आत्म्याच्या सहवासात

अनुक्रमणिका

आल्यास आपल्यातील धार्मिक वृत्तींचा परिपोष होतो आणि हा त्यांचा प्रभाव मोठा श्रेयस्कर असतो, त्याने खूप काही चांगले घडून येते अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. त्याच वेळी, काही धर्मप्रणालींमध्ये गुरू करण्याचे, मध्यस्थ असण्याचे वा पुरोहिताच्या साहाय्याचे महत्त्व, यांनी मदत केल्याखेरीज मोक्षप्राप्तीच्या दिशेने वाटचाल अशक्य असते, अशा प्रकारे सांगितलेले आहे. या गोष्टींचे असे स्तोम माजविले जात असल्याने, केवळ स्वत: प्रयत्न केल्याने कोणीही माणूस स्वतःची मुक्ती साधू शकत नाही या प्रतिपादनाचा, सिद्धान्ताचा ठामपणे निषेध करून तो अव्हेरण्यावर जितका जोर द्यावा तितका कमीच, असे म्हणायला हवे.

३७. ईश्वर आणि माणूस ( व्यक्ती ) यांच्यामध्ये कोणी तरी एक मध्यस्थ अत्यावश्यक असतो, आणि त्याच्या मध्यस्थीनेच मुक्ती मिळू शकते, या गोष्टीवर काही धर्मप्रणालींमध्ये इतका काही जोर दिलेला आहे की, पुनरुत्थानाचे काम ही स्वप्रयत्नांनी साध्य करावयाची गोष्ट असते, आणि स्वप्रयत्नांची जागा मध्यस्थाची दलाली घेऊ शकत नाही, हे सत्य आपल्या कदापिही दृष्टिआड होणार नाही यासाठी आपण सदैव दक्ष असायला हवे. अर्थातिच, ज्याच्याजवळ श्रेष्ठ दर्जाची गुणसंपदा आहे आणि जो पुण्यात्मा आहे अशा आचार्यांचे वा गुरूचे वा मार्गदर्शक मित्राचे साहाय्य हे सर्वांच्याच बाबतीत आवश्यक असते. पण अशा साहाय्याचा उपयोग एका मर्यादेपर्यंतच असतो. अंतिम प्रयत्न व धडपड स्वत:चीच असायला लागते. मध्यस्थ वा उपदेशक फार मदत करू शकत नाही. नरकात पडण्यापासून इतरांच्या आत्म्यांना वाचविण्यासाठी आपली पुण्याई कामी आणता येईल एवढी प्रचंड पुण्याईची देणगी कोणाच व्यक्तीपाशी असत नाही. दुसऱ्याच्या श्रेष्ठ गुणसंपदेच्या जोरावर मुक्ती विकत घेता येते याला आपल्या जाणिवेत कोणताच आधार नाही. ईश्वरी शासनाचा आपला जो काही अनुभव आहे त्याच्याशी विसंगत अशी ही समज आहे.

३८. सामाजिक व राजकीय दृष्टचा कोणती गोष्ट सोयीची वा गैरसोयीची आहे, लाभाची आहे या दृष्टिकोणातून केल्या जाणाऱ्या सर्व युक्तिवादांपेक्षा व्यक्तीच्या सदसद्विवेकाचा अधिकार श्रेष्ठ आहे अशी एकेश्वरवाद्याची धारणा आहे. यावर दोनच मर्यादा आहेत. नीती धाब्यावर बसविण्याचा हक्क सदसद्विवेकाच्या नावे कोणालाही दिला जाऊ शकत नाही. अन्य व्यक्तींनाही सदसद्विवेकाचा अधिकार असतो, आणि सदसद्विवेकाशी एकनिष्ठ राहून वागण्याची इतरांना जी तेवढीच मोकळीक असते तिला निर्बंधित करण्याचा हक्क सदसद्विवेकाने वागण्याच्या नावे कोणालाही प्राप्त होऊ शकत नाही. कोणीही एक व्यक्ती वा माणसांचा समुदाय धर्माच्या विषयामध्ये आम्ही म्हणतो तेच एकमेव निरपवाद सत्य, पूर्ण सत्य असा दावा करू शकत नाही. आमच्या हातून कधीच प्रमाद घडत नाही, आम्ही म्हणतो ते नेहमीच अचूक असते असे एक माणूस वा अनेक माणसांचा समुदाय म्हणू शकत नाही. असा दावा जर कोणी करीत असतील तर त्याचा कसून प्रतिवाद केला पाहिजे कारण असा दावा खोटा असतो. शिवाय, जर एकदा हा दावा मान्य केला तर माणसाची बुद्धी खुरटते, माणसे मानसिक दृष्टचा गुलाम बनतात. आपली अशी अवस्था झालीय याचे भान माणसांना नसते म्हणून ही स्थिती अधिक घातक असते.

३९. धर्माच्या विषयामध्ये हे क्षेत्र बुद्धीचे आणि हे क्षेत्र श्रद्धेचे, असा भेद एकेश्वरवादी करीत नाही. कृतिप्रवण आणि उत्कट प्रामाणिक विवेक म्हणजेच श्रद्धा. ( Faith is practical and earnest reason.) सामाजिक व राजकीय व्यवहारांच्या क्षेत्रामध्ये प्रस्थापित अधिसत्तेचे जेवढे प्रामाण्य असते त्यापेक्षा धर्माच्या क्षेत्रामध्ये ते कोणत्याही प्रकारे जास्त असत नाही. अधिसत्तेचा आदर केला पाहिजे, उठताबसता तिला आव्हान देता कामा नये, पण यापलीकडे जाऊन श्रद्धेच्या प्रांतात बुद्धीच्या वापरावर बंदीच घालावी अशी अधिसत्तेच्या अधिकाराची व्याप्ती असत नाही.



अनुक्रमणिका

# स्वतंत्र भारताचे द्रष्टे : न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे

द. गो. कर्वे

[ १९४२ साली न्या. रानडे यांची जन्मशताब्दी साजरी झाली. त्याप्रसंगी प्रा. द. गो. कर्वे यांनी न्यायमूर्तींचे तत्त्वज्ञान आणि कार्यपद्धती यांचा विस्तृत परिचय करून देणारा वरील शीर्षकाचा ग्रंथ रचला. त्याचे मूळ लेखन इंग्रजीत झाले होते. 'न्यायमूर्तीं'च्या शिकवणुकीचा पूर्ण फायदा व्हावयाचा तर तो आपल्या स्वतःच्या भाषेतूनच होणे शक्य आहे. स्वतः न्यायमूर्तींचाही त्याबद्दल विशेष आग्रह असे' हे ध्यानात घेऊन १९४२ साली हा ग्रंथ मराठी भाषेतही प्रसिद्ध झाला. मराठी भाषांतराचे काम आजचे मराठी वाङ्मयाचे व्यासंगी प्राध्यापक, ज्येष्ठ समीक्षक व लेखक प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी केले होते. त्या वेळीच ख्यातनाम असलेल्या मराठीचे प्राध्यापक व ज्येष्ठ समीक्षक प्रा. रा. श्री. जोग यांचाही हातभार लागला, असे ग्रंथकर्त्याने नमूद केले आहे.

प्रा. द. गो. कर्वे हे डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य व अर्थशास्त्राचे प्राध्यापक होते. त्या काळात प्रा. वा. गो. काळे यांच्यासमवेत त्यांनी "**भारतीय अर्थशास्त्र**" हे अर्थशास्त्राचे क्रमिक पुस्तक मराठी भाषेत सिद्ध केले. भारतातील नामवंत अर्थशास्त्रज्ञांमध्ये त्यांची गणना होते. स्वातंत्र्योत्तर काळात अनेक महत्त्वाच्या पदांवर व शासकीय समित्यांवर त्यांनी काम केले. ते रानडे-गोखले यांच्या संप्रदायातील (school) लिबरल होते.

'एक अत्यंत थोर पुरुष, कळकळीचा देशभक्त, धर्मसुधारक, विचाराग्रणी, लोकनायक, श्रेष्ठ दर्जाचा इतिहासकार, आणि खंदा अर्थशास्त्रज्ञ' असे प्रा. कर्वे यांनी रानड्यांचे यथार्थ वर्णन केले आहे. पुढे आपल्या 'प्रास्ताविका'त प्रा. कर्वे म्हणतात, 'हिंदुस्थानातील राष्ट्रीय जीवनाच्या साऱ्याच अंगांशी रानडे हे इतके समरस झाले होते, आणि त्या त्या अंगावर त्यांनी आपली एवढी छाप पाडली होती की, त्यांचे चरित्र म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील हिंदुस्थानातील प्रगतीपर चळवळींचा इतिहासच होय... ही चळवळ राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक आणि वैचारिक अशा विविध क्षेत्रांना व्यापणारी अशी होती; आणि या प्रत्येक क्षेत्रात रानडे यांनी आपले अग्रस्थान कायम राखले होते.' या वर्णनातही अतिशयोक्ती नाही.

आपण लिहिलेल्या चरित्राचा हेतू स्पष्ट करताना प्रा. कर्वे लिहितात की त्यांचा मुख्य हेतू 'दिवंगत थोर व्यक्तीच्या कार्यातील ज्या योजना व पद्धती यांचा पुढील पिढ्यांच्या जीवनावर विशेष परिणाम होऊन उपयुक्त ठरल्या असतील, त्यातील रहस्य विशद करण्याचा' आहे. यासाठी 'त्या पुरुषाच्या व्यक्तित्वाचे व सार्वजनिक जीवनाचे ज्ञान' तर हवेच असे म्हणून ते पुढे म्हणतात, 'पण यापेक्षाही अधिक अगत्याची गोष्ट म्हणजे चरित्रविषयक व्यक्तीच्या वैचारिक आणि नैतिक नेतृत्वावर त्याची निष्ठा असावयास हवी, तिच्या ध्येयाविषयी व कार्यपद्धतीविषयी त्याला आदर असला पाहिजे, आणि त्या व्यक्तीने लिहिलेल्या व बोललेल्या प्रत्येक शब्दाशी त्याचा परिचय असला पाहिजे.' या सर्वच गोष्टी स्वतःच्या ठायी इष्ट प्रमाणात नाहीत याचा नम्रभावाने उल्लेख करीत प्रा. कर्वे लिहितात, 'पण रानड्यांच्या राष्ट्रीय कार्यासंबंधीच्या योजना व पद्धती यांचे यथार्थ आकलन व्हावे याकरिता त्याने बरेच परिश्रम केले आहेत, आणि त्यांच्या कार्याविषयी त्यास अनेक वर्षे परम आदर वाटत आहे एवढे मात्र खास सांगता येईल. रानड्यांनी प्रतिपादलेली तत्त्वे आणि घालून दिलेले धडे नवीन परिस्थितीत आणि काहीशा बदललेल्या स्वरूपात आजही तितकेच अबाधित आहेत व पुढेही बराच कालपर्यंत अबाधित राहतील असाही अंतःकरणपूर्वक दृढ विश्वास त्याला वाटतो. याच कारणास्तव ज्या ज्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक चळवळींत रानड्यांनी भाग घेतला, त्यांतील

अनुक्रमणिका

मुख्य तत्त्वे आपल्यास कोणती वाटतात हे सांगण्याचा प्रस्तुत लेखकाने या पुस्तकात यत्न केला आहे.' प्रास्ताविकाच्या अखेरीस प्रा. कर्वे म्हणतात, '...स्वत:संबंधीचे, देशासंबंधीचे आणि अखिल मानवजातिविषयक असे जे आपले कर्तव्य आहे त्याची जीवन ही कार्यभूमी आहे असे (ज्यांना) वाटते, अशा साऱ्याच व्यक्तींचा रानड्यांच्या मतांना, त्यांनी त्यांचा योग्य बौद्धिक परामर्ष घेतल्यास, पाठिंबाच मिळेल अशी लेखकाची खात्री आहे.

प्रस्तुत ग्रंथातील 'जीवनविषयक तत्त्वज्ञान', 'रानड्यांची कार्यपद्धती', 'सामाजिक सुधारणा', 'राष्ट्रीय शिक्षण' आणि 'संदेश' ही पाच प्रकरणे येथे पुनर्मुद्रित केली आहेत.

मूळ ग्रंथाचे प्रकाशन आर्यभूषण मुद्रणालय, पुणे यांनी १९४२ साली केले होते. दिवंगत प्रा. द. गो. कर्वे यांचे व आज अस्तित्वात नसलेल्या आर्यभूषण मुद्रणालयाचे ऋण मनात वागवून 'नवभारत मासिक' या मासिकात वरील मजकुराचे पुनर्मुद्रण आम्ही करीत आहोत. – संपादक ]

# जीवनविषयक तत्त्वज्ञान

सारे कायदे आणि कानू यांच्याहि वर असणारा एक शाश्वत धर्म आहे. त्याचें अधिष्ठान न्याय व समता, दया व अनुकंपा, आंतून मिळणाऱ्या सदसद्विवेकाच्या प्रेरणा व बाहेरील निसर्ग यांवर आहे. विश्वकल्याणार्थ झटणाऱ्या या साऱ्या शक्तींना बांध घालणें म्हणजे भरतीच्या लाटा परतविण्याचा प्रयत्न करणें होय. या प्रवृत्तींचें सामर्थ्य पूर्णपणें ओळखून, जें आपणांस टाळतां येणार नाहीं त्याच्याशीं आपल्यास कितपत जुळतें घेणें आवश्यक आहे याचा प्रत्येकानें निर्णय करावा हेंच खऱ्या दूरदर्शीपणाचें होईल.

(संकीर्ण लेख– पृ. २३४)

न्या. रानडे यांचें व्यावहारिक धोरण ज्या जीवनविषयक तत्त्वज्ञानावर आधारलेलें होतें, त्याचा विचार केल्याखेरीज हिंदुस्थानांतील विविध चळवळी व घटना याविषयींचीं त्यांचीं मतें व दृष्टिकोण यांचें विवेचन शक्य होणार नाहीं. रानडे हे केवळ प्रसंग पाहून वागणारे नव्हते किंवा त्यांचें तत्त्वज्ञान नुसत्या अनुभवावर आधारलेलें नव्हतें. दीर्घकालीन सूक्ष्म चिंतनानें आणि सर्वांगीण विचारानें त्यांनीं स्वत:करितां कांहीं तत्त्वप्रणाली ठरविलेली होती. ज्या ज्या वेळीं एखादा नवीन प्रसंग अथवा प्रश्न उपस्थित होई, त्या त्या वेळीं या आपल्या मूलभूत तत्त्वप्रणालीच्या साह्यानें ते त्याचा विचार करीत. आपल्या जीवनामध्यें या तत्त्वप्रणालीचा त्यांनीं निकष बनविला होता. बाह्य परिस्थितीचा कस ते या निकषावर लावून पाहात आणि मगच कोणत्याहि प्रश्नासंबंधीं आपली व्यावहारिक भूमिका ते निश्चित करीत असत. यामुळें त्यांची वागणूक अगदीं तर्कशुद्ध अशी होई. रानड्यांच्या कृतींच्या व उक्तींच्या मागें प्राधान्यानें असणाऱ्या या सहेतुक, विवेकपूर्ण व तर्कशुद्ध विचारसरणीचा ज्यांना उमज पडलेला नाहीं, त्यांना रानड्यांची मनोरचना कळणें शक्य नाहीं.

रानड्यांचें तत्त्वज्ञान आणि जीवनांतील कार्य यांमध्यें धर्मवृत्ति व देशाभिमान यांचा इतका सुंदर आणि बेमालूम मिलाफ झाला आहे कीं त्यांच्या निकट सहवासियांनाहि त्यांच्या जीवनांत साधुत्वाचा भाग अधिक होता कीं देशप्रीति अधिक असे याचा संभ्रम पडे. रानड्यांचा नैतिक व बौद्धिक सहवास ना. गोखले यांना चौदा वर्षांहून अधिक काळ लाभला होता, आणि तोहि रानड्यांच्या अत्यंत परिणतप्रज्ञतेच्या काळांत. असें असूनहि रानड्यांच्या जीवनांत साधुत्वापेक्षां देशभक्तीचाच अंश अधिक होता असें त्यांना वाटे. रानड्यांच्या द्वितीय स्मृतिदिनानिमित्त मुंबईच्या हिंदु युनियन क्लबपुढें भाषण करितांना ते म्हणाले :

" जगाच्या, आणि हिंदुस्थानच्या इतिहासांतहि, असे अनेक मोठे सुधारक होऊन गेले आहेत कीं ज्यांनीं सुधारणांचा प्रचार केला आणि तो करतांना सत्याकरितां आणि आपल्या मनाच्या आदेशा-

अनुक्रमणिका

करितां छळहि सोसला. हें सत्य जाहीरपणें जगाला सांगण्यास त्यांच्या अंत:प्रेरणेनें त्यांना आज्ञा दिलेली असे. हे लोक सामान्य मानवाला दुष्प्राप्य आणि स्वत:च्या सामर्थ्यानें मिळविलेल्या अशा पदवीवर अधिष्ठित झालेले असत. रानडयांची भूमिका ही नव्हती. केवळ अंत:प्रेरणेनें सांगितलें म्हणूनच त्यांनीं सुधारणेचा पुरस्कार केला असें नाहीं; राष्ट्र म्हणून आपल्यास जगावयाचें असेल तर सुधारणेखेरीज दुसरी गति नाहीं असें बौद्धिक-दृष्टयाहि त्यांना पटलें होतें. सत्याकरितांच सत्याचा प्रचार करणारे लोक खरोखर सर्व मानवजाती-करितां कार्य करीत असतात. त्यांचा उपदेश विशिष्ट काळांतील किंवा देशांतील लोकांना केलेला असतो हा भाग गौण आहे. रानडयांनीं आपल्या जीवनाला व कार्याला स्वत:च्या देशा-पुरतीच मर्यादा घातलेली होती. जगांतील इतर राष्ट्रांच्या इतिहासाचें व संस्कृतींचें त्यांनीं अध्ययन केलें असलें तरी तें आपल्या लोकांना कसें मार्ग-दर्शक होईल एवढयाच हेतूनें केलें होतें. इतर सुधारक आणि रानडे यांच्यामधील हा मूलभूत फरक, त्यांच्या कार्याचें व शिकवणीचें खरें स्वरूप समजण्यास, लक्षांत घेणें आवश्यक आहे."

ना. गोखल्यांसारख्या रानडयांच्या शिष्याच्या मुखांतून आलेल्या या स्पष्ट उद्‌गारांवरून असें वाटेल कीं रानडयांच्या इतर चाहत्यांनीं व मित्रांनीं त्यांना ज्या उच्च साधुपदावर बसविलें होतें तेथून गोखले यांनीं त्यांना थोडेसें खालीं आणलें आहे. रानडयांच्या निकट सहवासांत असलेले व त्यांच्याशीं आर्थिक व राजकीय सुधारणांत सहकार्य करणारे कै. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी यांचें असें स्पष्ट मत होतें कीं, आपल्या गुरूंच्या सुधारणाविषयक उत्साहाचें जें निदान गोखले यांनीं केलें तें चुकीचें होतें. रानडयांच्या स्मृतिदिना-निमित्त 'हिंदु यूनियन क्लब' तर्फे गोखल्यांनीं केलेल्या भाषणानंतर तीनच वर्षांनीं त्याच व्यासपीठावरून भाषण करतांना रा. ब. जोशी गोखल्यांच्या भाषणांचा मुद्दाम उल्लेख करून म्हणाले :

"न्या. रानडे यांनीं हें सारें कार्य केवळ देश-प्रीतीनें प्रेरित होऊन केलें असें नसून तें धर्माचें कार्य आहे अशा भावनेनें आणि धर्मकार्यास उचित अशा उत्साहानें केलें असेंच या बाबतींत म्हटलें पाहिजे. आयुष्य म्हणजे परमेश्वरानें दिलेला एक पवित्र ठेवा असून त्याचा विनियोग केवळ त्याच्याच सेवे-मध्यें करणें हें आपलें कर्तव्य आहे अशी त्यांची भावना होती. ना. प्रो. गोखले यांनीं कांहीं वर्षां-पूर्वीं अशाच प्रसंगीं आणि याच व्यासपीठावरून बोलतांना असें म्हटलें होतें कीं 'रानडयांच्या सान्निध्यात येणाऱ्या कोणालाहि प्रथम जर कोणत्या गोष्टीची जाणीव होत असेल तर ती म्हणजे त्यांच्या अपूर्व व्यक्तिमत्त्वाच्या बुडाशीं असलेल्या विशुद्ध, अत्युत्कट व गाढ देशाभिमानाचीच होय.' रानडे हे एक निष्ठावान व उत्साही देशभक्त होते यांत संशय नाहीं. हिंदभूवरील त्यांचें प्रेम तीव्र व भावनोत्कट होतें आणि तिच्या हिताकरितां त्यांनीं जन्मभर परिश्रम केले. पण माझ्या मतें त्यांच्या अंतरंगांत देशप्रीति अथवा राष्ट्रीयता यापेक्षां बरेंच कांहींतरी अधिक होतें. त्यांचा दृष्टिकोण अधिक व्यापक व सहानुभूतीचें क्षेत्र अधिक विस्तृत होतें. त्यांचें मुख्य उच्चतर अशा ध्येयाकडे होतें. ते अत्यंत श्रद्धावान् आणि धर्मप्रवण होते; आणि त्यांच्या सहवासांत असतां मनावर प्रकर्षानें बिंब-णारीं अशी कोणती गोष्ट असेल तर ती म्हणजे त्यांची सहज, उदात्त व उत्कट ईश्वरनिष्ठाच होय. आपण त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या सहवासांतच नेहमीं असतों, आणि त्याच्याच कृपे-मुळें लाभलेल्या प्रकाशांत आपल्या शक्त्यनुसार आपलीं कर्तव्यें करीत असतों अशीच त्यांची भावना असे असें मला वाटतें."

अत्यंत निकट सहवासांत असलेल्या रानडयांच्या या दोन सहकाऱ्यांमध्यें असलेला हा एवढा मतभेद सकृद्दर्शनीं न उलगडणारा असा वाटतो, आणि त्यामुळें रानडयांच्या मनोरचनेंतील एका मूलभूत विशेषासंबंधीं कांहींशी संदिग्धता उत्पन्न होते. थोडें अधिक खोलांत जाऊन जर आपण या मतभेदाचें परीक्षण केलें, तर हा मतभेद खरा नसून वरवरचा आहे असें दिसून येईल. रानडयांच्या जीवनविषयक दृष्टिकोणाची घडण प्राधान्यानें धार्मिक आहे ही गोष्ट गोखल्यांनाहि मान्य होती. ज्या भाषणांत त्यांनीं रानडयांच्या देशप्रीतीस अग्रस्थान दिलें होतें, त्याच भाषणांत रानडयांच्या धर्मवृत्तीच्या बाजूनेंहि त्यांनीं साक्ष दिल्याचें आढळतें. ते म्हणतात :








" एकाद्या देवतेच्या सान्निध्यांत ज्या प्रकारची भावना मनांत निर्माण होते, तशीच भावना रानडयांच्या सान्निध्यांत असतां अनुभवास येत असें असें म्हणण्यांत कोणत्याहि प्रकारची अतिशयोक्ति नाहीं. त्यांच्यासमोर कोणत्याहि हलक्या गोष्टीचा उच्चार करणें तर राहोच, पण विचारसुद्धां मनांत आणण्याची भीति वाटत असे."

वस्तुत: रानडयांच्या प्राधान्यानें धर्मप्रवण असलेल्या मनावर देशप्रीतीची जी एवढी छाप दिसून येई, ती त्यांनीं बुद्धिपुरस्सर स्वीकारलेल्या भूमिकेचेंच फळ होतें. रा. ब. जोशी यांनीं म्हटल्याप्रमाणेंच, स्वदेशाच्या सेवेंत आपण परमेश्वरी हेतूच्या सिद्धतेस साहाय्य करीत आहों अशी रानडयांची भावना असे. कांहीं साधुसंत स्वत:च्याच आत्मिक उद्धारांत मग्न असतात; कांहीं सद्य:फलाकडे लक्ष न देतां कोणत्या तरी एका तत्त्वाच्या प्रस्थापनेसाठींच प्रयत्न करितात; कांहीं मात्र स्वत:च्या कर्तृत्वाला आणि उपयुक्ततेला संकुचित मर्यादा न घालतां आपल्या पुण्याईचा लाभ आपल्याशीं संबंध आलेल्या सर्वांनाच करून देतात. विभूतींच्या या तिसऱ्या कोटीमधले रानडे हे होतें हें स्पष्ट आहे. हिंदुस्थानच्या इतिहासांतील ज्या कालखंडांत त्यांचा जन्म झाला त्या-वेळच्या भारतीयांचें जीवन व त्यांच्यापुढील प्रश्न यांनींच त्यांचें लक्ष प्रामुख्यानें वेधावें हें अपरिहार्य होतें. परंतु याविषयीं केव्हांहि बोलतांना अथवा लिहितांना केवळ तत्कालोपयोगी गोष्टीचा पुरस्कार न करितां, मूलत: न्याय्य अशा गोष्टींचाच पुरस्कार त्यांनीं केला ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्याजोगी आहे. ज्याप्रमाणें व्यापक विश्वबंधुत्वाच्या आड त्यांनीं आपली कमी व्यापक अशी राष्ट्रीयता येऊं दिली नाहीं, त्याप्रमाणें सत्याच्या आड स्वार्थ येऊं दिला नाहीं. सर्व मानवप्राणी ईश्वराचींच लेंकरें आहेत असेंच ते म्हणत, आणि हिंदुस्थानच्या उद्धाराचें कार्य करण्यानें आपण जगांतील सर्व साधुजनांच्या मनांतील जिव्हाळयाच्या अशा ज्या दोन गोष्टी– सत्य व मानवहित– त्यांनाच हातभार लावीत आहोंत असें त्यांना [1]वाटे.

रानडयांचे विचार व त्यांनीं केलेल्या चळवळी इतक्या विविध स्वरूपाच्या होत्या कीं त्यांच्या जीवन-हेतूंमध्यें मुख्य कोणता याविषयीं अनेकांचीं अनेक मतें व्हावींत ही गोष्ट अपरिहार्यच होती. पण एवढयानें त्यांच्या निकट सहवासांतील ना. गोखले व रा. ब. जोशी या दोघांमधील मतभेदाचा सर्वस्वी उलगडा होत नाहीं. या दोघांच्या मतांमधील हें अंतर कदाचित् प्रत्येकानें केवळ आकस्मिकपणें आपल्या भाषणांत निरनिराळया मुद्द्यांवर भर दिल्यानें पडलें असेल. तरीहि असें म्हणतां येईल कीं कोणत्याहि विभूतीमधील साधुत्वाचें योग्य आकलन होण्यास तिच्या-कडे बघणाराच्या नैतिक व्यक्तित्वाचा विकासहि त्या प्रमाणांत झाला असला पाहिजे. इ. स. १९०३ मध्यें ना. गोखले हे स्वत: देशाभिमानाच्या उज्ज्वल दीप्तीनें प्रज्ज्वलित झाले होते, आणि ही ज्योत तेवत ठेवण्याचें कार्य पुष्कळ अंशीं रानडयांनींच केलें होतें. यामुळें त्यावेळीं गोखल्यांना रानडयांच्या गुणांपैकीं देशाभि-

१. मनाच्या शृंखला या शृंखला आहेत अशी एकदां जाणीव झाली कीं मग त्या आपोआप गळून पडतात. उलट त्यांचें बंधनात्मक स्वरूप नाहींसें होऊन उन्नत जीवनाला शिस्त लावण्यासहि त्यांचा उपयोग होऊं लागतो. असें होण्यास अर्थात् अनेक वर्षे अथवा पिढयाहि खर्ची पडतील. भावी पिढयांच्या हितासाठीं आपल्यास आपल्या जीवनाचा त्यागहि करावा लागेल. पण एकदां आपण योग्य मार्गाला लागलों कीं कृत्रिम तर्कदृष्टीमुळें आपणच झांकून टाकलेला अंतर्दीप अधिक तेजानें तळपूं लागेल व आपल्या मागून येणाऱ्यांना उन्नतीचा मार्ग दाखवील. उन्नतीच्या स्वर्गाकडे नेणारा हा मार्ग अत्यंत अरुंद आहे, आणि तो चालून जाणाऱ्याला दुबळया इंद्रियांचा व मनाचा तोल संभाळून तीक्ष्ण धारांच्या शस्त्रावरून कसरत करीत जावें लागतें. ' नरकाचा मार्ग सद्धेतूंच्या शिलांनींच बांधून काढला आहे ' ही इंग्रजी म्हण सर्वांस परिचित आहेच. फक्त कान व डोळे बंद करून उदासीन राहिलें, फूलपाखरांसारखें आयुष्य घालविलें आणि नैतिक व बौद्धिक दृष्टया मरण पत्करलें म्हणजे झालें. हा मार्ग आपण फार काळपर्यंत आचरला आहे. आतां आपलें घर व्यवस्थित लावण्याची वेळ आली आहे. केवळ रंगसफेती किंवा वरवरची डागडुजी करून अंतर्गत दोषकारणांचें निर्मूलन होणार नाहीं. जीवनाची आमूलाग्र पुनर्घटना करणें आवश्यक आहे. हृदयाचें या प्रकारचें नवें स्वरूप साधावयाचें असेल तर तीर्थसिंचनानें भागावयाचें नाहीं; त्याला अग्निदिव्यच हवें. (सं. लेख– पृ. १२४–१२५)










मानाचा गुण प्रकर्षानें लक्षांत यावा हें साहजिक होतें. रा. ब. जोशी यांची गोष्ट वेगळी होती. ते व रानडे यांच्यामध्यें वयाच्या दृष्टीनें अंतर कमी होतें. जोश्यांना आपला स्वतंत्र ध्येयवाद होता. त्यांत व रानड्यांच्या ध्येयवादांत कांहींसें साम्य होतें, पण जोश्यांनीं तो सर्वस्वी रानड्यांच्या पासून उचलला नव्हता. त्यामुळें त्यांना रानड्यांच्या व्यक्तित्वाचें व्यापक व यथायोग्य आकलन होऊं शकलें. गोखल्यांचें स्वतःचें व्यक्तित्व जसजसें विकसत गेलें, तसतसें त्यांनाहि रानड्यांच्या विविध गुणांचें आकलन योग्य प्रमाणांत होऊं लागलें. मुंबईच्या भाषणानंतर एक वर्षानें मद्रास येथें १९०४ च्या जुलैमध्यें भाषण करतांना रानड्यांच्या कार्याचें समालोचन त्यांनीं पुढील शब्दांनीं केलें आहे :

> "युगायुगाला, निरनिराळ्या देशांत व निरनिराळ्या प्रसंगीं, चुकतमाकत, अडखळत चाललेल्या या दुबळ्या मानवजातीला मार्गावर आणण्याकरितां व प्रकाश दाखविण्याकरितां ज्या विभूति अवतीर्ण होतात त्यांपैकीं रानडे हे एक होत."

जसजसा अधिक काल गेला, तसतसें रानड्यांच्या व्यक्तित्वांत प्रमुख असलेल्या नैतिक बाजूचें महत्त्व गोखल्यांना उमगलें. श्री. रमाबाई रानडे यांनीं लिहिलेल्या 'आठवणीं'ना गोखल्यांनीं जी प्रस्तावना लिहिली आहे तीवरून असें दिसतें कीं आपल्या गुरूच्या चारित्र्यांत परिणत स्वरूपांत आढळणाऱ्या साधुत्वाविषयीं त्यावेळीं त्यांची पूर्ण खात्री झाली होती. या लेखांत रानड्यांना ते विभूति म्हणून ओळखतात, एवढेंच नव्हे तर, त्यांना परमेश्वरी अवतारहि मानतात. गोखल्यांच्या या वैयक्तिक भावना सोडल्या तरी ज्यांचा ज्यांचा रानड्यांशीं चांगला परिचय होता त्या सर्वांनीं एकमतानें रानड्यांच्या चारित्र्यांत असणाऱ्या साधुत्व, ईश्वरनिष्ठा व सच्छीलता या गुणांना मान्यता दिली होती. आणि जीवनांत सद्‌गुणांना अनन्यसाधारण महत्त्व देणारी रानड्यांसारखी व्यक्तीच राष्ट्राला सुधारणेच्या मार्गावरून नेण्यास समर्थ ठरते.

रानडे हे कोणी संन्यासी नसून विशुद्ध व श्रद्धाशील अंतःकरणाचे गृहस्थच होते ही गोष्ट लक्षांत ठेवल्यास त्यांच्या साधुत्वाविषयींचा हा गोंधळ बराचसा कमी होईल. पुढील जन्मांत अधिक योग्यता प्राप्त होण्याकरितां इहलोकांतलें जीवन कर्तव्यतत्परतेनें, सर्वांगीण व विशाल दृष्टिकोण ठेवून व्यतीत करावें असें रानड्यांचें ध्येय होतें.[२] रानड्यांची मूर्तिपूजेवर श्रद्धा नव्हती, पण जगताचें नैतिक नियमन हें एका सर्वश्रेष्ठ शक्तीकडून होत असतें यावर त्यांचा दृढ विश्वास होता. या सर्वश्रेष्ठ शक्तीच्या इच्छेवर व योजनेवर पूर्ण श्रद्धा असणें हें रानड्यांच्या तत्त्वज्ञानाचें सार आहे.[३] यावरून असें मात्र समजूं नयें कीं रानडे हे केवळ दैववादी होते अथवा संन्यासाचा पुरस्कार करणारे होते. उलट दैववाद म्हणजे अत्यंत दुष्ट असा निरीश्वरवाद होय असें त्यांचें मत होतें. मनुष्याला आपल्या उद्धारार्थ, उत्तरोत्तर विकास पावणाऱ्या धर्मशीलतेच्या साह्यानें, मोक्षाप्रत जाण्याचा सहेतुक प्रयत्न करण्याची बुद्धि देणें आवश्यक आहे, एवढीहि न्यायबुद्धि अथवा शहाणपण त्या परमेश्वराला नाहीं असें मानणें हें एका अर्थीं ईश्वराचें अस्तित्व मुळांतच नाकबूल करण्याहूनहि अनिष्ट आहे. त्या ईश्वरी प्रेरणेला व हेतूला मान तुकविल्यामुळें व्यक्तींच्या व समाजाच्या उत्कर्षाला आवश्यक असलेला नवीन विश्वास व आशावाद आपल्यास प्राप्त होतो. या बाबतींत रानड्यांच्यावर पूर्वीच्या आर्यांच्या क्रियाशील, ओजस्वी व व्यावहारिक अशा धर्मविचाराचा जेवढा परिणाम झाला होता, तितकाच तो एकनाथ,

---

२. वैभव आणि संपत्ति पुष्कळ असली, अथवा इतर जग मोठ्या आदरानें आपल्याकडे पहात असलें, तरी आपलें खरें कर्तव्य म्हणजे या जन्मांत जो अल्पकाल आपल्या वांटयाला आला आहे, त्यामध्यें पुढील जन्माच्या दृष्टीनें आपण अधिक योग्य कसे होऊं हें पहाणें हेंच होय. आणि या दृष्टीनें प्रत्येक दिवशीं, अथवा प्रत्येक वर्षाला आपण किती प्रगति केली हें जर आपल्यास अजमावतां आलें तर आपल्या कार्याचा खरा मोबदला आपल्यास मिळाला असें होईल. (सं. लेख– पृ. २१२)

३. ते एकदां म्हणाले :– 'आपण सतीचें वाण घ्यावयाचें तें दुःख भोगण्यांत कांहीं आनंद आहे म्हणून नव्हे, तर ज्या गोष्टींकरितां हें करावयाचें त्या इतक्या महत्त्वाच्या आहेत कीं त्यापुढें हें दुःख आणि हा त्रास कांहींच नव्हे.' (गोखल्यांचीं भाषणें– पान ७६७)

तुकाराम व रामदास यांनीं घालून दिलेल्या निष्ठापूर्वक राष्ट्रसेवेच्या उदाहरणांचाहि झाला होता असें दिसतें. रानडे स्वतःला भागववतधर्मानुयायी मानीत असत, हें प्रसिद्ध आहें. ज्या प्रार्थनासमाजाचे रानडे हे एक अध्वर्यु होते तो पंथ इतर रूढ धर्मपंथांपेक्षां भागवतपंथाशींच अधिक जुळत होता.

मानव प्राणी आणि दैवी इच्छा यांच्यामधील व्यवहार प्रत्यक्ष स्वरूपाचा असावा असें रानडयांचें मत असल्यानें रूढ श्रुतिस्मृतिपुराणें यांची निरपवाद बंधनकारकता त्यांना मान्य नव्हती. त्यांच्या मतानें आध्यात्मिकदृष्टया

"आपण सारे ईश्वराचीं लेकरें आहोंत, म्हणून ईश्वराचीच आज्ञा मानण्यास आपण बांधलेले आहोंत. भूतकालांतील अथवा वर्तमानकालीन सत्पुरुष हे कितीहि मोठे व आदरणीय असले, तरी आपण आणि ईश्वर यांच्यामध्यें येण्याचा अधिकार त्यांना नाहीं."[४]

अंतर्मुख वृत्ति, स्वतःच्या वैगुण्याची जाणीव, उच्चतर ध्येयाची विकासयुक्त कल्पना, परमेश्वरी नेतृत्वावर श्रद्धा आणि स्वतःच्या दोषांचा परिहार करून गुणांची वृद्धि करण्याचा अखंड प्रयत्न इत्यादि पायऱ्या व्यक्तीच्या नैतिक उन्नतीस आवश्यक आहेत असें रानडयांनीं सुचविलें आहे. अशा तऱ्हेनें मोक्षप्राप्ति ही व्यक्तीच्या प्रयत्नावर अवलंबून असून आपल्या मनाला असणाऱ्या बंधनांची जाणीव हें त्या प्रयत्नाचें प्रारंभस्थान होय. हें झालें कीं आपला सारा आयुष्य-क्रम म्हणजे उच्चतर जीवन लाभण्याकरितां केलेला एक अखंड प्रयत्नच होऊन बसतो. आपला पुन-र्जन्मावरील विश्वास रानडयांनीं स्पष्ट शब्दांत व्यक्त केला आहे, पण हा जन्म आपल्यास जेथें जीवनाचे अनुभव येतात व जेथें आपली परीक्षाहि होते अशा या जगाखेरीज दुसऱ्या कोणत्या तरी लोकांत मिळतो ही कल्पना त्यांना पूर्णपणें अमान्य होती.[५] शिवाय त्यांच्या मतानें या जन्मांतील उच्च प्रवृत्तींच्या विकासामुळेंच अधिक उदात्त आणि उन्नत जीवनावरील आपला अधिकार सिद्ध होतो. आत्मसंतुष्टतेपेक्षां आत्मविस्ता-रावर, संन्यासापेक्षां कर्मयोगावर, गुणसंपत्तीवरील स्वामित्वापेक्षां गुणविकासावर भर देणें हाच रानडयांच्या

४. या पराधीनतेची आणि परावलंबनाची जागा सर्व सत्ता उलथून पाडणाऱ्या बंडखोरीनें घेतली पाहिजे असें नाहीं. आपल्या हृदयांतील ईश्वराची आज्ञा ऐकण्याचें स्वातंत्र्य हवें हें मात्र खरें. आजच्या किंवा कालच्या महान् व सुज्ञ व्यक्तींविषयीं आपण आदर बाळगणें हें उचित आहे; परंतु आपणांपैकीं उच्चनीच अशा साऱ्यांच्या हृदयांत जें दैवी तत्त्व–परमेश्वर–आहे, त्याच्या आणि आपल्यामध्यें त्यांनीं येतां कामा नये. या अर्थानेंच आपल्यामध्यें स्वाभिमान–अथवा आपल्यामधील दैवी अंशाचा अभिमान– बाणविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. हें स्वाभिमानाचें रोपटें फार नाजूक असून त्याची वाढ होण्यास वर्षानुवर्षें लागतात. पण ती करण्याचें सामर्थ्य आपल्यांत आहे, आणि तें आपलें स्वतःविषयींचें एक कर्तव्यच आहे. सर्व मानवी सत्तेचा मान ठेवा, धर्मसंस्थापक अथवा धर्मग्रंथ यांच्याविषयीं आदर बाळगा, परंतु हा आदर आणि मान आपल्या विवेकाच्या शिकवणीच्या– आपल्या हृदयांतील दैवी संदेशाच्या– आड येऊं देऊं नका.

(सं. लेख– पृ. १९४)

५. आतां याविषयीं नवीन विचार सांगावयाचा म्हणजे असा कीं आपल्या स्वतःपेक्षां अधिक महान् अशा ईश्वरी शक्तीच्या नेतृत्वाखालीं या कर्माबरहि सत्ता मिळवून योग्य प्रकारचें वळण मिळालेल्या माणसाला त्यावर मात करतां येणें शक्य आहे. हें आपल्यास आपल्या दररोजच्या व्यवहारांतहि दिसतें, आणि आपल्या धर्मग्रंथांतूनहि नियति अथवा दैव हीं आपल्या प्रगतीच्या आड क्वचितच येतात, मात्र आपण कर्मयोगाचें आचरण निष्ठेनें केलें पाहिजे, असें सांगितलेलें आढळेल. कर्माविषयींची चुकीची समजूत नाहींशी करणें हें फार कठिण आहें हें मला मान्य आहे. कदाचित् तें इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां अधिक कठिण असेल. परंतु तें झालें पाहिजे. या पिढींत अथवा या जन्मांत न साधलें, तर पुढील पिढ्या किंवा जन्म खर्च करावयास हवेत. कारण त्याखेरीज आपली संपूर्ण उन्नति साधणार नाहीं.

(सं. लेख– पृ. १९५)

तत्त्वज्ञानाचा बीजमंत्र होता[६].

हें तत्त्वज्ञान व्यक्तीच्या आध्यात्मिक जीवनापुरतेंच मर्यादित नसून त्याचें क्षेत्र विस्तृत होतें हें रानड्यांच्या भाषणांतील खालील उताऱ्यावरून स्पष्ट होईल.

"आध्यात्मिक बाबतींत, आणि कांहीं अंशीं ऐहिक बाबतींतहि, मनुष्याची खरी योग्यता त्याच्या ऐहिक वैभवावरून ठरविण्यांत येत नसून त्याची स्वतःची उन्नति किती झाली आहे अथवा उन्नत आणि व्यापक जीवनाच्या दृष्टीनें उत्तरोत्तर त्याला किती प्रगति करतां येईल यावरून ठरविण्यांत येते. परकीयांच्या अनुग्रहानें मिळणारी स्वतंत्रता ही परिस्थितीनें आपल्यावर लादलेली सवलत होईल. ती खरी आपली नव्हे. तो केवळ अनपेक्षित लाभ असून स्वप्रयत्नानें केलेली खरी प्रगती नव्हे." [७]

रानड्यांच्या व्यक्तित्वांत खासगी आचरणाकरितां राखून ठेवलेला वेगळा आणि सार्वजनिक धोरणाकरितां खुला ठेवलेला निराळा, सामाजिक सुधारणेकरितां एक व राजकीय चळवळीकरितां दुसरा, जिव्हाळ्याच्या माणसांच्या स्वागताकरितां अथवा विरोधकांना खोड्यांत घालण्याकरितां, असे वेगवेगळे कप्पे नव्हते. मानवी जीवनाच्या दैवी हेतूविषयीं त्यांना योग्य जाणीव होती, व आपल्या कामाशीं संबंध आलेल्या सर्व क्षेत्रांतून हें कार्य पार पाडण्याचा त्यांनीं आयुष्यभर प्रयत्न केला. रा. ब. जोश्यांनीं म्हटल्याप्रमाणें "रानडे हे कोणी दैवी प्रेरणा झालेले प्रेषित अथवा द्रष्टे नसले, तरी त्यांची श्रद्धा व आशावाद त्याप्रकारचा होता, आणि याच श्रद्धेनें आणि आशावादानें त्यांनीं जन्मभर कार्य केलें."

रानड्यांच्या जीवितकार्याच्या मागें प्रामुख्यानें असलेल्या या नैतिक व मानवी प्रेरणांचें ज्यांना ग्रहण होणार नाहीं व महत्त्व पटणार नाहीं, त्यांना रानड्यांनीं भारतीयांच्या जीवनांत मूलगामी आणि व्यापक अशा सुधारणा करण्याचा जो यत्न केला त्याचें खरें औचित्य समजणार नाहीं. हिंदुस्थानचें स्वातंत्र्य आणि प्रगति ह्या प्रश्नांच्या ऐतिहासिक आणि नैतिक स्वरूपाची कल्पना रानड्यांपूर्वीं यथार्थपणें कोणत्या भारतीयाला आली असेल तर ती राजा राममोहन राय यांनाच होय. राजा राममोहन राय हे हिंदुस्थानांतील सुधारणेच्या साऱ्या संघटित चळवळीचे जनकच होत. या दोन व्यक्तींचा प्रत्यक्ष असा संबंध आला नसला तरी रानड्यांना राजा राममोहन राय यांच्याविषयीं आदर वाटत असे हें उघड आहे. या दोघांचाहि एकच प्रयत्न सतत चालू असे. तो म्हणजे मानवी जीवनाचा कोणताहि विशिष्ट आणि तात्कालिक भाग घेतला तरी त्यांतून खोल दैवी हेतूच कसा सिद्ध होतो हें पाहणें हा होय. ज्याला रानड्यांच्या शिकवणुकीचें रहस्य समजावून घेऊन आपल्या शक्तीप्रमाणें तिचें अनुकरण करावयाचें असेल त्याला, बौद्धिक दृष्ट्या तरी, मनुष्याचें जीवन व त्याचें कर्तव्य याविषयींची रानड्यांची ही जी उदात्त कल्पना आहे तिच्याशीं समरस होणें आवश्यक आहे.

---

६. ही परिषद आणि हिच्यासारखीं इतर संमेलनें यांचें खरें कार्य म्हणजे प्रत्येक माणसास आपल्यावर कांहीं जबाबदारी असून ती पार पाडणें हें आपलें कर्तव्य आहे, आपलें जीवित आणि आपल्यास लाभलेलें शारीरिक सामर्थ्य हीं त्याकरितांच आहेत हें पटवून देणें हें होय. हाच विचार माझ्या मनांत अनेक वेळां येतो, आणि मला वाटतें या गोष्टींचा गंभीरपणें विचार करूं लागल्यास प्रत्येकाच्या मनांत येत असेल. भूतकाळाबद्दल आपल्यास भरपाई करावयाची आहे अशी जाणीव येथें जमलेल्यांपैकीं ज्यांना ज्यांना झाली असेल त्यांनींच येथें हजर असणें श्रेयस्कर आहे. मग आपल्यापुढील कार्यक्रमांतील एखादी बाब त्यांना मान्य नसली तरी चालेल.
(सं. लेख– पृ. २१३)

७. परंतु जेव्हां देशाच्या निरनिराळ्या भागांतील असंख्य लोकांना आपल्या सामाजिक परिस्थितींत बदल व्हावयास पाहिजे असें मनापासून वाटतें आणि प्रत्येकजण आपआपल्या स्थानीं तो घडवून आणण्याचा प्रयत्न करितो तेव्हां त्यांच्या त्या इच्छा आणि त्याकरितां त्यांनीं चालविलेली धडपड सफल होत नाहीं असें क्वचितच् घडतें.
(सं. लेख– पृ. २०९–२१०)

# रानडयांची कार्यपद्धति

माझ्या तत्त्वज्ञानांतील दोन गोष्टींवर माझी अविचल श्रद्धा आहे. हा आपला देश हीच जगाची खरी उद्धारभूमि आहे, आणि हिंदी जनताच त्या उद्धारकार्याकरितां ईश्वरानें नियोजिलेली आहे याच त्या दोन गोष्टी होत.

( सं. लेख– पृ. १२५–१२६ )

राजकारण, समाज वा धर्म; व्यापार, उद्योगधंदे वा ललितकला; शास्त्र, वाङ्मय वा कला; युद्ध वा शांतता, यांपैकीं कोणतेंहि क्षेत्र घेतलें, तरी मनुष्यालाच, व्यक्तिशः अथवा सामुदायिकरीत्या, स्वप्रयत्नानें आपल्या मार्गामधील अडचणींचा परिहार करून आपलें सामर्थ्य वाढविलें पाहिजे.

( सं. लेख– पृ. २३१–२३२ )

देशाचा उद्धार करण्याचें कार्य ज्यांनीं अंगावर घेतलें आहे अशा राष्ट्रनेत्यांच्या बोलण्यांत दोन गोष्टींचा उच्चार वारंवार झालेला आढळतो. आपला देश हीच जगाची खरी उद्धारभूमि आहे, आणि ईश्वरानें आपला समाज हाच या उद्धारकार्याकरितां नियोजिला आहे या त्या दोन गोष्टी होत. अशा तऱ्हेची मनोवृत्ति साधारणपणें निरपेक्ष स्वदेशसेवेपेक्षां आपल्या वंशासंबंधीं वाटणाऱ्या दुरभिमानावरच अधिष्ठित झालेली असते. रानडे हे हिंदुस्थानांतील सुधारणेच्या चळवळीचे एक प्रमुख नेते होते, आणि वर सांगितलेल्या दोन गोष्टींवरचा आपला दृढ विश्वास त्यांनीं प्रकट केला होता; म्हणून वरवर पाहणाऱ्या कोणाहि माणसाची समजूत रानडे हे पुनः एकदां राष्ट्रजागृति करण्याच्या या दोन ठराविक साधनांचाच अवलंब करीत आहेत अशीच झाली असती. पण हिंदी जनतेकडे ईश्वरानें सोपविलेल्या विशिष्ट कार्याविषयींची रानडयांची श्रद्धा ही केवळ जनतेस आपलेसें करून घेण्याच्या नेहमींच्या युक्तीपेक्षां वेगळी आणि अधिक अर्थपूर्ण होती हें दाखवून देणें फारसें अवघड नाहीं. परंतु ती तशी नसून लोकांच्या आत्मप्रीतीच्या भावनेस आवाहन करून राष्ट्रजागृति करण्याची एक युक्तीच होती असें जरी म्हटलें, तरी रानडयांनीं तद्वारां हिंदुस्थानच्या नवजीवनाचा पायाच घातला ही गोष्ट कोणालाहि अमान्य करतां येणार नाहीं.

जोपर्यंत जनतेला स्वतःची प्रगति करण्याकरितां आपण चालविलेल्या झगडयांत आपल्यास यश मिळेल अशीं खात्री वाटत नाहीं. तोंपर्यंत त्यांच्या केवळ सुधारणाविषयक कर्तव्यबुद्धीला केलेलें आवाहन निष्फळ होण्याचाच बराच संभव असतो. जितकी अधःपाताची गर्ता अधिक खोल, तितकी शतकानुशतकांच्या अवनतीनें निर्माण झालेली पराभूततेची भावना व तदनुषंगिक जडता घालविण्याची आवश्यकताहि अधिक. भारतीय जनता गेल्या शतकाच्या मध्यकालीं पराकाष्ठेच्या अगतिक स्थितीस पोहोंचली होती, आणि स्वतःला आलेल्या या अगतिकतेच्या कारणांसंबंधींचें त्यांचें अज्ञान भविष्यकालाविषयींच्या त्यांच्या नैराश्याइतकेंच घोर होतें. अशा स्थितींत कोणत्याहि अव्वल दर्जाच्या सुधारकाग्रणीचें अथवा द्रष्टयाचें पहिलें काम म्हणजे स्वदेशबांधवांच्या, निदान त्यांतील सुशिक्षितवर्गाच्या अंतःकरणांत तरी आशावाद निर्माण करणें हेंच होय. जेथें यशाची आशा नाहीं, तेथें कर्तव्याच्या हांकेसहि ‘ ओ ’ मिळत नाहीं. आशावादाच्या या संदेशाची घोषणा, पुढील कर्तव्यें आणि जबाबदाऱ्या यांविषयींची आपली योजना लोकांपुढें मांडण्याच्या आधींच, रानडयांनीं केली, यांत राष्ट्रांच्या उद्धाराच्या इतिहासाचें आपलें अचूक ज्ञान त्यांनीं प्रकट केलें.

भारतीय संस्कृतीच्या उत्कर्षापकर्षाच्या प्रदीर्घ इतिहासांत रानडयांना असे एकदोन विशेष आढळले कीं ज्यामुळें हिंदुस्थानच्या अनन्यसाधारण अशा नियोजित

भूमिकेविषयींची त्यांची श्रद्धा दृढ झाली.[1] हिंदुस्थानाला विविध संस्कृतींचें संगमक्षेत्र असें अगदीं यथार्थपणें म्हणतां येईल. मूळची आर्य संस्कृति ही या चित्रांतील पार्श्वभूमि आणि बराच मोठा भाग आहे असें म्हटल्यास मुसलमानी, बौद्ध व ख्रिस्ती संस्कृतींनाहि त्यांत महत्त्वाचें स्थान मिळाल्याचें दिसतें. अनेक संस्कृतींच्या या साहचर्याचें पर्यवसान स्वाभाविकपणेंच सहिष्णुता आणि तडजोडीची वृत्ति बाणण्यांत झालें आहे. अधूनमधून, लक्षांतहि न येतां, पण तितक्याच निश्चितपणें संस्कृतींची ही सरमिसळ व एकीकरण चालूं आहे. या भिन्न संस्कृतींच्या मिश्रणानें तयार झालेल्या सर्वमान्य अशा मानवी संस्कृतीच्या संवर्धनाची विशिष्ट भूमिका या देशाकरितां योजलेली आहे. आपल्या सर्व कृतींच्या द्वारें या नियोजित कार्यास आपल्या परिस्थितींत शक्य तें साहाय्य आपल्यास करावयाचें आहे.

या आशावादास पुष्टि देणारा भारतीय इतिहासाचा दुसरा एक विशेष असा कीं भारतीय जीवनाचा विकास इतर देशांच्या मानानें निर्विघ्न व अखंडपणें चालला आहे. बाहेरून होणारीं आक्रमणें व अंतर्गत अशांतता हिंदुस्थानाला अगदीं अपरिचित आहेत असें नाहीं, परंतु इतर प्राचीन देशांशीं तुलना करितां हिंदुस्थानांतील अखंड अशी शांतता व प्रगति विस्मयकारक आहे. भारतीय संस्कृतींत असलेल्या या चिवट जिवंतपणाचें मूळ परिस्थितीशीं जुळवून घेण्याच्या जनतेमधील वृत्तींत आहे. आपले सध्यांचे आचारविचार मूलतः चुकीचे आहेत हें मान्य करण्याची त्यांची तयारी नसली, तरी बदलत्या परिस्थितीशीं या आचारविचारांचा मेळ घालण्यास ते सदैव तयार असतात. मानवी स्वातंत्र्याचें आणि विश्वबंधुत्वाचें स्वप्न सत्यसृष्टींत उतरविण्यास भारतीयांच्या या अनन्यसाधारण विशेषाची मुद्दाम जोपासना केली पाहिजे.

वर्तमानकालीं घडणाऱ्या अनेक तात्कालिक घडामोडींच्या मागें सामान्य जनांना न उमगणारा असा कांहीं भाग आहे हें कळण्यास माणसाची दृष्टि अधिक दूरगामी असावी लागते, व तिला युगांचा नसला तरी शतकांचा विचार एकदम करण्याचें सामर्थ्य असावें लागतें. परकीयांनीं पुनः पुनः केलेल्या आक्रमणामुळें सर्वच भारतीयांचीं मनें तात्काळ उद्वेगानें आणि शरमेनें भारावतात. आपल्या मनाच्या कोठल्याहि भागांत अशा भावनांना स्थान न देण्याइतके रानडे देशभक्तिशून्य खास नव्हते. इतिहासकार म्हणून हिंदी आणि परकीय लोकांमधील एखाद्या अयशस्वी लढ्याचें वर्णन करावयाचा प्रसंग त्यांना येता, तर आपल्या देशबांधवांच्या पराभवाचें वर्णन त्यांनीं हौसेनें केलें असतें असें मुळींच नाहीं. एखादें प्रत्यक्ष आक्रमण देशावर झालें असतें तर त्यांच्यामधील मराठ्याचें रक्त सळसळल्यावांचून राहिलें नसतें. या गोष्टी खऱ्या असूनहि, शक्य तों सर्व प्रतिकार करून एका झगड्यांत अपयश आल्याने पुढील झगड्याची तयारी करण्याच्या दृष्टीनें, झालेल्या लाभहानीचा विचार करतांना सर्व परिस्थिति लक्षांत घ्यावी लागते. अशा वेळीं आपल्या समाजांत जी

---

१. माझ्या तत्त्वज्ञानापैकी दोन गोष्टींवर माझी अविचल श्रद्धा आहे. हा आपला देश हीच जगाची खरी उद्धारभूमि आहे, आणि हिंदी जनताच त्या उद्धारकार्याकरितां ईश्वरानें नियोजिलेली आहे याच त्या दोन गोष्टी होत. या प्राचीन आर्यावर्तावर ईश्वरानें आपल्या कृपादृष्टीचा एवढा वर्षाव कांहीं उगाच केलेला नाहीं. त्याच्या इतिहासाच्या घटनेंत ईश्वराचा हात असल्याचें दिसतें. इतर देशांपेक्षां वेगळी अशी संस्कृति आणि धार्मिक व सामाजिक घटना आपल्यास लाभली असून कालाच्या विशाल रंगभूमीवर त्यांचा विकास निर्वेधपणें चालत आला आहे. जुनी परिस्थिति नवीन गोष्टींना सावकाशपणें आत्मसात् करीत क्रान्तीशिवाय प्रगतीकडेच झुकत आहे. जगांतील सर्व मोठ्या धर्मांचा उदय येथेंच झाला, आणि आतां पुनः येथेंच ईश्वरी आज्ञेनुसार ते बंधूंप्रमाणें एकत्र आले आहेत. त्या ईश्वरी इच्छेनेंच त्यांत नवीन चेतना उत्पन्न होऊन ते सारे एक होतील. जगांतील साऱ्या देशांत हें भाग्य हिंदुस्थानच्या वांटचालाच आलें आहे, आणि या विचारानें आपल्या मनास आशा व सामर्थ्य मिळण्याजोगें आहे. क्रमानें, सावकाश, नवीन गोष्टी आत्मसात् करून प्रगति करणें– हाच आपल्या गत इतिहासाचा अपूर्व विशेष आहे.

(सं. लेख– पृ. १२५–१२६)

अनुक्रमणिका






नवीन लोकांची भरती झाली तिचाच केवळ विचार करून भागत नाहीं; तर परकीयांनीं आपल्या व्यक्तिगत आणि सामाजिक जीवनांत ज्या नव्या पद्धति आपल्याबरोबर आणलेल्या असतात त्यांचाहि विचार करावा लागतो.

आजच्या घटकेला जें यशस्वी ठरलें असेल त्या सान्याचा गौरव करावयाचा या वृत्तीपासून रानडे सर्वथैव अलिप्त होते. आर्यांच्या संस्कृतीवर अधिक आक्रमक अशा इतर संस्कृतींचें वर्चस्व झाल्यावेळींहि त्यांना वेदकालीन संस्कृतीविषयीं आदरच वाटे. परंतु प्रतिकूल परिस्थितीमधील चांगल्या गोष्टींकडेही कानाडोळा करणें त्यांच्या हातून होत नसे. स्वतः आर्यलोकसुद्धां एकेकाळीं परकीय आक्रमकच असून त्यांनीं येथें वसाहती केल्या ही गोष्ट लक्षांत घेतां गतकाळाकडे पाहून कालचे शत्रु ते आजचे शेजारी, मित्र, अथवा बांधवच होतात ही नेहमींच्या प्रत्ययाची गोष्ट मान्य करणें त्यांना जड वाटलें नाहीं. यशस्वी शत्रूकडून योग्य तो बोध आपल्या जित बांधवांचें सामर्थ्य वाढावें या दृष्टीनें घ्यावयास त्यांची तयारी असे, आणि यापेक्षांहि अधिक म्हणजे इतिहासाच्या पडद्यावर दिसणाऱ्या अनेक घटनाचित्रांच्या हालचालींच्या पाठीमागें असणारें अखंड सूत्र जें इतर पूर्वग्रहदूषित किंवा संकुचित दृष्टीच्या लोकांस दिसत नसे तें त्यांना दिसे. या दृष्टीनें हिंदुस्थानच्या कांहीं भागांवर जें मुसलमानांचें राज्य झालें, आणि जी गोष्ट कांहीं लोकांना सर्वस्वी निर्भेळ अशी आपत्ति वाटते त्यांतसुद्धां रानड्यांना कांहीं अनुकूल गोष्टी दिसल्या. मुसलमानी सत्तेनें कला, उद्योगधंदे आणि संस्कृति यांवर जे कांहीं परिणाम झाले ते जरी बाजूला ठेवले तरी हिंदुस्थानचे जे भाग एरवीं विलगविलगच राहिले असते ते राजकीय दृष्ट्या तरी एक झाले हा फायदा झाला. मुसलमानांच्या आक्रमणाला जेवढा कांहीं संघटित असा प्रतिकार हिंदूंकडून झाला त्यामध्येंहि व्यापक शासनसंस्थेच्या जाणिवेचीं बीजें आढळून येतील. अशोकाच्या कालानंतर फक्त अकबराच्या कालींच हिंदुस्थानांत बऱ्याचशा भागावर एक राजसत्ता नांदत होती. हिंदुस्थानच्या राष्ट्रीयत्वाच्या विकासांत मुसलमानांचें आगमन आणि राज्य यांचा भाग महत्त्वाचा आहे, व ही गोष्ट आर्यसंस्कृतीविषयींचा आपला अभिमान किंवा मराठ्यांची उत्कट देशभक्ति न विसरतांहि रानडे मान्य करूं शकत.

रानड्यांची हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजवटीसंबंधानें जी वृत्ति होती तीमधूनहि निराशेच्या परिस्थितींत सुद्धां कांहीं आशादायक विशेष नेमके शोधून काढण्याचें त्यांचें सामर्थ्य दिसून येतें. ब्रिटिशांच्या आक्रमणाच्या पद्धति किंवा राज्य करण्याचें तंत्र यांवर रानड्यांनीं केलेल्या टीकेपेक्षां अधिक भेदक व समर्पक टीका करतां येणें शक्य नाहीं. असें असून या नव्या घटनेंतील चांगली बाजू मान्य करण्यास ते केव्हांहि तयार असत. व्यापक अर्थानें राजकीय ऐक्य, किंबहुना साधें राज्यकारभारविषयक ऐक्यहि ब्रिटिश राजवटींत जेवढें प्रस्थापित झालें तितकें त्यापूर्वी कधींच झालें नव्हतें. हें राज्ययंत्र आपलें नाहीं किंवा निर्दोष नाहीं हा मुद्दा येथें अप्रस्तुत आहे. या राजवटींत सर्वांवर सारख्याच प्रमाणांत लादलें गेलेलें दास्य एका दृष्टीनें उपकारकच झालें, कारण त्यामुळें आपण सारेंच लोक सारखे व एकच आहोंत ही राष्ट्रीय भावना आपल्या आचारांत व विचारांत दिसून येऊं लागली. रानडे आणि इतर तत्कालीन पुढारी यांनीं ज्याला चालना देण्याचे विशेष प्रयत्न केले, त्या हिंदी राष्ट्रीयत्वाचा जन्म या प्रकारच्या घटनेंतून झाला आहे. परकीय सत्तेखालीं वैयक्तिक कर्तृत्वाला व विकासाला फार थोडा वाव मिळतो असें ज्यांना वाटे त्यांना सर्व जनतेच्या अडचणी व तेथें कार्य करण्यास असलेलें विशाल क्षेत्र यांकडे बोट दाखवून ते उत्तर देत. त्यांचें मत असें होतें कीं देशाविषयींचा आपला अभिमान किंवा आपल्या अंगचें कर्तृत्व यांना राज्यकारभारांतच वाव आहे असें नसून त्यांचा ओघ आपण जनतेच्या हिताकडे वळविल्यास शेवटीं एक दिवस जनता हीच राजसत्ता होऊन बसेल. याच दूरदर्शी आणि सखोल अशा हिंदी परिस्थितीच्या ज्ञानाच्या प्रकाशांत रानड्यांनीं स्वतः कार्य केलें व इतरांस तें करण्यास प्रोत्साहन दिलें.

एकंदर मानवी झगड्याचा हिंदुस्थानांतील जो भाग आहे त्याच्या अखेरच्या निर्णयासंबंधीं रानड्यांची वृत्ति आशेची असे. हा त्यांचा आशावाद दुर्बल माणसाच्या केवल मनोराज्यासारखा नसून हिंदुस्थानच्या इतिहासांतील सूक्ष्म अंतर्गत प्रवृत्तींच्या अभ्यासावर आधारलेला होता. परंतु रानड्यांचा विशेष हा कीं त्यांनीं दिलेली कर्तव्याची हांक या झगड्याच्या निर्णयाकडे

अनुक्रमणिका

पाहून दिलेली नव्हती.[२] एखादा झगडा प्रतिकूल परिस्थितींत करावयाचा असला तरी तें कांहीं तो अजिबात सोडून देण्याचें कारण होऊं शकत नाहीं.[३] आपलें स्वत्व कायम राखणें आणि अनिष्ट शक्तींचा हल्ला परतविणें यांकरितां केलेला प्रयत्न, फल न मिळालें तरीसुद्धां राष्ट्राला संजीवन देऊं शकेल. त्यामुळें तात्कालिक फलप्राप्ति कदाचित् होणार नाहीं, परंतु तो करणारांची सुधारणा खास होईल, आणि अखेर तिलाच महत्त्व आहे. औद्योगिक प्रगतीसारख्या क्षेत्रांतहि परकीयांच्या या बाबतींतल्या श्रेष्ठत्वामुळें आपण क्रियाशून्य होतां कामा [४]नये. आपल्यामधील बलाबलाचें चांगलें ज्ञान करून घेऊन सबल बाजूचा जास्तींत जास्त उपयोग करून घेऊन दुर्बलतेवर विजय मिळवण्यांतच खरा पुरुषार्थ आहे.

इंग्लंडसारख्या प्रगतिपर राष्ट्रांशीं संबंध आल्यानें आपणांस स्वतंत्र व प्रगतिपर जीवनक्रम आंखणें शक्य झालें आहे. अशा वेळीं ध्येयसिद्धीस खुल्या असलेल्या आपल्या आवडीच्या सर्व क्षेत्रांतून, उपलब्ध असलेल्या सर्व साधनांच्या साहाय्यानें कार्य करण्यास झटणें हें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य आहे. रानडे जीवनाकडे धर्मनिष्ठेच्या दृष्टीनें पहात असल्यानें त्यांना उदासीन वृत्तीच्या लोकांची फार चीड येई.[५] आधुनिक संस्कृतीमुळें जीवनांत नवनवीन संधी मिळतात, पण उदासीन किंवा आळशी लोकांना त्याचा काय फायदा ? स्वातंत्र्य व सुधारणा हवी असणाऱ्या कोणालाहि जबाबदारीची सतत जाणीव, सहकार्य व परिश्रम या गोष्टी अत्यंत आवश्यक आहेत.

आर्थिक संघटनेच्या सुधारलेल्या पद्धतीनें आधुनिक राज्यसंस्थेच्या स्थैर्यास व प्रगतीस कशी मदत होते याची रानडयांना चांगलीच कल्पना होती, म्हणून औद्योगिक सुधारणेकडे आपलें तें एक कर्तव्य आहे या दृष्टीनें पाहण्याचा ते उपदेश करीत. रानडयांचें परिस्थितीचें हे अवलोकन व तीवर त्यांनीं सुचविलेले उपाय किती अचूक असत याची जाणीव त्यांच्या समकालीन लोकांसहि झाली असणें शक्य नव्हतें. या कार्यांत राजकीय आणि धार्मिक मतभेदांना कांहींच स्थान नव्हतें. आपली स्वतःची स्थिति सुधारत असतांनाच समाजाची स्थिती सुधारण्याचें श्रेय या औद्योगिक कार्यानें मिळत असे. आतां औद्योगिक सुधारणेचें जें शिखर आपणांस गाठावयाचें, त्याचें यशापयश उत्पा-

---

२. या प्रयत्नांत आपल्यास अपयश येईल, कदाचित् भलतेंच कांहीं होईल, परंतु केवळ प्रयत्नानेंहि आपलें अपरिमित कल्याण होईल; आणि अपयशापासून धडे मिळतील. हाच साऱ्या प्रगतीचा नियम आहे आणि त्यांतून आपली तेवढी सुटका व्हावी असें आपल्यास म्हणतां येणार नाहीं. (सं. लेख– पृ. २३६)

३. हा झगडा प्रतिकूल आणि विषम परिस्थितींतला आहे यात शंका नाहीं; अगदीं हत्ती आणि मुंगी यांच्यामधील म्हणतां येईल. तरीहि तो चालविला पाहिजे. जे या झगडयांत गुंतले आहेत त्यांना वेळोवेळीं तो योग्य दिशेनें चालला आहे कीं नाहीं, किंवा त्याची गति पुरेशी आहे कीं नाहीं एवढेंच पहावयाचें आहे. (अ. निबंध– पृ. ९५)

४. औद्योगिक शिक्षण व तेंहि सर्वोत्तम शिक्षकांपासून, घेण्याचें प्रत्यक्ष कार्य दैवानें आतां आपल्याकरितां नियोजिलें आहे. आपण आतांपर्यंत बरीच प्रगति केली आहे. कच्च्या मालाची सुधारणा झाली पाहिजे आणि आपली जमीन तो माल निर्माण करण्यास समर्थ नसेल तेव्हां त्याची बाहेरून आयात केली पाहिजे. सहकार्याच्या तत्त्वावर भांडवल व मजूर यांची संघटना आपल्यास करावयास हवी, आणि आपलें शिक्षण पूर्ण होऊन दुसऱ्यांची मदत लागेनाशी होईपर्यंत परदेशी तज्ज्ञ आणि यंत्रसामग्री जरूर तेवढी आणविली पाहिजे. आपण फार कालपर्यंत विश्रांति घेतली, आतां नवीन कामाला आपण हात घातला पाहिजे, आणि शरीराला अधिक कष्टाच्या, पण प्रामाणिक कामाची संवय लावावयास पाहिजे, हाच सामाजिक सद्‌गुण आपल्यास शिकावयाचा आहे, आणि तो शिकणें अथवा डावलणें यावर या लढयांत आपल्यास मिळणारें यश अथवा अपयश अवलंबून आहे. (अ. निबंध– पृ. ११३–११४)

५. ते नेहमीं म्हणत, 'औदासीन्य हा या कालांतला मोठा शाप आहे.' चुकीचीं मतें एकवेळ त्यांना चाललीं असतीं, कार्यशक्ति अमार्गाला लागलेली सुद्धां चालली असती, परंतु या औदासीन्यानें त्यांना अत्यंत उद्वेग येई. त्यावर जय मिळवणें त्यांना फार कठिण वाटे. (गोखल्यांचीं भाषणें– पृ. ७७७)



अनुक्रमणिका

दनाच्या सध्यांच्या पद्धतींत इष्ट तो बदल करण्यावर आणि उपलब्ध सामग्रीवर अवलंबून असतें हें खरें. पण उपलब्ध असतील त्या साधनांचा अधिकांत अधिक उपयोग करून घेतल्यानें दारिद्र्य कमी होईल, राष्ट्रीय संपत्तीची वाढ होईल, आणि त्याचबरोबर राजकीय पदवीहि उंच होईल. रानड्यांच्या किंवा त्यांच्या मागाहूनच्या पिढींतील कोणत्याहि राजकीय लेखकाला राष्ट्रीय प्रगतीस आवश्यक असलेल्या आर्थिक पायाचें महत्त्व इतकें उमगलें नव्हतें.

औद्योगिक क्षेत्रांतसुद्धां अगदीं सर्वोत्कृष्ट परिस्थिती अनुकूल नसली तरी निराश होण्याचें कारण नाहीं असें रानडे म्हणत. सरकारची आवश्यक तेवढी सहानुभूति नसली, जरूर तें आवश्यक भांडवल मिळवणेंहि कठिण असलें, काम करणारे लोक असावे त्यापेक्षां कमी कार्यक्षम असले, तरी या परिस्थितीवर उपाय म्हणजे नुसती कुरकुर अथवा क्रियाशून्यता नसून मिळतील त्या साधनांच्या साहाय्यानें पुढें पाऊल टाकणें हाच होय. परिस्थिति शक्य तेवढी सुधारावयाची, आपल्या ध्येयाच्या दिशेनें उपलब्ध सामग्रीचा शक्य तेवढा उपयोग करून घ्यावयाचा हें रानड्यांच्या कार्यपद्धतीमधील मूलभूत तत्त्व होतें.[६] त्यांचें स्वतःचें जीवन इतकें आपल्या उपदेशास धरून असे कीं त्यांच्या संगतीनें कार्य करणाऱ्या कोणालाहि त्यांचें शक्य तों अनुकरण करण्याशिवाय दुसरा मार्गच नसे. जेव्हां रानड्यांनीं वरील विचार प्रथम व्यक्त केले तेव्हां त्यांच्यापुढें आर्थिक प्रश्नच असला तरी व्यवहारांतील वागणुकीसंबंधींचा हा नियम आर्थिक क्षेत्राबाहेरील गोष्टींसहि लागू होता हें स्पष्ट आहे.

कोणत्याहि कार्यांत वेळोवेळीं येणाऱ्या अडचणी म्हणजे कर्तृत्व व पराक्रम यांना दिलेलें आव्हानच होय. या वृत्तींचा परिपोष करण्याची मुळांतच आवश्यकता आहे ही गोष्ट रानड्यांनीं पुरेपूर ओळखली होती. अपयशानें रानडे कधीं खचून गेले नाहींत; कीं मिळालेलें फळ फार अल्प म्हणून कधीं निराश झाले नाहींत; मात्र टाकलेलें प्रत्येक पाऊल प्रगतीच्या आकांक्षेला आणि कर्तृत्वाच्या भावनेला पोषक असल्याची त्यांची खात्री व्हावी लागे. मंदगतीनें झालेली प्रगति टिकाऊ स्वरूपाची होते आणि रानड्यांच्या मतें भारतीय समाजाचा हा एक विशेष गुणच होता. परंतु या मंदगतीचें रूपांतर सुस्तपणांत होऊं नये, किंवा पुराणप्रियतेचें पर्यवसान गतिशून्यतेमध्ये होऊं नये म्हणून प्रगतीची ज्योत प्रज्वलित ठेवून कर्तृत्वाची आकांक्षा जागृत ठेवणें फार महत्त्वाचें होतें.[७] या वृत्ति जागृत ठेवण्यास प्रत्यक्ष कार्यासारखें दुसरें साधन नाहीं. म्हणूनच प्रत्यक्ष कार्य करणारांमध्यें विचारविषयक कांहीं उणीवा असल्या तरी अत्यंत सहिष्णु वृत्तीनें रानडे त्यांच्याकडे पहात.

रानडे हे पक्के परंपरावादी होते. या म्हणण्याचा अर्थ एवढाच कीं परंपरा आणि परिस्थिति यांचा मोठमोठ्या क्रान्तिकारक सुधारकांवर अथवा विचारवंतांवरहि अपरिहार्यपणें होणारा परिणाम त्यांना मान्य असे.[८] या जगांत कोणीहि स्वयंभू असत नाहीं

६. आपल्यास मुख्यतः टाळावयाची गोष्ट म्हणजे अव्यवहार्य गोष्टींच्या पाठीमागें लागणें ही होय... या परिस्थितीची जाणीव झाल्यावर ती सुधारण्याकरितां प्रयत्न करावयाचा तोहि ही गोष्ट पक्की लक्षांत ठेवून, कीं आपल्यास जें साधायचें तें एका वर्षांत अथवा एकाच पिढींत साध्य होईल असें नाहीं. आपल्यास जास्तींत जास्त शक्य म्हणजे लोकांत त्याची इच्छा आणि प्रवृत्ति उत्पन्न करणें, आणि तद्विषयक चळवळ सुरू करून तिला चालना देणें एवढेंच होय. (अ. निबंध– पृ. १८५)

७. विशिष्ट सत्ता अथवा संपत्ति यांचा लाभ हेंच कांहीं आपलें ध्येय नव्हे. ती साध्य करण्याचा प्रयत्न हेंच आपलें खरें ध्येय. या प्रयत्नांत भावनांचा आणि बुद्धीचा विकास व विस्तार झाल्यानेंच आपणांस अधिक धीर, अधिक सामर्थ्य, अधिक शुद्धता आणि अधिक सत्यप्रियता प्राप्त होतील. निदान मी तरी गेल्या हजार वर्षांतील आपल्या इतिहासांतील अलीकडील भागावरून हाच बोध घेईन. या अनेक शतकांच्या इतिहासापासून आपण जर कांहींच बोध घेतलेला नसला, तर आपलें कार्य साधण्याची आशा संपलीच म्हणावयाची.

(सं. लेख– पृ. २२७–२२८)

८. आपलें बोलणें व कृति स्वेच्छेनेंच होत आहेत असें तुम्ही दाखवूं शकाल, तरी अजाणतां कां होईना ज्या परंपरेंत तुम्ही जन्मलां, ज्या परिस्थितींत तुम्ही वाढलां, आईच्या स्तनांतून जें दूध तुम्ही प्यालां,

हें जसें खरें, तसेंच आनुवंशिक आणि परिस्थितीच्या परिणामांतून कोणीहि निसटूं शकत नाहीं हेंहि सत्य होय. यांतून सुटका होणें ही गोष्ट जशी अस्वाभाविक तशीच अनिष्टहि आहे. सध्यांच्या परिस्थितींतून निघालेलें ध्येयच टिकून राहूं शकेल.[९] हें ध्येय प्रत्यक्षांत उतरविण्याचा प्रयत्न लोकांकडून व्हायचा तोहि त्यांच्या आजच्या गरजा आणि त्यांना उपलब्ध असणारी सामग्री यांच्या साहाय्यानेंच होय. केवळ विचारच करावयाचा तर रानडयांच्या ध्येयवादाला मर्यादाच नव्हत्या. पण प्रत्यक्ष कार्याच्या त्यांच्या तत्त्वज्ञानांतील एक भाग या नात्यानें कोणत्याहि वेळीं आणि कोणत्याहि स्थलीं आपल्या ध्येयवादांतील जो भाग प्रत्यक्ष वस्तुस्थितीच्या साहाय्यानें सिद्ध होऊं शकेल तेवढाच ते उचलीत.

आर्थिक किंवा राजकीय क्षेत्रांत कसलीहि महत्त्वाची प्रगति होण्यास तीन गोष्टींच्या अनुकूलतेची रानडयांना अत्यंत आवश्यकता वाटे, आणि दुर्दैवानें नेमकी त्यांचीच वाण या देशांत होती. पहिली मोठी गरज म्हणजे ऐक्यभावनेची. कोणताहि प्रसंग किंवा कल्पना घ्या, त्यासंबंधीं आपल्या साहजिक प्रतिक्रिया पाहिल्या तर त्यांत जाति, पोटजाति व धर्म, प्रांतिक व ऐतिहासिक भावना इत्यादींचा इतका भाग असतो कीं उदार व अभिनिवेशरहित मतें असलेलीं माणसें फारच क्वचित् आढळतात. आणि आर्थिक किंवा राजकीय प्रगतीला या दुसऱ्या मनोवृत्तीचीच जरूर आहे. म्हणून ज्या ज्या चळवळीमुळें व्यक्तीचा समूहाशीं, लहान समूहांचा मोठा समाजाशीं, एका समाजाचा दुसऱ्या समाजाशीं, आणि अखेर एका धर्माचा दुसऱ्या धर्माशीं संबंध दृढ होण्याचा संभव असे त्या त्या चळवळीचें कौतुकानें स्वागत करून रानडे तिला पाठिंबा देत. व्यापक राष्ट्रीय ऐक्य हें त्यांचें ध्येय[१०] असे. तें सर्वच क्षेत्रांतून व स्थानांवरून साधणें आवश्यक होतें.

---

ह्या व ज्या इतर गोष्टींशीं आपला संबंधच नाहीं असें तुम्हांस म्हणतां येणार नाहीं, त्यांचा परिणाम होतच असतो. पूर्वींची मदत न घेतां, नवीन दिशेनें नवीन कार्य उभारून दाखविणें शक्य आहे असें म्हणणें म्हणजे मीं स्वयंभू आहे आणि माझ्या पित्यानें अथवा पितामहानें मजकरितां कांहीं करण्याची जरुरी नव्हती असें म्हणण्यासारखें आहे. निदान मला तरी तसें वाटतें.

(सं. लेख– पृ. १५८)

९. मला वाटतें कीं आपल्या या देशाच्या भूतकालाविषयीं रानडयांच्या इतकें प्रेम आणि आदर दुसऱ्या कोणासहि वाटत नसेल. ‘ आपल्या मनांत कितीहि असलें तरी भूतकालाशीं अजिबात संबंध तोडणें आपल्यास शक्य नाहीं, आणि समजा कदाचित् शक्य असलें, तरी तें इष्ट नाहीं ’ असे उद्गार त्यांनीं एकदां काढले होते. परंतु भूतकाळांतच गुंग होऊन राहण्याची मात्र त्यांची तयारी नव्हती. त्यांच्या मतें भूतकालापेक्षां वर्तमान आणि भविष्य हे देशाच्या दृष्टीनें अधिक महत्त्वाचे होत. भूतकालाच्या अभ्यासानें आपल्या कार्यास उपयुक्त असा बोध आपल्यास मिळून आपल्या प्रयत्नांत आपल्यास धीर व आधार मिळतो हें खरें. कारण आपल्या स्वभावांतील उणीवा व प्रगतीमधील अडचणी त्यावरून आपल्यास कळतात व त्यांचें निराकरण आपण करूं शकतों; तसेंच प्रगतीच्या अखंड इतिहासाचे कांहीं नियम असतात त्यांच्याहि मर्यादा आपल्यास समजून येतात. परंतु जीवनाच्या दृष्टीनें अधिक महत्त्वाची बाब म्हणजे आजचीं कर्तव्यें आपण किती चांगल्या प्रकारे पार पाडतों व पुढील कालाकरितां किती तयारी करून ठेवतों हीच आहे.

(गोखल्यांचीं भाषणें– पृ. ७८७–७८९)

१०. इतिहासाला वळण लावणाऱ्या परमेश्वरानें आजपर्यंत जर आपल्यावर एवढी कृपा केली आहे, तर आतां पूर्वींपेक्षांहि अधिक उदार अशा शक्तींशीं संबंध आला असतां आपण काय म्हणून निराश व्हावें ? ‘ जुना करार’च ‘ नवीन धर्माज्ञे ’ ( New Gospel ) च्या सत्यतेची आणि कल्याणकारकतेची साक्ष देतो. या ‘ धर्माज्ञे’ची शिकवण अशी आहे कीं ऐक्य साधणें व भेद नाहींसे करणें हें आपलें सर्वांत महत्त्वाचें कर्तव्य आहे. संघटना आणि स्वावलंबन या महान् सद्‌गुणांची उक्तीनें व कृतीनें ती ‘ धर्माज्ञा ’ शिकवण देत आहे. आपल्या हृदयामधील ईश्वरी अंश जो जीवात्मा त्याच्या योग्यतेविषयीं अधिक उदात्त अशी कल्पना या ‘ धर्माज्ञे’वरून आपल्यास होते. आपल्याच प्रयत्नानें केवळ जें शक्य झालें नसतें तें अंतर तोडण्याचें कार्यहि ती

हें ऐक्य लहान आणि मोठ्या साऱ्याच बाबतींत साधणें आवश्यक होतें. समान हितसंबंध असतील तेथें एकदिलानें वागण्याची संवय होणें जरूर होतें. हें अर्थात् हळूहळूच साधावयाचें. ऐक्याला मधल्या जवळच्या वाटा असूं शकत नाहींत, निदान त्या धोक्याच्या असतात. याचा प्रत्यय आपल्याला पूर्वी केव्हांहि आला नव्हता, एवढा आज येत आहे. हळूहळू पण निश्चित असें कार्य करण्याची रानड्यांची पद्धतीच सर्वोत्कृष्ट होती. आतां हें मोठ्या प्रमाणावरील ऐक्य साधण्याच्या दृष्टीनें इतरांमधील चांगल्या गोष्टी लक्षांत घेण्याचा फार फायदा होतो. हा अमोलिक गुण फार थोड्यांच्या अंगीं असतो. असें जरी असलें तरी आपलें हित साधेल असें वाटल्यास अनेकांना त्यांचें आचरण करणें शक्य आहे. स्वहितसाधनाकरितांहि लोकांशीं जुळवून घेण्याची व सर्वसंग्रहाची वृत्ति प्रगतिपर अशा लोकांत जितकी असावयास पाहिजे तेवढी आपल्यांत नाहीं असें रानड्यांस वाटे. एक होऊन कार्य करूं लागण्यापूर्वी एक विचार करण्यास आधीं शिकावें लागतें, व हें तर एकमेकांविषयीं सहिष्णुतेची आणि गुणग्रहणाची वृत्ति असल्याखेरीज अशक्य आहे. याबाबत केवळ तात्त्विक उपदेश वा प्रोत्साहन पुरें पडत नाहीं. आपल्या दररोजच्या व्यवहारांतहि समानहितसंबंधांवर अधिष्ठित असलेल्या व्यापक ऐक्याच्या[11] साहाय्यानें प्रगति करून घेण्याचें सहेतुक धोरणच आपण स्वीकारलें पाहिजे.

आम्हां भारतीयांच्या एका स्वभावविशेषानें मात्र रानड्यांच्या उज्ज्वल आशावादावर केव्हां केव्हां नैराश्याची छाया पडलेली दिसे. उपलब्ध ऐतिहासिक दाखले व स्वकालीन अनुभव यांवरून त्यांना असें वाटूं लागलें होतें कीं भारतीयांच्या प्रकृतींत असें कांहीं तरी आहे कीं ज्यामुळें त्यांना अखंडपणें श्रम करवत नाहींत.[12] प्रसंगानें एकदम उफाळणारा आशावाद, शौर्य वा त्याग या गोष्टींची अपेक्षा आपल्यास कोणाहि भारतीयाकडून करतां येईल. परंतु असे लोक थोडेच कीं जे सबंध आयुष्यभर ध्येयार्पित बुद्धीनें सतत राष्ट्रसेवा करूं शकतील. रानडे मात्र अशा थोड्या लोकांपैकीं एक होते हें आपणांस माहीत आहे. सर्वसामान्य जनतेचा उत्साह लौकरच ओसरून जातो, व शिस्तीच्या आणि सततोद्योगाच्या जीवनाला ते कंटाळतात. हा परिणाम हवामानाचा आहे, किंवा परंपरेनें रुजलेल्या कल्पनांचा आहे, अथवा आनुवंशिकच गुण आहे हा विचार तितका महत्त्वाचा नाहीं. स्वातंत्र्य व प्रगति यांविषयींच्या उत्कट इच्छेपुढें या साऱ्यांनीं मान वाकवायलाच हवी. या दोषांचें आज जें प्राबल्य दिसतें

---

करूं पाहते आणि यापूर्वी कधींहि पहावयास मिळाला नव्हता इतका, आशापूर्ण भविष्यकाल आपल्यापुढें त्यामुळें उभा आहे. (सं. लेख– पृ. १२५–१२६ )

११. आपसांतली दुही हा भारतीयांच्या इतिहासांत सर्व काळीं व सर्व अवस्थांत आढळून येणारा असा भयंकर दोष आहे. याचें वर्णन गौरवाच्या भाषेंत आत्मतुष्टि, मोकळे राहण्याची वृत्ति, दास्य व शिस्तीची कैद न जुमानण्याची वृत्ति या शब्दांनीं करण्यांत आलें आहे. अशा विस्कळित शक्तीच्या संघटनेमुळें येणाऱ्या सामर्थ्यापुढें अथवा कार्यकौशल्यापुढें, रणांगणावर काय किंवा विधिमंडळांतून काय, टिकाव लागणें शक्य नाहीं. (मराठ्यांचा उदय– पृ. ५४)

१२. राष्ट्राच्या उद्धारास पहिली आवश्यक गोष्ट म्हणजे उद्योग असें त्यांचें मत होतें. आपल्या स्वतःच्या जीवनांत त्यांनीं त्याचें आचरण इतक्या उत्तम तऱ्हेनें केलें कीं नैराश्याच्या विचारांनीं त्यांचें मन केव्हांहि खचून जाणें शक्य नव्हतें. सुमारें बारा वर्षांपूर्वीं सामाजिक परिषद् आणि लोकांत असणारी तिची अप्रियता यांविषयीं बोलतांना एकदां मीं त्यांचेजवळ पुढीलप्रमाणें प्रश्न काढला होता. सुधारणेचे कट्टे पुरस्कर्ते असलेल्या कांहीं लोकांनीं सभा भरवणें आणि ठराव करणें यासारख्या पोकळ कार्यानें कांहीं व्हावयाचें नाहीं असे उद्गार काढून आपली निराशा व्यक्त केली असतां या सामाजिक परिषदेच्या कार्यावरची आपली श्रद्धा इतकी अढळ कशी राहूं शकली ? रानडे माझ्याकडे वळून मला म्हणाले, “ कांहीं वर्षें वाट पहा. आज ज्या काँग्रेससंबंधीं एवढा उत्साह लोकांना वाटतो आहे, त्या काँग्रेसविषयींहि हेच प्रश्न लोक करावयाला लागणार हें भविष्य मला आज दिसतें आहे. आपल्या लोकांच्या प्रकृतींतच असें कांहीं तरी आहे कीं ज्यामुळें अखंड उद्योगाचा ताण त्यांना सहन करतां येत नाहीं.” (गोखल्यांचीं भाषणें– पृ. ७७९)

अनुक्रमणिका

त्यावरूनच त्यांना विरोधी असें वातावरण निर्माण करण्याची किती आवश्यकता आहे याची कल्पना येते. दीर्घकालपर्यंत व सतत असा झगडा चालविण्यास आवश्यक असलेल्या गुणांची वाढ योग्य अशा सामाजिक आणि शैक्षणिक व्यवस्थेच्या योगानें होऊं शकेल असा रानडयांना विश्वास वाटत असे. पण मधून मधून त्यांचें मन शंकाग्रस्त होई. स्वजनांच्या मनोवृत्तीचें हें रानडयांनीं केलेलें निदान म्हणजे यथार्थ असें स्वभाव-विश्लेषण होतें कीं केवळ त्यांना येणारी प्रासंगिक शंका होती हें पुढील पिढीच्या वागणुकीवरून व कर्तृत्वावरूनच सिद्ध व्हावयाचें आहे. रानडयांच्या निधनानंतरच्या कालामध्यें अनेक क्षेत्रांमधील अनुभवानें देशाच्या उज्ज्वल भवितव्याविषयीं आपली आशा दृढ होण्यासारखें बरेंच घडलें आहे यांत मात्र शंका नाहीं.

* *

# सामाजिक सुधारणा

आपणां सर्वांस हवें असणारें संक्रमण कोणतें ? त्यांत बंधनें नकोत, स्वातंत्र्य हवें; भोळसटपणा नको, श्रद्धा हवी; जन्मप्राप्त पदवी नको, समान भूमिकेवरील व्यवहार हवा; जबरदस्ती नको, युक्तिवाद हवा; विस्कळीतपणा नको, संघटना हवी; अत्याग्रह नको, सहिष्णुता हवी; आंधळा दैववाद नको, आत्मप्रत्यय हवा. सामाजिक विकासाचा माझा अर्थ हा आहे– मग तो व्यक्तीच्या दृष्टीनें असो कीं वर्गाला अनुलक्षून असो.

(संकीर्ण लेख– पृ. ११६–११७)

राजकीय पुढारी किंवा अर्थशास्त्रज्ञ म्हणून रानडयांनीं केलेल्या कार्याविषयीं अनेकांना फारशी माहिती नसली, तरी समाजसुधारणेच्या चळवळींतील त्यांच्या कर्तृत्वाची मात्र त्यांना चांगली कल्पना असते. मागील प्रकरणांत उद्धृत केलेल्या रा. ब. जोश्यांच्या भाषणांतील उताऱ्यावरून हें स्पष्ट दिसतें कीं, रानडयांच्या अगदीं निकटच्या सहकाऱ्यांपैकीं कांहींना रानडयांच्या समाजसुधारणाविषयक कार्यामध्येंच त्यांचा खरा मोठेपणा सांठविलेला होता, असें वाटत होतें. रानडयांच्या समाजसुधारणेच्या कार्याकडेच केवळ पाहिलें, तरी असें दिसून येईल कीं रानडयांचा प्रयत्न अत्यंत दूरगामी आणि विधायक स्वरूपाचा होता. वस्तुतः त्यांची समाजसुधारणेची कल्पना इतकी सर्वव्यापक होती कीं, तीमध्यें मानवी प्रगतीच्या सर्व अंगांचा अंतर्भाव होई. व्यापक अर्थाची समाजसुधारणा झाल्याखेरीज राजकीय किंवा आर्थिक सुधारणेसारखे प्रगतीचे सर्वमान्य मार्गही खऱ्या अर्थानें यशस्वी व्हावयाचे नाहींत असें त्यांचें मत होतें. रानडयांच्या मतप्रणालीचें अंतिम ध्येय आणि तीमधील खोल अभिप्राय यांचें मर्म समजण्यास त्यांच्या समाजसुधारणाविषयक मतांचे यथार्थ ज्ञान करून घेणें आवश्यक आहे.

आजच्याप्रमाणें रानडयांच्या कालींहि दैन्य व परावलंबित्व हे भारतीयांच्या जीवनाचे प्रमुख विशेष होते. परकीय अंमलाखालील देशांत या अनिष्ट गोष्टींचा संबंध परकीयांच्या राजवटीशीं सहज लावतां येतो. स्वतः रानडयांनीं ब्रिटिश सरकारच्या राजकीय आणि आर्थिक धोरणावर कांहीं कमी टीका केली नाहीं, किंवा सामाजिक दृष्टया हिंदी लोक मागासलेले आहेत हीं गोष्ट सरकारनें तटस्थ व निष्क्रिय राहण्याला योग्य सबब आहे असेंहि त्यांना कधीं वाटलें नाहीं. तथापि बौद्धिक व सामाजिक स्वातंत्र्याचे कोंडलेले प्रवाह मोकळे सोडल्याखेरीज हिंदी सुधारणेला आपला उत्कर्षबिंदू गाठतां येणार नाहीं अशी त्यांची खात्री होती. हिंदुस्थानच्या प्रगतीच्या ध्येयाविषयींची रानडयांची कल्पना फार उदात्त होती; आणि या उदात्त ध्येयाची पूर्तता व्यक्तीच्या ठिकाणीं असणाऱ्या आत्माविष्करणाच्या सर्व स्वाभाविक प्रवृत्तींना राष्ट्रकार्यास जुंपल्याखेरीज होण्याजोगी नव्हती.

मानवी मन व त्याचें व्यक्तिमत्व ही एक एकजिनसी अशी शक्ति आहे, आणि तिची उन्नति किंवा अवनति ही जीवनाच्या सर्व बाजूंनीं प्रकट होणारी क्रिया असते ही गोष्ट रानडयांनी पक्की ओळखली होती. म्हणून



अनुक्रमणिका

राष्ट्रसुधारकानें विधायक सुधारणेच्या सर्व शाखांकडे लक्ष पुरविणें कसें अगत्याचें आहे हें त्यांच्या एका लेखांतील खालील सुंदर आणि वैशिष्ट्यपूर्ण उताऱ्यावरून स्पष्ट होईल. ते म्हणतात :

> " निढळाच्या घामावर जगावें लागणें हा मनुष्याला मिळालेला शाप नसून त्याचें अस्तित्व आणि विकासच त्यावर अवलंबून आहे. राजकीय, सामाजिक, धार्मिक, व्यापारविषयक किंवा औद्योगिक वगैरें सर्व क्षेत्रांत, त्याचप्रमाणें सौंदर्य, चित्र, वाङ्मय, शास्त्र, कला इत्यादि बाबतींत, तसेंच शांततेच्या किंवा युद्धाच्या काळांत, व्यक्तिशः व सामुदायिकरीत्या मार्गांत येणाऱ्या अडचणींचा निरास करून स्वतःच्या प्रयत्नानेंच मनुष्यानें आपल्या शक्तीचा विकास करून घ्यावयाचा आहे. तुमच्या राजकीय हक्कांचें पारडें जर हलकें असेल तर तुमची समाजपद्धति चांगली असणें शक्य नाहीं, तुमची समाजपद्धति विवेक व न्याय यांवर आधारलेली असल्याशिवाय तुम्ही राजकीय अधिकार व हक्क यांचा उपभोग घेण्यास लायक ठरणार नाहीं. तुमची समाजव्यवस्था चांगली असल्याखेरीज तुमची आर्थिक घटना चांगली असणें शक्य नाहीं. तुमचीं धर्मविषयक ध्येयें जर हीन व निकृष्ट असतील तर सामाजिक, आर्थिक किंवा राजकीय क्षेत्रांत तुम्हांला यश मिळणें शक्य नाहीं. हें परस्परावलंबन योगायोगानें आलें नसून हा निसर्गनियमच आहे." ( सं. लेख– २३१–२३२ )

रानड्यांच्या दृष्टीनें धार्मिक, सामाजिक, आर्थिक आणि राजकीय प्रगतीचीं अंगें परस्परांशीं कशीं निगडित आहेत हें वरील उताऱ्यावरून स्पष्ट होतें. ज्याला म्हणून आपल्या थोर राष्ट्राचा पुनरुद्धार करावयाचा आहे, त्याला स्वतःच्या कामगिरीची यापेक्षां कमी व्यापक कल्पना असून भागणार नाहीं, आणि हेंच जगांतील सर्व राष्ट्रांच्या प्रगतीच्या उदाहरणांवरून सिद्ध होतें. रानड्यांच्यासंबंधीं विशेष लक्षांत घेण्याजोगी गोष्ट ही कीं उपरिनिर्दिष्ट भिन्नभिन्न वर्गांतील लोकांबरोबर प्रत्यक्ष कार्य करणें त्यांना साधत असे. ज्या अनेक गोष्टींनीं व्यापक असें राष्ट्रोद्धाराचेंच कार्य होत आहे असें रानड्यांना वाटे, त्याच गोष्टीकडे त्यांचे समकालीन निष्ठावान असे बरेच लोक एक राजकीय, अथवा सामाजिक, अथवा धार्मिक प्रश्न अशा संकुचित दृष्टीनेंच पहात. सुधारणेच्या विविध प्रयत्नांमध्यें एकच एक सर्वव्यापक असें सूत्र अंतर्भूत आहे हें पटवून देण्याची संधि रानडे कधीं दवडीत नसत; त्याचप्रमाणें एकाद्या कार्यकर्त्यानें त्यांच्या संपूर्ण योजनेंतील विशिष्ट अंगाविषयींच दाखविलेल्या आस्थेचा फायदा घेण्यासहि ते चुकत नसत. हातीं असलेल्या विशिष्ट सुधारणेपेक्षां राष्ट्रजीवनावर साकल्यानें तिचा होणारा परिणाम अधिक महत्त्वाचा होय. सुधारणेची कोणतीहि कृति जोंपर्यन्त त्या सर्वसामान्य योजनेंत बसत असे, तोंपर्यंत रानड्यांना आपल्या सहकाऱ्यांचा एकंदर तात्त्विक दृष्टिकोण किंवा त्यांच्या इतर कार्ययोजना याविषयीं हुजत घालण्याचें कांहींच कारण नव्हतें. रानड्यांची आपल्या सर्वच समकालीन अशा कार्यकर्त्यांवर जी सारखीच छाप पडलेली दिसते तिचें रहस्य तरी हेंच आहे.

या संबंधांत रानड्यांच्या कालांतील दोन सुप्रसिद्ध वादांचा उल्लेख करणें योग्य होईल. या दोन वादांपैकीं एक तर, आतां इतका काल मध्यें गेल्यावर, अत्यंत क्षुल्लक वाटण्यासारखाच आहे. त्याकाळीं सार्वजनिक कार्यकर्त्यांची संख्या अगदीं थोडी होती, आणि परस्परांना सोइस्कर रीतीनें भेटण्याचे प्रसंग आज जितके येतात, तितके पूर्वीं येत नसत. याकरितां काँग्रेसच्या अधिवेशनाच्या वेळींच सामाजिक परिषद् भरविणें सोईचें वाटत असे. पुण्याच्या काँग्रेस अधिवेशनाच्या वेळींहि प्रथम असें सुचविण्यांत आलें होतें कीं काँग्रेसकरितां उभारलेल्या मंडपांतच सामाजिक परिषद् भरवावी. त्याच्यामागें सोईपेक्षां इतर कोणताहि खोल हेतु नव्हता. पुणें अधिवेशनाच्या आधीं कांहीं वर्षें या दोन्ही परिषदांच्या बैठकी एकाच मंडपांत भरतहि असत. सामान्यतः काँग्रेसचें अधिवेशन संपल्यानंतर सामाजिक परिषदेस सुरवात होई. पुण्यांतील सनातनी-पक्षानें– यांत कांही कट्टर काँग्रेसभक्तहि होते– या परंपरेला विरोध केला, आणि स्वतःच्या मतांना पाठिंबा मिळविण्याकरतां जोराची चळवळहि चालविली. स्वाभाविकच एकाच मंडपांत दोन्ही परिषदा भरविण्याची जुनी पद्धति चालावी अशी रानड्यांची प्रथम इच्छा होती. कारण यांत जशी सोय होती त्याप्रमाणें राष्ट्रीय प्रगतीच्या अंतर्गत एकरूपतेचें बाह्य चिन्ह म्हणूनहि या रूढीस महत्त्व होते.

बाह्यतः तरी क्षुल्लक दिसणाऱ्या या स्थानिक

कार्यकर्त्यांमधील मतभेदानें इतकें उग्र स्वरूप धारण केलें कीं काँग्रेसच्या सर्व खऱ्या हितचिंतकांना या गोष्टीचा निकाल सामोपचारानेंच लागावा असें वाटूं लागलें. रानडे हे केवळ स्थानिक अथवा विशिष्ट पक्षाचेच पुढारी नसल्यानें, या बाबतींत त्यांनींच योग्य तो पुढाकार घ्यावा या आशेनें सारे लोक त्यांच्याकडे पहात होते. म्हणून वरील सर्व प्रकारामुळें खेद झाला असतांहि मोठ्या कौशल्यानें प्रसंगोचित असें वर्तन त्यांनीं केलें. त्यांनीं ही बाब काँग्रेसच्या निरनिराळ्या घटक-समितींच्याकडे पाठवून दिली. त्यांपैकीं बहुतेकांनीं पूर्वीची पद्धत चालू ठेवण्यास संमति दिली. याप्रमाणें सामाजिक परिषद काँग्रेसच्या मंडपांत भरविण्याच्या आपल्या पहिल्या बेतास केवळ रूढीचाच नसून सर्व अधिकृत संस्थांचाहि पाठिंबा आहे हें स्पष्ट करून मग रानड्यांनीं सामाजिक परिषदेचा चिटणीस या नात्यानें पुण्यांतील विशिष्ट परिस्थितीमुळें आपला पहिला बेत पुढें चालविण्याचा विचार नसल्याचें जाहीर केलें.

हा निर्णय ठरवितांना रानड्यांच्यावर केवळ स्थानिक मतप्रदर्शनाचा परिणाम झाला होता असें नसून पुण्याबाहेरील पुष्कळशा काँग्रेस कार्यकर्त्यांनीं सामाजिक परिषदेचें हें अधिवेशन शांतपणें पार पडावें अशी जी इच्छा प्रकट केली होती तिचाहि परिणाम झाला होता.[१] जुनी परंपरा सोडून देऊन सलोखा व ऐक्य साधण्यानें रानड्यांनीं आपली सुप्रसिद्ध अशी तडजोडीची वृत्तीच प्रकट केली, त्याचप्रमाणें सर्वमान्य अशा मोठ्या कार्याकरितां एकत्र येऊन, इतर गौण कार्यांकरितां स्वतंत्रपणें काम करूं इच्छिणाऱ्यांचें सहकार्यहि टिकविलें. हा सर्वसंग्राहकतेचा गुण सुधारकाग्रणींमध्यें असणें फार उपयुक्त असतें. इतर प्रान्तांतील शहरांतून ज्या गोष्टी बिनबोभाट झाल्या त्यांवर पुण्यांत जें एवढें रण अनपेक्षितपणें माजलें त्याचा जो अन्वयार्थ रानड्यांनीं लावला त्यावरून त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनाहि त्यांचें दूरदर्शित्व व विशाल राष्ट्रीय दृष्टिकोण तात्पुरता कां होईना, मान्य करावा लागला. याबाबतचें रानड्यांचें म्हणणें पाहिलें असतां सुधारकाची भूमिका कशी लोकानुवर्ती व सर्वस्वीं आत्मार्पणाची असावयास पाहिजे याविषयींच्या त्यांच्या मतांवर चांगला प्रकाश पडतो. म्हणून नेहमीपेक्षां अधिक मोठा असा उतारा येथें देणें इष्ट होईल असें वाटतें :

> " इतर साऱ्या हिंदुस्थानानें जो समजूतदारपणा व शहाणपणा दाखविला, तशा प्रकारचें शहाणपण व शांतवृत्ति आम्हांमध्यें स्वाभाविकपणें असणें योग्य असतांहि कां दाखविली गेली नाहीं ? सामान्यत: याविषयीं जो खुलासा केला जातो त्यानें माझें समाधान होत नाहीं हें मी स्पष्टपणें सांगतों. याच्या बुडाशीं आणखी कांहींतरी असलेंच पाहिजे आणि त्याचा विचारहि आपल्यास केला पाहिजे...... सामाजिक सुधारणेचे प्रश्न निरनिराळ्या प्रांतांतून निरनिराळ्या पद्धतीनें सोडविले जातात. बंगालकडे पाहिलें तर असें दिसून येईल कीं तेथील धार्मिक चळवळींत तद्विषयक विचार करणारी सारीच महत्त्वाची मंडळी आहेत, पण त्यांचा एक निराळाच पंथ बनून राहतो. इतर प्रांतांपेक्षां बंगालमध्यें सनातनी लोक अधिक सनातनी व सुधारक लोक हे फारच सुधारलेले आढळतात. वस्तुत: तेथें दोन विभक्त गटच निर्माण झाले आहेत. बंगालमध्यें ब्राह्मसमाजानें जें केलें तेंच पंजाबमध्यें आर्यसमाज अधिक प्रमाणांत करीत आहे... आर्यसमाज ही एक धार्मिक संघटना असून ती सामाजिक पायावर आधारलेली आहे. अधूनमधून कांहीं थोडे लोकच तिचा आधार घेत असून इतर समाज हळूं हळूं अधिकाधिकच कट्टर बनत चालला आहे. आपल्या प्रान्ताचा विशेष हा कीं आपल्यास एकाच दिशेनें कार्य करावयाचें नाहीं, तर सर्व दिशांनीं संघटितपणें प्रयत्न करावयाचा आहे, आणि यापेक्षां अधिक

---

१. परिषदेच्या अधिवेशनांत ना. बाबू सुरेन्द्रनाथ यांनीं पाठविलेल्या पत्रांतील उतारा वाचून दाखविण्यांत आला तो पुढीलप्रमाणें होता :– " आपल्या चर्चा-विचारांतून सामाजिक प्रश्न वगळण्यांत येतात याचें कारण म्हणजे असे प्रश्न घेतले तर फार गंभीर स्वरूपाचे मतभेद होऊन त्यांतून अखेर दुही निर्माण होईल; आणि ती टाळणें हें सर्वांत अधिक महत्त्वाचें आहे. दुसऱ्या पक्षाची विनंति ही अगदीं अयुक्तिक आहे हें खरें; परंतु कित्येक वेळां आपल्याला अधिक अनिष्ट गोष्टी टाळण्याकरितां अयुक्तिक मागण्यांनाहि मान वांकवावी लागते.

(सं. लेख– पृ. १५२–१५३)







म्हणजे मागील परंपरा तोडून व इतर समाजाशीं सर्वस्वीं फटकून वागावयाचें नाहीं... आम्ही कोणताहि एक मार्ग स्वीकारला तर आमचीं भांडणें मिटतील. आम्ही जर बाकीच्या साऱ्या समाजास हवें तें करण्यास मोकळें सोडून आपला स्वतंत्र पंथच स्थापन केला, तर आम्हांस स्वास्थ्य लाभेल; कारण आमच्या प्रतिगामी आणि सनातनी मित्रांस नेमकें हेंच हवें आहे... तेव्हां आपणांस हें कळलें असेलच कीं वैयक्तिक मतभेद किंवा पक्षोपपक्षांतील भांडणें अथवा अशाच कांहीं गोष्टी व कारणें यांमुळें प्रस्तुत परिस्थितीचा बोध होत नाहीं. अखेरपर्यंत एकाच मार्गाचा अवलंब करावयास आपण तयार नाहीं; विविध प्रश्नांच्या बाबतींत आम्ही विविध पद्धति उपयोगांत आणतों; आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्वत:करितां निराळा पंथ स्थापण्याची आपली मुळींच इच्छा नाहीं. गैरसमज पसरण्यास आणि वातावरण इतकें प्रक्षुब्ध होण्यास माझ्या मतें हेंच मुख्य कारण आहे. यांतच वैयक्तिक आणि खासगी मतभेदांची पडलेली भर लक्षांत घेतली कीं, इतर कोठेंहि झाला नाहीं अशा तऱ्हेचा खेदकारक विरोध या आमच्या शहरांत कां झाला याचा उलगडा होईल."

(सं. लेख– पृ. १५९–१६०)

या भाषणापूर्वी झालेलीं कडाक्याचीं भांडणें पाहिलीं असतां, प्रचलित घडामोडींतील सखोल मर्म शोधून काढणाऱ्या रानड्यांच्या सामर्थ्याचें कौतुक करावें, कीं प्रतिपक्ष्याच्या कृत्यांची योग्य कारणपरंपरा समजावून देणाऱ्या त्यांच्या थोर मनाची अधिक प्रशंसा करावी हें समजत नाहीं. त्यावेळीं निर्माण झालेल्या परिस्थितींचें मूळ पुणें व महाराष्ट्र यांतील व्यक्तिनिष्ठ आणि पक्षनिष्ठ राजकारणांतच पुष्कळसें आढळून येईल; तथापि त्या गंभीर प्रसंगाच्या निमित्तानें रानड्यांनीं जीं मतें प्रतिपादलीं त्यांवरून त्यांची सामाजिक सुधारणाविषयक भूमिका मात्र स्पष्ट होते. ह्या साऱ्या प्रसंगाचें रानड्यांच्या मतें तात्पर्य एवढेंच होतें कीं त्यांना सुधारणा ही केवळ व्यक्तीकरितां नको होती. नवीन नैतिक बंधनें पाळण्याचें वचन व्यक्तीकडून घेतल्यास तें साधलें असतें. कांहीं थोड्याच निवडक लोकांकरितां हें उच्च जीवन असावें असेंहि त्यांना वाटत नसे. त्यामुळें एक निराळी जात मात्र निर्माण झाली असती. त्यांची इच्छा अशी कीं, सर्व समाजालासुधारणेला अनुकूल करावें व व्यवहारांत समाजाशीं संबंध तुटणार नाहीं एवढ्यापुरतेंच पुढें पाऊल टाकावें. यामुळें सुधारणा मंद गतीनेंच व्हावयाची, व तीहि प्रतिगामी वर्गाशीं. सतत निकराचा सामना करूनच. परंतु अखेरीला हीच पद्धति श्रेयस्कर आहे हें महाराष्ट्रांत सामाजिक सुधारणेच्या सर्व बाजूंनीं जी सर्व समाजाची विशेष प्रगति झाली आहे तीवरून पुरेपूर सिद्ध झालें आहे.

रानड्यांप्रमाणें इतिहासकाराची अथवा भविष्यवेत्त्याची दृष्टि ज्याला नाही अशा सामान्य निरीक्षकास हा वाद अगदीं क्षुल्लक व बहुतांशीं स्थानिक स्वरूपाचा वाटेल यांत शंका नाहीं. ज्या दुसऱ्या वादाकडे आपल्यास वळावयाचें आहे त्याच्या स्वरूपाचें ज्ञान रानड्यांच्या समकालीन लोकांसही योग्य प्रमाणांत झालें होतें. बहुतेक साऱ्या सुशिक्षितांना बालविवाह, कडक जातिनिर्बंध, स्त्रियांची परवशता इत्यादि सामाजिक गोष्टींबाबत पुष्कळच क्रांति झाली पाहिजे असें वाटे; पण इतर कित्येकांस परराज्यांतील दास्याचा प्रश्नच अधिक महत्त्वाचा वाटे. राजकीय स्वातंत्र्याचा नाश ही हानि संकुचित पुराणमताभिमान किंवा इतर अन्याय्य अथवा आजच्या युगांत अर्थहीन ठरलेल्या रूढींपेक्षां फार मोठी आहे, एवढेंच नव्हे तर, राजकीय स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज समाजसुधारणेचा मार्ग मोकळा होणार नाहीं असेंच त्यांना वाटे. अजूनहि कित्येक राजकारणी लोकांचीं मतें अशींच आहेत. सामाजिक सुधारणेचें क्षेत्र आतां व्यक्तीपुरतें मर्यादित राहिलें नसून आर्थिक आणि समाजजीवनाच्या इतर पद्धतींचा त्यांत अंतर्भाव होऊं लागला आहे. असें असूनहि राजकीय आणि सामाजिक सुधारणेकडे पाहण्याच्या या दोन दृष्टींमधील भेद नाहींसा झाला नाहीं. माणुसकी आणि सामाजिक न्यायबुद्धीला पटणाऱ्या सुधारणा पुढें रेटण्यास राजकीय सुधारणा संपूर्णपणें हस्तगत होईपर्यंत वाट पहावयाची कीं काय हा प्रश्न रहातोच.

या प्रश्नाला रानड्यांचें उत्तर त्यांच्या नेहमींच्या पद्धतीला धरून मूलग्राही व व्यवहाराला अनुसरून आहे. धर्मप्रवण व भक्तिप्रधान व्यक्ति या नात्यानें माणुसकीवर आधारलेल्या सामाजिक सुधारणेकडेच त्यांचें लक्ष प्रथम ओढलें जावें हें स्वाभाविक होतें. सामाजिक हिताची व न्यायाची वृद्धि व्हावी म्हणून तर त्यांना

अनुक्रमणिका

राजकीय सत्तेची आवश्यकता वाटे. रानडे हे साधना-करितां साध्याचा किंवा बाह्यांगाकरितां अंतरंगाचा त्याग करणारे नव्हते. शांतपणें सर्व गोष्टींचा आढावा घेतां त्यांना असें दिसून आलें कीं मानवी जीवनाचे विविध मार्ग आणि तद्विषयक विविध विचारप्रणाली यांची परस्पर गुंतागुंत इतकीं झालेलीं असतें कीं इतर बाजूंकडे जाणूनबुजून दुर्लक्ष्य करून एकाच दिशेनें प्रगतीचा प्रयत्न करून सिद्धि मिळविणें हें अव्यवहार्य तर आहेच, पण घातकहि आहे. याच प्रकरणांत पूर्वी उद्धृत केलेल्या एका उतार्‍यांत त्यांच्या एतद्विषयक मतांचें निदर्शन चांगल्या तर्‍हेनें झालें आहे. एखाद्या सभेच्या जागेबद्दलच्या हट्टानें राजकीय विरुद्ध सामाजिक असा वाद पेटवून देण्या-इतकें तारतम्य सुटणें रानड्यांच्या बाबतींत जसें अशक्य होतें, तसेंच एखाद्या अत्यंत निकडीच्या राजकीय प्रश्नानें मन व्यग्र आहे या सबबीवर सामाजिक अन्याय किंवा दुःख यांकडे शांतपणें पहात बसण्याची वृत्तीहि त्यांनीं धारण केली नव्हती. विधायक कार्यक्रम असें गांधी ज्याला म्हणतात, आणि केवळ दृश्य आणि खळबळ उडवून देणार्‍या चळवळीपेक्षां ज्यावर त्यांनीं निसंदिग्धपणें जोराचा भर दिला आहे त्याची येथें आठवण साहजिकच होते. रानडे व गांधी यांच्यांत फरक एवढाच कीं सुधारणाविषयक चळवळीच्या निरनिराळ्या प्रकारांकरितां निरनिराळीं कार्यक्षेत्रें मोकळीं ठेवण्यास रानड्यांनीं संमति दिली होती. विधायक कार्यक्रमाच्या यशासाठीं सुद्धां अशा तर्‍हेची वांटणी आवश्यक आहे. प्रत्यक्ष कार्यक्षेत्रांत मूलतःच भिन्न असलेल्या अनेक चळवळी एकत्र आणल्यानें कार्यकर्त्यांमधील एकोपा, त्यांची निष्ठाबुद्धि व त्यांच्या प्रयत्नांतील यश या सर्वांवर अनिष्ट परिणाम होतो. रानडे पंथ आणि गांधी पंथ यांमध्यें असलेलें हें साम्य व वैषम्य बरेंच अर्थपूर्ण व उद्बोधक आहे.

व्यवहारांत ज्याचें महत्त्व कमी आहे अशा एखाद्या सामाजिक प्रश्नाबद्दल असलेल्या मतभेदाकरितां राजकीय कार्यकर्त्यांत निरनिराळे विभाग कल्पिणें अदूरदृष्टीचें आहे असें रानडे मानीत, तसेंच सामाजिक कार्यकर्त्यांत राजकीय मतांमुळे गट पाडणें हेंहि त्यांस नापसंत असे. समानहितसंबंध किंवा एकादा कार्यक्रम याकरितां एकत्रित होण्यापेक्षां कृत्रिम भेद कल्पून सर्वस्वीं अलग अलग गट स्थापन करण्याची वृत्तीच आपल्यांत प्रामुख्यानें दिसते. या अलगपणाच्या वृत्तीचा उगम एखाद्या पंथाला किंवा आचारनियमांना घट्ट चिकटून राहण्याच्या आपल्या संवयीतच आहे आणि या संकुचित व असहिष्णुतेच्या पायावरच आपली जाति-संस्था उभारलेली आहे. लोकशाहीची उभारणी तर समानहितसंबंधांकरितां एका निशाणाखाली जमण्याच्या वृत्तीवरच करणें जरूर आहे. पक्ष व पंथ ह्यांवरील आत्यंतिक निष्ठेनें उत्पन्न होणार्‍या अलगपणाचा राज-कारणांत प्रवेश करून देण्याच्या आपल्या धोरणामुळें आपण आपल्या पूर्वपरंपरेमधील एका अनिष्ट विशेषाला साहाय्य करण्याचे व एकजुटीनें कार्याला अडथळा करण्याचे पाप मात्र माथी घेत असतों. मानवी हित-संबंध व मतें ही भिन्नभिन्न असावयाचीच. हीं जाणीव ठेवून झालेलें सहकार्यच प्रगतीला पोषक होते. त्याचा कल एखाद्या मताला हट्टानें चिकटून राहण्याकडे झुकूं लागला कीं त्याचें पर्यवसान एकीऐवजी दुहीत झालेंच म्हणून समजावें. एखाद्या कार्यापुरतें ज्याज्याशीं तुम्ही सहमत आहांत त्याच्याशीं तेवढ्यापुरतें सहकार्य करण्याचें रानड्यांचें ब्रीद हिंदुस्थानांतील प्रगमनशील व लोकसत्तात्मक समाजव्यवस्थेच्या भविष्याच्या दृष्टीनें सर्वथैव योग्य होते.

भारतीय समाज अनिवार्य अशा र्‍हासाच्या मार्गाला लागला आहे, किंवा हा र्‍हास परकीयांनीं येथें वसाहती केल्याशिवाय थांबवितां येणार नाहीं, हीं दोनहि मतें भारतीय इतिहासाचा सूक्ष्म अभ्यास केला असल्यानें रानड्यांना मान्य नसत.[२] उलट

२. आपले पाश्चात्य टीकाकार हे आपल्या विढींतील स्वतःस शहाणे म्हणविणारे लोक आहेत. त्यांतील कांहीं अति शहाण्यांनीं स्वतःच्या समाधानापुरतें तरी असें दाखवून दिलें आहे कीं सर्व पौरस्त्य लोकांचे भाग्याचे दिवस आतां संपले असून कसा तरी काल काढून मरून जाणें, आणि अधिक समर्थ लोकांना जागा करून देणें या पलीकडे त्यांना कांहीं कर्तव्य उरलें नाहीं. या तत्त्ववेत्त्यांच्या मतें राजकीय उन्नति, सामाजिक बंधनांतून मुक्ति, धार्मिक अथवा आध्यात्मिक ज्ञानाचा प्रकाश या गोष्टी यापुढें भारतीय लोकांना प्राप्त व्हावयाच्या नाहींत. हीं अनिष्ट भविष्यें खरोखरीच ईश्वरप्रेरित असतील, तर आपला मुळींच तरणोपाय नाहीं. पण

भारतीय संस्कृतींत नवीन परिस्थितीशीं जमवून घेण्याचें अपूर्व सामर्थ्य आहे असें त्यांस वाटे. ज्यावेळीं नवीन मतप्रणालीशीं किंवा पंथाशीं भारतीय संस्कृतीचा संबंध येतो त्यावेळीं आपल्या मूळच्या पुराणप्रिय मनोवृत्तीस अनुसरून या नव्या प्रवाहाला प्रतिरोध करण्याचा प्रयत्न तिजकडून होतो. परंतु या प्राथमिक विरोधास न जुमानतां नव्या प्रवाहानें स्वतःच्या सामर्थ्यानें अथवा परिस्थितीच्या अनुकूलतेमुळें तग धरला तर आपल्या सबंध संस्कृतींत व चालीरीतींत तो योग्यपणें बसेल अशा पद्धतीनें भारतीय संस्कृतीकडून त्याचें ग्रहण होतें. याप्रमाणें नव्याजुन्याच्या संघर्षाची आणि परस्परांशीं एकरूप होण्याची क्रिया सारखी चालू असते. अशा क्रमानें आपली संस्कृति सारखी विकसित होत आहे, व यांतच आपल्यास आशेला जागा आहे.

भारतीय इतिहासाची संगति रानडयांनीं अशा तऱ्हेनें लावली होती. परंतु त्यामुळें जें जसें होईल तसें तें घडूं दिल्यानें सर्व संकल्प सिद्धि पावतील या कल्पनेवर विसंबून राहण्यास ते तयार नव्हते. कारण, त्यामुळें आपल्या समाजांतील औदासीन्य व निश्चलता या दुर्गुणांस साहाय्यच झालें असतें. आधुनिक शास्त्रानें व सामाजिक संघटनेमुळें जे नवीन प्रवाह निर्माण झाले आहेत, त्याच्या बुडाशीं रानडयांच्या मते दोन मूलभूत हेतु होते. मानवी श्रेष्ठतेची जाणीव आणि सत्याच्या व न्यायाच्या स्वतःच्या कल्पनांप्रमाणें कार्य करण्यास सर्वांस स्वातंत्र्य देण्याची इच्छा या दोन गोष्टींमुळेंच आधुनिक काळांत मानवजातीच्या विधायक प्रगतीला लोक साहाय्य करीत असतात. भारतीयांनीं या दोन कल्पना आत्मसात् केल्या असत्या तर बाकी कशाविषयींच रानडयांनीं फिकीर केली नसती. एकदां का या कल्पना पटल्या कीं कार्यारंभ कसा करावयाचा या तपशिलाच्या बाबतींत तडजोड करावयास रानडे सदैव तयार असत.

रानडयांच्या मतें, नव्या गोष्टींतील चांगल्या भागाचें जुन्याकडून ग्रहण करवून सुधारणा करणें, हा कोणत्याहि सुस्थित समाजांत प्रगति घडवून आणण्याचा स्वाभाविक असा एकच मार्ग असतो. जुन्याचा त्याच स्वरूपांत उद्धार करूं पाहणारे जीर्णोद्धारक किंवा त्यांत आमूलाग्र फरक करूं इच्छिणारे क्रांतिकारक या दोघां-

---

आपल्या सुदैवानें हीं भविष्यें खरीं नाहींत, आणि अधिक म्हणजे तीं खोटीं ठरविणें आपल्या हातीं आहे. इतिहासाचा त्यांना आधार नाहीं, किंवा शास्त्रेंहि त्यांना अनुकूल नाहींत. ईश्वराच्या राज्यांत कळकळीच्या प्रार्थनेला, त्यागावर आधारलेल्या आकांक्षांना, असत्य व अज्ञान यांविरुद्ध चालविलेल्या खऱ्या झगडयाला केव्हांहि अपयश आलेलें नाहीं. या झगडयाचे मार्ग बदलावे लागतील, पण त्यामुळें त्याचें स्वरूप बदलत नसून कोणालाहि निराश होण्याचें कारण नाहीं. तुम्हांला झालेला बाह्य लाभ किंवा तुमच्याजवळचें वैभव यावर तुमची अथवा तुमच्या राष्ट्राची भवितव्यता अवलबून नसून तुम्ही स्वतः कसे आहांत यावर आहे. कांहीं विशिष्ट सुधारणा आज आमच्या आवांक्याबाहेर असतील, किंवा आमच्या फायद्याच्याहि नसतील; परंतु सुधारणेची खरी कळकळ आणि स्वार्थत्यागावर चालविलेले खरे प्रयत्न यांनीं आमच्या दोषांवर आम्हांला विजय मिळून आमच्यामधील चांगल्या गुणांस अधिक सामर्थ्य आल्यावांचून राहणार नाहींत, आणि अनेक शतकें कलह आणि दुही यांनीं विच्छिन्न झालेल्या हृदयांमध्यें एकीचें निशाण खास रोंवलें जाईल. हें या झगडयाचें नैतिक मर्म आहे; आणि ज्यांना त्यांत झगडण्याचा मान बहुमोल वाटणार नाहीं त्यांना काय म्हणावें बरें?– आपल्याच कल्पनाराज्यांत रममाण होणारे महात्मे असेंच म्हणावें लागेल. इतिहास आणि शास्त्र या दोहोंचाहि कौल आपल्याविरुद्ध पडला तर आपल्यास खरोखरच थांबणें जरूर आहे. पण आपल्या या थोर देशाचा इतिहास पाहिला तर असें दिसून येईल कीं बाहेरच्या प्रत्येक परकीय आक्रमणाचा परिणाम आपल्या या परमेश्वरास प्रिय अशा लोकांना शिकवण देण्याच्याच दृष्टीनें झाला आहे, आणि त्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारांत नसलें तरी गुणसामर्थ्याच्या दृष्टीनें देशाचें पाऊल निश्चितपणें अधिक उच्च ध्येयाच्या दिशेनें पडत गेलें आहे. आपल्या इतिहासांतून हें सार निघत नसेल, तर ती एक कल्पित कथाच म्हणावी लागेल. पुनरुन्नतीची आशाहि सोडून द्यावी लागेल इतकी आपल्या देशाची कधींच अवनति झाली नव्हती. परकीय आक्रमणाच्या पुरांत कांहीं काल दबून राहिल्यावर त्या परकीयांच्या संस्कृतीमधील, किंवा धर्म व राज्यव्यवस्थेंतील चांगलें तें घेऊन त्यानें आपलें डोकें वरच काढलें आहे.

(सं. लेख– पृ. ११५–११६)



अनुक्रमणिका

पैकी कोणाशींच त्यांचें पटणें शक्य नव्हतें. गतेतिहासांतील काल्पनिक सुवर्ण-युगाच्या पाठीमागें लागणाऱ्यांना आणि प्रचलित अव्यवस्था व ऱ्हास यांच्यावर तोड म्हणून आपल्या संस्कृतीच्या पूर्वावस्थेंतील विशेष गोष्टींचाच पुनरुद्धार करूं इच्छिणाऱ्यांना त्यांनीं पुढील खरमरीत प्रत्युत्तर दिलें आहे :

"ज्यावेळी जुन्या रूढींचा पुनरुद्धार करा म्हणून आपल्यास सांगण्यांत येतें त्यावेळीं सांगणाऱ्यांच्यां डोळचांपुढील काल अत्यंत संदिग्ध असतो... पुनरुद्धार कोणत्या गोष्टींचा करावयाचा ? ज्यावेळीं आपले अत्यंत पवित्र असे वर्णगुरु सध्यां अघोर मानलेल्या कृत्यांत रममाण झाले होते, व ज्या काळीं त्यांच्या अशनाला व प्राशनाला देशाच्या प्रत्येक भागांतील प्राणी व वनस्पति पुऱ्या पडत नव्हत्या अशा काळांतील जुन्या चालींचा पुनरुद्धार करावयाचा काय ? त्या प्राचीन काळांतील मानव व देव यांनीं निषिद्ध पदार्थांचें भक्षण व प्राशन इतकें केलें आहे कीं त्याची शिफारस करण्याचें धाडस पुनरुद्धाराची चळवळ करणाऱ्या कोणासही करवणार नाहीं. तसेंच पूर्वीच्या बारा प्रकारच्या पुत्रांची पद्धति आपण पुनः सुरूं करावयाची काय ? कां जबरदस्ती व मिश्र अनैतिक संबंध मान्य असलेले विवाहाचे जे आठ प्रकार त्यांचा पुनरुद्धार करावयाचा ? स्वबंधूंची स्त्री विधवा झाली असतां तिच्या ठिकाणीं पुत्रोत्पत्ति करण्यास संमति देणाऱ्या नियोग पद्धतीचा पुनरुद्धार करावयाचा ? कीं विवाहबंधन शिथिल करणारें जें स्वातंत्र्य जुन्या ऋषींनीं आणि ऋषिपत्न्यांनीं उपभोगिलें त्याचा उद्धार करावयाचा ? वर्षानुवर्षे पशूंची कत्तल उडविणाऱ्या व देवतातुष्टीकरितां शेवटीं मनुष्याचेंहि बलिदान करावयास मागेंपुढें न पहाणाऱ्या यज्ञसंस्थेचा पुनरुद्धार करावयाचा ? कीं किळसवाण्या गोष्टींना व व्यभिचाराला उत्तेजन देणाऱ्या वाममार्गी शक्तिपूजेचा करावयाचा ? सतीच्या व बालहत्येच्या चालीचा पुनरुद्धार करावयाचा कीं जिवंत माणसाला नदींत फेंकणें, कडचावरून लोटणें खिळचांनीं जखडणें अथवा जगन्नाथाच्या रथाखालीं चिरडणें यासारख्या रूढींचा पुनरुद्धार करावयाचा ? ब्राह्मण-क्षत्रियांच्या परस्परविघातक युद्धांचा पुनः उद्धार करावयाचा कीं येथील मूळ रहिवाश्यांना दिल्या गेलेल्या क्रूर शिक्षांचा व मानखंडना करणाऱ्या पद्धतींचा उद्धार करावयाचा ? एका स्त्रीला अनेक पति अथवा एका पतीला अनेक स्त्रिया यांपैकीं कोणत्या चालीचा पुनरुद्धार हवा ? ब्राह्मणजातीनें जमीनदारी व गृहस्थाश्रमाचा पेशा सोडून जुन्या काळांतल्याप्रमाणें भिकारी बनून राजाश्रयावलंबी बनण्याची आपणांस आवश्यकता वाटते काय ? जिवंत अशा कोणत्याहि समाजाच्या व्यवस्थेंत जुन्या गोष्टींचा पुनरुद्धार करणें अशक्य आहे. जें एकदां मृत झालें, गाडलें गेलें किंवा जळून गेलें, तें सर्व काळीं मेलेलें, गाडलेलें व जळून गेलेलेंच राहणार. जुन्या कारणांचेंच परिवर्तन नव्या व्यवस्थेंत करावयास पाहिजें, याखेरीज नष्ट झालेल्या भूतकाळाचा पुनरुद्धार करूं म्हटलें तर तें शक्य नाहीं. पुनरुद्धार करणें जर अशक्य असेल तर सुधारणा करणें हाच एक पर्याय सुज्ञांपुढें आहे."

(सं. लेख– पृ. १९०–१९१)

आतां परतंत्र व तात्पुरत्या तरी ऱ्हास करणाऱ्या अशा नव्या राज्यव्यवस्थेमध्यें अनेक बाबी अशा होत्या कीं त्यामुळे कोणाचेंहि मन निरुत्साही व्हावें; परंतु त्यामध्येंहि रानडयांना एक महत्त्वाचा उपकारक विशेष आढळला होता. पूर्वीं होऊन गेलेल्या अनेक संस्कृति कितीहि उच्च स्वरूपाच्या व यशस्वी असल्या तरी त्या निश्चितपणें थोडचा निवडक लोकांपुरत्याच मर्यादित होत्या. जन्म, गुण व संपत्ति यांमधील उच्च पदवीला प्राचीन काळच्या कल्पनांत व समाजव्यवस्थेंत फार महत्त्व होतें. ज्ञान, ध्यान व त्याग यांवर भर देणाऱ्या ब्राह्मणधर्माचाहि[३] सर्व समाजापैकी फारच थोडयांशी संबंध आला होता. बाकीच्या जमातींचें, विशेषतः खालच्या वर्गांचें, औदासीन्य व गतिशून्यता पराकोटीची होती. अशा प्रकारें, विभागलेल्या व विषम अवस्थेंतल्या

---

३. वस्तुस्थिति अशी होती कीं ब्राह्मण–संस्कृति व तीमधील काव्य, तत्त्वज्ञान, निवृत्तीचे कडक नियम, आणि पावित्र्य या गोष्टी वरील वर्गांतच राहिल्या. हा वर्ग सर्व समाजांत दहा टक्केसुद्धां नव्हता आणि खालच्या वर्गांत त्यांच्या संस्कृतीचा प्रवेश मुळींच झाला नाहीं.

(सं. लेख– पृ. २०४)

समाजांत, मोठ्या प्रमाणांत राष्ट्रीय एकीकरणाची व प्रगतीची यशस्वी चळवळ करणें शक्य नाहीं. विशेषत: जेथें व्यक्तींचें मन आचाराच्या किंवा विचाराच्या बाबतींत रूढीच्या पाशांतून मुक्त झालेलें नसतें, तेथें त्या समाजाच्या औद्योगीकरणाची शक्यता फार कमी असते. आधुनिक शासनसंस्थांशीं आपला संबंध आला नसता, तर आपल्या या देशाच्या जीवनांत व चालीरीतींत काय बदल झाले असते हें सांगणें कठिण आहे. परंतु नव्या शासनसंस्थेमुळें आचारविचारांतील जुनाटपणा जेवढ्या झपाट्यानें कोसळून पडला, तेवढ्या झपाट्यानें कोसळला नसता हें बहुतांशीं खरें आहे. व्यापक व सर्वांगीण सुधारणा होण्यास नवीन व वेगळ्याच विधायक शक्तींशीं संबंध येण्याची आवश्यकता सर्व वर्ग, पंथ व समाज यांना असते. पाश्चात्य विद्येनें ही गरज भरून काढली, आणि पाश्चात्यांशीं आलेल्या संबंधानें नवीन औद्योगिक व सामाजिक व्यवस्थेशीं आपला परिचय झाला.

ज्याप्रमाणें केवळ जुन्या गोष्टींच्या पुनरुद्धाराची शक्यता किंवा उपयुक्तता यांवर रानड्यांची श्रद्धा नव्हती, त्याचप्रमाणें मुळासकट सर्व शाखोपशाखांचा विच्छेद करणाऱ्या क्रान्तीच्या कल्पनेसहि त्यांचा पाठिंबा नव्हता.[४] आपल्या प्रवृत्तींना निश्चित वळण लावण्याच्या कामीं परिस्थिति व परंपरा यांचा बराच भाग असतो व नव्या परिस्थितीशीं जुळणाऱ्या जुन्या गोष्टींवर नव्याचें कलम केल्यानेंच निर्वेध व चिरकालीन प्रगति शक्य होते, ही गोष्ट ते जाणून होते. ब्राह्मण, जैन, बुद्ध इ. कोणत्याहि काळांतील समाजव्यवस्थेंत व पद्धतींत करड्या हुकमतीच्या प्रदीर्घ कारकीर्दीमुळें दैन्य व औदासीन्य हींच येणें अपरिहार्य होतें. आपल्या कृति, भावना व विचार ह्यांच्या द्वारें आपल्या युक्तित्वाची प्रत्येकास पूर्णपणें वाढ करून घेतां यावी याकरितां आचारविचारांतील व्यक्तिस्वातंत्र्याचें क्षेत्र विस्तृत करणें हें सामाजिक चळवळीचें मुख्य उद्दिष्ट होतें.[५] व्यक्तिस्वातंत्र्याच्या या चळवळीची दिशा प्रस्तुत प्रकरणाच्या शिरोभागीं दिलेल्या उताऱ्यांत शक्य तेवढी दाखविण्याचा प्रयत्न रानड्यांनीं केला आहे.[६] पूर्वग्रहानें, किंवा परंपरेनें अथवा सामाजिक रूढीमुळें निर्माण झालेल्या जबरदस्तीच्या ऐवजीं रानड्यांना स्वातंत्र्य हवें होतें. रानड्यांच्या काळीं व जवळजवळ आजहि एखाद्या प्रश्नाकडे नवीन, स्वतंत्र्य व चिकित्सक दृष्टीनें पाह-

---

४. आपण जें बोलतों व करितों तें अगदीं स्वेच्छेनें करीत आहों असें वरवर वाटतें, पण अजाणतां कां होईना ज्या परंपरेंत आपण जन्मलों आहों, ज्या परिस्थितींत आपण वाढलों, ज्या मातेचें स्तनपान आपण केलें त्यांची छाया आपल्या साऱ्या जीवनावर पडल्यावांचून रहात नाहीं, किंवा ज्यांच्याशीं आपला मुळींच संबंध नाहीं असें आपल्यास म्हणतां येणार नाहीं त्यांचाहि परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही. भूतकालाची मुळींच मदत न घेतां नव्या धर्तीवर नवीच रचना करूं असें म्हणणें म्हणजे आपण स्वयंभू असून आपल्या पूर्वजांनीं आपल्याकरितां कांहींही करण्याची आवश्यकता नव्हती असें म्हणण्यासारखेंच आहे. निदान मला तरी या गोष्टींबाबत असें वाटतें. (सं. लेख– पृ. १५८)

५. बाहेरून लादलेल्या नियमांनीं आपलें हित होणार नाहीं. एखाद्या बाबतींत निरुपाय झाल्यासच, रक्तस्राव थांबण्याकरितां जसें शल्यवैद्यास बोलावण्यांत येतें व मागाहून रोग्यास सावकाशपणें बरें करण्याकरितां वैद्याच्या हातीं देण्यांत येतें त्याप्रमाणें हे बाह्योपचार योग्य होतील. बंधनमुक्ततेचें हें कार्य आपलें आपणच करावयास हवें, व त्यांत प्रत्येक व्यक्तीनें स्वोद्धाराकरितां स्वत: प्रयत्न करावयास हवा. याच वृत्तीनें गेलीं तीस वर्षें किंवा अधिक काल हें कार्य चाललें आहे. (सं. लेख– पृ. २०८)

६. आपल्या विचारसरणीस लावावयाचें नवें वळण, वर सांगितल्याप्रमाणें, बंधुभावना, बहिर्मुख वृत्तीचा विकास, आणि सहकार्याची भावना अंतरंगांत दृढ करणें या गोष्टींवर आधारलेलें हवें. आपले मित्र व सहकारी यांचें मंडळ वाढवीत रहा; वाटल्यास हळूहळू व बेतानेंच वाढवा. परंतु माणसामाणसांमधील मूलभूत समानतेची भूमिका ओळखण्याकडेच वृत्ति असली पाहिजे. तीमुळेंच सहानुभूति व सामर्थ्य उत्पन्न होईल. या वृत्तीनेंच अनेक आपल्याबरोबर आहेत, विरुद्ध नाहींत किंवा आपण चुकीनें समजतों त्याप्रमाणें आपल्यापेक्षां खालींहि नाहींत असा विश्वास उत्पन्न होऊन आपल्यांत अधिक सामर्थ्य येईल.
(सं. लेख– पृ. १९३)

ण्याची वृत्ति आपल्याकडे इतकी विरळ आहे कीं सामाजिक सुधारणेचें तेंच सर्वांत महत्त्वाचें उद्दिष्ट म्हणतां येईल. इतर सर्व मानवी गोष्टींप्रमाणें मानवी विचारशक्ति हीहि ज्ञान मिळविण्याचें व कार्य करण्याचें एक सर्वस्वीं निर्दोष असें साधन नव्हे हें खरें. तथापि व्यक्तीची किंवा समाजाची प्रगति अथवा मुक्तता याच मानवी ज्ञानानें शोध करून स्वीकारलेल्या मार्गानें होणार आहे. परिस्थितीचा स्वतः करून घेतलेला बोध व त्यास अनुसरून वागण्याचें स्वातंत्र्य हाच मानवी जीवनाचा खरा नैतिक पाया आहे. नव्या नव्या गोष्टी शिकण्यास व आचरण्यास मोकळीक देणारी समाज-पद्धति पाहिजे, आणि अशा स्वातंत्र्याचा फायदा घेण्याचें शिक्षण लोकांस मिळालें पाहिजे. बुद्धीस स्वातंत्र्य मिळून तिला तर्कशुद्धतेचें वळण लागल्या-शिवाय राजकीय किंवा आर्थिक क्षेत्रांत नव्या रीतीची सुधारणा शक्य नाहीं. सुधारणा, पुनरुज्जीवन व प्रगति हीं परस्पराशीं बरींच निगडित आहेत; पण बौद्धिक स्वातंत्र्य हा तीनहि गोष्टींना समान असा एकच पाया आहे.

चिकित्सक दृष्टीमुळें आज मान्य झालेलीं सत्यें किंवा रूढ आचार शुद्ध राहून त्यांची उपयुक्तता कायम टिकते. एवढेंच नव्हे, तर एकाद्या गोष्टीचें योग्य ज्ञान करून घेऊन तिच्या अस्तित्वासाठीं आवश्यक वाटणाऱ्या इतर गोष्टीहि खुशीनें स्वीकारण्यानें मानवी मनाची उंची वाढण्यास बरीच मदत होते. यावरून साहजिकच चिकित्सक वृत्तीबरोबरच तिच्याच साहाय्यानें सिद्ध झालेल्या गोष्टींवर श्रद्धा ठेवण्याची जबाबदारीहि स्वीकारावी लागते. स्वाभिमान व स्वावलंबन यांवर आधारलेल्या मानवी जीवनांत भोळसटपणाला वस्तुतः स्थानच असूं नये, पण त्याबरोबर श्रद्धेचा व आकांक्षे-चाहि लोप झाला तर मानवी संस्कृतीचा सारा बौद्धिक, नैतिक व भौतिक डोलारा कोसळून पडेल, आणि अखिल मानवजात रानटीपणाच्या तमोयुगांत परत फेंकली जाईल. मनुष्याचें मार्गदर्शन करणाऱ्या ज्या कांहीं गोष्टी आहेत त्यांत त्याची स्वतःची बुद्धि ही इतर साधनांपेक्षां अधिक विश्वसनीय आहे या तत्त्वावर श्रद्धा असणें हें संस्कृतीचें मूलतत्त्व आहे, किंवा असावयास हवें. भोळ-सटपणाविरुद्ध मोहीम पुकारण्यास रानडयांची तयारी होती, पण त्याबरोबर श्रद्धावृत्तीवर आघात करण्याची त्यांची इच्छा नव्हती. इतर काळच्या सुधारकांनीं श्रद्धा व भोळसटपणा यांमधील हा भेद जर लक्षांत घेतला असता तर आतांपर्यंतच्या बहुतेक सुधारणाविषयक चळवळींत मागाहून शिरलेल्या प्रचंड विघातक प्रवृत्तींस जागा मिळाली नसती.

मध्ययुगीन समाजव्यवस्था सारी जन्मप्राप्त पदवी-वर आधारलेली होती. युरोपियनांची सरंजामशाही घेतली काय, किंवा हिंदूंच्या वर्णव्यवस्थेचा विचार केला काय, दोन्हींतहि प्रत्येक मनुष्यप्राण्याला अगदीं जन्मा-पासून पूर्वनियोजित अशा समाजव्यवस्थेच्या चौकटींत बसवून टाकण्याचीच कल्पना होती. अशा तऱ्हेची व्यवस्था कांहीं विशिष्ट कारणांमुळें व्यक्तीच्या व समाजाच्या दृष्टीनें स्वाभाविक व सोईचीहि असेल, परंतु मोठमोठ्या राष्ट्रीय सरकारांच्या छत्राखालीं लाभलेल्या शांततेमुळें, व भौतिकशास्त्रें औद्योगिक कार्यास सहज जुंपतां आल्यानें या जीर्ण संस्थेची धोंड जशी प्रगतीस तशीच खऱ्या स्थैर्यासहि सारखीच अडथळा करूं लागली. नव्या समाजव्यवस्थेंत प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या व समाजाच्या हिताच्या दृष्टीनें आपल्यामध्यें जें सर्वोत्कृष्ट असेल तें समाजाच्या सेवेस सादर करतां येतें, व त्याचा मोबदला त्या व्यक्तीनें केलेल्या सेवेच्या मानानें तीस समाजाकडूनहि कांहीं सुखसोईचा लाभ होतो. समाज म्हणजे तरी काय, अखेर व्यक्तींचाच बनलेला असतो. म्हणून विनिमयाच्या या योग्य तत्त्वा-नुसार गुणांनीं किंवा मेहनतीनें कोणत्याहि उच्च पदाला पोहचण्याचा प्रत्येक व्यक्तीला जो हक्क असतो तो बजावण्यास नव्या समाजघटनेंत संधि दिली जाते. जन्मप्राप्त पदवीला विशेष महत्त्व असलेल्या जुन्या समाजव्यवस्थेशीं या नव्या पद्धतीची तुलना केली तर असें दिसून येईल कीं या नव्या पद्धतीचें स्वरूप तत्त्वतः व अनेक वेळां व्यवहारांतहि परस्परांतील करारा-सारखें असतें.

जन्मजात सामाजिक पदवीमुळें मोठेपणा व सुधारणा यांचा कांहींसा त्याग करावा लागतो, तर हें तत्त्व सोडून शुद्ध परस्परकराराचें तत्त्व स्वीकारल्यास व्यक्तीचें स्वातंत्र्य व त्यामुळें होणारी शास्त्रीय प्रगति हीं सामुदायिक ऐक्य व न्याय यांस विरोधी होण्याचा संभव असतो. जेथें पूर्वी मुळींच स्वातंत्र्य नसे, तेथें नवीन व्यवस्थेंत पहिली पायरी म्हणजे व्यक्ति अथवा वर्ग यांचे परस्परांमधील संबंध सामाजिक नियमानें न ठरवितां स्वतःच्या राजीखुषीनें ठरविणें ही होय.

समाजाची व्यवस्था या शुद्ध परस्परकराराच्या पायावर करण्यांत कांहीं मर्यादा न संभाळली तर दोन प्रकारचे दोष उत्पन्न होतात याची जाणीव रानडयांना होती. पहिली गोष्ट अशी कीं शास्त्रीय प्रगति किंवा भौतिक समृद्धि यांपेक्षां सामाजिक ऐक्याचें व्यवहारदृष्टया किंवा नैतिक दृष्टया अधिक महत्त्व आहे. म्हणून सामाजिक ऐक्याच्या आड न येईल इतपतच या कराराच्या तत्त्वावर भर देण्यांत यावा. दुसरी गोष्ट अशी कीं, व्यवहार अगर करार करणाऱ्या दोन पक्षांतील मूळ भूमिकेंत स्वखुषी व न्यायबुद्धि आहे ही गोष्ट कराराच्या हितकारी तत्त्वांत गृहीत धरलेली असते. परंतु समाजांतील जातगोत, मिळकत, वारसापद्धति इत्यादि निरनिराळया बाबींमुळें कराराच्या वरील प्राथमिक अटीहि पुऱ्या होत नाहींत. म्हणून सुधारणामंदिराची पहिली पायरी या दृष्टीनें कराराच्या तत्त्वाबरोबर सर्वांस सारखी संधि असणें इत्यादि इतर तितक्याच महत्त्वाच्या गोष्टी यावयास पाहिजेत. समाजाची जी एकंदर संघटना करावयाची तींत हेंहि साधावयास हवें.

ज्या समाजांत जन्मप्राप्त पदवीस महत्त्व असतें, त्याला नवीन संघटनेची कमींतकमी गरज वाटते; आणि व्यक्तीला केंद्र समजणाऱ्या समाजांतच त्या संघटनेला प्रारंभ होतो ही गोष्ट चमत्कारिक वाटेल. औद्योगिक युगाच्या पहिल्या पहिल्या अवस्थांत सामाजिक नियंत्रणाची बाजू काढून टाकून त्या जागीं खासगी पण सुनियंत्रित अशा परस्परसंबंधाच्या योजनेवर भर देण्यांत येई. पण लौकरच असें दिसून येऊं लागलें कीं या परिवर्तनामुळें होणाऱ्या सामाजिक घडामोडींचे परिणाम फार मूलगामी असतात, व म्हणून समाजाच्या हितसंबंधांशीं निगडित असलेल्या सर्व बाबींचें मार्गदर्शन शासनसंस्थेनेंच आपल्या हातांत घेणें आवश्यक होऊन बसतें. या अपरिहार्य व तर्कप्राप्त निष्कर्षास युरोपियन् आणि विशेषतः इंग्लिश विचारवंतांनीं विशेष तत्परतेनें मान्यता दिली नाहीं. रानडयांना मात्र राजकीय त्याचप्रमाणें आर्थिक प्रगतीमुळें आवश्यक झालेल्या नव्या समाजघटनेंत वैयक्तिक स्वातंत्र्य आणि संघटित मार्गदर्शन यांच्या उपयुक्ततेची योग्य कल्पना होती.

ज्या समाजपद्धतींत जन्मप्राप्त पदवीस महत्त्व आहे, तिच्या अवनत स्थितींत दैववादी वृत्ति बळावते आणि यामुळें तिची उपयुक्तता संपल्यानंतरहि अधिक कालपर्यंत तिला जीवादान मिळतें. अशा समाजांत आहे ही व्यवस्थाच कल्याणकारक आहे या दृष्टीनें पाहण्याची इतकी संवय होते, कीं विरुद्ध अनुभवाच्या पुराव्यानें सुद्धां तिला सहजासहजीं धक्का बसत नाहीं. एकीकडे श्रद्धा व एकीकडे अनुभव अशा स्थितींत, स्थितिशील समाजांत रुळलेलें मन दैवी नियतीकडे धांव घेतें; आणि प्रचलित समाजव्यवस्थेपासून ज्यांचा फायदा होतो, त्यांना या स्वाभाविक प्रवृत्तीची वाढ व्हावी असें साहजिक वाटतें. दैववाद हें अधोगतीला चाललेल्या मानवी समाजवृक्षाला येणारें अत्यंत कटु फळ आहे. व्यक्तीचें अथवा समाजाचें पुनरुज्जीवन करावयाचें असल्यास, स्वतःच्या कृत्यांनीच आपलें हित व अहित होतें व स्वतःच्याच बुद्धीनें आपल्या परिस्थितीचें आकलन करून तींत सुधारणा करण्याचा प्रयत्न कोणत्याहि परिस्थितींत करणें हें शक्य आहे, तसेंच तें आपलें कर्तव्यहि आहे ही गोष्ट प्रथम पटली पाहिजे. मानवी उदात्ततेच्या व स्वातंत्र्याच्या या जाणीवेंतच सुधारणेचें मूळ तत्त्व आहे, हें रानडयांनीं दिग्दर्शित केलें होतें. या सुधारणेकरितां रानडयांनीं आपलें जीवन अर्पण केलें होतें व अशा सुधारणेमुळेंच भारतीय स्वातंत्र्याचा व उत्कर्षाचा उदय होईल असा रानडयांना विश्वास होता. रानडयांच्या कालीं या दैववादाची काळी छाया विशेष पडलेली होती. अशा काळांतहि स्वतःच्या बुद्धीच्या प्रकाशाची शिकवण देण्यास विशेष धैर्य आणि खोल दृष्टि लागते. आपल्या अंगावर पडलेलें कार्य करण्यास सुधारक आणि द्रष्टा या दोन्ही नात्यानें रानडयांची योग्यता याप्रमाणें फार मोठी होती यांत शंका नाहीं.

हिंदुस्थानच्या भावी समाजव्यवस्थेविषयीं रानडयांच्या ज्या कांहीं कल्पना होत्या, त्यांत व्यक्तीची बंधनांतून मुक्तता झालीच पाहिजे आणि तिला आपली सर्वांगीण उन्नति करून घेण्यास शिकविलें पाहिजे या सिद्धान्तांस अग्रस्थान होतें; त्याचप्रमाणें भौतिक सुधारणांच्या फळाची गोडी चाखण्याची भारतीयांची क्षमता अधिक वाढावी यावरहि त्यांचा कटाक्ष असे. आध्यात्मिक दृष्टीनें भौतिकवाद हें एक हीन ध्येय असेल अथवा नसेलहि. परंतु औदासीन्य व गतिशून्यता या गोष्टी मात्र निःसंशय घातक होत्या. चैतन्यानें युक्त व निरोगी अशा समाजव्यवस्थेंत आपल्या कल्पनेप्रमाणें आयुष्य घालविण्याचें नुसतें स्वातंत्र्य पुरेसें होत नाहीं,

तर या गोष्टीस आवश्यक तीं साधनेंहि उपलब्ध असावयास पाहिजेत. आर्यांच्या येथील वसाहतकालांत साऱ्या वैयक्तिक व सामाजिक कृतींचें उद्दिष्ट म्हणजे इच्छेनुसार जीवनोपभोग घेतां यावा म्हणून भौतिक साधनसंपत्तीची वाढ करणें हें होतें. परंतु नंतरच्या कालांत भारतीय जीवनाचा कल भौतिक कला व उद्योगधंदे यांकडे उदासीनतेनें व तटस्थपणें पाहण्याकडे होता. वेदकालांतील ज्ञानोपासनेचे प्रयत्न आध्यात्मिकाबरोबर भौतिकासंबंधींहि चालू होते; पण मागाहूनच्या अधोगतीच्या कालांत प्राप्त वस्तूंचा त्याग करणें, किंबहुना त्यांचें ज्ञानहि करून न घेणें हेंच उच्च ज्ञानाचें निदर्शक होऊन बसलें. त्यागांत कांहीं नैतिक मोठेपणा असेल, पण तो केव्हां ? जेव्हां जवळ असलेली वस्तु, किंवा नसली तर, जी मिळविण्याची पात्रता अंगीं आहे, तिचा त्याग केला तर. पण ज्यावेळीं कर्तृत्वशून्यतेमुळें राष्ट्राच्या आर्थिक प्रयत्नांची उत्पादनशक्ति घटली आहे अशावेळीं त्या त्यागाला किंमत नाहीं. उदात्त नैतिक ध्येयाच्या परिपूर्ततेसाठीं सुद्धां जोरदार आणि संपन्न अशी आर्थिक घटना करणें आवश्यक असतें.

कोणत्याहि प्रगमनशील समाजास आवश्यक अशा जीवनक्रमाविषयीं रानडयांची कांहीं विशिष्ट विचारसरणी होती. तिचा एक प्रमुख विशेष असा कीं तीमध्यें कला व शास्त्रें यांचा समाजानें प्रगतीसाठीं चालविलेल्या प्रयत्नांत उपयुक्त भाग म्हणून अंतर्भाव होई. उच्च संस्कृतीचा एक भाग म्हणून कला व शास्त्रें या क्षेत्रांतील प्रगतीची योग्यता उच्च नैतिक ध्येयाइतकीच आहे; किंबहुना शास्त्रें आणि कला यांच्या प्रगतीमुळें जें सामर्थ्य लाभतें, तें नसेल तर समाजाला नीतीच्या क्षेत्रांतहि प्रगति करणें अशक्य आहे. हिंदी लोकांची व विशेषतः ज्यांना साधनांची अनुकूलता आणि फुरसद आहे, अशांचीं मनें राष्ट्रीय प्रगतीच्या या अंगाकडे वळवावीं अशी रानडयांची उत्कट इच्छा होती.

रानडयांच्या दृष्टीनें निष्कारण बंधनें ज्यांत नाहींत अशी समाजपद्धति, भरभराटीस आलेले उद्योगधंदे आणि हेतुपुरस्सर झालेलें सामाजिक सहकार्य या गोष्टी स्वतंत्र व उत्कर्षसंपन्न भारतीय जीवनाला इमारतीच्या पायासारख्या होत्या. सामाजिक पुनर्घटनेचा त्यांनीं स्वीकारलेला मार्ग याप्रमाणें सर्वांगीण होता. स्वतःच्या हयातींत कांहीं विशिष्ट सुधारणांवर त्यांनीं भर दिला, तो या सबंध योजनेला चालना देण्याच्या हेतूला आनुषंगिक म्हणूनच. दोन गोष्टींविषयीं मात्र रानडयांचें मत ठाम झालें होतें. एक अशी– परकीयांनीं आपल्यावर केलेलें आक्रमण हें बव्हंशीं जातिसंस्थेमुळें सामाजिक बाबतींत व्यक्ति तटस्थ राहतात म्हणून झालें.[७] दुसरी गोष्ट म्हणजे या जातिसंस्थेचें मूळ येथें वसाहत करून राहणाऱ्या आर्यांच्या आक्रमणांत आहे.

नंतरच्या ऐतिहासिक घटनांमुळें जातिसंस्थेचा हा राजकीय पाया कुचकामाचा ठरला, एवढेंच नव्हे तर, स्वतःच्या स्वातंत्र्याकरितां व उन्नतीकरितां झटत असतां, भारतीयांनीं सर्व भेदभाव विसरून एक होणें आवश्यक आहे ही गोष्टच स्पष्ट झाली. जातिसंस्थेला कोणत्या पद्धतीनें आणि कोठवर मुरड घालावी या बाबतींत, आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सर्व प्रकारच्या योग्य तडजोडीस रानडे तयार होते. परंतु हिंदी समाजाच्या आर्थिक, सामाजिक आणि राजकीय संघटनेच्या उपक्रमांत जातिसंस्था फार दिवसांपासून कुचकामी ठरली आहे, किंबहुना तिचा अडथळाच होत आहे या मुख्य प्रमेयाला कोणताहि विरोध त्यांना मान्य झाला नसता. अर्थात् हें सांगायला नकोच कीं जाति-

७. गेल्या तीन हजार वर्षांत आपली जी अवनति होत आली आहे तिला जबाबदार असणाऱ्या कल्पना किंवा अंतःप्रवृत्ति काय असाव्यात ? त्या थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येतील. एक– अलिप्तपणा अथवा आत्मसंतुष्टता; दोन– आंतील विवेकबुद्धीच्या सांगणीपेक्षां बाह्य सत्ता अथवा शक्ति यांच्यापुढें मान वांकविणें; तीन– वंश आणि जन्म यांवरून माणसामाणसांत काल्पनिक भेद मानणें; चार– अन्यायाला अथवा अपराधाला मुकाट्यानें मान्यता देणें; आणि आंधळ्या दैववादापर्यंत मजल जाईल एवढें ऐहिक कल्याणाकडे सर्वसाधारण दुर्लक्ष्य. आपल्या जुन्या समाजव्यवस्थेच्या बुडाशीं या वृत्ति आहेत. साहजिकच त्यांचा परिणाम सध्यांच्या कौटुंबिक व्यवस्थेंत झालेला दिसतो. तीमध्यें स्त्री ही सर्वस्वी पुरुषाच्या आणि खालच्या जाति वरच्या जातींच्या दास्यांत रहात आहेत. इतक्या की मनुष्यत्वाविषयीचा स्वाभाविक आदरहि त्यांच्यामध्यें उरला नाहीं.

(सं. लेख– पृ. १९२)

अनुक्रमणिका

संस्थेच्या वर्चस्वामुळें शतकानुशतकें ज्या अवनत स्थितींत 'अस्पृश्य' खितपत होते तीबद्दल त्यांना अत्यंत खेद होत असे.[८]

या जातिसंस्थेवर आपल्या समाजरचनेचा पाया इतक्या दीर्घकालपर्यंत आधारलेला आहे कीं स्वतः दलित वर्गांनाहि आपलें व समाजाचें हित आपली ही अवनत स्थितीच पुढें चालविण्यांत आहे असें वाटूं लागलें. नव्या कल्पनांच्या आणि नव्या परिस्थितीच्या प्रभावामुळें दलितवर्गांतील कांहीं चाणाक्ष व धीराच्या लोकांनी स्वतःच्या उद्धाराकरितां चळवळ सुरूं केली होती हें खरें. परंतु वरच्या वर्गांतील ज्या लोकांना प्रचलित व्यवस्थेंतील अपूर्णतेची व अनिष्टपणाची जाणीव झाली असेल त्यांनी तरी आपल्या उद्धाराकरितां दलितांनी टाहो फोडीपर्यंत वाट पहाण्याची जरूर नव्हती.[९] सामाजिक न्यायबुद्धीच्या दृष्टीनेंच नव्हे, तर स्वतःच्या अंतिम हिताच्या दृष्टीनें सामाजिक सुधारणेचे प्रयत्न व्हावयास हवेत, व ते शक्य तितके प्रत्येक व्यक्तीस समान स्वातंत्र्य आणि सारखी साधनें मिळाली पाहिजेत या तत्त्वावर व्हावयास पाहिजेत.

जातिसंस्था हें एके काळी साऱ्या समाजाची सुव्यवस्था लावण्याचें एक तत्त्व होतें हें उघड आहे. वैयक्तिक अस्पृश्यतेची दुष्ट चाल हें तिचे केवळ एक अंग होतें. पूर्वीच्या राज्यव्यवस्थेचें या जातिसंस्थेस पाठबळ असे. हें अर्थात् चालू व्यवस्था पुढें चालविण्याचें जें सामान्य धोरण सर्व सरकारांचें असतें त्यामुळें झालें असेल; किंवा जातिभेद असण्यांतच ज्यांचें हित आहे अशांनी सहेतुक केलेल्या प्रयत्नांनीं झालें असेल. आज तें निश्चितपणें सांगणें कठिण आहे. राज्यकारभारांत शिवाजीसारख्या एका विभूतीचाच प्रभाव जेव्हां पडे किंवा ग्रामपंचायतीसारख्या लोकमतानुवर्ती संस्थेकडून न्याय होई तेव्हां जातिभेदाचे दुष्परिणाम बऱ्याच अंशी सौम्य होत. परंतु ब्रिटिशांनी सुरू केलेल्या आर्थिक व राजकीय व्यवस्थेंत जातिभेदास स्थानच नव्हतें. त्यांचें धोरण बहुधा सारे वर्ग एकाच मालिकेंत बसविण्याचें अथवा क्वचित् खालच्या वर्गांना वर ओढण्याचें असे. जातिभेदाकडे या नव्या राजवटीचें दुर्लक्ष्य झाल्यानें जे वैयक्तिक व सामाजिक परिणाम झाले ते कसेबसे जिरवण्यापलिकडे हिंदु समाजास कांही करतां येईना.

असें असतांही मंदिरप्रवेश किंवा सार्वजनिक सुखसोईंचा लाभ यासारख्या बाबतीत मात्र ब्रिटिश सत्तेनें जुनी पद्धतीच उचलून धरली. कारण यासारख्या गोष्टीत हिंदु लोकांना त्यांच्या कलाप्रमाणें वागूं देणें हेंच त्यांना कारभाराच्या दृष्टीनें सोईचें वाटे. या धोरणांतील अन्याय व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या अडचणी ह्या कालांतरानें समजून आल्या. परंतु अगदीं अलीकडेपर्यंत जातीय अन्यायाविरुद्ध कायदेशीर इलाजाचा प्रश्न उपस्थित झाला नव्हता. रानड्यांच्या काली सरकारनें आपल्या कारभारांत जातिभेदास मान्यता देण्यास नकार दिला एवढीच गोष्ट पुढें वाढत गेलेल्या जातिविच्छेदनाच्या चळवळीस उत्तेजन म्हणून किंवा पाठिंबा म्हणून पुरेशी आहे असें मानलें गेलें.

हिंदी लोकांच्या, विशेषतः हिंदूंच्या समाजव्यवस्थेंतील इतर गोष्टी मात्र कायद्याच्या स्वाभाविक कक्षेंतून तितक्याशा सुटल्या नाहींत. उच्च हिंदूंमधील पुनर्विवाहाचा प्रश्न आणि बहुतेक साऱ्या समाजांतील बालविवाहपद्धति या दोन गोष्टी उदाहरणादाखल घेतां येतील. यापेक्षांहि मिळकत व वारसा या बाबींचा

---

८. आजवर ज्यांचा स्पर्शहि आपल्यास भ्रष्ट करील असें आपण मानलें त्यांच्याशीं अधिक विचारपूर्वक वागून त्यांना आपली उन्नति साधण्यांत आपण मदत करणार, कीं 'आमच्यावर आपली सांवलीही पाडूं नकोस' असें म्हणणार? पहिल्या प्रकारानें वागण्यांत आपल्या अंतरात्म्याला अधिक सामर्थ्य, धीर, दयाशीलता ही लाभतील. की दुसऱ्या प्रकारानें? (सं. लेख– पृ. २११)

९. तोच आक्षेप तिसऱ्याहि प्रकारानें सांगतां येईल. तो असा– ज्यांना अन्याय होतो ते तक्रार करीत नाहींत, मग तिऱ्हाइतांना मध्यें पडण्याचें कारण काय? आपलें मंडन करण्याची ही पद्धति जुनीच आहे. गुलामगिरी रद्द करण्याच्या वेळीं, तसेंच सती व बालहत्येविरुद्ध कायदे होत असतांना, त्याचप्रमाणें पुनर्विवाह मान्य करणाऱ्या कायद्याचे वेळीं हेंच कारण पुढें करण्यांत आलें होतें. अन्यायाचा अत्यंत अनिष्ट परिणाम म्हणजे त्याला बळी पडणाऱ्यांची इतकी अवनति होते कीं आपल्यावर जुलूम करणाऱ्यांच्या पायावर ते लोळण घेतात. (सं. लेख– पृ. ७९)

अनुक्रमणिका

शासनसंस्थेशीं अधिक निकट संबंध येई. यांतील कोणतीही चाल अथवा रीत केव्हांहि स्थिर आणि निश्चित स्वरूपाची नव्हती. बदललेल्या परिस्थितीच्या आणि मतांच्या प्रभावामुळें त्यांत हळूहळू बदल होत होता. मात्र हें केव्हां होई ? ग्रामपंचायतीसारख्या स्थानिक सत्तेला आपल्यापुढें येणाऱ्या धार्मिक व लौकिक प्रश्नांवर योग्य उपाय शोधून ते विरोधाला न जुमानतां अमलांत आणण्याचें स्वातंत्र्य असे तेव्हां. जेव्हां सारी लौकिक सत्ता परकीय सत्तेच्या एकाच अधिकाऱ्याकडे आली आणि धर्म तर अपरिवर्तनीय होऊन बसला त्यावेळी सामाजिक चालीरीतींमधला लवचिकपणा नाहींसा झाला. इकडे निरनिराळ्या क्षेत्रांतील प्रचलित व्यवस्था व आचार यांविरुद्ध असंतोष वाढत चालला आणि आज मान्य व रूढ होऊन बसलेल्या चालींमध्यें बदल घडवून आणण्यास काय उपाय योजावेत हा प्रश्न सर्व वर्गांतील लोकांच्या व विशेषत: हिंदुसमाजाच्या मनांत घोळूं लागला.

रानडयांची या विषयावरील मतें त्यांच्या वृत्तीस धरूनच होतीं. इच्छित ध्येय साध्य करून घेण्याकरितां कोणत्याहि एकाच पद्धतीवर सर्वस्वीं भरंवसा ठेवण्यास ते तयार नसत. प्रथम ते बहुजन समाजास नियोजित सुधारणेची आवश्यकता आणि तीमधील न्याय्य बाजू पटवून देण्याचा आटोकाट प्रयत्न करीत. हें करीत असतां इष्ट सुधारणा ही केवळ आपल्या परीनें हिताची आहे एवढेंच नव्हे, तर तीमुळें सध्यांपेक्षां अधिक जुनी आणि फायदेशीर व्यवस्थाच आपण पुन: स्वीकारीत आहोंत असें दाखविण्याचा ते शक्य तों प्रयत्न करीत.[१०] जेथें जुळेल तेथें या पद्धतीनें लोकांना विनंति केल्यास विरोध कमी होतो, आणि नव्या सुधारणेची उपयुक्तताहि वाढते. या दृष्टीनें सामाजिक सुधारकांसहि जुन्या धर्मग्रंथांचा व इतिहासपुराणांचा व्यासंग उपयोगी पडतो असें त्यांना वाटत असें. स्त्रीशिक्षण, बालविवाह, पुर्नविवाह यांसारख्या बाबतींत प्राचीन काल व जुने शास्त्रग्रंथ यांस आवाहन करणें पुष्कळ वेळां फायद्याचें ठरलें आहे. रानडे बहुजनसमाजास धरून राहणारे असल्यानें, आणि कमींतकमी प्रतिकार कोणत्या

१०. ही आणखी एक गैरसमजूत असून तिला खोटया अभिमानाखेरीज दुसरा आधार नाहीं. या खोटया अभिमानानें भयंकर गैरसमजांना आपण कवटाळीत असतों. वस्तुत: हल्लींची सामाजिक व्यवस्था पूर्वीच्या थोर धर्मशास्त्रकर्त्यांनीं घालून दिलेली खास नाही. त्यांच्या नांवाबद्दल शब्दांनीं आपण आदर दाखवीत असतों, पण त्यांच्या आज्ञा मात्र पदोपदीं मोडत असतों. जेव्हां ही धर्मशास्त्रें रचिली गेलीं त्या काली प्रचलित असलेल्या रूढींशीं आजच्या बहुतेक रूढि विरुद्ध आहेत. आजची स्त्रियांची परावलंबनाची स्थिति, विवाहाच्या वयासंबंधी रूढ मर्यादा, वरील वर्गांतील विधवांना पुर्नविवाहाची बंदी, देशांत हल्ली असलेल्या अनेक पोटजातींचे विवाह त्याच पोटजातींत करण्याविषयीचा निर्बंध, स्त्रियांचें अज्ञान आणि एकान्तवास, कांही धंदे कांहीं जातींनाच मोकळे ठेवणें, परदेशगमनाला बंदी, पुरुषांना मिळणाऱ्या सवलती व स्त्रियांवर लादलेली निवृत्ति यामुळें निर्माण झालेली विषमता, कडक रोटीबंदी आणि अस्पृश्यता, कांहीं जातींनाच करावयाचा सारासारशून्य दानधर्म, या आणि यासारख्या इतर गोष्टीत जुन्या पद्धतीपासून आपण जे इतके दूर गेलों आहोंत त्याला हे पूर्वींचे धर्मशास्त्रकार कसे जबाबदार म्हणतां येतील ? जुन्या पद्धतीत झालेले हे फरक मनुष्यनिर्मितच होत. माणसांमधील दोषप्रवृत्तीना दिलेल्या या सवलती होत; पूर्वींच्या अधिक चांगल्या रूढीच्या ऐवजी घुसडलेले हे दुष्ट आचार होत. अनेकदा इतिहासाला अज्ञात अशा व्यक्तीनीसुद्धां हे फरक केलेले असतात. देशाची स्थिति अधिक वाईट झाली असतांनाच जे फरक आपल्या आचारांत पडले त्यांचें समर्थन करण्याकरितां धर्मग्रंथांतून अनेक प्रक्षेप केलेले आहेत. धर्मशास्त्राची मान्यता ज्यांना मिळूं नये अशा भलत्या नवीन गोष्टी यांत आहेत. कदाचित् या गोष्टी सद्धेतूनेंच घातल्या गेल्या असतील. परंतु हे सद्धेतु असलेच तर ते साधणें त्यांना शक्य झालें नाहीं हें उघड आहे; या नवीन गोष्टींचें उच्चाटन करूनच जुनी चांगली ध्येयें त्यांच्या ठिकाणी स्थापलीं जाणें साहजिक आहे. आजच्या सुधारकांवर, ते जुन्या माननीय अशा पद्धतीचा आपल्या सोईस येईल तसा उपयोग करून घेत आहेत, असा आरोप करतां येणार नाही. उलट सुधारकांनाच आपण या पुराण-धर्माज्ञांचे संरक्षक आहों अशी भूमिका घेतां येईल, आणि ज्यांनी आपल्या स्वार्थाकरितां दैवी आज्ञा धुडकावून दिल्या त्यांचा निषेध करतां येईल. ( सं. लेख- पृ. २३३-२३४ )

धोरणानें होईल हें त्यांना माहीत असल्यानें, नव्या सुधारणांना जुन्या परंपरेच्या चौकटींत शक्य तितकें बसविण्याचा ते नेहमीं प्रयत्न करीत.[११] बदल तर सारखा होतो; पण तसें कधीं भासत नाहीं हें ब्रिटिशांच्या राज्यघटनेविषयीं जसें म्हणतां येतें तसेंच भारतीय समाजाविषयींहि त्यांच्या मतें म्हणतां येण्याजोगें होतें.

जेथें जुन्या गोष्टींचा आधार घेतां येण्याजोगा नसे, तेथें मात्र क्रान्तिकारक सुधारणेचा प्रचार करण्यासहि रानडे मागें घेत नसत. उदाहरणार्थ, अस्पृश्यता किंवा सती यांसारख्या चालींचें निर्मूलन, जुन्या धर्मग्रंथांचीं संमति असो वा नसो, केलेंच पाहिजे असें त्यांचें मत होतें. नियोजित सुधारणेच्या युक्ततेची व उपयुक्ततेची खरी कसोटी म्हणजे आजची आपली गरजच होय. नवीन गोष्टीचा उपक्रम जुन्याच्या स्वरूपांत जो करावयाचा तो एक सोईस्कर मार्ग म्हणूनच. परंतु जेथें सद्य:कालीन गरज जुन्याच्या उद्धारानें भागण्यासारखी नाहीं अशी समाजांतील पुढाऱ्यांची खात्री पटते, तेथें नव्या पद्धतीचाच उपक्रम करणें भाग असतें. अशा तऱ्हेचा परंपराभंग पूर्वीच्या काळीं पुष्कळदां झालेला आहे, आणि प्राचीन ऋषिमुनींनीं आपल्या कालीं जें केलें तें स्वत:च्या काळांत करण्यास मागेंपुढें पहाणारे रानडे नव्हते. तसेंच जेथें नुसत्या मलमपट्टीनें काम भागण्यासारखें नव्हतें तेथें अधिक कडक उपाययोजना करण्यास व जरूर पडल्यास शस्त्रक्रियाहि करण्यास त्यांची तयारी असे.[१२] उलट औषधोपचारानें, थोड्या मंद गतीनें कां होईना, जी सुधारणा होणें शक्य आहे, तीकरितां शस्त्रक्रियेचा अवलंब करण्यास मात्र त्यांची अनुमति नसे. कारण त्यांच्या मतें रोग्याला औषधोपचारच अधिक मानवतो. परंतु जेथें रोग सतत जवळ बाळगावयाचा कां शस्त्रानें त्याचें निराकरण करावयाचें असा प्रश्न उपस्थित होई, तेथें रानडे सर्वांच्या आधीं शस्त्राला हात घालीत.

एखादा नवीन उपक्रम इष्ट आहे आणि आवश्यकहि आहे, अशी त्यांच्या मनाची खात्री झाली कीं रानडे जनसमुदायाच्या संमतीकरितां, हें स्थित्यंतर म्हणजे जुन्या परंपरेचाच नवा अवतार आहे, अशा तऱ्हेची संपादणी करीत असत. आणि जर नवें स्थित्यंतर मूलगामी स्वरूपाचें असलें व जर त्याचा सर्वांकडून स्वीकार होण्यास जेवढ्या प्रमाणांत लोकमताचा पाठिंबा आवश्यक आहे तेवढ्या प्रमाणांत मिळण्यासारखा नसला तर त्या स्थित्यंतरास कायदेशीर स्वरूप देण्याकरितां रानडे शासनसंस्थेचा आश्रय घेण्यास तयार असत. अशा तऱ्हेनें शासनसंस्थेकडे स्नेहभावानें पाहण्याची व समाजसुधारणेस तिचा उपयोग करून घेण्याची वृत्ति, रानड्यांच्या कालांत दुहेरी टीकेस पात्र झाली. पहिली गोष्ट अशी कीं, सामाजिक व्यवस्था ही भारतीय समाजाची खासगी बाब असल्यानें, परकीय सत्तेनें तिच्यांत प्रवेश करून रूढ चालीरीतींत बदल करण्याचा किंवा त्या बदलास अधिकृत स्वरूप देण्याचा उपक्रम करूं नये, अशा मतांचे कांहीं लोक भारतीय समाजांत होते. रानड्यांना हें मत बिलकूल मान्य नव्हतें.

जोंपर्यंत सुधारणेचा उपक्रम त्या समाजांतील पुढाऱ्यांकडून होतो तोंपर्यंत, शासनसंस्था परकीय असली तरी कांहीं बिघडत नाहीं,[१३] असें त्यांचें मत होतें. किंब-

११. आपल्यापुढें प्रश्न असा कीं या प्रवाहाबरोबरच सुज्ञ माणसाप्रमाणें आपण तरून जावयाचें कीं त्याला विरोध करावयाचा ? हे ओघ परमेश्वरी इच्छेनें निर्माण होत असल्यानें त्यांच्याबद्दलचें आपलें कर्तव्य स्पष्ट आहे; आणि हें कर्तव्य आपण केवळ देवाची आज्ञा पाळत आहोंत या भावनेनें न करतां आपल्या निकटच्या पूर्वजांनीं आपल्या मार्गांत जे अडथळे उत्पन्न करून ठेवले त्यांचें उल्लंघन करून जुन्या पूर्वजांच्या चालीरीतीप्रत आपण पुन्हा परत येत आहोंत याहि भावनेनें केल्यास अधिक सुखदच वाटेल. (सं. लेख– पृ. २३५)

१२. शरीरांतील नासके रोगट भाग यांच्या बाबतींत जी वृत्ति योग्य असते ती कांहीं नेहमीच्या सामान्य शारीरिक विकारांच्या बाबतींतली नव्हे. पहिल्या प्रकारच्या विकारांच्या बाबतींत होमिओपाथीमधील अत्यंत लहान गोळी चालत नसून तीक्ष्ण शस्त्रक्रियाच हवी असते. हा दृष्टांत मनुष्यशरीराविषयींच खरा आहे असें नाहीं. समाज-शरीर आणि सामाजिक अधोगतींत उत्पन्न झालेलीं समाजदेहावरील बांडगुळें यांवरहि तोच उपाय फलदायक ठरतो. (सं. लेख– पृ. ८१)

१३. अशा बाबतींत परकीय आणि आपले राज्यकर्ते असा खरा भेदच होऊं शकत नाहीं. जेव्हां परकीयांच्या हिताचा आपल्या हिताशीं विरोध उत्पन्न होतो त्यावेळीं त्याला कांहीं अर्थ असतो. परंतु जेथें

हुना, समाजानें बऱ्यावाईट गोष्टींविषयी एखादी नवीन वृत्ति जर स्वीकारली तर तिला शासनसंस्थेनें मान्यता देणें, भारतीय परंपरेस धरूनच होतें. मात्र विचारवंत सुधारकांची स्वतःचीच अशी खात्री झालेली असली पाहिजे कीं, आपण सुचवीत असलेली गोष्ट निःसंशय योग्य असून, ती करणें आवश्यक आहे व ती अमलांत आणण्याच्या बाबतींत समाजांतील सत्प्रवृत्तीच्या लोकांचा आपणांस पाठिंबा आहे. अशा गोष्टींत सुधारणेच्या प्रत्यक्ष उपक्रमापूर्वी, जनसमुदायांतील सर्वांची तर राहोच पण पुष्कळांचीसुद्धां अनुमति मिळणें मुष्कील असतें. सुधारणेला प्रत्यक्ष विरोध करणारे किंवा तिच्याविषयीं उदासीन असणारे लोक पुष्कळदां, प्रत्यक्ष अनुभवानंतर, नव्या पंथांत सामील होतात, या श्रद्धेनेंच सुधारकांनीं वागलें पाहिजे. सुधारणा करणारे लोक स्वतःच्या योजनांना कायदेशीर स्वरूप देण्यांत, विशिष्ट वर्गाच्या कल्पनांना बळकटी आणणाऱ्या सर्वमान्य सामाजिक साधनांचा उपयोग करण्यापलीकडे कांहीं करीत नसतात. रानडयांच्याप्रमाणें असाहि युक्तिवाद करतां येण्यासारखा आहे कीं, रूढि आणि परंपरा यांवर अधिष्ठित असलेल्या कायद्यांनींच प्रचलित आचारविचारांना पाठिंबा दिला आहे व उचलून धरिलें आहे. त्या आचारविचारांत बदल करावयाचा असल्यास कायद्यांतहि बदल केला पाहिजे. कारण रूढीला कायद्याचा पाठिंबा असल्यानें कायद्यांत बदल केल्याखेरीज रूढींतहि फेरफार करणें शक्य नसतें. असें असूनहि, सती किंवा बालहत्या यांसारख्या माणुसकीला मुळांतच लांछन असणाऱ्या ज्या गोष्टींचें निराकरण लोकांच्या दुराग्रहाला न जुमानतां करणें कोणत्याहि सुसंस्कृत सरकारचें कर्तव्य आहे, त्यांखेरीज इतर गोष्टींबाबत समाजांतील सत्प्रवृत्त लोकांनाच बदल घडवून आणण्याची इच्छा झाल्याखेरीज कायद्याचें साहाय्य घेण्यास रानडे तयार नसत. कायद्यानें सुधारणेस पूर्णता येते व तिला अधिकृत स्वरूपहि येतें; पण विवेकानें आणि स्वेच्छेनें झालेल्या मतपरिवर्तनाची सर त्याला केव्हांहि यावयाची नाहीं.

सामाजिक सुधारणेसाठीं सरकारचें साहाय्य घेण्यास ते अनुकूल असल्याबद्दल आणखी एका बाजूनें रानडयांना विरोध झाला. १९ व्या शतकांतील इंग्लिश तत्त्ववेत्त्यांनीं तटस्थवृत्तीचें ( Theory of non-interference ) दुसरें टोंक गांठलें होतें. या तत्त्वानुसार कायदा व सुव्यवस्था राखण्याखेरीज नागरिकांच्या कोणत्याहि कृत्यांत सरकारनें लक्ष घालतां कामा नये. पण इंग्लिश शासनसंस्थेची वागणूक या तत्त्वाप्रमाणें कधींच नव्हती. मात्र ज्यावेळीं येथें किंवा इंग्लंडमध्येंहि धोरणाच्या दृष्टीनें सरकारच्या मनांत कांहींच करावयाचें नसे त्यावेळीं ही तटस्थतेची सबब चांगली सोईची पडे. रानडयांच्या मतें तत्त्वतः तरी सरकारच्या अधिकाराला कोणतीच मर्यादा असून उपयोगी नाहीं. सोईस्कर अशा जितक्या उपायांनीं व्यक्ति व समाज यांचें हित करितां येईल तितकें तें करणें हें शासनसंस्थेच्या कार्याचें वास्तवस्वरूप होय. विशेषतः जे स्वतः शारीरिक, सामाजिक अथवा आर्थिक अन्यायांचा प्रतिकार करूं शकत नाहींत, त्यांच्या संरक्षणार्थ सरकारनें मध्यें पडलेंच पाहिजे. साऱ्याच सत्प्रवृत्त लोकांची, मग ते हिंदी असोत किंवा इतर असोत, सुधारणेलाच सहानुभूति होती; आणि रानडयांच्या वेळेपासून आलेल्या अनुभवांवरून हें पुरेपूर सिद्ध झालें आहे कीं शासनसंस्थेच्या शक्तीचा साधन म्हणून उपयोग करून न घेण्यांत आपण अत्यंत आत्मघातकी धोरणानें वागत असतों. समाज ज्या ताजव्यानें चांगल्या वाईटाचें मोजमाप करीत असतो त्याविरुद्ध कायदाहि जाऊं शकत नाहीं, व त्यानें जातांहि कामा नये. प्रत्येक वेळीं समाजांतील सुज्ञ माणसांनींच सरकारला सुधारणेच्या मार्गानें न्यावयाचें असतें.

रानडयांच्या भाषणांतील खालील उताऱ्यावरून त्यांचीं समाजसुधारणेचीं कल्पना किती व्यापक होती व तिच्या सिद्धयर्थ कोणता मार्ग अवलंबण्याची त्यांची तयारी होती हें उत्कृष्ट रीतीनें दिसून येते :

" समाजसुधारणेची चर्चा करणाऱ्या विचारवंतांचे दोन पंथ आहेत. एका पंथाला वाटतें कीं सुधारणेला उत्तेजन देण्याकडे आणि समर्थ करण्या-

---

त्यांचें हित कांही गुंतलेलें नाहीं, आणि उपक्रम सर्वस्वीं आपल्याकडून होत आहे अशा वेळीं सरकारी मदतींवर येणारा ठराविक आक्षेप निघूंच शकत नाहीं. कारण आपणच संमत केलेल्या तत्त्वांनुसार हा कायदा होत असून आपलें स्वातंत्र्य गमावण्याचा त्यांत कांहींच प्रश्न नाहीं.

(सं. लेख– पृ. ८०)

कडे ज्यांचा कल आहे अशा सर्व प्रत्यक्षाप्रत्यक्ष साधनांचा उपयोग करून घ्यावा. दुसऱ्या पंथाचा असा दृढ विश्वास आहे कीं, वस्तुस्थितींत ढवळाढवळ न करतां तिला स्वतःचा मार्ग आक्रमूं द्यावा; म्हणजे हळूहळू पण निश्चितपणें, अप्रत्यक्ष कार्यशक्तींनीं इष्ट असणाऱ्या सर्व गोष्टी आपोआप साध्य होतील. आपसांतील कलह, आर्येतर लोकांचा उत्कर्ष, शक आणि मुसलमान राज्यकर्त्यांचें वर्चस्व इत्यादि नैतिक आणि राजकीय कारणांच्या परिणामांची संपूर्ण जाणीव ज्यांना आहे आणि ज्यांना मानवप्रगतीच्या विशिष्ट अवस्थेंत कांहीं न्याय्य कल्पनासुद्धां सर्वोच्च शासनसंस्थेकडून स्पष्टपणें मान्य करून घेणें कसें आवश्यक असतें हें पटलेलें आहे ते कांहीं मर्यादेपर्यंत कायद्याची मदत घ्यावी असें म्हणतात. कारण कायदा म्हणजे उच्च निःस्वार्थी विवेकाचें अखेरचें परिणत रूप होय व त्यामुळें सुधारणेस साहाय्यक अशा इतर प्रवृत्तींनाहि चालना मिळून ती लोकप्रिय होऊ लागते. या सर्व गोष्टींविषयीं ज्यांना पुरेशी जाणीव झालेली नसते, ते लोक शिक्षणानें व उदात्त कल्पनांमध्येंच असणाऱ्या सामर्थ्याचा हळूहळू विकास झाल्यानें इष्ट त्या सर्व गोष्टी प्राप्त होतील असा विश्वास बाळगतात."

सामाजिक सुधारणेचीं विशिष्ट क्षेत्रें आणि अंगें यांच्या सापेक्ष महत्त्वाविषयीं सुधारकांत हा मतभेद असेल, तथापि सामाजिक सुधारणेचें अंतिम ध्येय व तें साध्य करून घेण्याचें मार्ग या दोन्हींच्या बाबतींत, अनुभव व युक्तिवाद यांचा रानड्यांनाच पाठिंबा आहे. प्रत्येक व्यक्तीला स्वतःला अत्यंत उचित वाटणारा जीवनक्रम ठरविण्याची मोकळीक देणें आणि नियोजित क्रम पार पाडण्यास लागणाऱ्या साधनांची सोय करणें हें सर्व सामाजिक सुधारणांचे ध्येय असलें पाहिजे. समता व न्याय हे आमच्या सर्व सुधारणेचे बीजमंत्र होत. जेथें जेथें प्रचलित समाजव्यवस्थेचा या ध्येयास अडथळा होतो, तेथें तेथें तसेंच कांहीं महत्त्वाचें सामाजिक कारण नसल्यास, सुधारणा ही व्हावयालाच हवी. ही सुधारणा घडवून आणण्यास स्वेच्छेनें झालेल्या मतपरिवर्तनापासून सरकारी सत्तेपर्यंत सर्व वाजवी साधनांचा उपयोग व्हावा. सरकारी सत्तेचा उपयोग अर्थात् सुधारणा लोकांना मान्य व्हाव्या एतदर्थ जे खासगी प्रयत्न चालू असतात, त्यांना पाठिंबा मिळवून देण्यापुरताच करावा. रानड्यांच्या नंतरच्या कालांत आजवर सामाजिक सुधारणेचें क्षेत्र इतकें विस्तृत झालें आहे कीं त्यांत हल्लीं राजकीय आणि आर्थिक भागाचाहि अंतर्भाव होऊं लागला आहे. पण त्या सुधारणेच्या मुळाशीं असणारीं तत्त्वें मात्र तीच आहेत.

* *

## राष्ट्रीय शिक्षण

पुराणकालांतील ऋषिजनांमध्ये अगस्त्य आणि त्याची पत्नी लोपामुद्रा, अत्रि आणि त्याची भार्या अनसूया, आणि वसिष्ठ व त्याची अर्धांगी अरुंधती यांचीं उदाहरणें या बाबतींत उत्तम नमुना ठरतील असें मला वाटतें. त्याचप्रमाणें आधुनिक कालांत आपल्याकडील डॉ. भांडारकर, मद्रासचे दि. ब. रघुनाथराव, बंगालमधील कै. केशवचंद्र सेन, बाबू प्रतापचंद्र मुजुमदार, आणि पंडित शिवनाथशास्त्री, व पंजाबचे हंसराज आणि लाला मुनशीराम यांचींहि नांवें घेतां येतील. ज्या समाजामध्यें अशा उपदेशकांची परंपरा अखंड चालू शकते तो माझ्या मतें केव्हांहि नाश पावणार नाहीं; आणि अशा लोकांचा उपदेश आपल्यास बोध करून स्फूर्ति देऊन मार्ग दाखविण्यास लाभत असतांना, त्या 'पूर्वनियोजित पुण्यभूमी' चें दर्शन होण्याचा काल अधिकाधिक जवळ येत राहणार याविषयीं मला तरी बिलकुल शंका नाही. (संकीर्ण लेख– पृ. २४६–२४७)

रानड्यांच्या विचारांतील हेतुपूर्णता आणि व्यापकता, त्यांच्या शिक्षणविषयक मतांमधून जेवढी स्पष्ट दिसून येते, तेवढी ती इतरत्र क्वचितच दिसून येईल. हिंदुस्थानांत ज्या स्वतंत्र आणि कर्तृत्वशाली नवीन जीवनाचा उदय व्हावा असें त्यांना वाटे त्याची केवळ पद्धतीच नव्हे, तर खऱ्याखुऱ्या अंतःप्रवृत्ति नवीन पिढीनें आत्मसात् करणें किती अगत्याचें आहे याची संपूर्ण जाणीव त्यांना असे. जीवन हें केवळ व्यक्तीच्या दृष्टी-



अनुक्रमणिका

नेंच नव्हे तर समाजाच्या, किंबहुना सर्व मानवजातीच्या दृष्टीनें, एक मोठें जोखमीचें काम आहे. जीवसृष्टींतील विकासाचा नियम जीवनाच्या सर्व अंगांना लागू पडतो, व ज्यांना आपल्या परिस्थितीचा सर्वोत्तम उपयोग करून घेतां येतो त्यांनाच प्रगतिपर असें जीवन लाभूं शकतें. 'सर्वांत सामर्थ्यवान् अशाच गोष्टी टिकून रहाव्यात' हा नियम क्षुद्र हेतूंस्तव होणाऱ्या घोर कलहासंबंधीं खरा आहे असें नसून चांगलें तेवढें निवडून काढण्याचा निसर्गाचा तो एक न्याय आहे त्या न्यायाच्या अंमलबजावणीमधून पूर्वींहि हिंदुस्थान सुटला नाहीं आणि इतर राष्ट्रांमध्यें त्याची पायरी आज जी खालची आहे, तीवरून जर त्यास वरती यावयाचें असेल, तर मानवजातीच्या या झगडयापासून घ्यावयाचा बोध त्यानें लक्षांत आणला पाहिजे.[1]

व्यक्ति असो किंवा राष्ट्र असो. त्याच्या ठिकाणीं गुणांबरोबर दोष हे असणारच, आणि परिस्थितींत बदल झाला कीं बहुधा एकंदर साऱ्याच गोष्टींची योग्यता मोजण्याच्या आपल्या कल्पनांत बदल करावा लागतो. म्हणून राष्ट्राला जर कालगतीबरोबर रहावयाचें असेल तर परिस्थितीशीं सतत जुळवून घेण्याची क्रिया जाणून बुद्धिपूर्वक चालूं ठेवावयास हवी. जीवनाच्या साऱ्याच अंगांनीं हें करणें जरूर असतें. अगदीं भौतिक विचारच केला तरींहि शरीर आणि मन यांच्या सर्व शक्तींचा संपूर्ण विकास केल्याखेरीज कोणत्याहि समाजास आपली संपूर्ण जबाबदारी पार पाडून, मिळणाऱ्या संधींचा जास्तींत जास्त उपयोग करून घेतां येणार नाहीं. जीवनांतील अधिक उच्च कार्यांकरितांसुद्धां उत्तम शारीरिक तयारी आवश्यक असते. ही गोष्ट समाजांतील व्यक्तींना जेवढी लागू तेवढीच ज्या भौतिक सामग्रीच्या साहाय्यानें आपलीं ध्येयें साधावयाचीं असतात त्या सामग्रीलाहि लागूं आहे. कोणत्याहि समाजास आपली व त्याबरोबर मानवजातीचीही प्रगति करून घ्यावयाची असेल तर ही प्रगति तो समाज शरीरदृष्टया व भौतिक साधनदृष्टया सुसंपन्न असल्याखेरीच साधणार नाहीं. या आवश्यक अशा गोष्टी प्रथम साध्य केल्या पाहिजेत हें त्या समाजानें लक्षांत ठेवावयास हवें.

पण केवळ शारीरिक शक्ती असल्यानें प्रगति किंवा बचाव होईलच असें मात्र नाहीं. शारीरिक गुणांबरोबर बौद्धिक आणि नैतिक शक्तींचा विकास होणेंहि आवश्यक आहे. किंबहुना हे गुण तर मानवाचे विशेष गुण असून त्यांची जोपासनाहि विशेष रीतीनें व्हावयास हवी. याच दोन शक्तींच्या योगानें मानवेतर सृष्टीच्या विरोधावर त्यास जय मिळवितां आला, इतकेंच नव्हे तर मानवजातीमधील निरनिराळ्या समाजांनीं जी जी प्रगति केली तिचें श्रेय अखेरीस त्यांनाच द्यावें लागेल. बुद्धीचा, एक शक्ति म्हणूनच तसाच प्रगतीचें साधन म्हणूनहि, उत्तम विकास करून सतत नवीन संशोधनाकरितां व परिस्थितीशीं जमवून घेण्याकरितां ती अत्यंत सावध राखली पाहिजे. मानवजातीच्या प्रगतीमध्यें आपलें स्थान कायम ठेवणें हें, ज्या राष्ट्रांमध्यें बौद्धिक जोमदारपणा विशेष प्रमाणांत दिसून येतो, अशा राष्ट्रांनाच शक्य झालें आहे. बौद्धिक सामर्थ्य आणि निर्माणशक्ति यांचें हें महत्त्व रानडयांना पूर्णपणें पटलें होतें. तथापि बुद्धीच्या कर्तृत्वास वळण लावणाऱ्या योग्य त्या नैतिक शक्तीचा विकास होणें हेंहि तितकेंच अगत्याचें आहे ही गोष्ट ते विसरले नव्हते.

बौद्धिक शक्तींची एकांगी जोपासना केल्यानें राष्ट्राला सामर्थ्य आणि वैभव यांचा लाभ होईल. परंतु त्याबरोबरच समाजाच्या नैतिक बाजूचा विकास त्या प्रमाणांत झाला नाहीं तर न्याय आणि शांतता यांची हमी देतां येणार नाहीं. या दोन गोष्टींच्या अभावीं समर्थ व समृद्ध असा समाजहि दरिद्री आणि पराधीन समाजाइतकाच दुःखी असूं शकेल. ज्ञानामुळें जी शक्ति प्राप्त होते तिचा योग्य सदुपयोग केला गेला पाहिजे. सामर्थ्य आणि समृद्धि यांची प्राप्ति करून घेण्यास आवश्यक असणाऱ्या गोष्टी आणि त्यांच्या प्राप्तीमुळें होणारे लाभ यांचें सूक्ष्म प्रतिबिंब एकंदर सामाजिक व्यवस्थेमध्यें पडत असतें; म्हणून कोणत्याहि सावध आणि संवेदनक्षम समाजाचें मुख्य कर्तव्य समाजामध्यें अनिष्ट संस्था आणि आचार न येऊं देणें हें असतें. तत्कालीं अस्तित्वांत असणाऱ्या सामाजिक संस्था वा

१. आपल्यापेक्षां अधिक सामर्थ्यवान् अशा राष्ट्रांबरोबर करावयाच्या झगडयामध्यें आपण मागें पडूं नये अशी इच्छा असेल तर आपल्यास या दिशेनेंच कार्य करीत राहिलें पाहिजे.

(सं. लेख– पृ. ३१४)

रूढि यांचें उपकारकत्व वेळोवेळीं पारखलें जाऊन आपली त्यांवरील श्रद्धा नव्यानें स्थापित करण्याचें कार्य अखंडपणें न चाललें, तर त्या रूढींमधील चैतन्य नाहींसें होऊन त्या जीर्ण होऊं लागतात. समाजाच्या आकांक्षा, गरजा आणि त्याच्या परिस्थितींत त्याला साध्य असणाऱ्या गोष्टी यांच्याशीं त्यांतील रूढी जर जुळत्या नसतील तर त्या समाजास विकृति होऊन इतर निरोगी आणि अधिक जोमदार समाजाशीं होणाऱ्या स्पर्धेत त्याचा टिकाव लागण्याचा फार थोडा संभव असतो. भौतिक आणि सांस्कृतिक प्रगतीस समाजाच्या संघटितपणाचा केवढा फायदा होऊं शकेल याची रानडे यांना चांगलीच कल्पना होती. याकरितां हिंदुस्थानच्या प्रगतिपूर्ण स्वातंत्र्यास साहाय्यक होईल. अशा प्रकारची शारीरिक संघटना आणि मानसिक दृष्टिकोण निर्माण करण्याची त्यांची इच्छा होती.

विद्यार्थिदशेंत रानडे हे स्वतः फार वाचन करीत ही गोष्ट सर्वपरिचित आहे, आणि पुढील जीवनांतहि दररोजच्या शारीरिक गरजांइतकेंच विविध विषयांवरील वाचन त्यांना आवश्यक होऊन बसलें होतें. तथापि ते स्वतः कधीं निष्फळ पांडित्य करीत बसत नसत, आणि विद्यार्थ्यांनींसुद्धां वाटेल तसलें योजनारहित अतिरिक्त वाचन करावें असें त्यांना वाटत नसे. त्यांच्या मतानें प्राथमिक शिक्षणाची पहिली अवस्था संपल्यावर लवकरच विद्यार्थ्याला जगताच्या प्रगतीचीं सूत्रें कशीं एकाच दिशेनें चालत आहेत याची जाणीव करून देणें हें फार महत्त्वाचें होतें. स्वाभाविक प्रवृत्ति आणि विचारामुळें झालेला बुद्धीचा निश्चय या दोनहि दृष्टींनीं त्यांच्यामधील आंतरराष्ट्रीय वृत्ति अधिक प्रबळ झालेली होती. किंबहुना विश्वबंधुत्व आणि वसुधैव कुटुंबकत्व या दृष्टींनीं आपल्या स्थानाची त्यांना प्रत्यक्ष जाणीव होती हेंच म्हणणें अधिक बरोबर ठरेल. साऱ्या मानवी जीवनाकडे व्यापक दृष्टीनें पाहण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं होतें; आणि या व्यापक आणि त्यांना सर्वांत महत्त्वाच्या वाटणाऱ्या अशा भूमिकेवरून जें आपलें कर्तव्य ठरे, त्याला आपलें आजचें वर्तनहि ते जुळवून घेत.

प्रत्येक तरुण हिंदी नागरिकाला आपली उच्च परंपरा आणि उच्चतर असें भवितव्य यांची ओळख जीवनांत शक्य तितक्या लवकर व्हावी अशी त्यांची इच्छा होती. मानवास भूतकालापासून मिळालेला वारसा आणि त्याचें उज्ज्वल भवितव्य याविषयींची एकांगी, सांप्रदायिक अथवा संकुचित कल्पना करून देणारें कोणतेंहि शिक्षण प्रगतीला उपयुक्त होऊं शकत नाहीं. प्रत्येक राष्ट्राला मानवी जीवनामधील आपला भाग कोणता याची नीट कल्पना आल्यासच आपलें कर्तव्य अत्यंत कार्यक्षमतेनें करितां येईल.[२] या उच्च ध्येयाचे सारेच बारकावे बौद्धिक आणि नैतिक दृष्ट्या निरनिराळ्या पायऱ्यांवर असणाऱ्या साऱ्याच लोकांना समजतील अशी आशा करणें अयोग्य होईल. परंतु कोणत्याहि शिक्षणपद्धतीची अशी व्यवस्था सहेतुकपणें करावयास पाहिजे कीं निदान त्या विशिष्ट समाजांतील मुख्य मुख्य बुद्धिमंतांना आणि बहुजनसमाजापैकीं पुष्कळांना जगाच्या प्रगतीच्या पार्श्वभूमीवर आपल्या स्वतःचीं निकटचीं कर्तव्यें आणि हितसंबंध काय आहेत याची कल्पना यावी. एखाद्या मोठ्या योजनेंत आपलें स्थान कोणतें आहे याची कल्पना आल्यानें आपण आपलें म्हणून सांगावयाचे हक्क आणि बोलावयाची भाषा यांमध्यें इष्ट अशी प्रमाणबद्धता राहते, आणि शिवाय आपल्या साऱ्या प्रयत्नांस विशेष प्रकारचा बोज प्राप्त होतो. रानड्यांनीं आपल्या जीवनांत जें स्वतःपुरतें प्राप्त करून घेतलें होतें, तें सर्वांनाच मिळालें पाहिजे अशी त्यांची मनीषा होती. शिक्षणपद्धतीमध्यें व्यक्तीच्या आणि समाजाच्या प्रयत्नांचें, व्यापक मानवी जीवन व इतर जगत् यांमधील स्थान काय आहे यावर विशेष भर द्यावयास हवा असें त्यांना वाटे.

मानवी प्रगतीच्या वेगवेगळ्या शाखा या अखेरीस

२. हे जे धडे घ्यावयाचे त्यांखेरीज, आपल्या नवीन शिक्षकांस आणखीहि एका गोष्टीचें ज्ञान हवें. बाहेरील मोठ्या जगांत कोणत्या शक्ति कार्य करीत आहेत याची योग्य जाणीव त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांस करून द्यावयास हवी. या शक्तींना तात्पुरता प्रतिबंध होतो किंवा बाह्यतः अपयश आल्यासारखें दिसतें. असें असलें तरी मनुष्याच्या उन्नतीकरितां आणि सुखाकरितां जे प्रयत्न साऱ्या मानवजातीकडून होतात त्यांचें सार या शक्तींच्या कार्यांत आलेलें असतें हेंहि त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांना समजून सांगावयास पाहिजे. (सं. लेख—पृ. २४६)

एकरूप होतात हें कळणें अगत्याचें आहे असें जसें रानडयांचें सांगणें असे, तसेंच ज्ञानाच्या सर्व शाखांचेंहि आहे असें ते म्हणत. मनुष्याचे सारें अनुभव हे तत्त्वत: एकरूपच असतात आणि एखाद्या विशिष्ट प्रश्नाचें संपूर्ण ज्ञान तेवढया मर्यादेंतसुद्धां ज्ञानाच्या विविध अंगांचा अंतर्गत संबंध कळल्यावांचून होऊं शकत नाहीं. प्रत्येकाला साऱ्या गोष्टींचा अभ्यास प्रत्यक्षपणेंच करितां येणें शक्य नसलें तरी आपल्या विषयाशीं ज्ञानाच्या इतर क्षेत्रांचा कसकसा संबंध येतो हें डोळे उघडे ठेऊन पाहतां येईल. ज्ञानाच्या विविध अंगांचा परस्परांवर काय परिणाम होत असतो आणि या साऱ्यांचा मानवी प्रगतीच्या दृष्टीनें संकलित असा काय अर्थ असतो एवढें जाणण्याचा तरी प्रयत्न व्हावयास हवा. मानववंशाच्या वेगवेगळ्या शाखांमध्यें बाह्यरूप, आचार व वसतिस्थान यांमधील भेद, हे सबंध मानवजातीनें साध्य केलेल्या व तिला शक्य असणाऱ्या गोष्टींमध्यें तत्त्वत: वास करणाऱ्या एकरूपतेच्या मानानें गौण व वरवरचे आहेत. एका विशिष्ट भागाच्या प्रगतीकरितां प्रयत्न करीत असतां सबंध मानव समाजाच्या हितांकडेहि लक्ष असावयास पाहिजे. त्याचप्रमाणें ज्ञानाच्या विशिष्ट शाखेमध्यें विशेष परिश्रम करीत असतां मानवजातीनें आजवर प्राप्त करून घेतलेल्या ज्ञाननिधीच्या सर्व अंगांची योग्यता जाणावयास हवी.

वरील विवेचनावरून एखाद्यास असें वाटण्याचा संभव आहे कीं शिक्षणपद्धति आणि समाजव्यवस्था यांजविषयींच्या रानडे यांच्या अपेक्षा प्रमाणाबाहेर मोठ्या होत्या. वस्तुत: या भीतीला आधार नाहीं. एकदा या व्यापक एकरूपतेची जाणीव झालेली असली कीं बौद्धिक किंवा सामाजिक चळवळींत प्रत्येक तपशिलामध्यें तिचें घोडें ते पुढें दामटीत नसत. उलट अभ्यासाचीं सामान्य आणि विशेष अशीं दोन अंगें स्पष्टपणें वेगळीं राखण्याची त्यांची इच्छा असे. शिकणाऱ्याच्या मनाच्या स्वाभाविक कलाप्रमाणें आणि ज्ञानाच्या प्रत्येक शाखेच्या तात्त्विक आणि व्यावहारिक महत्त्वाच्या प्रमाणांत, सर्वांना झेंपतील व सोईचे होतील असे शिक्षणक्रम आंखले पाहिजेत असें त्यांचें म्हणणें असे. इतर कोणत्या कारणाकरितां नसलें तरी राष्ट्राच्या बौद्धिक आणि भौतिक साधनसंपत्तीचा व्यय काटकसरीनें व्हावा म्हणून सामान्य आणि विशिष्ट शिक्षणक्रमामध्यें मर्यादा घालून देण्यास त्यांची तयारी असे; आणि शिक्षण हेंच ज्यांचें जीवनकार्य आहे अशांच्यापेक्षांहि त्यांना हें अधिक पाहिजे होतें. जें आवश्यक आहे अथवा शक्य आहे अशी आपली स्वत:ची खात्री पटली नाहीं, त्याकरितां मानवी शक्तीचा अथवा व्यावहारिक साधनांचा अपव्यय करण्याचें त्यांच्या मनांतहि येणें शक्य नव्हतें.

शिक्षकांनीं आपल्या कामाकडे राष्ट्रीय किंवा अधिक व्यापक अशा मानवजातीच्या सेवेच्या कल्पनेनें पाहण्याची आवश्यकता रानडे प्रतिपादित असले, तरी त्यांनीं अथवा त्यांच्या विद्यार्थ्यांनीं पूर्वकालच्या आश्रमांतील सर्वसंगपरित्यागाचें आणि एकलकोंडे जीवन कंठावें अशी त्यांची अपेक्षा नव्हती. हिंदी लोकांच्या दृष्टिकोणांतील आणि समाजव्यवस्थेमधील दोष निवडून काढून त्यांचें निर्मूलन करण्यावर आणि राष्ट्रीय प्रगतीस पोषक अशा सद्गुणांचें संगोपन करण्यावरच शिक्षकांनीं भर द्यावा असें त्यांचें म्हणणें होतें. सर्वांत, आपल्या बहुजनसमाजांतील शरणागतीची वृत्ति समूळ काढून टाकिली पाहिजे याविषयीं त्यांचा विशेष आग्रह असे. हिंदुस्थानांत बहुतेक साऱ्या बाबतींत आज्ञापालनास केवळ परंपरेची अथवा अधिकाराची सत्ता पुरेशीं होई. रानडयांचा परंपरेविषयींचा आदर, तिच्यांत बदल करणें हितावह आहे अशी खात्री पटली नसल्यास, ती अबाधित राखण्यापुरताच होता. तसेंच शासनसंस्थेच्या अधिकारासहि समाजनियमनामध्यें योग्य असें स्थान असतें हें रानडयांना मान्य होतें. परंतु परंपरा असो किंवा राजकीय सत्ता असो, लोकांनीं त्यांच्यापुढें मान वाकवावयाची ती बुद्धीला त्यांचा अधिकार पटतो म्हणूनच; नुसत्या अंध संवयीमुळें किंवा भीतीमुळें तें होतां कामा नये असें त्यांचें मत होतें.

स्वतंत्रपणें आणि भरपूर माहितीच्या आधारानें विचार करण्याची संवय ही योग्य अशा शिक्षणपद्धतीमुळेंच लागते. शारीरिक शरणागति ही बहुधा बौद्धिक आणि मानसिक शरणागतीचाच परिणाम असते. शिक्षणकार्य करणाऱ्या लोकांस रानडयांचें असें सांगणें असे कीं त्यांनीं आपली शिक्षणपद्धति विद्यार्थ्यांमध्यें स्वतंत्र विचार करण्याची इच्छा आणि सामर्थ्य उत्पन्न होईल अशा तऱ्हेची बनवावी. सर्व प्रगतीच्या मागें असणारी चालकशक्ति अखेरीस सत्य आणि मौलिक विचार अथवा कल्पना यांच्यामध्यें असणारा जोर हीच

आहे, आणि रानड्यांच्या मतानें विद्यार्थ्यांच्या मनामध्यें जें विचारस्वातंत्र्य ठसवावयाचें त्यांचें स्वरूप टीका अथवा स्वतःचें समाधान करणें एवढ्यापुरतेंच अनुत्पादक अथवा क्रियाशून्य राहूं नये. नवीन मिळालेल्या ज्ञान-प्रकाशाचें परावर्तन कांहीं निर्मितीच्या दिशेनें व्हावें. हा हेतु साध्य होण्यास आपल्या विद्वान् अभ्यासकांमध्यें कर्तृत्वाची प्रबळ परंपराच निर्माण व्हावयास हवी. या बाबतींत उदाहरण घालून देण्याचें महत्त्व फार असतें हें रानड्यांना माहीत असल्यानें शिक्षकांनीच आपल्या अंगीं क्रियाशील आणि निर्मितिक्षम विद्वत्ता बाणवायला पाहिजे असें त्यांनीं आग्रहानें प्रतिपादिलें. वाङ्मय अथवा कला, किंवा सामाजिक अथवा भौतिक शास्त्रें, कांहींहि घेतलें तरी आपल्यामध्यें स्वतंत्र विचार फारच कमी असतो आणि त्याहून कमी स्वतंत्र निर्मिति असते. परकीय साधनांशीं परिचय असण्याचें महत्त्व त्यांनी कमी लेखलें नाहीं. किंबहुना आपल्या कृतीनें आणि भाषणांतून परकीयांनीं प्रत्येक क्षेत्रांत आधींच केलेल्या प्रगतीशीं पूर्ण परिचय असावा असें त्यांनीं प्रतिपादलें. पण सबंध मानवी ज्ञानाच्या प्रगतीमध्यें आपण आपली कांहीं भर घातल्याशिवाय आपली विद्वत्ता फलद्रूप होत नाहीं असेंच त्यांना वाटे.

राजकीय आणि आर्थिक क्षेत्रांत आंतरराष्ट्रीयत्व हें अद्यापि एक स्वप्नच असलें तरी बौद्धिक क्षेत्रांत त्याची बरीच मजल गेली आहे. तेव्हां समकालीन वैचारिक क्षेत्रांमधील प्रवाहांचा परामर्ष न घेतां आपण एकटेच मानसिक व बौद्धिक परिश्रम करीत राहणें बहुतांशीं व्यर्थ होतें. ज्ञानोपासनेची वृद्धि व्हावी एतदर्थ व्यक्ति अगर संघटित संस्था यांचे प्रयत्न ज्या ज्या केंद्रांत चालू असतील त्यांच्याशीं आपले संबंध जोडावयास हवेत. ज्या अभ्यासकास आपल्या श्रमांत बचत करावयाची आहे आणि आपलें कार्य खरोखर उपयुक्त व्हावें असें वाटत आहे त्याला अलिप्तता किंवा आत्मसंतुष्टता उपयोगाची नाहीं. शिक्षकांनीं आणि वरच्या विद्यार्थ्यांनीं आपापल्या अभ्यासक्षेत्रांत घालून दिलेल्या उदाहरणांचा सर्वसाधारण विद्यार्थ्यांवर खास परिणाम होतो. बौद्धिक आणि शास्त्रीय क्षेत्रांमध्यें एकदां या व्यापक सहकार्याची आणि नवीन निर्मितीची परंपरा पडली कीं हळूहळू सामान्य जनांच्यापर्यंत ती पोंचते. मौलिक विचाराचा प्रवाह लहान उगमापासून हळूहळू फोंफावत जातो आणि कालान्तरानें जगाच्या एकंदर ज्ञानाच्या निधीमध्यें त्याला महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें.

हिंदुस्थानामधील शिक्षणसंस्था आणि विचारवंत यांच्या ठिकाणीं पूर्वी अगदीं अशीच वृत्ति भरून राहिली होती. अशा पूर्वीच्या काळाची स्मृति रानडे अनेक वेळां करून देत असत. अनेक पुराण ऋषींनीं तत्त्वज्ञान आणि समाजशास्त्र यांवरील वाङ्मयांत टाकलेली भर आजहि मानवाच्या स्वतंत्र आणि विधायक विचारांचा उत्तम नमुना म्हणून मान्य झाली आहे. यांपैकीं अनेक ग्रंथांची स्तुति या देशांतीलच नव्हे तर परदेशांतील चिकित्सक आणि विद्वान् अभ्यासकांकडून झाली आहे आणि उदाहरणभूत म्हणून त्यांना मान्यता मिळाली आहे. त्या उत्कर्षाच्या कालांतील हिंदी विद्वत्तेमधील वृत्तीचें पुनरुज्जीवन व्हावें आणि जुन्या परंपरेमधील ज्ञानाचा आणि जोमाचा नवीन प्रश्नांचा विचार करितांना उपयोग व्हावा अशी रानड्यांची इच्छा होती. परंतु हें सारें शुद्ध विद्वत्तेच्या वृद्धीच्या दृष्टीनें व्हावें असें मात्र शिक्षकांना किंवा विद्यार्थ्यांना त्यांचें सांगणें नव्हतें. ते जें जें करीत अथवा बोलत त्याच्यामागें हिंदुस्थानचा पुनरुद्धार आणि प्रगति याचा मुख्य विचार असे. पूर्वी आर्यांनीं हिंदुस्थानांत आगमन केल्यानंतरच्या पहिल्या कांहीं काळांत त्या नवीन वसाहत करणाऱ्यांना ज्याप्रमाणें मोठ्या बौद्धिक आणि व्यावहारिक अडचणींना तोंड देऊन आपलें स्थान स्थिर करावें लागलें, त्याप्रमाणें आतां पाश्चात्यांच्या नवीन आव्हानामुळें लोकांचे आचार आणि विचार यांना नवीन वळण लावणें भाग पडलें आहे.[३] शिक्षक हे समाजाचे नेते असून आपल्या पूर्वजांनीं जी विधायक कामगिरी केली ती आपण आपल्या पिढीमध्यें करावयास हवी, अशा प्रकारची आकांक्षा त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांमध्यें निर्माण केली पाहिजे. साऱ्या विद्वत्तेचा उपयोग आपल्या लोकांच्या

---

३. अर्थात् या कालांत द्यावयाचें शिक्षण, त्याचे विषय आणि त्याची पद्धति नवीन प्रसंग आणि परिस्थिति यांना जुळेल अशीच हवी; परंतु यांस प्राणभूत असलेली वृत्ति प्रथमच विन्ध्य ओलांडून दक्षिणेमध्यें वसाहत करणाऱ्या लोकांमध्यें जी होती तीच असावयास पाहिजे.

(सं. लेख– पृ. २४५–२४६)

अनुक्रमणिका

आकांक्षांचा अर्थ लावून त्यांची प्राप्ती होण्याचा मार्ग आंखून देण्याकडे झाला पाहिजे. या मार्गांतील अनेक अडचणींकडे दुर्लक्ष्य करणें शक्य नसलें, तरी त्यांमुळें आपलें हें कर्तव्य उत्साहानें पार पाडून आपलें ध्येय साध्य करून घेण्यापासून आपण परावृत्त होतां कामा नये.

या राष्ट्रीय ध्येयाविषयींची रानडयांची कल्पना काय होती हें मागें नमूद केलेंच आहे. हिंदुस्थानांत जी उत्क्रांति होत आली आहे तिच्या प्रवाहांत मध्यें खंड पडला तरीं ती पुनः चालू होते. तिचें शेवटचें ध्येय म्हणजे मानवी संस्कृतींच्या अनेक प्रवाहांचें शांततेनें, पण प्रत्यक्ष प्रयत्नांनी एकीकरण करून एका सामान्य संस्कृतीची स्वतंत्र व प्रगतिपर अशी वाढ होत रहावी हें आहे. मध्यें खंड पडलेल्या अक्रियतेच्या कालांत सत्य आणि ज्ञान यांचा प्रकाश लोकांना मिळेनासा होई. हा प्रकाश आपल्यावर ज्यांचें हिताहित सोंपविलें आहे अशा आपल्या विद्यार्थ्यांना मिळेनासा होऊं नये इकडे लक्ष पुरविणें शिक्षकवर्गाचें काम आहे. हें लोकांचें ध्येय आणि त्याच्या प्राप्तीकरितां त्यांचें जें कर्तव्य, तें सतत विद्यार्थ्यांच्या डोळ्यापुढें धरणें हें फलदायी झाल्यावांचून राहणार नाहीं. वाटर्लूच्या रणक्षेत्रावरी वेलिंग्टनचा विजय ईटनच्या मैदानावर मिळविला गेला असें जसें म्हणण्यांत येतें तद्वतच उदयोन्मुख हिंदुस्थानचे बौद्धिक आणि भौतिक क्षेत्रांतील पराक्रम येथील विद्यालयें आणि शिक्षणसंस्था यांमधून घडले आहेत असें म्हणतां आलें पाहिजे. सबंध जगाचें एकीकरण आणि प्रगति घडवून आणण्याच्या दृष्टीनें आवश्यक असणारें केंद्र स्थापून जगाला उदाहरण घालून देण्याचें जें आपलें ध्येय आहे त्याच्या सिद्धीकरितां जे भगीरथ प्रयत्न आपल्यास करावे लागणार आहेत, त्याकरितां एक पिढीची पिढीच शिकवून तयार केल्याशिवाय भागणार नाहीं असें रानडयांना वाटे.

हिंदुस्थानांतील सुधारकांपुढें असलेलें पुनरुद्धार आणि प्रगति यांचें कार्य एवढें प्रचंड आहे कीं लोकांनीं गजबजलेल्या एवढ्या मोठ्या देशांतील बहुतेक साऱ्या कार्यकर्त्यांचे श्रम त्यांत खर्ची पडावेत. जातीजातींमधील आणि धर्माधर्मांमधील ऐक्याचे प्रश्नहि एवढे कठिण आहेत कीं अत्यंत गुणसंपन्न व समन्वयचतुर समाजाची सारी शक्ति त्याकारणीं लागावी. बौद्धिक आणि शास्त्रीय प्रगतीची निकड फार आहे. जीवनाचा किमान आणि वाढता दर्जा कायम ठेवण्यास औद्योगिक प्रगति होणें पहिल्या प्रथम आवश्यक आहे. स्वतंत्र आणि प्रगतिपर अशा लोकांच्या एकीभूत आकांक्षांचें खरेंखुरें प्रातिनिधिक असें राज्ययंत्र स्थापन करणें याकडेहि लक्ष पुरवावयास हवें आहे. हीं सारीं कर्तव्यें राष्ट्राच्या शक्तीवर आत्यंतिक भार टाकणारीं आहेत. रानडयांनीं या साऱ्या गोष्टींचा भार कमी लेखला असें नाहीं, आणि जबाबदारीचें हें ओझें सहन करूं शकतील अशा-प्रकारें तरुणांचें शिक्षण शक्य तों लवकर व व्यवस्थित-पणें सुरू व्हावें असें त्यांनीं सुचविलें. असें असूनहि नवीन पिढीचीं क्षितिजें हिंदुस्थानापुरतींच मर्यादित असावीं असें त्यांना वाटत नव्हतें. एकेकाळीं 'बृहद् भारत' अस्तित्वांत होता आणि तो पुनः अस्तित्वात येईल अशी त्यांना आशा होती. मात्र ज्याप्रमाणें हिंदुधर्माचें पूर्वीचें आक्रमण तरवारीनें साध्य केलेलें नसून उच्चतर संस्कृतींचें आक्रमण होतें, त्याप्रमाणेंच हिंदी लोकांच्या प्रयत्नांस चालना देणारें हें नवें स्वप्न म्हणजे ऐक्य, स्वतंत्रता आणि प्रगति यांचा संदेश जगाच्या काना-कोपऱ्यापर्यंत पोचविणें हें होतें. या सांस्कृतिक आक्र-मणास आरंभ अर्थातच हिंदुस्थानास भौगोलिक आणि सांस्कृतिक दृष्टया निकट असलेल्या देशांपासून व्हावयाचा. विस्तारवृत्ति ही कोणत्याहि जिवंत संस्कृ-तीस आवश्यक असणारी पहिली गोष्ट होय आणि आपल्यास आणि आपल्या विद्यार्थ्यांना ज्या व्यापक अशा चळवळीत आपापला कार्यभाग पार पाडावयाचा आहे, तिच्या या अंतिम ध्येयाची जाणीव शिक्षकवर्गानें जागृत ठेवणें जरूर आहे असें त्यांचें मत होतें.

संस्कृति या शब्दाचा अनेक वेळां चुकीचा उप-योग करण्यांत येतो. बहुधा त्याचा उपयोग अत्यंत अनिश्चित स्वरूपाच्या आचारविचारसमूहाचा अर्थ दर्शविण्याकडे होतो. रानडयांच्या विचारांत हा सैलपणा आणि गोंधळ मुळींच नसे. हिंदुस्थानची 'नवीकृत संस्कृति' असे शब्द योजतांना आपल्यास काय म्हणाव-याचें आहे त्याची त्यांना स्पष्ट कल्पना होती. शास्त्राचा अभ्यास मानवाच्या गरजा भागविण्याच्या दृष्टीनेंच व्हावा; कलांचा विकास मनुष्यांमधील सूक्ष्म कोमल भावनांची वृद्धि व्हावी एतदर्थ व्हावा; प्रगतिपर सामा-जिक जीवनांतील या आणि अशा प्रकारच्या इतर सुख-सोईंचा फायदा कांहीं निवडक अशा थोडया लोकांच्या पुरता मर्यादित राहूं नये अशी त्यांची कल्पना होती.

अर्थात् प्रत्येकाच्या वांटचास येणारा या सुखसोईचा भाग ज्याच्या त्याच्या समाजांतील स्थानाप्रमाणें आणि तो स्वत: याला हातभार लावील त्या प्रमाणांत असणार हें उघड आहे. प्रत्येकाला आपलें आध्यात्मिक ध्येय ठरविण्याला आणि त्याची प्राप्ति करून घेण्यास आपल्याच विचाराच्या इतर लोकांशीं सहकार्य करण्याला पूर्ण स्वातंत्र्य देण्यास त्यांची तयारी असली तरी सर्व मानवजात आणि तिची व्हावयाची प्रगति ही एकरूप असावी याविषयीं त्यांचा आग्रह असे. आपल्यामधील चांगल्या गोष्टी इतरांनीं उचलाव्यात अशी उत्सुकता त्यांना जशी असे, त्याप्रमाणेंच दुसऱ्यांच्या विचारपद्धती-मधील चांगल्या किंवा नवीन गोष्टींचा स्वीकार कराव-यास ते तितकेच तयार असत. 'ऐक्य–स्वातंत्र्य–प्रगति' —एकाचीच नव्हे तर सर्व समाजाची– हें त्यांचें ध्येय होतें आणि हाच या नवीन भारतीय संस्कृतीचा विशेष होय अशी त्यांची विचारसरणी होती. या नवीन जीवनांत प्रयत्न, सेवा आणि समाधान या तीनहि गोष्टी असल्यानें त्या आचरणें ही गोष्ट स्पृहणीय अशीच होती. यामध्यें स्वतंत्र, एकरूप व प्रगतिपर आणि बंधुभावनेनें प्रेरित अशा जगाची आशा प्रतीत होते. व्यापक आणि उदात्त अशी ही जीवनाची कल्पना, व्यवहार्य अशा सामाजिक आणि राजकीय सुधारणेचें ध्येय या दृष्टीनें, आजपर्यंतच्या इतिहासांत अपूर्व अशीच होती. रानडयांचा आशावाद दांडगा असल्यानें त्यांना असें वाटे कीं कोण-त्याहि एका पिढीनें अथवा समाजानें या दिशेनें केलेलें कार्य अत्यंत अल्प असणेंच शक्य असलें तरी सर्व देशांतील प्रत्येक नवीन पिढीला या जगांतील तिच्या भवितव्याची संपूर्ण जाणीव करून दिल्यास राष्ट्राची प्रगति योग्य अशा दिशेनेंच होईल. शिक्षकांनीं अशा प्रकारचा उच्च ध्येयवाद बाळगून आपल्या विद्यार्थ्यांसहि तो शिकवावा अशी त्यांची अपेक्षा असे.

शिक्षणाच्या कार्यासंबंधीं इतकी उदात्त कल्पना असल्यानें शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यामध्यें वैयक्तिक निष्ठेचे व प्रेमाचे असे संबंध ज्या पूर्वीच्या पद्धतींत आढळून येत त्या निर्मल आणि उत्साही परंपरेचें पुनरुज्जीवन व्हावें अशी त्यांची इच्छा असल्यास नवल नव्हतें.[४] स्वार्थप्रधान वृत्तीच्या सध्यांच्या जगांत शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या संबंधाचें पर्यवसान निव्वळ कराराच्या स्वरूपाचें होऊं पहात आहे हें अत्यंत शोचनीय होय. शिक्षणाचा केवळ एक कला एवढ्याच दृष्टीनें विचार केला तरी शिक्षकांची आपल्या कार्याकडे केवळ एक धंदा या दृष्टीनें पाहण्याची वृत्ति अथवा शिकणाऱ्यांचीहि जी संकुचित व्यवहारी वृत्ति नव्यानें अस्तित्वांत येत आहे ती समर्थनीय ठरणार नाहीं. कारण शिक्षकांनीं ज्ञानाची जी परंपरा विद्यार्थ्यांच्या हातीं पोंचविलेली असते तिजबद्दलच्या निष्ठेचा अभाव यामध्यें असतो. जें आपण वाचतों अथवा ऐकतों त्याविषयीं चिकित्सेची वृत्ति बाळगूनहि आपल्याआधीं जी प्रगति झालेली आहे तिचा चांगला परिचय करून घेण्याचा मनःपूर्वक प्रयत्न आपण केला पाहिजे. ही वृत्ति अंगीं बाणण्यास आपले पूर्वज आणि शिक्षक यांच्यासंबंधीं एक प्रकारचा आदर आवश्यक आहे. आपल्या गुरूंचे अथवा पूर्वजांचे आपण अंधभक्त असण्याची जरूरी नाहीं. परंतु आपल्या ज्ञानार्जनामध्यें त्यांना महत्त्वाचें स्थान असतें आणि त्यांच्याविषयीं आदराची आणि भक्तीची वृत्ति असल्यानें आपल्यास त्यांच्याबरोबर येणाऱ्या संबंधापासून खराखुरा फायदा होण्याला मदतच होणार आहे. असें हें संबंध निर्माण करून टिकविण्याची बरीचशी जबाबदारी शिक्षकांवरच पडते हें रानडयांना माहीत होतें. आपली विद्वत्ता, अभ्यास आणि ध्येयवाद यांच्या योगानें विद्यार्थ्यांमध्यें प्रेमाची आणि आदराची भावना त्यांनी निर्माण केली पाहिजे. जर दोघांनींहि या बाबतींतली आपापली भूमिका योग्य प्रकारें पार पाडली, तर सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टीनें तो मोठाच फायदा होईल.

शिक्षकांची ज्ञानावरील भक्ति हीच प्रामुख्यानें विद्यार्थ्यांच्या मनात तशीच वृत्ति निर्माण करण्यास कारणीभूत होते. कार्यक्षम आणि अत्यंत स्वकार्यनिरत अशा शिक्षकाच्या अभावीहि विद्यार्थ्यांमधील ज्ञान-निष्ठेचें क्वचित् एखादें उदाहरण आढळून येईल.

---

४. आपल्या जुन्या परंपरेचा उद्धार या बाबतींत केल्यानें तरुण पिढीच्या मनावर विद्येविषयींची आस्था, विविध विषयांचा अभ्यास करण्याची आवश्यकता आणि गुरुजनांविषयींची वैयक्तिक भक्ति हीं विशेष प्रकारानें आपण ठसवूं शकूं. असें केल्याखेरीज शाळा अथवा कॉलेजमधील कोणत्याहि प्रकारच्या शिक्षणास काहींहि फळ येईल अशी आशा नको. (सं. लेख– पृ. २४६)

परंतु हिंदुस्थानसारख्या एक खंड म्हणतां येईल अशा राष्ट्राचा उद्धार आणि प्रगति हीं अशा अपवादभूत व्यक्तींच्या बौद्धिक कामगिरीनें घडून येण्याजोगीं नाहीं. सबंध जनसमाजाला पुरेशा प्रमाणांत ज्ञानप्रसार करण्यास आवश्यक असलेले विद्वान् व नेते उत्पन्न होण्यास निष्ठावंत आणि स्वतंत्र व नवीन विचार प्रसवणाऱ्या विविध विचारप्रणालींची परंपराच निर्माण व्हावयास हवी. अशा विचारप्रणालींची वाढ होण्यास निष्ठावंत अभ्यासक व शिक्षक यांची संख्या बऱ्याच मोठ्या प्रमाणांत वाढली पाहिजे. आज उपलब्ध असलेलें सारें ज्ञान आत्मसात् करून त्यांत भर घालण्याचा प्रयत्न करावयाचा, तर त्यांत अनेकविध मार्ग अंतर्भूत होतात याची कल्पना रानड्यांना होती. बौद्धिक व्यवसायांच्या क्षेत्रांत दुसऱ्यांचें ज्ञान आत्मसात् करून आपली भर त्यांत घालण्याचें सामर्थ्य ज्या राष्ट्रांनी गमाविले त्यांना व्यावहारिक आणि भौतिक क्षेत्रांतहि विशेष कांहीं करतां येईल असें नाहीं. याकरितां सर्व सांस्कृतिक आणि व्यावहारिक पुनरुज्जीवनाच्या चळवळीचें अधिष्ठान म्हणून खऱ्या ज्ञानोपासनेचे आणि शास्त्रीय परंपरेचें कार्य चालविणाऱ्या संस्था विस्तृत प्रमाणावर निघालेल्या पाहण्याची रानड्यांना इच्छा होती.

केवळ भौतिक शास्त्राची शुद्ध तात्त्विक प्रगति घेतली तरी ती कार्यक्षम अशा शिक्षकांच्या नेतृत्वाखालीं व निष्ठावंत अशा विद्यार्थ्यांच्या संपूर्ण सहकार्यानें संघटितपणें चालविण्याखेरीज नेटानें होत राहणार नाहीं हें स्पष्ट आहे. परंतु शास्त्राची प्रगति आणि ज्ञानाची प्राप्ति हीं साध्य नसून केवळ साधनें आहेत. त्यांचें साध्य म्हणजे मानवी जीवन उदात्त करून मनुष्याच्या निर्माणशक्तीचा परिपोष करणें हें आहे. हीं ध्येयें मुख्यतः नैतिक आहेत आणि शिक्षकवर्गाकडून त्यांस आवश्यक असणारी भावनेची पार्श्वभूमि तयार झाल्याखेरीज आणि त्यांबद्दलचें आवश्यक तें शिक्षण मिळाल्याखेरीज तीं साध्य होणें कठिण आहे. बौद्धिक, नैतिक आणि भावनांच्या दृष्टीनें शिक्षकांची भूमिका विद्यार्थ्यांच्या बाबतींत इतकी महत्त्वाची आहे कीं त्यांनीं आपल्यास मिळणाऱ्या संधीचा चांगला उपयोग केल्यास बहुजनसमाजाच्या मनामध्यें खरोखरीच क्रांति करून सोडणें शक्य आहे. ह्या मार्गानें इष्ट अशी मनोवृत्ति निर्माण झाल्यास राष्ट्रीय ध्येय साध्य करून घेण्याचें प्रत्यक्ष कार्य हें पुष्कळसें सोपें होण्याजोगें आहे. आर्यसंस्कृतीच्या जुन्या परंपरेला धरून शिक्षक, विद्वज्जन आणि निस्वार्थी समाजधुरीण यांनीं आपल्या जीवनांत या ध्येयाचा आविष्कार करून त्याचा प्रचार हिंदुस्थानांत आणि बाहेरील जगांत करावा हें रानड्यांना हवें होतें.[५]

प्राथमिक आणि दुय्यम शाळांमधील शिक्षण बहुतांशीं पुढील जीवनाच्या सर्वसामान्य तयारीच्या स्वरूपाचें असतें. ज्ञानाच्या एका विशिष्ट शाखेमधील विशेष शिक्षण कॉलेजमधील काळांतच सुरू होणें शक्य

---

५. आपल्या शिक्षकवर्गानें विद्यार्थ्यांना मनुष्य या नात्यानें माणसाचा दर्जा काय असतो याची जाणीव करून दिली पाहिजे; आणि आजपर्यंत इतरांना दूरदूर लोटण्याची जी वृत्ति आपल्यामध्यें वाढत आली आहे, तिजवर आवश्यक ते इलाज करावयास हवेत. आपणा सर्वांचे विचार, उच्चार आणि आचार मानवजातीसंबंधीं वाटणाऱ्या प्रेमानें प्रेरित झालेले असावेत; आणि आपली वागणूक आणि श्रद्धाविषय हे जरूर तेथें रूढिबंधनांतून मुक्त होऊन सदसद्विवेकाला धरून असावेत हेंहि पण त्यांनीं पहावयास हवें. त्याचवेळीं असा शिक्षकवर्ग पूर्वीच्या संन्यासी लोकांप्रमाणें न व्हावा अशीहि काळजी आपण घेतली पाहिजे. पूर्वीच्या काळीं आणि हल्लींहि आमरण ब्रह्मचर्याची शपथ घेऊन, मानवजातीची सेवा व आपल्यास निर्माण करणारा परमेश्वर यांना स्वतःस वाहून घेणाऱ्या लोकांकडून आपल्या आणि इतर देशांत मोठेंच सत्कार्य घडलें आहे हें मला मान्य आहे. परंतु अशा लोकांना जीवनाच्या निरनिराळ्या बाजू संपूर्णतः कितपत अनुभवण्यास मिळतात याची शंका वाटते. माझ्या मतानें या बाबतींत आपल्यास पुराणकालांतील ऋषिजनांमध्यें अगस्त्य आणि त्याची पत्नी लोपामुद्रा, अत्रि आणि त्याची भार्या अनसूया, आणि वसिष्ठ व त्याची अर्धांगी अरूंधती यांचीं उदाहरणें उत्तम नमुना ठरतील असें वाटतें. त्याचप्रमाणें आधुनिक कालांत आपल्याकडील डॉ. भांडारकर, मद्रासचे दि. ब. रघुनाथराव, बंगालमधील कै. केशवचंद्र सेन, बाबू प्रतापचंद्र मुजुमदार आणि पंडित शिवनाथशास्त्री, व पंजाबचे लाला हंसराज आणि लाला मुनशीराम यांचींहि नांवें घेतां येतील. ज्या समाजामध्यें अशा उपदेशकांची परंपरा अखंड चालू शकते तो माझ्या मतें केंव्हांहि नाश पावणार नाहीं; आणि अशा लोकांचा उपदेश





आहे. विशेष हेतूनें प्रेरित झालेल्या शिक्षणपद्धतीचा सर्वांत अधिक फायदा होण्याच्या दृष्टीनें आवश्यक असलेली बौद्धिक व शारीरिक वाढहि याच अवस्थेमध्यें होत असते; म्हणून विश्वविद्यालयीन शिक्षण घेतलेल्या लोकांनीं राष्ट्रीय चळवळींत ज्या प्रकारचा भाग घ्यावा अशी रानड्यांची इच्छा होती, त्याला उपयुक्त असा अभ्यासक्रम असावा अशी त्यांना तीव्र उत्कंठा होती. आपल्या जीवनांत अलीकडील काळांत एकेकट्यानें कार्य करण्याची संवय खोल रुजलेली माहीत असल्यानें कॉलेजमध्यें सर्वसाधारणपणें वसतिगृहांतून विद्यार्थ्यांनीं राहिलेंच पाहिजे असा नियम त्यांनीं सुचविला.[६] दुसऱ्यांना ज्यांच्यापासून ज्ञान मिळून दिशा लागावयाची त्यांना तरी कृति आणि विचार यांमध्यें सामुदायिक दृष्टीनें वर्तन करण्याची संवय असावयास पाहिजे. आधुनिक जीवनामध्यें निरनिराळ्या क्षेत्रांत सहेतुक सहकार्य करण्याची आवश्यकता अनेक वेळां उत्पन्न होते. औद्योगिक प्रगति होत असतां खासगी सामाजिक जीवनाचे घटक उत्तरोत्तर लहान लहान होत जातात. अशावेळीं सहकार्यानें कार्य करण्याचा गुण त्या हेतूनें मुद्दाम केलेल्या योजनांच्या साहाय्यानें वाढवावा लागतो. एकत्रपणें आणि सामुदायिक रीत्या कार्य करण्याचा नुसता उपदेश करून भागत नाही.

कॉलेजमध्यें राहण्यानें सर्वसामान्य प्रश्नांसंबंधीं सर्वांकडून कांहीं सामान्य असा विचार करून जी दिशा अवलंबिली जाते, तिच्या अनुरोधानें सर्वजणांना मिळून कार्य करावेंच लागतें; इतकेंच नव्हे तर त्यामुळें वेगवेगळ्या लोकांबरोबर अधिक संबंध प्रत्येक क्षणाला येत जातो. आर्थिक, धार्मिक, जातीय आणि इतर भेद हे बाजूस ठेऊन सर्वांना सामान्य अशा शैक्षणिक आणि सामुदायिक ध्येयास अधिक प्राधान्य द्यावें लागतें. पण यामुळेंच एकराष्ट्रीयत्वाची निर्मिति मुख्यत: होते. लोकांच्या मनावर एकत्रपणें राहण्याची वृत्ति ठसवावी लागते; आणि हें केवळ कांहीं विशिष्ट भावनेवर अवलंबून न ठेवतां सर्वांना सामान्य अशा जीवनांत जे फायदे आहेत ते मनाला पटल्यामुळें होणें शक्य असतें. जीवनामध्यें प्रवेश करण्याच्या आधींच अनुभवानें हें लोकांच्या प्रत्ययाला आणून देणें हें जवळ जवळ अशक्य आहे. परंतु समाजाच्या विचाराला वळण लावण्याचें कार्य ज्यांच्या हातीं आहे, त्यांच्या अंगीं जर ही राष्ट्रीय वृत्ति बाणली तर इतरांना तें वळण लागणें सुलभ होतें. विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांना एक सर्वसामान्य जीवन लाभल्यास कांहीं सामाजिक फायदे जसें होतात, तसें कांहीं तोटेहि होतात हें खरें आहे. म्हणून आपल्या उच्च शिक्षणाच्या संस्थांचें स्वरूप कसें असावें हें सांगण्याच्या आधीं त्याचें धोरण ज्ञानोपासना, ऐक्य आणि प्रगति यांवर अधिष्ठित असावें असें रानडे यांनीं सांगितलें. हे हेतु आणि त्यांजविषयींची योजना डोळ्यांपुढें ठेऊन दिल्या गेलेल्या शिक्षणांत कॉलेजमधील वसतिगृहांत राहणें आवश्यक केल्यानें राष्ट्रीय जीवनावर मोठा सुपरिणाम होणार आहे.

कॉलेजशीं संबंध असलेल्या बहुतेक साऱ्या लोकांची तेथेंच राहण्याची सोय झाल्यास शिक्षण शक्य तितक्या अधिक प्रमाणांत देणें सुलभ जाईल. या गोष्टीचा फायदा आपल्या देशांत पूर्णांशानें अद्यापि घेण्यांत आला नाहीं. कांहीं अपवाद सोडल्यास विद्यार्थ्यांचें आणि अनेक वेळां शिक्षकांचें जीवनहि व्यवस्थितपणें आंखलें गेलेलें नसतें. शक्ति आणि काल यांचा फार अपव्यय होतो. या स्थितीचीं इतर अनेक कारणें असलीं तरी विद्यार्थ्यांचे कांहीं थोडे तासच कॉलेजमध्यें जातात ही गोष्ट बऱ्याच अंशानें कारणीभूत आहे. त्यामुळें अमोलिक अशा मानवी साधनांचा बराच अपव्यय होतो. विद्यार्थी आपला जेवढा वेळ शिक्षणांत खर्च करितात त्या मानानें त्यास मिळालेल्या शिक्षणाचें प्रमाण आणि योग्यता हीं आवश्यक किंवा शक्य आहे, त्यापेक्षां बरींच कमी पडतात. यापेक्षां अधिक उत्कट अशा प्रकारचें शिक्षण मिळण्यास

---

आपल्यास बोध करून, स्फूर्ति देऊन, मार्ग दाखविण्यास लाभत असतांना, त्या 'पूर्वनियोजित पुण्यभूमी' चें दर्शन होण्याचा काल अधिकाधिक जवळ येत राहणार याविषयीं मला तरी बिलकूल शंका नाहीं.

(सं. लेख– पृ. २४६–२४७)

६. याकरितां कॉलेजमध्यें राहणें आवश्यक असावें या गोष्टीस उत्तेजन देऊन तें सर्वत्र रूढ करणें योग्य होईल.

(सं. लेख– पृ. ३१४)

विद्यार्थ्यानें आपला विद्यार्थीजीवनाचा सारा काळ योग्य शैक्षणिक अशा कामापायीं खर्च केला पाहिजे. रानडयांच्या मनांत असलेली कल्पना म्हणजे पूर्वीची शिक्षक आणि शिष्य यांनीं एकत्र राहून, ज्ञान आणि सद्‌गुण यांवरील निष्ठा जागृत ठेऊन, आपलें जीवन व्यतीत करण्याची जी परंपरा, तिचा या नवीन कालांतील रूढ कल्पना आणि प्रसंग यांना अनुसरून पुनरुद्धार करणें ही होती. आजच्या स्वरूपांत बहुतेक विद्यालयांतून हें ध्येय साध्य होणें फार दूर आहे; त्यांमधून शिक्षणासंबंधींची भारतीयांचीं कल्पनाहि व्यक्त होत नाहीं आणि जगांतील प्रगतिपर आणि यशस्वी राष्ट्रांत रूढ असलेली आधुनिक विश्वविद्यालयीन व्यवस्थाहि आढळून येत नाहीं. विद्यालयें म्हणजे एका ध्येयानें प्रेरित झालेल्या लोकांच्या वसाहती असावयास पाहिजेत आणि या वसाहतींचे जोंपर्यंत आपण घटक आहोंत, तोंपर्यंत आपलें सारें जीवन त्याप्रीत्यर्थच खर्च व्हावयास हवें. तरच समाजानें या संस्था स्थापन करून चालविल्याचें चीज आहे. चालकांच्या जाहीर हेतूंच्या दृष्टीनें जर विद्यालयांची योग्य पहाणी केली तर फारच थोडया संस्था आवश्यक त्या पदवीपर्यंत पोहोचूं शकतील. संकल्पित मार्गापासून या प्रकारानें च्युत होऊन राहणें आणि कार्यक्षमतेचें निकृष्ट प्रमाण मान्य करून राहणें, या गोष्टी रानडयांना ज्याकरितां या संस्था निर्माण व्हाव्यात असें वाटे, त्याला सर्वस्वीं विरोधी होत्या.

अष्टौप्रहर शिक्षण देण्यावर हा जो भर रानडयांनीं दिला, त्यावरून विद्यार्थ्यांच्या कानांवर बौद्धिक शिक्षणाचा प्रवाह सारखा पडत राहावा असें त्यांना वाटे असें समजणें बरोबर होणार नाही. आपल्या काळांतील कोणत्याहि इतर शिक्षणतज्ज्ञांपेक्षां रानडे यांना शारीरिक शिक्षण आणि विकास यांचें महत्त्व अधिक पटलें होतें. या विचाराचें महत्त्व दोन कारणांनीं त्यांच्या मनावर बिंबलें होतें.[७] आपल्याकडील विश्वविद्यालयांतील पहिल्या पहिल्या विद्यार्थ्यांच्या राहणीत आरोग्यास विघातक अशा अनेक संवयी शिरल्या होत्या. त्यांच्यामधील अधिक आस्थेवाईक विद्यार्थ्यांवर अभ्यासाचा बोजाहि फार पडे. सुशिक्षितांमधील अपमृत्यू हें जवळजवळ एक सामाजिक संकटच होऊन बसूं पाहत होतें. याची चर्चा रानडयांनीं आपल्या एका निबंधांत विस्तृतपणें केली आहे. त्यांत प्रस्तुत परिस्थितीस तोंड देण्यास शारीरिक शिक्षणाचा एक क्रमहि सुचविला होता. परंतु रानडयांना शारीरिक शिक्षणाविषयी जी एवढी कळकळ वाटे तिचें मूलकारण यांत नव्हतें. महाराष्ट्रांत आणि हिंदुस्थानच्या इतर भागांत शारीरिक शिक्षणाची एक अखंड आणि प्रभावी अशी परंपरा होतीच. त्याचबरोबर रानडयांच्या मनावर सर्वांगीण जीवनाच्या ग्रीक कल्पनेचाहि विशेष परिणाम झाला होता.

ग्रीक संस्कृतीची मध्यवर्ती कल्पना प्रत्येक नागरिकाच्या साऱ्या चांगल्या शक्तींची निर्दोष व संपूर्ण जोपासना, त्याचें जें सामुदायिक राष्ट्रजीवन, त्याच्या दृष्टीनें व्हावी अशी होती. बौद्धिक त्याचप्रमाणें नैतिक, शारीरिक तसेंच कलात्मक शिक्षण, प्रत्येक नागरिकाचें संपूर्ण व्यक्तिमत्त्व विकसित व्हावें याकरितां आवश्यक असे. रानडयांच्या मताप्रमाणें शारीरिक शिक्षणाचें एकंदर अभ्यासक्रमांतलें स्थान गौण नव्हतेंच. मग प्राप्त परिस्थितींत तात्पुरता उपाय म्हणून त्यांनीं त्याला मान्यता दिली हें म्हणणें दूरच राहतें. इतर विषयांप्रमाणें शारीरिक विकास आणि कार्यक्षमता यांचीहि परीक्षा व्हावी, त्याचप्रमाणें किमान बौद्धिक तयारीप्रमाणें तितकीच शारीरिक तयारी असल्याखेरीज पदवीपरीक्षेचा अभ्यासक्रम विद्यार्थ्यानें समाधानकारकपणे पार पाडला असें समजलें जाऊं नये असें त्यांचें म्हणणें होतें. व्यक्तीच्या आणि समाजाच्या व्यक्तिमत्वाचा संपूर्ण, समतोल आणि प्रमाणशीर असा विकास होणें हें ध्येय असलें पाहिजे आणि शिक्षणाचें खरें कार्य म्हणजे लोकांना तें ध्येय साधण्याकरितां आवश्यक तीं साधनें उपलब्ध करून देणें हें आहे.

रानडयांच्या मतानें ज्ञानाच्या बाह्य स्वरूपापेक्षां त्यांतील सारभूत अर्थाला अधिक महत्त्व असे, आणि त्यापेक्षांहि मिळविलेल्या माहितीपेक्षां ती मिळविण्याची पद्धत अधिक महत्त्वाची होती. त्यामुळें परीक्षांना ते फार महत्त्व देत नसत. परीक्षेला नेमलेला अभ्यासक्रम हा व्यवस्थितपणें पार पाडलेला असला आणि विद्यार्थ्याची प्रगति समाधानकारक झाली असल्याचा शिक्षकांकडून

---

७. शारीरिक व्यायाम हा कॉलेजच्या शिस्तीचा एक भाग केला जावा आणि बौद्धिक प्राविण्याप्रमाणें यामधील प्राविण्याचाहि विचार करण्यांत यावा.

(सं. लेख– पृ. ३१४)






दाखला मिळाला कीं विद्यापीठानें त्या विद्यार्थ्यांची योग्यता मान्य करावी. परीक्षांची संख्या न वाढवितां ती उलट कमी करावी असा प्रयत्न व्हावयास हवा, आणि जेव्हां परीक्षा ठेवलेली असेल त्यावेळीं ती कठिण न करितां ज्ञानाची खरी कसोटी मात्र लागावी. अभ्यासाचें भलतेंच ओझें, तो करण्यांत पद्धतशीरपणाचा आणि योग्य विभागणीचा अभाव, आणि शेवटीं अनेक कठिण परीक्षा यांचा विद्यार्थ्यांच्या आरोग्यावर दुष्परिणाम होतो. आधीं व्यवस्थित आणि पद्धतशीर तयारी करून घेतल्याशिवाय मधून मधून अनेकवेळां परीक्षा घेतल्या तरी त्यांचा शैक्षणिक दृष्टचा कितीसा उपयोग होतो याची शंकाच आहे. म्हणून परीक्षेवर आज दिला जाणारा भर कमी करून त्यांच्याऐवजीं अभ्यासक्रमाची चांगली योजना आंखून, त्याची विभागणी व्यवस्थितपणें करून, शिक्षक आणि विद्यार्थी यांनीं, नियमितपणानें तो पार पाडावा असें रानडयांचें निश्चित मत होतें. इष्ट ज्ञानाची प्राप्ति इष्ट अशाच पद्धतीनें व्हावी हा शिक्षणपद्धतीचा उद्देश असावयास हवा. नुसत्या परीक्षांनीं हें साधणार नाहीं; म्हणूनच रानडयांनीं शिकविण्याच्या नियमित पद्धतीवर आणि तयारी करून घेण्याच्या क्रमवार योजनेवर भर दिला.

अलीकडे अनेक विद्यापीठांतून दिसून येणारी अभ्यासक्रम फार वाढविण्याची प्रवृत्ति रानडयांना मान्य नसे. यामध्यें शिक्षकांची बौद्धिक तयारी, शिकणाऱ्यांचा उत्साह, आणि ग्रंथसंग्रह व प्रयोगशाला यांच्यामधील साधनसामग्री यांना न झेपेल इतका अभ्याक्रम ठेवलेला असतो. अभ्यासाची अंतिम प्रगति किती व्हावी याला रानडे कोणतीहि मर्यादा घालूं इच्छित नव्हते. मात्र त्या प्रगतीची दिशा आपल्या गरजा आणि सामर्थ्य यांच्या अनुरोधाने आंखली गेली पाहिजे; आणि सर्वांत मूलभूत गरजांना पहिलें स्थान मिळावयास पाहिजे. तुलनात्मक दृष्टचा सोपे आणि साधे असे अभ्यासश्रम विद्यार्थ्यांना निवड करण्याच्या व अभ्यासाच्या दृष्टीनेहि फायद्याचे होतात.[८] ज्यामध्यें एकाच विषयांत विशेष प्रावीण्य अपेक्षिलें जातें किंवा निरनिराळ्या विषयांची अव्यस्थित भेसळ केलेली असते अशा अभ्यासक्रमापेक्षां हे साधेच अभ्यासक्रम सोइस्कर असतात. विशेष प्रगति झालेले असे जे विद्यार्थी असतील किंवा ज्यांना विशेष आकांक्षा असेल, त्यांना शिक्षकानें त्या विषयांतील साऱ्या गुंतागुतीच्या भागांची ओळख करून द्यावी; पण विद्यापीठाचे जे सर्वसामान्य अभ्यासक्रम असतील त्यांचें ध्येय समाजजीवनांतील त्या त्या अंगांचा चांगला अभ्यास करून त्यामध्यें लोकांचें मार्गदर्शित्व कार्यक्षमतेनें करूं शकतील असे विद्यार्थी तयार करण्याचें असावें. यांना प्रसंगविशेषीं विशेष तज्ज्ञांचें साहाय्य मिळावें. असे तज्ज्ञ तयार करण्याचें कार्य संशोधनसंस्थांकडून व्हावें आणि या संस्था विद्यापीठाला जोडलेल्या किंवा स्वतंत्रहि असाव्यात. संशोधनसंस्थेच्या मानानें कॉलेज अथवा विद्यापीठ यांचें क्षेत्र अधिक व्यापक असें असतें. संशोधन संस्थांचें कार्य केवळ त्या विषयाचें तात्त्विक ज्ञान वाढविण्याचें आहे. विद्यापीठें आणि उच्च शिक्षणाचीं विद्यालयें यांच्यापुढें ही ज्ञानोपासनेची दृष्टि असूनहि शिवाय सामाजिक आणि नैतिक उपयुक्ततेचाहि विचार असतो. ज्ञानसंपादनाचें हें कार्य व्यापक सामाजिक कार्यापेक्षां गौण नसलें तरी तें समाजाच्या गरजांशीं जुळेल अशा पद्धतीनेंच झालें पाहिजे.

शिक्षणसंस्थांमधील केवळ ज्ञानोपासनेचें कार्य, आणि समाजाचें जीवन व त्याच्या गरजा यांच्यामधील परस्परसंबंधाचा अभाव, देशी भाषांच्या अभ्यासक्रमाइतका इतर कशांतहि स्पष्ट दिसून येत नाहीं. रानडयांच्या कालानंतरच्या दिवसांत याबाबत कांहींशी सुधारणा झाली आहे. देशी भाषांचा उपयोग आतांपेक्षां पुष्कळच व्यापक प्रमाणावर व्हावयास हवा ही गोष्ट मान्य होत आहे. देशी भाषांना उत्तेजन देण्याच्या बुडाशीं असणारीं तत्त्वें मात्र स्पष्टपणें मांडून त्यांचा परस्परसंबंध अद्यापि लावून दाखविण्यांत आला नाहीं. या विषयावरील योग्य असें शिक्षणविषयक धोरण ठरविण्यांत रानडयांचीं मतें फारच उपयुक्त ठरतील. देशी भाषांच्या अभ्यासांत रानडयांच्या मतानें दोन वेगवेगळ्या दृष्टि असणें संभवनीय होतें. एक शिक्षणाचें माध्यम म्हणून व दुसरी अभ्यासाचा विषय म्हणून. देशांमध्यें निरनिराळ्या भाषांच्या प्रांतांमधून शास्त्रीय व संस्कृतिविषयक अभ्यास करणारांची संख्या जसजशी

---

८. या पुढील आपलें प्रयत्न अभ्यासक्रम सुलभ व्हावा आणि परीक्षांची संख्या कमी करून त्या कमी कठिण व्हाव्यात या दिशेनें व्हावयास पाहिजेत. (सं. लेख– पृ. ३१४)

अनुक्रमणिका







वाढत जाईल, तसतशी त्या त्या भाषेला माध्यम म्हणून अधिक लोकप्रियता मिळवून देऊन तिचा उपयोग करायला आरंभ झाला पाहिजे. हिंदुस्थानांत युनिव्हर्सिटी शिक्षणाच्या पहिल्या कालांत, म्हणजे रानड्यांच्या कालांत, ही अवस्था अद्यापि आली नव्हती. म्हणून त्यांनीं त्यावेळीं देशी भाषेचा माध्यम म्हणून उपयोग व्हावा असा आग्रह धरला नव्हता.

त्यानंतर आतां परिस्थिति सुधारली आहे आणि निदान दुय्यम शिक्षणांत तरी देशी भाषांचा माध्यम म्हणून उपयोग बऱ्याच प्रमाणांत होऊं लागला आहे. आतांपर्यंत आलेल्या अनुभवावरून देशी भाषेच्या कैवाऱ्यांच्या अपेक्षांना पुष्टीच मिळाली आहे. मातृभाषेच्या योगानें विषयाची समजूत आणि अर्थ व्यक्त करतां येण्याचें प्रमाण निश्चितपणें वाढलें आहे असें म्हणतां येईल. इंग्रजी भाषेचें ज्ञान मात्र यामुळें कमी झालें ही गोष्ट खरीं. परंतु हें अगदीं अनपेक्षित होतें असें नाहीं. देशी भाषेचा उपयोग करण्यामध्यें हेतूच हा आहे कीं इंग्रजीकडे सर्वसाधारण विद्यार्थी आपलें जेवढें लक्ष पुरवितात तें कमी करून इतर विषयांकडे त्यांनीं अधिक उत्साहानें वळावें. संक्रमणाच्या काळांत, कॉलेजमध्यें देशी भाषेचा माध्यम म्हणून उपयोग होऊं लागेपर्यंत युनिव्हर्सिटीमध्यें प्रवेश करूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांमध्यें मात्र इंग्रजीच्या ज्ञानाचें प्रमाण वरच्या दर्जाचें असावें ह्याविषयीं आग्रह धरण्यांत यावा. ज्या विद्यापीठांतून असा आग्रह धरण्यांत आला नाहीं त्यांमधील कॉलेजांतील शिक्षणाच्या दर्जांत कांहींसा उणेपणा आला आहे व हा दोष कांहीं अंशीं अपरिहार्य आहे. विषयाची समजूत अधिक सुलभ आणि चांगली होते हा जो स्वदेशी बोध भाषेमुळें मोठा फायदा होतो त्याचें महत्त्व यामुळें कमी होत नाहीं.

कॉलेजमध्यें माध्यम म्हणून देशी भाषांचा उपयोग कदाचित् आणखी कांहीं कालपर्यंत पुढें ढकलावा लागेल. कारण देशी भाषांमध्यें सर्व विषयांवरील वाङ्मयांत पुष्कळ भर पडावयास हवी. तशीच प्रांतांची राजकीय विभागणीहि अधिक सोइस्कर अशा भाषावार तत्त्वावर व्हावयास पाहिजे. पण विद्यापीठाचें उच्च शिक्षण आणि समाजाचें सांस्कृतिक जीवन या दोन्हींमध्यें कांहीं संबंध नाहीं असें जें आज वाटतें तें दूर करण्याचे शक्य ते तात्कालिक उपाय व्हावयास हवेत. रानडे हे मुंबई विद्यापीठाच्या सिंडिकेटचे सभासद होते. त्यावेळीं त्यांनीं अशी सूचना मांडिली होती कीं कोणत्याहि पदवी परीक्षेच्या विद्यार्थ्यास आपल्या मातृभाषेमध्यें निबंध लिहिणें आवश्यक करावें. याला बऱ्याच फेलोंचाहि पाठिंबा होता. या सूचनेचा हेतु पदवीधरांना आपल्या भाषेचा परिचय अधिक व्हावा व त्या भाषेंत त्यांना अधिक सहजतेनें लिहितां बोलतां यावें एवढाच होता. त्या कालांत या दोन गोष्टी दुर्दैवानें फार कमी प्रमाणांत आढळून येत. परंतु ही सूचना फेटाळून लावण्यांत आली आणि त्यास कारणें काय दिलीं तर विद्यार्थ्यांवरील अभ्यासाचा बोजा वाढेल, ज्यांची निश्चित अशी देशभाषा नसेल त्यांना तें त्रासाचें होईल, आणि या भाषांचा वाङ्मयीन अभ्यास त्यामुळें होणार नाहीं. या अडचणी अत्यंत क्षुल्लक आहेत हें स्पष्टच आहे. त्यावरून शिक्षणाधिकाऱ्यांची देशी भाषांच्या बाबतींत सर्वसाधारणपणें कशी प्रतिकूल वृत्ति असे एवढेंच दिसून येतें.

रानड्यांनीं देशी भाषांविषयींचा आपला प्रयत्न सोडून दिला नाहीं, तर बऱ्याच निकराच्या प्रयत्नांनीं एम्. ए. परिक्षेच्या ऐच्छिक विषयांमध्यें त्यांनीं देशी भाषांना स्थान मिळवून दिलें. त्यावेळीं जो आरंभ झाला त्यापुढें आतां बरीच प्रगति होऊन बहुतेक विद्यापीठांतून ऐच्छिक विषयाचें स्थान त्यांना मिळालें आहे. देशी भाषेला योग्य तो मान मिळावा एतदर्थ रानड्यांनीं जे प्रयत्न केले त्यांचेंच हें फळ होय. सुशिक्षितांनीं देशी भाषांच्या द्वारें आपल्या ज्ञानाचा लोकांमध्ये प्रचार करावा अशी जी रानड्यांची अपेक्षा होती तीहि बऱ्याच अंशीं सिद्धीस गेली हेंहि पुढील प्रगतीवरून दिसून येतें. लेखनाची आणि सार्वजनिक कार्याची हौस असणाऱ्या व्यक्तींनींहि इंग्लिशशीं प्रत्यक्ष परिचय नसणाऱ्यांच्याकरितां बरेंच कार्य केलें आहे. परकीय भाषेंतील ग्रंथांचीं देशी भाषांमध्ये भाषांतरें करण्याच्या उद्देशानें कित्येक संस्था निघाल्या. महाराष्ट्रांत अशा प्रकारच्या संस्था स्थापण्यांत रानड्यांनीं स्वतः भाग घेतला होता. तथापि अजूनहि विद्यापीठें किंवा सरकार यांच्यामार्फत व्यावहारिक आणि संस्कृतिविषयक अनेक निरनिराळ्या विषयांवर नियमित अशा व्याख्यानमाला

चालविण्याचा प्रयत्न झालेला नाहीं.[९] या दिशेनें झालेल्या इतर किरकोळ प्रयत्नांवरून त्यांची उपयुक्तता सिद्ध झाली असून देशाच्या शिक्षणव्यवस्थेमध्येंच या व्याख्यानांचा अंतर्भाव झाला तर राष्ट्रीय दृष्टचा त्याचा फार उपयोग होण्यासारखा आहे. शिक्षण हें बहुजनसमाजापर्यंत पोंचल्याखेरीज त्याचा हेतु संपूर्णपणें सिद्ध झाला असें होत नाहीं असें रानड्यांना वाटे.

समाजाच्या आणि व्यक्तीच्याहि दृष्टीनें श्रेयस्कर जीवनाच्या आपल्या कल्पनेस धरून प्रगति व्हावी याकरितां सबंध राष्ट्राची संघटना व्हावी अशी रानड्यांची इच्छा होती. या संघटनेमध्यें स्वखुषीनें भाग घेणें आणि राष्ट्रीय प्रगतीच्या ध्येयकल्पनेवर श्रद्धा ठेवणें या दोन गोष्टी नागरिकत्वास आवश्यक आहेत. राष्ट्राच्या आणि व्यक्तीच्या हिताच्या दृष्टीनें मनुष्याच्या आयुष्यांत शक्य तितक्या लवकर या राष्ट्रीय गुणांचा ठसा तरुण पिढीच्या मनावर उमटणें आवश्यक आहे. हें आरंभीचें शिक्षण दिल्यावरहि उत्तम नागरिकत्वास आवश्यक असणाऱ्या नैतिक व बौद्धिक गुणांची छाननी वेळोवेळीं होऊन बदलणाऱ्या गरजा व परिस्थिति यांना ते जुळते करून घ्यावयास हवेत. या कारणाकरितां शैक्षणिक संस्था आणि इतर व्याख्यानमाला यांची योग्य दिशेनें संघटित व्यवस्था करणें हें राष्ट्रीय जीवनाचें महत्त्वाचें अंग असतें. एखाद्या विशिष्ट संकुचित पंथाचा पुरस्कार न करितां, पण त्याचबरोबर या गोष्टी केवळ खाजगी संस्थांवर न सोंपवितां, सरकारनेंच राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यामध्यें पुढाकार घेऊन त्यास अंशतः तरी द्रव्यसाहाय्य केलें पाहिजे. याकरितां झालेला खर्च आणि केलेले परिश्रम राष्ट्रीय प्रगतीचें साधन आणि सुधारलेल्या जीवनाचें ध्येय या दोनहि दृष्टींनीं समर्थनीयच ठरतात.

---

९. पदवी मिळाल्यावर विद्यार्थ्यांनी विद्यापीठापासून दूर न जातां आपल्या नंतरच्या जीवनांत आणि व्यवहारांत विद्यापीठाशीं असलेला उन्नतिकारक संबंध कायम राखावा अशी कांहीं व्यवस्था विद्यापीठांनीं केली पाहिजे. विद्यापीठाच्या कार्याचा योग्य तो विस्तार केल्यानेंच हे चांगल्या प्रकारें साधणार आहे.

(सं. लेख– पृ. ३१४)

* *

## संदेश

मनुष्याचें सर्व स्वरूपच बदलून, त्यास सर्वतः शुद्ध करून सर्वांगपरिपूर्ण करणें हें आपलें ध्येय असलें पाहिजे. याकरितां त्याच्या बुद्धीस स्वतंत्र करून, त्याची कार्यनिष्ठा वाढवून, त्याच्या सर्व शक्तींचा संपूर्ण विकास घडवून आणणें आवश्यक आहे. हें सारें झाल्याखेरीज आपण आपल्या पूर्वजांसारखे होण्याची आशाच नको. आपले पूर्वज हे परमेश्वराचे आवडते लोक असून त्यांच्यावर त्यानें मोठीं कामे सोंपविलीं होतीं, आणि त्यांनींहि पण मोठीं कार्यें करून दाखविलीं होतीं.

( सं. लेख– पृ. १७९–१८० )

या ग्रंथाच्या नांवांत व ग्रंथामध्येंहि कित्येक ठिकाणीं रानड्यांचा उल्लेख 'स्वतंत्र भारताचे द्रष्टे' असा आम्हीं केलेला आहे. रानड्यांच्या दृष्टीपुढें भारताच्या जीवनाचा सारा पट साकल्यानें उभा होता. भूतकालापासून वर्तमानकालांत त्याची परिणति होऊन पुढें भविष्यांत त्याचें भवितव्य काय आहे हें सारें त्यांच्या दृष्टीला दिसलें होतें. कोणत्याहि परिस्थितीचे चांगले अथवा वाईट परिणाम काय होतील ते अचूकपणें ओळखण्याची शक्ति त्यांच्या ठिकाणीं होती. आपल्या आणि इतर देशांच्या इतिहासाचा खोल

अभ्यास केल्यानें त्यांची पूर्ण खात्री झाली होती कीं हिंदुस्थानचें भवितव्य फार उज्ज्वल आहे. हें कांहीं केवळ मनोराज्य अथवा सुखद आत्मवंचना होती असें नाहीं. आपल्या इतिहासामध्यें एकामागून एक येऊन गेलेल्या अवस्थांमध्यें प्रकट होणाऱ्या हिंदी समाजाच्या विशेष गुणांचा पद्धतशीर अभ्यास त्यांनीं केला होता. आपल्या देशाची भौगोलिक स्थिति, आपल्या समाजांत झालेलें अनेक वंशांचें मिश्रण, नवनवीन संस्कृतींत असलेला सारा हितकारक भाग आत्मसात् करण्याची अपूर्व शक्ति, या भारतास लाभलेल्या ठेव्यामधील मूलभूत गोष्टी यांनीं वरील आशांना आधारच मिळतो. या अत्यंत इष्ट असणाऱ्या देणग्यांपैकीं एकीचाहि त्याग न करतां, आपल्या निकटच्या भूतकालांत आपणांस चिकटलेल्या अनिष्ट गोष्टींचें गांठोडें फेंकून देऊन आतां ज्या नवीन संस्कृतीशीं आपला संबंध आला आहे तिच्यामधील चांगल्या गोष्टी उचलण्याची वेळ आली आहे असें त्यांना वाटे.

हे जे वरील गुण आपण संपादावेत आणि आपल्या रोजच्या जीवनांत प्रकट करावेत असें रानडयांना वाटे, त्यांची रूपरेषा सांगणें म्हणजेच रानडयांचा संदेश सांगणें होय. आपल्या साऱ्या प्रयत्नाचें ध्येय मनुष्यांतील सर्व हितकारक शक्तींचा संपूर्ण विकास साधण्याचें असलें पाहिजे. आपलें मुख्य कर्तव्य प्रत्येक व्यक्तीला हा विकास करून घेण्यास पूर्ण स्वातंत्र्य मिळेल अशी परिस्थिति निर्माण करणें हें आहे. या स्वातंत्र्याचा उपयोग विधायक कार्याकडे आणि उत्तरोत्तर विकसित होत जाण्याऱ्या ध्येयाप्रीत्यर्थ झाला पाहिजे. याकरितां मानवाचें भौतिक जीवन सुखाचें झालें पाहिजे, आणि अशा सुखी जीवनाचा, समाजाच्या नैतिक आणि सांस्कृतिक प्रगतीचें साधन म्हणून उपयोग झाला पाहिजे. हा प्रश्न एकटया भारताचा नसून सबंध जगांतील मानवजातीचाच आहे. जसजशी परिस्थिति येईल त्याप्रमाणें प्रत्येक व्यक्तीस आणि राष्ट्रास तिला तोंड द्यावें लागेल हें खरें, परंतु तें करतांना मानवजातीनें चालविलेल्या व्यापक झगडयाचा हेतु डोळयांआड होतां कामा नये. प्रत्येक व्यक्तींत ज्या कांहीं हितकारक शक्ति असतील त्यांचा विकास करण्यास त्यांना संपूर्ण स्वातंत्र्य मिळावें एतदर्थ झटत रहा हाच संदेश रानडयांनीं अनेक निरनिराळया मार्गांनीं सांगण्याचा प्रयत्न केला. रानडयांच्या जीवनाचें व उपदेशाचें सार अगदीं यथार्थपणें सांगावयाचें झाल्यास ‘ सर्वांना समता आणि स्वातंत्र्य मिळावें म्हणून जीवनांत सतत प्रयत्न करीत राहणें ’ असेंच सांगतां येईल. रानडयांचें मन इतर कोणापेक्षांहि अधिक जाणणारे जे गोखले त्यांनाहि रानडयांच्या जीवनहेतूविषयीं हेंच वाटे. अत्यंत विचार-पूर्वक केलेल्या आपल्या एका भाषणांत त्यांनीं रानडयांचा संदेश– त्यांच्या जीवन कार्याचा हेतु– पुढील शब्दांत सांगितला आहे. त्याच शब्दांनीं या पुस्तकाचा उप-संहार करणें योग्य होईल :–

> “ त्यांच्या जीवनाचा संदेश आपण, विशेषत: तरुण पिढीनें, पवित्र आणि बंधनकारक मानला पाहिजे. मनुष्यमात्रांत अधिकाधिक समता नांदावी, आणि प्रत्येक मनुष्याची मनुष्य या नात्यानें कांहीं योग्यता आहे हें ओळखलें जावें या दोन तत्त्वां-करितां रानडे जन्मभर झटले. वातावरण अधून-मधून कितीहि निराशाजनक झालें तरी या दोन तत्त्वांचा विजय अखेरीला होणार हें निश्चित. तो विजय लवकर व्हावा म्हणून आपल्यास प्रयत्न करतां येईल. **‘ स्वदेशाकरितां स्वार्थत्याग आणि कार्य करीत रहा ’** हाच संदेश रानडयांनीं आप-ल्यास दिला आहे.”

(गोखल्यांचीं भाषणें– पृ. ७८४)

* * *

# रानडे यांची राष्ट्रोद्धाराची योजना*

लेखक : प्रो. द. गो. कर्वे, अेम्. अे.

माधवरावजी तर गेलेच, पण त्यांनी घालून दिलेलें उदाहरण डोळ्यांपुढे ठेवून सर्वजण जर यथाशक्ति देश-कार्याकरिता झटण्याचा प्रयत्न करतील, तर आपल्या सर्वांस जी गोष्ट हवी आहे ती प्राप्त झाल्याखेरीज कधीहि राहणार नाही. — लोकमान्य टिळक

## सर्वव्यापी कार्यकर्तृत्वाचें मूळ

लोकमान्य टिळकांनी ज्यांचा 'सर्वज्ञः स हि माधवः' ह्या अुक्तीने गौरव केला, 'अीश्वरी प्रेरणेप्रमाणें ते कार्य करीत' असें ज्यांच्याबद्दल रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी ह्यांनी म्हटलें आणि 'अडखळत चालणाऱ्या मनुष्य-समाजाचें मार्गदर्शन करण्याकरिता अधूनमधून जन्मास येणाऱ्या अवतारी पुरुषांत त्यांची गणना केली पाहिजे', अशी ज्यांबद्दल नामदार गोखले यांनी ग्वाही दिली, त्या रानड्यांच्या कामगिरीचें सर्वांच्या डोळ्यांत चटकन् भरणारें स्वरूप म्हणजे ती शब्दशः 'सर्वव्यापी' होती हें होय. न्यायमूर्ति रानड्यांसंबंधी लोकमान्य टिळकांनी लिहिलेल्या सुप्रसिद्ध मृत्युलेखांत ह्या सर्वव्यापी कार्य-कर्तृत्वाचें मूळ कशांत होतें तें स्पष्टपणें सांगण्यांत आलें आहे, ह्या लेखांत रानड्यांविषयी लिहितांना लो. टिळक म्हणतात, "धर्मव्यवस्था, समाजसुधारणा, अुद्योगधंदे, शिक्षण, राजकीय व्यवस्था वगैरे बाबतींत आम्ही मागे आहों व या सर्व गोष्टींत सुधारणा झाल्याखेरीज अितर सुधारलेल्या राष्ट्रांची आपणांस बरोबरी करतां यावयाची नाही असा त्यांचा पक्का ग्रह झालेला होता!"

रानडे ह्यांस सुधारक पक्षाचे अग्रणी समजत असत तें खरोखर ह्या व्यापक अर्थानेच होय. विधवाविवाह, स्त्री-शिक्षण, अस्पृश्यतानिवारण, प्रौढ-विवाह इत्यादि बाबतींत त्यांच्या नेतृत्वाखाली जी चळवळ झाली तीस सामाजिक सुधारणेची चळवळ असें म्हणण्याचा प्रघात आहे. आणि सामान्य अर्थाने तो योग्यहि आहे. परंतु ज्या सामाजिक सुधारणेची रानडे यांस तळमळ लागली होती, किंबहुना जी घडवून आणणें हें आपणांस अीश्वराने नेमून दिलेलें जीवनकार्य आहे असा त्यांचा विश्वास होता, ती समाजसुधारणा त्यापेक्षा पुष्कळच अधिक व्यापक होती. व्यक्तिशः नागरिक व सामुदायिक रीत्या सर्व राष्ट्र यांच्या गुणोत्कर्षास पूर्ण वाव मिळावा अशी त्यांची मनीषा होती. हिंदुस्थानांतील लोकांस असें स्वातंत्र्य व वैभव प्राप्त करून घेतां आलें, तर त्यांस आपल्या स्वतःचा व त्याबरोबरच सर्व अगाचा अुद्धार करण्याचें पुण्य लाभेल अशी त्यांची खात्री होती.

## रानड्यांचा विश्वास

परदास्य व दारिद्र्य ह्यांत खितपत पडलेल्या राष्ट्रांतील एका नेत्याचें ध्येय व धोरण हीं एवढी अुन्नत असावीं ह्याचें सकृद्दर्शनीं कोणासहि आश्चर्य वाटेल. परंतु रानड्यांनी हिंदुस्थानाच्या अितिहासावरून हें सार काढलें होतें. जागतिक संस्कृतीचें माहेरघर बनण्यास व विश्वधर्म स्थापन करून त्याचा अितर राष्ट्रांत प्रसार करण्यास हिंदी लोकच लायक आहेत असें त्यांस वाटे. व्यक्ति व समाज, स्वार्थ व परमार्थ, स्वधर्म व सहिष्णुता, हिंसा व अहिंसा — अित्यादि द्वंद्वांपैकी कोणत्याहि एकाची आत्यंतिक अुपासना न करतां, जीवनांतील सर्व आवश्यक गोष्टींस प्रमाणशीर महत्त्व देण्याची कला हिंदी आर्य लोकांस जेवढी साधली होती, तेवढी ती अितरांस क्वचितच साधली असेल.

अितर देशांशीं तुलना व केली तर येथील अितिहास अधिक शांततामय अव्याहतपणें चालू असलेला दिसतो. जागतिक संस्कृति व विश्वधर्म ह्यांच्या वाढीस शांततेचें साम्राज्य साहाय्यक व्हावें हें साहजिकच होतें. देशाच्या भूत, वर्तमान व भविष्य ह्या तिन्ही कालांबद्दल रानड्यांची दृष्टि अशी विधायक, आशामय व पूज्य-भावनेची असल्याने त्यांच्या सर्व कार्यास अेकसूत्रीपणा व भरदारपणा लाभला. हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा, संपन्न व्हावा, व जगांतील अितर मोठमोठ्या राष्ट्रांच्या बरोबरीने मानवी सुधारणेच्या प्रगतीस त्याला हातभार लावतां यावा, हीच आपणा सर्वांस हवी असणारी गोष्ट होय. व रानडे यांच्या अुदाहरणांचें प्रत्येकाने यथाशक्ति

* [न्यायमूर्ती रानड्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने केसरी-मराठा संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'सह्याद्रि' मासिकाने जानेवारी १९४२ मध्ये 'सह्याद्रि रानडे विशेषांक' प्रसिद्ध केला. प्रस्तुत लेख केसरी-मराठा ट्रस्ट यांच्या सौजन्याने येथे पुनर्मुद्रित करीत आहोत. — संपादक]



अनुक्रमणिका








पालन केल्याने 'ती प्राप्त झाल्याखेरीज कधीहि राहणार नाही', असा लोकमान्य टिळकांचा विश्वास होता. बौद्धिक व अैतिहासिक पायावर अुभारलेल्या सर्वांगीण व व्यवहारनिष्ठ अशा कोणत्या योजनेचें रानडयांनी अुदाहरण घालून दिलें हें प्रस्तुत लेखांत थोडक्यांत सांगावयाचें आहे. रानडयांचें व अंशत: लोकमान्य टिळकांचेंहि, विशिष्ट तत्त्वज्ञान ह्या योजनेंत प्रतीत होतें.

## धर्माला पहिलें स्थान

रानडयांच्या कार्यक्रमांत धर्माला पहिलें स्थान दिलें पाहिजे. सांप्रदायिक रीत्या विश्वासार्ह मानलीं जाणारीं तत्त्वें अगर आचारपद्धति ह्यांचा राष्ट्रीय प्रगतीशीं प्रत्यक्ष संबंध फार थोडा असतो. निरनिराळ्या काळीं व स्थळीं लोकांच्या आध्यात्मिक व नैतिक गरजा भागविण्यास अीश्वर-प्रेरित महात्म्यांनी अनेक जीवनतत्त्वें, व नीतिविचार आणि धार्मिक आचार सांगितलेले असतात. सर्वसामान्य सामाजिक गरजा भागविण्यास हे सर्व धर्मपंथ साहाय्यभूत होणारे असल्याने ज्या त्या समाजाने आपापल्या धर्माचें पालन करणें योग्य आहे, असें रानडे यांचें मत होतें. परंतु सर्व धर्मीयांस सारखेच लागू असणारे व राष्ट्राच्या सर्वांगीण अुन्नतीस आवश्यक असणारे धर्मविषयक दोन विचार सर्व जनतेच्या मनावर ठसणें त्यांस आगत्याचें वाटे. जगांतील व्यवहारांचें, किंबहुना अेकंदर सृष्टि-व्यापारांचें, नियमन अेका सर्वव्यापी शक्त्यनुसार होत असतें, व ही शक्ति आपल्यामधील चांगुलपणाच्या अंशास पोषक असते असा त्यांचा दृढ विश्वास होता. चांगुलपणाचें व्यावहारिक फळ अेखादे वेळेस न मिळालें तरीहि चांगलेपणाच्या वृद्धीसाठी आपण आटोकाट खटपट केली ही भावना अत्यंत सुखप्रद व शांतिदायक असते. सारासार विचार करून व सत्याचा जय होणार ह्या विश्वासानें आपलें नियुक्त कार्य करीत राहाण्यास, निदान सत्य व सद्‌गुण ह्यांबद्दल तरी दृढ आस्तिक्य-बुद्धि असणें जरूर आहे.

जीवनाचा हेतु आपल्यामधील भलेपणाचा, म्हणजे दैवी, अंश वाढविणें हा आहे. स्वातंत्र्य हवें तें हा अंश वाढविण्यास संधि मिळावी म्हणून, समृद्धि हवी ती आत्मविकासास साधने हवीत म्हणून आणि समता पाहिजे ती आत्मोत्कर्षाचा मार्ग सहकार्यानें आक्रमतां यावा म्हणूनच होय. जगाचें नैतिक नियमन व मानवजातीचा नैतिक विकास ह्यांवर दृढ श्रद्धा बसल्याने प्रत्येक व्यक्तीच्या मनांत स्वाभिमानाची, आशेची आणि कर्तव्यतत्परतेची जी भावना उत्पन्न होते तीसहि रानडयांच्या मतें राष्ट्रोद्धाराच्या दृष्टीने फार महत्त्व होतें. धर्म ह्या शब्दाचा सांप्रदायिक वा पारमार्थिक अर्थ सोडून त्याचा नैतिक व व्यावहारिक अर्थ घेतला तर अीश्वर-कार्यास स्वत:स समर्पण करून घेण्याच्या अुत्कट कर्तव्यबुद्धीस धार्मिक बल असें म्हणणें गैरवाजवी होणार नाही. अेका अर्थानें अीश्वराच्या अस्तित्वाबद्दल शंका असणाऱ्या लोकांतहि समर्पित कर्तव्यनिष्ठेचें हें धर्मबल असूं शकतें. सत्य व सद्‌गुण ह्यांच्याबद्दल परमोच्च आदर व आपापल्यापुरतें त्यांच्या प्रगती-प्रीत्यर्थ पूर्ण कर्तव्यपालन करण्याची तयारी ह्या दोन गोष्टी अुदयोन्मुख राष्ट्रांतील प्रत्येक नागरिकानें आत्म-सात करून अंमलांत आणल्या पाहिजेत असें रानडे यांचें मत होतें.

## हिंदी संस्कृतीचें महत्त्व

प्राचीन आर्यावर्त, अैतिहासिक कालांतील अथेन्स अित्यादी ग्रीक राष्ट्रें किंवा आधुनिक रशिया– ह्या स्थळ, काळ व परंपरा ह्या तीनहि बाबतींत भिन्न असणाऱ्या देशांचें अुदाहरण पाहिल्यास अेखाद्या विशिष्ट संस्कृतीबद्दल अत्युत्कट आदरभाव व ती सत्यसृष्टींत अनुभवास यावी ह्याकरिता हवी ती खटपट व स्वार्थ-त्याग करण्याची तयारी असल्याखेरीज कोणत्याहि लोकांत जोम, अैक्य व कर्तृत्व ह्यांचा प्रादुर्भाव होत नाही हें स्पष्ट दिसून येअील. रानडयांच्या राष्ट्रोद्धाराच्या योजनेंत त्या मूलभूत गोष्टीस योग्य महत्त्व दिलेलें आढळतें. हिंदी संस्कृतीची थोरवी व तिचा आपणांस आणि अितरांस पूर्ण अनुभव घेतां यावा ह्याकरिता पडेल तो स्वार्थत्याग करण्याची तयारी ह्यांबद्दल प्रत्येक हिंदी नागरिकाच्या मनात अनुकूलतेची आणि पूज्यतेची भावना अुत्पन्न करणें हें अितर कोणत्याहि साधनांपेक्षा राष्ट्रोद्धाराच्या दृष्टीने अधिक निकडीचें आहे असें रानडयांस वाटे.

रानडयांच्या काळीं परकीय राजसत्तेबरोबरच परकीय धर्मप्रचारकांचा येथे बडेजाव वाढत होता. सरकारचें प्रत्यक्ष प्रोत्साहन मिशनऱ्यांस त्यांच्या धर्म-प्रसाराच्या कार्यास मिळण्यासारखें नव्हतें. परंतु मिशनऱ्यांचें धोरण सामाजिक अुपयुक्ततेच्या संस्था स्थापून त्यांद्वारा आपल्या धर्माचा प्रसार करण्याचें असल्याने, अशा संस्थांस जी सरकारी मान्यता लाभे त्याचा लोकांवर परिणाम झाल्याविना राहात नसे.







अनुक्रमणिका

रानडे यांनी अितर सर्व धर्मांप्रमाणें ख्रिस्ती धर्माचाहि सखोल अभ्यास केला होता, व दया, समता, बंधुभाव, नम्रता अित्यादि त्यांतील अनेक बाबी त्यांस मान्यहि होत्या. परंतु तेवढ्यावरून तात्त्विक अगर व्यावहारिक दृष्टचा तो धर्म निरपवाद अथवा हिंदु धर्माहून श्रेष्ठ आहे असें त्यांस वाटत नव्हतें. किंबहुना शुद्ध स्वरूपांत हिंदु धर्म अितर सर्व धर्मांपेक्षा श्रेष्ठ ठरण्यासारखा आहे अशी त्यांची खात्री होती. हिंदु धर्माचें पुन: परीक्षण करून नव्या कालास साजेल अशा तऱ्हेचा त्यांत बदल करणें आवश्यक आहे असें मात्र त्यांस वाटे. अेकेश्वर-निष्ठा, समता, सामुदायिक प्रार्थना, प्रवृत्तिपर शिकवण, अित्यादि अनेक बाबतींत ही सुधारणा होणें जरूर आहे असें त्यांस वाटे. वेदकालीन हिंदुधर्मांत ह्या सर्व गोष्टींचा पुष्कळसा अंतर्भाव झालेला आढळतो. रानड्यांच्या धार्मिक सुधारणेंत पौराणिक कालांतील रूढि बदलून वेदकालीन आचार-विचारांचा कांही भाग पुन: अमलांत आणणें जरूर आहे असें प्रतिपादण्यांत येअी.

## मिशनऱ्यांच्या बंडाला शह

परकी ख्रिस्ती धर्माच्या तात्त्विक व व्यावहारिक हल्ल्यावर रानड्यांसारख्या विद्वान, सव्यसाची व वजनदार पुढाऱ्याने असा पद्धतशीर प्रतिहल्ला चढविल्यानेच मिशनऱ्यांचें बंड मोडलें. सुशिक्षित हिंदूंस स्वत:च्या धर्माची योग्य शिकवण देअून त्याचें विश्वमय व सर्वोच्च स्वरूप स्पष्ट करण्याकरिताच रानडे ह्यांनी प्रार्थनासमाजाची खटपट केली. प्रार्थनासमाजाचीं आध्यात्मिक तत्त्वें जरी केवळ थोड्या सुशिक्षितांसच समजण्यासारखीं होतीं, तरी त्याचें व्यावहारिक स्वरूप भागवत धर्माशीं जुळतें असल्याने स्वत: रानडे व त्यांचे अनेक सहकारी वारकरी समाजाशीं बंधुत्वाने वागत. शास्त्रें, कला, संघटना अित्यादि बाबतींत झालेल्या नव्या प्रगतीचा आढावा घेअून आपले आचारविचार पद्धतशीरपणें बदलणें ही हिंदु धर्माची जुनी परंपरा आहे. ती रानडे यांनी आपल्या काळीं अव्याहत चालविली व निदान महाराष्ट्रांत तरी धार्मिक बाबतींत हिंदुसमाज अखंड राखिला. परधर्मांत गेलेल्या हिंदूंस पावन करून घेणें व समाजांतील सर्व व्यक्तींस बौद्धिक स्वातंत्र्य व सामाजिक समता ह्यांचा लाभ करून देणें ह्या गोष्टींचा त्यांनी जोराने पुरस्कार केलेला आढळतो.

## कार्यप्रवण आदेश

स्वदेश व स्वधर्म ह्यांच्या अभिमानाबरोबरच त्यांच्यांत योग्य ती सुधारणा करून त्यांच्या अुत्कर्षाकरिता झटण्याची जबाबदारी प्रत्येक नागरिकावर येअून पडते. हिंदी लोकांत सामान्यत: पारंपरिक व्यवस्थेस चिकटून राहण्याची सवय दृढमूल असते, परंतु रूढ आचार-विचारांचें बौद्धिक शोधन करण्याची व त्यांस अनुसरून प्रगतीप्रीत्यर्थ झटण्याची त्यांच्यांतील फारच थोड्यांची तयारी असते. रानड्यांनी महाराष्ट्रांत व अितरत्र नवी कल्पना व नवी प्रथा पाडली ती तीच; ज्याने त्याने आपापल्या बुद्धीप्रमाणें परिस्थितीचा विचार करून तिच्यांत आपल्या कल्पनेप्रमाणें सुधारणा करण्यास झटणें आवश्यक आहे असें ते अेकसारखे प्रतिपादीत. त्यांच्या भाषणाचा अगर लेखाचा तात्कालिक विषय कोणताहि असो, ह्या कार्यप्रवण आदेशाचा त्यांत हटकून अंतर्भाव व्हावयाचाच. शोधनात्मक अगर संघटनात्मक कार्य यशस्वी करावयाचें म्हणजे तें ‘समानधर्मीयांशीं’ सहकार्यानेंच करावें लागतें. चौकसपणा, विवेचक दृष्टि आणि सहकार्याने काम करण्याची हौस ह्या गोष्टी रानड्यांच्यापूर्वी महाराष्ट्रांत अगदीच नव्हत्या असें नाही. परंतु त्यांच्या अुदाहरणाने त्या वाढीस लागल्या. पूर्वाभिमानाबरोबरच वर्तमानकालीन कार्याची जबाबदारी आपणांवर पडते हें त्यांच्या शिकवणुकीमुळेच सर्वांस कळून आलें. नुसता पूर्वजांचा अभिमान म्हणजे मुदतीबाहेर गेलेले कर्जरोखे होत, ते पुन: पुन: स्वीकृतीने खरे करून न घेतले तर सर्वच व्यवहार संपुष्टांत येअील असें ते म्हणत. त्यांच्या ह्या अुक्तींतील मर्म जाणून कार्य करीत असणें हें राष्ट्रोद्धारास अत्यंत आवश्यक आहे.

## ‘विधिघटने’चा भावार्थ

जगांतील सर्व व्यवहार विधिघटनेनुसार होतात असा रानड्यांचा विश्वास असल्याने हिंदुस्थान व अिंग्लंड ह्यांमध्ये अुत्पन्न झालेलें साहचर्य हें अीश्वरी संकेतानुसार झालेलें आहे असें त्यांनी म्हणावें ह्यांत आश्चर्य नव्हतें. परंतु त्यांच्या ह्या मताचा अन्वयार्थ मात्र त्यांच्या अेकंदर मतप्रणालीवरून व कार्यपद्धतीवरूनच लावला पाहिजे. हिंदुस्थानांत अिंग्लंडचें राज्य स्थापन झालें हा येथील लोकांस मोठा वर मिळाला अगर अीश्वरी देणगी प्राप्त झाली, आता ह्यापुढे राज्यकर्ते सांगतील त्याप्रमाणें वागण्यापलीकडे कांही शिल्लक अुरलें नाही, असा त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ नव्हता. अुलट, अिंग्रज लोकांनी आपणांस आपल्या ज्या गुणाभावांमुळे जिंकलें त्या अुणीवा दूर करून कालचा

पराभव आज नाही तर निदान अुद्या-परवा तरी आपल्या अुत्कर्षास व सुस्थितीस साहाय्यक करून घ्यावा असा त्यांचा अुपदेश होता. अनेक मार्गांनी त्यांचे जे अुद्योग चालत ते ह्याच धोरणानुसार होत. अिंग्रज सर्वस्वी गुणसंपन्न आहेत, किंवा आपण सर्वस्वी नादान आहोंत अशी विकृत मनोभावना त्यांच्यांत नव्हती. त्यांच्यांत दुरभिमान किंवा द्वेष हे दोष नव्हते, तरी स्वाभिमान पूर्णपणें वास करीत होता. आत्मविश्वासाने, आशायुक्त मनाने, ध्येयपूर्ण भावनेने आत्मविकासाची मिळेल ती संधि हातची सोडूं नये, हीच त्यांची शिकवण. कोणत्याहि राष्ट्रधुरीणाची अशीच शिकवण असणार.

अिंग्रजी अमलाचा काळ सोडून दिला व त्याच्या आधीची मुसलमानी रियासत घेतली तरी रानडे यांनी अशाच निर्विकार व विधायक दृष्टीने त्याकडे पाहिलेलें आढळेल. हिंदुत्वाचा अभिमान आणि मराठ्यांचें क्षात्र-तेज रानडे यांच्या रोमरंध्रीं मुरलेलें होतें, हें त्यांचे लेख काळजीपूर्वक वाचल्यास कोणासहि दिसून येणार आहे. मुसलमानी सत्तेस सबंध महाराष्ट्राने केलेला राष्ट्रीय विरोध हा स्वातंत्र्य-युद्धांच्या अितिहासांत अजरामर होण्यासारखा आहे हें रानडे यांनी जेवढ्या प्रकट व अधिकारी तऱ्हेने चित्रित केलें आहे, तितकें अजून तरी दुसऱ्या कोणी केलेलें नाही. असें असूनहि जे मुसलमान हिंदुस्थानांत स्थायिक झाले किंवा येथील ज्या रहिवाश्यांनी मुसलमानी धर्म स्वीकारला त्यांबद्दल राष्ट्रीय दृष्ट्या रानड्यांची भावना सहकार्याची व मित्रत्वाची होती. निरनिराळ्या मुसलमानी रियासतींचा अितिहास पाहिला तर त्यांनी हिंदुस्थानाच्या वाढींत दोनतीन तऱ्हांनी भर घातलेली दिसते. लहान क्षेत्रा-अैवजी राजकीय व आर्थिक दृष्ट्या विस्तृत क्षेत्रांचे घटक बनणें ही विकासात्मक क्रिया भरतखंडाच्या अेकीकरणास आवश्यक होती. मुसलमानी रियासतींत ह्या दृष्टीने बरीच प्रगति झाली अेवढेच नव्हे, तर राज्यकारभाराची प्रादेशिक संघटनाही अधिक पद्धत-शीरपणें सुरू झाली. अनेक कला, शास्त्रे, काव्येतिहास अित्यादि बाबतींतहि परस्परसाहचर्याने हिंदूंचा मुसल-मानांकडून व मुसलमानांचा हिंदूंकडून फायदा झाला. मुसलमानांची धार्मिक अेकनिष्ठता व कडवेपणा थोडा-फार हिंदूंनी अुचलला तर हिंदूंमधील सहिष्णुवृत्ति व व्यापक दृष्टि ह्यांचा मुसलमानांवर परिणाम झाला. किंबहुना देशाच्या अनेक भागांत हिंदु व अिस्लामी संस्कृतीचें मिश्रण सुरूहि झालें होतें. धर्मपंथ व आचार-विचार ह्यांस राष्ट्रवादास व प्रगतीस पोषक असें वळण लागत होतें. अिंग्रजांस मराठे, मुसलमान व शीख ह्यांच्यापैकी अनेक राज्यकर्त्यांनी अेवढा विरोध केला तोहि हिंदु-मुसलमानांच्या परस्परसाहचर्याने झालेल्या प्रगतीखेरीज करतां आला नसतां असें रानडे यांचें स्पष्ट मत होतें.

## अिंग्रजी व मुसलमानी रियासत

हिंदुस्थानाच्या प्रगतीच्या दृष्टीने अिंग्रजी रियासत अेका अर्थाने अधिक अुपकारक, तर दुसऱ्या दृष्टीने अधिक हानिकारक आहे, हें रानड्यांनी अचूक हेरलें होतें. मुसलमान जेते मूळचे परदेशी असले, तरी त्यांनी येथेच वस्ति केल्याने ते शेवटी अेतद्देशीयच बनले. अिंग्रजी राज्य मुळांत व पुढे परकीच राहिलें. त्यांतल्या त्यांत सर्व सत्ता आपल्या देशबांधवांच्या हातांत ठेवून, व्यापारद्वारा हिंदुस्थानाची संपत्ति शोषण करण्याचें जें धोरण अिंग्रजांनी स्वीकारलें तें आपल्या देशास विनाशक आहे हें रानडे यांनी ताडलें. ह्या बाबतींत आंग्लाअीपेक्षा मोंगलाअी बरी असें वाटण्यासारखीच परिस्थिति होती.

परंतु दुसऱ्या महत्त्वाच्या बाबतींत अिंग्रजांच्या साह-चर्याने आपणांस अनेक फायदे होण्यासारखे आहेत, हें रानडे यांनी लवकर ओळखलें. अिंग्रजांचें बळ त्यांच्या देशाभिमानांत, अैक्यभावनेंत, अुद्योगप्रियतेंत, शास्त्रीय ज्ञानांत व प्रभावी संघटनेंत आहे हें जाणून त्या त्या दिशेने आपण कार्यास लागून प्रगति घडवून आणली पाहिजे. लहानसहान वैयक्तिक अगर सामुदायिक निष्ठेहून अुच्च दर्जाची अेकराष्ट्रीयत्वाची भावना सर्व हिंदवासियांच्या मनांत अुत्पन्न होणें, आपल्या स्वातंत्र्यास व प्रगतीस अत्यंत आवश्यक आहे. मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीय अैक्य व राष्ट्राभिमान अुत्पन्न झाल्याखेरीज येथे कोण-तीच टिकाअु स्वरूपाची प्रगति होअूं शकणार नाही, हें रानडे जाणून होते. ह्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे की, रानड्यांस आपल्या राष्ट्राचें आपण निराळें कणगुलें करून जगाहून अलग राहूं, ही गोष्ट शक्य अगर अिष्ट वाटत होती. अुलट, सर्व जगाची व मानवजातीची प्रगति होण्यास, हिंदुस्थानांत स्वतंत्रता व गुणविकास ह्यांचें अधिष्ठान झालें पाहिजे, असेंच त्यांस वाटे. राष्ट्रीयत्वाच्या सबबीवर व्यक्तिस्वातंत्र्यास पायाखाली चिरडणें ही गोष्ट जेवढी अन्यायाची तेवढीच आंतर-राष्ट्रीयत्वाची ओरड करून राष्ट्रीय हितास हरताळ फासणें हें अन्यायाचें व अदूरदृष्टीचें आहे अशी, रानडे




अनुक्रमणिका

यांची खात्री होती.

### शिक्षणविषयक खटपट

अिंग्रजांचा अंमल हा शास्त्र व अुद्योगधंदे ह्यांच्या वाढीने अुत्पन्न झालेल्या आर्थिक व लष्करी सामर्थ्यावर अवलंबून असल्याने, ह्या दोन्ही बाबतींत आपली प्रगति घडवून आणणेंहि आगत्याचें आहे, हें रानडे यांस कळून चुकलें होतें. येथील शिक्षणक्रमांत आधुनिक वाङ्मयीन विषयांबरोबरच शास्त्रें व कला ह्यांचा अंतर्भाव केला पाहिजे अशा दिशेने रानडे यांनी पुष्कळ खटपट केली. डेक्कन अेज्युकेशन सोसायटीसारख्या आधुनिक ज्ञानाच्या प्रसारार्थ स्थापन झालेल्या संस्थांस तर त्यांनी प्रोत्साहन दिलेंच; परंतु त्याच्याबरोबर सरकाराचीहि ह्याबद्दलची जबाबदारी त्यांनी वारंवार राज्यकर्त्यांच्या निदर्शनास आणली. किंबहुना रानडे यांस अेका बाजूला आपले लोक व दुसऱ्या बाजूला परकी सरकार ह्या दोहोंच्याहि शिक्षणाचें काम करावें लागलें. हातून कृति कशीहि होवो, अिंग्रज सरकाराचें प्रकट धोरण हिंदुस्थानाचें राज्य हिंदी लोकांच्या हितार्थ चालविण्याचें होतें. ह्या घोषणेचा फायदा घेअुन रानडे सरकारावर शिक्षण, अुद्योगधंदे, जबाबदार राज्यसंस्था अित्यादि बाबतींतलें अुदार व प्रगतिपर धोरण लादण्याची खटपट करीत होते.

असें करतांना केवळ सरकाराच्या तोंडचा शब्द गेला आहे, त्याचा पुरेपूर फायदा घ्यावा अेवढेंच रानड्यांचें धोरण होतें असें नाही. अंकित देशाच्या अेकांगी पिळवणुकीचें धोरण दोनहि देशांस व पर्यायाने सर्व मानवी प्रगतीस विघातक असतें, अशी त्यांची पक्की खात्री झालेली होती. अंकित प्रदेश अेकसारखा दरिद्री व निर्बल होत राहील, तर सत्ताधारी राष्ट्रासहि शेवटीं प्रगतीस मुकावें लागेल; अुलट ज्या राष्ट्राच्या बरेवाअीटाची जबाबदारी आज आपणावर पडली, तिचा योग्य निर्वाह करून, तेथील लोकांस स्वावलंबनाच्या आणि प्रगतीच्या मार्गावर आणून सोडलें, तर बरोबरीच्या सहकार्याचा दोघांसहि चांगला फायदा होअील. हिंदुस्थानांत आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करण्यापुरतेंच नव्हे, तर अुद्योगधंद्यांच्या वाढीसहि अिंग्रज सरकाराने सक्रिय साहाय्य करावें, अशी रानड्यांची निकडीची मागणी होती.

'डेक्कन अेज्युकेशन सोसायटी'सारख्या खासगी शिक्षणसंस्थांचा पुरस्कार करीत असतांहि सरकाराने आपलें अुच्च शिक्षणामधून अंग काढून घेअूं नये, अुलट जास्त मोठ्या प्रमाणावर शास्त्रीय शिक्षण देण्यास पुढे यावें अशीं त्यांची खटपट असे. अेक तर आधुनिक शिक्षण अेवढ्या मोठ्या प्रमाणावर देणें जरूर होतें की, निवळ खासगी प्रयत्नांनी हा प्रश्न सुटण्यासारखा नव्हता. निदान रानडे यांच्या काळीं तरी सरकाराने शिक्षणांतून अंग काढून घेणें म्हणजे अेक लोकांस अज्ञानांत ठेवण्यास तयार होणें, किंवा मिशनऱ्यांच्या शाळा-कॉलेजांकडे त्यांस लोटणें असाच अर्थ निघत होता. शिक्षण ही गोष्ट राष्ट्रीय संस्कृतीस अेवढी आवश्यक आहे की, तिचा सर्वसामान्य प्रसार सरकाराकडूनच व्हावयास पाहिजे. सरकार परकी आहे, त्याचें लोकशिक्षणाकडे दुर्लक्ष आहे, अशा परिस्थितींत तात्पुरता अुपाय म्हणून खासगी शिक्षणसंस्थांचा पुरस्कार करणें योग्य आहे. अितरहि दृष्टींनी कांही प्रमाणांत खासगी शिक्षणसंस्था चालू राहणें आवश्यक आहे. परंतु सरकारावरील जबाबदारी त्यामुळे कमी होत नाही, अशी रानड्यांची यथार्थ दृष्टि होती.

### अुद्योगधंद्यांबद्दल अुठावणी

आधुनिक शास्त्रीय ज्ञानाच्या अभावाप्रमाणेंच आपल्याकडील अुद्योगधंद्यांची मागसलेली स्थिति रानडे यांस शोचनीय वाटे. यांत्रिक युगाच्या पूर्वी आपल्याकडे चांगल्यापैकी कारागिरी होती. परंतु ती मुख्यतः स्थानिक गरजा भागविण्यापुरती होती. विशेषतः यंत्रयुग सुरू झाल्यामुळे तर हिंदी आर्थिक घटनेंतील अेकांगीपणा, म्हणजे सर्व व्यवसाय शेतकीवर अवलंबून असण्याची स्थिति, अधिकच जाणवूं लागला. ह्याच वेळीं अिंग्रजांचा अंमल येथे सुरू होअून, त्यांच्या देशांतील नव्या यांत्रिक कारखान्यांत तयार झालेला माल येथे स्वस्ताअीने विकूं लागला. त्याच्याहि आधी अनेक सुष्टदुष्ट मार्गांनी आपल्या मालाचा खप वाढविण्याचें धोरण कंपनी सरकाराने चालू ठेवलें होतें. १८५८ नंतर प्रत्यक्ष अिंग्रज सरकाराच्या हातीं येथील राज्यकारभाराचीं सूत्रें गेल्यावर हिंदी बाजार सर्व ब्रिटिश व्यापाऱ्यांस मोकळे झाले, व सरकार, आर्थिक बाबतींत आपण पडूं अिच्छित नाही ह्या धोरणाचा आधार घेऊन, येथील कारागीर, धंदेवाले आणि व्यापारी ह्यांचें नुकसान स्वस्थपणें पाहत बसलें. रानड्यांच्या मतें ही फार मोठी चूक होती. परदेशाच्या चढाओढीमुळे होणारें नुकसान कोणत्याहि एका व्यक्तीकडून भरून येणारें नव्हतें. आपली साधनसामग्री पाहून त्याप्रमाणें येथे आधुनिक पद्धतीचे कारखाने व सुधारलेली शेती आणि व्यापार हीं सुरू करावयास पाहिजे होतीं. हें विधायक कार्य

अनुक्रमणिका

घडून येईपर्यंत परकीय चढाओढीपासून येथील अुद्योगधंद्यांचें संरक्षण करणेंहि जरूर होतें.

रानडे यांच्या ह्या अुठावणीप्रमाणें सरकार वागलें असतें, तर हिंदी दारिद्र्याचा व वाढत्या खेडवळपणाचा प्रश्न लवकर सुटण्याच्या मार्गास लागला असता. कोणतीहि सुधारणा अगर क्रांति टिकाअू व्हावयाची, तर ती लोकांमधील कार्यक्षमतेच्या वाढीवरच अवलंबून असणार हें रानडे जाणून होते. परंतु मागसलेल्या परिस्थितींतून गुणवृद्धीस संधि मिळावी ह्याकरिता सरकाराचें नेतृत्व व संरक्षण ह्यांची जरूर होती. ह्या दोन गोष्टींची पूर्णपणें अनुकूलता असल्याखेरीज कोणत्याहि राष्ट्राची आर्थिक प्रगति झालेली वा टिकलेली नाही.

## नैसर्गिक व न्याय्य मागणी

व्यक्तिनिष्ठ कारखानदारीपेक्षा रानड्यांस समाजनिष्ठ कारखानदारी अधिक पसंत होती. त्याचें पहिलें कारण वर दर्शविल्याप्रमाणें होतें. मागसलेल्या देशांत कमींत कमी काळांत व कमींत कमी खर्चानें कारखानदारी किंवा मोठ्या प्रमाणावरील शास्त्रीय शेती सुरू करावयाची, तर ती सामुदायिक रीत्या करणेंच योग्य ठरतें. औद्योगीकरणाची योजना सरकारद्वारा अमलांत आणण्याची खटपट करण्यांत रानडे यांचा दुसराहि हेतु होता. अुत्पादनाचें अगर धंद्याचें प्रमाण लहान असणें श्रेयस्कर होतें, तेव्हा सर्व आर्थिक व्यवहार खासगी कराराच्या पद्धतीने होणें योग्य होतें. परंतु भांडवलशाहीची आर्थिक पद्धति किफायतशीर ठरूं लागल्यानें धंद्यांचें खासगी स्वरूप जाअून त्यांस सहजच सामुदायिक स्वरूप प्राप्त होतें. ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून भांडवलशाहीची जोड खासगी धंद्यांशीं लाअून देणें म्हणजे जाणूनबुजून विषमता, अुधळपट्टी व वर्गकलह ह्यांस अुत्तेजन देण्यासारखें आहे. नैसर्गिक व न्याय्य कारणांनी अुत्पन्न होणारी विषमता कोणत्याहि समाजांत राहणारच; तसेच सामाजिक घटना व सरकारी धोरण ह्यांत कितीहि बदल केला, तरी निसर्ग व मनुष्यबल ह्यांच्या बाबतींत प्रत्येक राष्ट्राजवळ जी आर्थिक साधनें असतात त्यांहून अधिक सुबत्ता त्यांस लाभणें शक्य नसतें. ह्या दोनहि गोष्टी रानडे यांस पूर्ण मान्य होत्या, तरीहि हिंदुस्थानाचें दारिद्र्य दूर करण्याचा व निरपवादपणें आपलें औद्योगीकरण घडवून आणण्याचा मार्ग म्हणजे सरकाराच्या किंवा समाजसंस्थेच्या मार्फत घडवून आणलेली औद्योगिक क्रांति हाच होय, अशी त्यांची ठाम समजूत होती.

हिंदुस्थान सरकाराला हिंदुस्थानाच्या हिताबद्दल अेवढी आंच नव्हती म्हणून असो, किंवा आर्थिक बाबतींत तटस्थतेचें धोरण स्वीकारणें योग्य आहे असें त्यांस वाटत होतें म्हणून असो, रानड्यांची ही अत्यत नैसर्गिक व न्याय्य मागणी त्यांस मुळींच मान्य झाली नाही. स्वत: अुद्योगधंद्यांचें नेतृत्व स्वीकारीत नसलां, तर निदान लोकांना आपली सुधारणा घडवून आणण्यास अुत्तेजन तरी द्या, अशी त्यांची दुसरी मागणी होती. सरकारानें व्याजाची हमी देअून येथे आगगाडीचे रस्ते बांधविले आणि चहा व सिंकोना ह्यांच्या मळेवाल्यांस अुत्तेजन दिलें. असें असून शेती अगर कारखानदारी ह्या बाबतींत हिंदी लोकांस मदत करण्याचें सरकारानें साफ नाकारलें. शेती सुधारल्याखेरीज अुद्योगधंदे कायमचे अुर्जितावस्थेस येणें शक्य नाही अशी रानड्यांची खात्री होती. आधुनिक ज्ञान, पद्धतशीर घटना व सामुदायिक नियमन ह्या सर्वांच्या साहाय्यानें व्यापक स्वरूपाची आर्थिक क्रांति घडून येणें जरूर होतें. शेतकऱ्यांचें कर्ज, शेतसारा, कुळांचे कायदे अित्यादि तपशीलवार सुधारणांचा विचार रानडे यांनी शक्य तोंवर वरील योजनेस धरूनच केलेला आढळतो. परंतु सरकाराचें आर्थिक धोरण सर्वस्वी अुपेक्षेचें आहे असें ठरल्यानें त्यांतल्या त्यांत खासगी धंदेवाल्यांस मदत व जरूर तेथे त्यांचें नियमन ह्यांपुरत्याच रानड्यांनी सूचना केल्या.

## जबाबदार राज्यपद्धतीचा पुरस्कार

समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या अंगीं असलेल्या गुणांची पूर्ण वाढ होण्यास, तिला स्वातंत्र्य व जरूर तें सामाजिक साहाय्य असावें अशी रानड्यांची अपेक्षा असल्यानें सनदशीर व जबाबदार राज्यपद्धतीचा त्यांनी पुरस्कार केलेला आढळतो. ब्रिटिश साम्राज्यांतसुद्धा अितरांच्या बरोबरीनें नागरिकत्वाचे हक्क प्राप्त न झाल्यास हिंदी लोकांची नैतिक व भौतिक वाढ खुंटेल असें त्यांनी जाहीर केलें होतें. अंतर्गत व आंतरराष्ट्रीय स्वातंत्र्याच्या भूमिकेवरून सर्वांशीं सहकार्यानें काम करण्यास त्यांची तयारी होती. हाच युक्तिवाद त्यांच्या मतें संस्थानांसहि लागू होता. प्रदेश, लोक, संस्कृति, अितिहास व सामुदायिक हितसंबंध ह्या सर्व बाबतींत ब्रिटिश व हिंदी हिंदुस्थान अेकजीव आहेत. अेकाहून दुसऱ्याची स्थिति आजहि मूलत: निराळी नाही, आणि दोघांचें भवितव्यहि अलगपणें कल्पितां येणार नाही. ह्याकरिता संस्थानांनी सनदशीर व जबाबदार राज्यपद्धतीची सुरुवात करून निदान ब्रिटिश प्रांताअितपत






तरी आपल्या प्रजेस स्वावलंबनाचा व स्वातंत्र्याचा अनुभव घेऊं द्यावा व अन्य पक्षीं ब्रिटिश हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांनी संस्थानिकांस त्यांच्या अडचणीच्या प्रसंगी साहाय्य करून दोघांनी मिळून राष्ट्रीय प्रगतीचें व स्वातंत्र्याचें शिखर गांठावें अशी रानडयांची योजना होती.

रानडयांच्या कालीं मूलभूत व सर्वसामान्य गोष्टीच अेवढया दुष्प्राप्य व म्हणून अधिक महत्त्वाच्या वाटत की, निदान राजकीय सुधारणेच्या बाबतींत तरी तपशीलवार योजना करण्याची वेळ आली नव्हती. येथील लोकांस स्वातंत्र्य व शिकवण देअून आपल्या पायांवर अुभें राहण्यास समर्थ करणें न्याय्य व अिंग्लंडाच्याहि हिताच्या दृष्टीने अिष्ट आहे ही गोष्ट सरकाराच्या मनावर बिंबविणें, आणि आपण आपला अुज्ज्वल अितिहास आणि भविष्य काळांतील नियुक्त कार्य हीं ध्यानांत घेअून अेकजुटीने आणि स्वावलंबनाने संघटित व सर्वांगीण प्रगतीचा मार्ग आक्रमिला पाहिजे ही शिकवण लोकांस देणें, ह्याच दोन गोष्टी रानडयांना मुख्यत्वेंकरून करावयाच्या होत्या. ह्यांचा तात्त्विक अूहापोह करण्यांत व अनेक संस्थांच्या द्वारा त्याप्रीत्यर्थ कार्य करण्यांत रानडयांचा बहुतेक काळ गेला. असें असूनहि येथील राज्यकारभाराच्या पद्धतीबद्दल त्यांनी अेक महामंत्र सांगून ठेवला होता. हिंदुस्थान हा देश अेवढा प्रचंड आहे व तो अितक्या विविध घटकांचा बनलेला आहे की, येथे अेका मध्यवर्ति केंद्रांतून सर्व बाबतींत धोरण ठरविणें किंवा कारभार हांकणें अशक्य व अनिष्ट आहे. केवळ कारभाराच्या चोखपणाकडे लक्ष द्यावें, तर नागरिकांचें स्वातंत्र्य व नैसर्गिक प्रगति ह्यांस बाध येतो. संरक्षण व त्यांच्या अनुषंगाने अुत्पन्न होणारे आर्थिक व कारभारविषयक प्रश्न अेवढेच मध्यवर्ति सरकारने आपल्याकडे ठेवावे. प्रांत व जिल्हे ह्यांस पुष्कळ अधिकार तोडून द्यावे व शक्य तेथे गांवपंचायतीचाहि अुपयोग करून घ्यावा, अशी त्यांची सूचना होती. प्रांत हा घटकहि मोठा असून राज्यकारभार पुष्कळसा जिल्ह्यानिहाय होअूं लागल्याखेरीज, स्वराज्य अगर सुराज्य ह्यांचा लोकांस प्रत्यक्ष अनुभव येअूं शकणार नाही असें रानडयांचें मत होतें.

## सार्वजनिक कार्यक्रम

सार्वजनिक कार्यक्रमांत विधायक व आक्रमक असे दोन भाग असतात. रानडयांच्या काळीं जुनें सार्वजनिक जीवन नामशेष झालें होतें व नवें अगदी बाल्यावस्थेंत होतें. अशा वेळीं आक्रमक कार्यक्रमास वाव फार थोडा होता. युक्तीप्रयुक्तीने, वादविवादाने, जेवढें साधेल तेवढें साधून घ्यावयाचें होतें. खरी कामगिरी होती ती आपलें सर्वांगीण बळ वाढवून आक्रमणाची पायाशुद्ध तयारी करावयाची हीच होती. नवें राजकीय, लष्करी व औद्योगिक तंत्र ध्यानांत घेअून, बहुजनसमाजाला नव्या ज्ञानाचें व पद्धतीचें शिक्षण देणें जरूर होतें. हें शिक्षण देतांना कांही जुन्यांत फरक करून तर कांही अगदी नवीन आचारविचार रूढ करून, चालणें जरूर होतें. आणि हें सर्व अेकराष्ट्रीयत्वाची सामुदायिक भावना जोमास लागेल, प्रत्येक व्यक्तीमधील गुणविकासास सारखी मदत होअील व व्यक्ति आणि समाज ह्यांचा अेकत्रित जीवनाचा अुत्कर्ष होअील, अशा दृष्टीने प्रगति घडवून करावयाचें होतें.

अनेक जातींच्या व धर्मांच्या, आणि कमी अधिक प्रमाणांत प्रगति झालेल्या, जनसमूहास अेकत्रितपणें स्वातंत्र्याचें, सुखाचें व प्रगतीचें जीवन कसें कंठितां येअील, हा जागतिक सुधारणेचा मुख्य प्रश्न आहे. शतकानुशतकें ह्याच प्रश्नास निरनिराळ्या प्रकारांची अुत्तरें मोठमोठे साधुसंत व मुत्सद्दी देत आले आहेत. आजहि जगामध्ये जो अभूतपूर्व झगडा चालू आहे, तो ह्याच ध्येयाप्रत नेण्याचें अभिवचन देणाऱ्या दोन राष्ट्रसंघांमध्ये आहे. हिंदुस्थानाच्या प्रगतीचा प्रश्न प्रमाणाने लहान वाटला, तरी मूलतः ह्या जागतिक प्रश्नाचाच तो अेक भाग आहे अेवढेंच नसून, बीजरूपाने तो सर्व जगाचाच प्रश्न आहे. व्यक्तिमात्रांत व्यापक स्वरूपाची निष्ठा जागृत करून, सहकार्याने गुणविकास करण्याचें अुद्दिष्ट त्याच्यापुढे प्रामुख्याने ठेवल्याखेरीज, मोठमोठ्या राष्ट्रांचे किंवा जगाचे प्रश्न सुटत नाहीत. संपत्ति व सत्ता ह्यांच्या लालुचीमुळे होणाऱ्या वाढीस सुधारणा अगर प्रगति असें कधीच म्हणतां येणार नाही. समता, स्वातंत्र्य व गुणविकास हींच मानवजातीचीं योग्य ध्येयें आहेत, असें म्हटलें पाहिजे. राजकीय स्वातंत्र्य व औद्योगिक प्रगति ह्यांची मातब्बरी वरील ध्येयांचीं साधनें म्हणूनच होय. साध्य व साधन, आणि अुच्च व नीच ध्येय ह्यांमधील फरक न्यायमूर्ति रानडयांप्रमाणें आपणहि सतत ध्यानांत ठेवला आणि तो सर्व लोकांच्या आचारविचारांत अुतरेल अशी खटपट केली, तर आपले अंतर्गत व अेकंदर जागतिक प्रश्न सुटण्यास खात्रीनें मदत होअील.



# रानडे–संप्रदाय*

लेखक : श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, बी. अे., पुणें

[ **श्री. के. क्षीरसागर :** जन्म १९०१ चा. पुणे येथील एम्. ई. एस्. महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक. १९५९ साली मिरज येथे भरलेल्या महाराष्ट्र ( मराठी ) साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. साहित्य अकादेमीच्या मराठी सल्लागार मंडळावर नियुक्त सदस्य म्हणूनही काम केले. १९४० साली प्रसिद्ध झालेल्या 'राक्षसविवाह' ह्या कादंबरीमुळे प्रथम प्रसिद्धी. १९४५ साली प्रसिद्ध झालेल्या 'सुवर्णतुला' ह्या पुस्तकामुळे राजकारणावर तत्त्ववेत्त्याच्या भूमिकेतून लिहिणारे लेखक म्हणून त्यांचे नाव झाले. सखोल चिंतन, व्यापक व निकोप दृष्टिकोण व सहृदय अंत:करण ह्यांचा त्यांच्या वैचारिक निबंधांतून प्रत्यय येतो. सौंदर्यवादी टीकाकार म्हणून ओळखले जातात.

**काही ग्रंथ :** वाङ्मयीन मूल्ये, वादसंवाद, साहित्याच्या दरबारात, उमर खय्यामची फिर्याद हे काही लेखसंग्रह. ]

निष्क्रिय आणि निष्प्राण झालेल्या महाराष्ट्रास नवीन प्राण व प्रेरणा देणारे अष्टावधानी प्रज्ञावंत म्हणून रानडे यांचें श्रेष्ठत्व सर्वच ओळखतात. लोकमान्य टिळकांनी लिहिलेल्या मृत्युलेखांत तर "**सर्वज्ञः स हि माधवः ।**" या वचनाचें स्मरण करून प्राचीन पंडित-मुत्सद्दी माधवाचार्य व हेमाद्रि यांशीं या अर्वाचीन माधवाची तुलना केली होती. तथापि सर्वज्ञ मनुष्याचाहि स्वत:चा म्हणून विषय असतो; आणि समदर्शी पंडितालाहि स्वत:चा असा अेक कल असतो. माधवरावांच्या सहिष्णुतेहून आणि संग्राहकतेहूनहि त्यांच्या विशिष्ट नैसर्गिक कलांत त्यांचें व्यक्तिवैशिष्ट्य अधिक सापडण्याचा संभव आहे. 'सर्वज्ञ' व 'सर्वसंग्राहक' न्यायमूर्तींच्या शतसांवत्सरिक अुत्सवाच्या प्रसंगीं त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विशेष घटकांचें समालोचन केल्यास रानडे संप्रदायाचें सम्यग्दर्शन घडण्याचा अधिक संभव आहे.

रानड्यांच्या कालीं "महाराष्ट्र देश अेक थंड गोळा होअून पडला" असला, तरी महाराष्ट्रांत व भरतखंडांत प्राण ओतणारे, रानड्यांच्या पूर्वी कोणी झाले नव्हते असें नव्हे. राममोहन रॉय, दादाभाओी नौरोजी व लोकहितवादी यांची अशा राष्ट्रधन्वन्तऱ्यांत गणना करावी लागते. पैकी राममोहन यांचा महाराष्ट्राशीं प्रत्यक्ष संबंध येणें संभाव्य नव्हतें. तथापि दादाभाओी व लोकहितवादी या दोन राष्ट्रपितामहांनी केलेल्या विचारमंथनानंतरच्या आचारविभागाचा प्रारंभ महाराष्ट्रांत रानडे यांच्या अध्वर्युत्वाखाली झाला.

राजकारण, समाजसुधारणा, राजसेवा, ओीश्वरभक्ति व विद्यार्जन यांसारख्या विविध ( व क्वचित् विरोधी ) कार्यांत रानडे यांची शक्ति विभागलेली दिसते. सरकारी नोकरीच्या बाबतींतहि अेकदा नोकरी पत्करल्यावर अवखळपणा न करतां वरिष्ठांचे हुकूम मान्य करणें हेंच ते आपलें कर्तव्य मानीत. सन १८७१ पासूनचा काळ रानडे व पुणें यांच्या जीवनांत फार महत्त्वाचा मानला जातो. पण या काळांतील त्यांच्या विख्यात लोककार्याच्या मुळावरच त्यांची सरकारी नोकरी येण्याचा योग आला होता. सार्वजनिक सभेचा जन्म १८७० सालीं झाला; आणि १८७१ च्या नोव्हेंबरमध्ये रानडे यांची नेमणूक पुणें येथे झाली. पण पुणें

* [ न्यायमूर्ती रानड्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने केसरी-मराठा संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'सह्याद्रि' मासिकाने जानेवारी १९४२ मध्यें 'सह्याद्रि रानडे विशेषांक' प्रसिद्ध केला. प्रस्तुत लेख केसरी-मराठा ट्रस्ट यांच्या सौजन्याने येथे पुनर्मुद्रित करीत आहोत. —संपादक ]

येथे दाखल झाल्यावर थोड्याच दिवसांत त्यांस मालवण येथे सेकंड क्लास सबॉर्डिनेट जज्जाच्या जागीं नेमल्याचा हुकूम झाला ! "मालवणच्या बदलीचा हुकूम जर सिद्धीस गेला असता, तर माधवरावांच्या हातून जें कार्य पुण्यास राहिल्यामुळे घडलें त्यास अजीबात खो बसला असता", असें त्यांचे प्रमुख चरित्रकार फाटक यांस खेदाने नमूद करावें लागलें आहे.

## विविध सेवांचा समन्वय

माधवरावजींच्या कार्याची पार्श्वभूमि ध्यानांत येण्यास ज्या अनेक गोष्टी लक्षांत ठेवणें जरूर आहे, त्यांपैकी निष्ठापूर्वक केलेली सरकारी नोकरी ही प्रमुख असल्यानेच या बारीकशा पण दीर्घपरिणामी ठरण्यासारख्या गोष्टीचें अुदाहरण घ्यावें लागलें. अर्थात् रानडे यांनी सरकारी नोकरी केली या गोष्टीकडे त्यांच्यानंतरच्या पिढ्यांच्या दृष्टीने पाहिल्यास कालविपर्यासाचा दोष घडेल. कारण सरकारी नोकरी म्हणजे पाप व थोड्या पगारावर खासगी नोकरी म्हणजे स्वार्थत्याग हें समीकरण समाजाच्या अंगवळणीं टिळक-चिपळूणकरांच्या पिढीनंतर पडलें. त्यापूर्वीच्या पिढ्यांत सरकारी नोकरी सार्वजनिक कार्याच्या आड येत नसे अितकेंच नव्हे, तर राजाश्रयाच्या आसनावरून लोककार्यांस हात घालणें थोडें अधिक यशस्करहि असे. रानडे यांनी नोकरी पत्करली, त्या वेळीं सरकाराची सेवा आणि लोकांची सेवा यांचें असें प्रेमाचें नातें होतें; तथापि लोकजागृतीची जी पुढची अवस्था स्वत: रानडे यांनीच नजीक आणली, त्या अवस्थेस सरकारी नोकरी मानवण्यासारखी नव्हती ! ज्या पिढ्यांस प्राधान्येंकरून लोकशिक्षणाचें कार्य करावें लागलें व जागृत जनता अथवा जागरूक सहकारी दिसूं लागण्यापूर्वीच विराम पावावें लागलें, त्यांच्या कार्याच्या आड सरकारी नोकरी येण्यासारखी नव्हती; तथापि मुंबअी विद्यापीठाच्या द्वारें पाश्चात्य शिक्षणाचा लाभ जसा रानडे यांसच प्रथम झाला, तसाच त्या विद्यापीठामुळे ज्यांचे डोळे अुघडून नवा प्रकाश पाहूं लागले अशा नवविचारी सहकाऱ्यांचा लाभहि रानडे यांसच प्रथम झाला. अम्मलदार पुढाऱ्यांच्या पिढींत त्यांनी आपल्या लोककार्यास प्रारंभ केला; पण पीळदार आणि नि:संग अशा तरुण पिढीच्या अुदयानंतरहि त्यांस आपलें कार्य पुरोगामी राखण्याची अवघड कसरत करावी लागली. रानडे यांस आपल्या विशिष्ट स्वभावामुळे किंबहुना विशिष्ट संप्रदायामुळेच या विविध सेवांचा समन्वय राखतां आला !

## कार्ये विविध पण दृष्टि अेक

कार्यक्षेत्रांची विविधता हीं मोठ्या व्यक्तींच्या मोठेपणाचीच द्योतक असते यांत शंका नाही; तथापि व्यक्तींच्या आणि राष्ट्रांच्या जीवनांत असे क्षण येतात की, त्या वेळीं प्राधान्य कोणत्या कार्यास द्यावें या प्रश्नासच प्राधान्य येतें. रानड्यांच्या काळीं तर कोणत्या कार्यास अेवढेच नव्हे, तर कोणत्या भावनेस, कोणत्या आशेस, कोणत्या निराशेस प्राधान्य दिलें जाअील, यावर राष्ट्राचें भवितव्य अवलंबून होतें. अिंग्रजांचें आगमन ही अीश्वरी योजना म्हणावयाची की पूर्वकर्माबद्दल शिक्षा म्हणावयाची, यासारख्या भाषालंकारप्राय प्रश्नाचेहि त्या वेळीं दूरगामी परिणाम होणारे होते. कित्येक पिढ्या अज्ञानांत, क्षुद्र भावांत आणि औदासीन्यांत लोळत पडलेल्या हिंदी मध्यम वर्गाच्या नवोदित देशाभिमानावर भिस्त ठेवावयाची, की ब्रिटिश औदार्यबुद्धीवर ( Liberalism ) भिस्त ठेवावयाची, हा प्रश्न त्या वेळीं केवळ लेखनाचा विषय नसून वर्तनाचा दंडक ठरत होता. तसेंच भारतीय संस्कृतीचा अभिमान धरून परराज्य व परसंस्कृति यांच्याविरुद्ध बंड करावयाचें, की भारतीय देवभक्तीची परंपरा नव्या संस्कृतीस जुळवून घेअून अीश्वरावर भिस्त ठेवावयाची, असा त्या पिढीपुढे प्रश्न होता.

अिंग्रजी पेहरावांत पुनर्जन्म पावलेली देवभक्ति, अिंग्रजी शिक्षणामुळे स्फुरण पावलेली सामाजिक बंडखोरी आणि जुना अितिहास व नवीन शिक्षण यांच्या स्फूर्तीने अुदय पावलेला स्वावलंबी स्वाभिमान— या तीन प्रवृत्ति त्या वेळीं प्रधानपदासाठी झगडत होत्या. रानडे यांनी यांपैकी कोणत्याच प्रवृत्तीचा धिक्कार केला नाही ( आणि हेंच त्यांचे वैशिष्ट्य ! ) आणि या तीनहि प्रवृत्तींच्या कार्यकर्त्यांना रानडे मित्र, मदतगार आणि नायक वाटत ! अनेक वेळा कठोरपणें विरोध करणाऱ्या टिळकांनीहि मृत्युलेखांत त्यांस सर्व चळवळींचे जनक व साहाय्यक म्हणून गौरविलें होतें.

शत्रूवरहि प्रेम करणाऱ्या मनुष्याचे देखील मित्र म्हणून वेगळे असतातच ! तसेच सर्वसंग्राहक पुढाऱ्यांचेंहि स्वत:चें म्हणून कार्य असतें. रानडे यांनी सार्वजनिक काकांच्या द्वारें सार्वजनिक सभेच्या कार्याचा पुरस्कार केला, विष्णुशास्त्री पंडित यांच्यासारख्यांच्या



अनुक्रमणिका






मदतीने विधवाविवाहाचा पुरस्कार केला, दयानंदांचा सत्कार केला, केशवचंद्रांच्या निर्गुण पूजेचा अंगीकार केला, अिंग्रज अधिकाऱ्यांनी पुरस्कारिलेल्या काँग्रेस कार्यास हातभार लावला, अैतिहासिक व सामाजिक विषयांवर प्रकाश पाडला, भारतीय अर्थशास्त्रासंबंधी लेखन केलें. या दृष्टीने पाहतां रानडे हे धार्मिक, सामाजिक, राजकीय व आर्थिक यांपैकी अमुकच एका कार्याचे पुरस्कर्ते असें म्हणतां येणार नाहीं. कार्यें विविध असलीं तरी त्यांकडे पाहण्याची रानडे यांची दृष्टि अेकच होती असें त्यांचे अुद्‌गार, कार्य आणि प्रचार पाहिल्यास दिसून येअील. आणि ही वृत्ति म्हणजे धार्मिकतेची आणि नेमस्तपणाची होय. सार्वजनिक जीवनांतील नेमस्त सांप्रदायाचा अुदय रानडे यांजपासून झाला आणि नेमस्त या संज्ञेचे अधिकारी रानडे यांचेअितके कोणीच झाले नाहीत. आणि या नेमस्तवृत्तींतच सरकारी नोकरीपासून तों अत्याचाराशीं संबंध ठेवल्याच्या वहीमापर्यंत, वाळीत पडण्यापासून तों वडिलांचें अुल्लंघन न करण्यापर्यंत, अिंग्रजी भांडवलाची तरफदारी करण्यापासून ते राणीच्या दरबारांत सार्वजनिक हक्कांचा अुच्चार करविण्यापर्यंत, विविध गोष्टींचा संग्रह झालेला होता.

## नेमस्त संप्रदायाचे आद्य प्रवर्तक

सर्वसाधारण वर्तमानपत्रवाचकांची अशी समजूत दिसून येअील की, टिळकांच्या जहाल राजकारणापूर्वीचें राजकारण तें नेमस्त राजकारण. ज्या राजकीय पुढाऱ्यांवर राजद्रोहाबद्दल खटले झाले नाहीत ते नेमस्त. तथापि जहाल, मवाळ यांतील भेद केवळ पिढीवरहि अवलंबून नाही. सरकारची अितराजी, खटले, शिक्षा हे आनुषंगिक परिणाम होत. खरा फरक परिस्थितीच्या निदानापासूनच सुरू होतो. मवाळपणा प्रत्यक्ष प्रतिकाराच्याच तेवढा आड येतो असें नसून विचारांच्याहि आड येतो. राजकारण आणि अर्थशास्त्र या दोनही क्षेत्रांतील विचारांत रानडे हेच नेमस्त संप्रदायाचे आद्य प्रवर्तक होत असें दिसून येअील. ॲडॅम स्मिथ् रिकार्डो यांचें प्रतिष्ठित अर्थशास्त्र सोडून फ्रेडरिक लिस्टसारख्या 'परकीय' (अिंग्रजी दृष्टीने परकीय) अर्थशास्त्रज्ञाच्या विचारसरणीचा स्वीकार आणि भारतीय परिस्थितीला योग्य असा विनियोग करून त्यांनी हिंदी अर्थशास्त्राचा पाया घातला, म्हणून त्यांचें नांव आजतागायत अर्थशास्त्राच्या क्षेत्रांत आदरपूर्वक आठवतात. हिंदुस्थानच्या औद्योगिक विकासांत ब्रिटिश भांडवलाचें कार्य निश्चित करण्याच्या प्रश्नांत त्यांच्या व दादाभाअी, लोकहितवादी यांच्या दृष्टिकोणांत दिसून येणारें अंतर अर्थपूर्ण आहे. दादाभाअी ब्रिटिश भांडवलाला ब्रिटिश भांडवल म्हणावयासच तयार नव्हते. प्रथम केलेल्या व्यापारी व राजकीय लुटीचाच अेक अपूर्णांक या देशांत कारखान्यांत खर्च करणारांस, देशाच्या वाढीला हातभार लावल्याचें श्रेय मिळणार नाही असें दादाभाअी म्हणत; व म्हणून सत्तासंपादनाला अर्थात् स्वराज्याला निःसंदिग्ध प्राधान्य देत. युरोपीय अर्थशास्त्राच्या राष्ट्रीय संप्रदायाचा पुरस्कार करूनहि रानड्यांना त्या दृष्टिकोणांतून निघणारे राजकीय अुपसिद्धान्त मान्य झाले नाहीत, या गोष्टींची संगति केवळ अर्थशास्त्राच्या विचाराने लागणार नाही. अेका विशिष्ट मर्यादेपर्यंत शास्त्रीय पृथक्करण पोहोचल्यावर हातीं लागणारीं तत्त्वें कित्येकदा संशोधकाच्या धार्मिक, तत्त्वज्ञानपर किंवा भावनात्मक प्रवृत्तीशीं येअून भिडतात व त्या प्रवृत्ति शास्त्रीय सिद्धान्तांस वेगळें वळणहि लावतात. रानड्यांच्या अैतिहासिक व राजकीय दृष्टिकोणांतील धार्मिक वृत्तीचें मिश्रणच आर्थिक सिद्धान्तांच्या अन्तिम फलिताच्या आड आलें असें म्हणावें लागतें. अितिहासांतील दुर्घटनादेखील अीश्वरी प्रसादाचा भाग मानल्यावर आणि ब्रिटिश राज्य ही अीश्वरी योजना मानल्यावर विविधरूपांनी हिंदुस्थानांतून जाणारी खंडणी ही लूट म्हणणें व या लुटींतून परत येणाऱ्या भांडवलाचा धिक्कार करणें रानडे यांच्या अर्थशास्त्रांत बसणें शक्य नव्हतें.

## अीश्वरी योजनेचा आशय ?

अिंग्रजी राज्य ही अीश्वरी योजना समजण्याच्या बाबतींतहि रानडे यांचा विशिष्ट दृष्टिकोण ध्यानीं घेणें जरूर आहे. लोकहितवादी यांच्याहि लिखाणांत, ब्रिटिश राज्य आलें ही गोष्ट चांगली झाली, असें वारंवार म्हटलेलें आढळतें. तथापि या सर्वस्वी अेकरूप दिसणाऱ्या शब्दप्रयोगांच्याहि आंतील आशयांत (content मध्ये) असलेलें अंतर सूक्ष्मपणें पाहिलें पाहिजे. लोकहितवादींचे विविध वृत्तींतील व प्रसंगांतील विविध लेख पाहिल्यास त्यांचा रोख ब्रिटिशांच्या सत्कर्मापेक्षा स्वकीयांच्या कुकर्मावर अधिक होता. व ब्रिटिश राज्य आलें हें बरें झालें अथवा निदान पांचशें वर्षें तरी ब्रिटिश राज्य पाहिजे, वगैरेसारखे त्यांचे अुद्‌गार थोडे सूक्ष्मपणें पाहिल्यास त्राग्याचे होते असेंच दिसून येअील. ब्रिटिश





राज्य ही ओीश्वरी करणी यांत तर शंकाच नाही; पण तो ओीश्वरी प्रसाद नसून ओीश्वरी कोप होय व तो कोप आपला अर्वाचीन अितिहास पाहतां सर्वस्वी यथार्थ होय अशी त्यांची विचारसरणी होती. याचाच अर्थ, ते या घटनेकडे कृतकर्माचे "अटळ फळ" अथवा Nemesis या दृष्टीने पाहात. ही "अनिवार्य पर्यवसाना"ची अथवा Nemesis ची दृष्टि. "देव सर्व कांही आपल्या भल्याकरिताच करतो", "हिंदुस्थान हें देवाचें लाडकें राष्ट्र आहे", "ब्रिटिश भांडवलाने आपली भरभराटच होत आहे", वगैरे समाधानी वृत्तीहून वेगळी होय. पहिल्यांत स्वकीयांच्या दुष्कर्माची आणि दु:स्थितीची जाणीव तीव्र असते; दुसऱ्यांत कोणत्याहि स्थितींत संतापाचें किंवा जहाल भावनेचें कारणच नाही ही दृष्टि दिसते. लोकहितवादींचें लिहिणें वास्तववादी असे; तर रानडयांचें बोलणें श्रद्धावादी असे. आणि म्हणूनच ज्या क्रांतिकारक विचारांना रानडे "शुद्ध फाजीलपणा" म्हणत, त्यासारखे विचार लोकहितवादींच्या नि:स्पृह आणि फटकळ मराठी लिखाणांतच नव्हेत, तर दादाभाओीं-ह्यूम यांच्यासारख्या पारशी युरोपियन पुढाऱ्यांच्या लिहिण्यांतहि विपुल आहेत. लोकहितवादी, दादाभाओी, ह्यूम अगर रानडे यांपैकी कोणीच प्रत्यक्ष साधनांच्या दृष्टीने क्रांतिकारक नसले तरीहि, दृष्टिकोणांत नेमस्त कोण व जहाल (radical) कोण, हें मात्र त्यांचे अुद्‌गार व तरतमभाव (emphasis) पाहिल्यास लक्षांत आल्याखेरीज राहणार नाही. शांतता आणि सुव्यवस्था सर्वांसच हवी होती. परंतु डोळयांपुढें दिसणाऱ्या दारिद्रयादि भीषण गोष्टी पाहून नको म्हटलें तरी क्रांति टळत नाही, हें वास्तववादी दादाभाओी-ह्यूम यांचें प्रतिपादन असे. ब्रिटिशांच्या आगमनाबद्दल आनंद मानणाऱ्या लोकहितवादींचे पुढील अुद्‌गार पाहा :—
"तसा (अमेरिकेसारखा) हा देश केवळ अिंग्रजांच्या वस्तीचा होओील काय?... अशा प्रकारचे प्रश्न माझ्या अंत:करणांत येतात व यांची विवेचना करतां करतां ओीश्वर अिच्छा काय आहे ती समजत नाही. ... **जे सुधारलेले लोक आहेत त्यांस मी पुसतों की, तुम्हांस जर सर्व सर्व गोष्टी पुढे भयंकर दिसतात तर तुम्ही स्वस्थ कसें बसलेत?...**"*

तसेंच त्यांचे स्वदेशीसंबंधीचे (त्यांनी "स्वदेशी" शब्द वापरलेला नाही.) अुद्‌गार पुढीलप्रमाणें आहेत. "याजकरिता सर्वांनी असा कट करावा की, जें आपले देशांत पिकेल तेंच नेसूं... कापूस विकणारांनी असा विचार करावा की, अिंग्रजांस अिकडे तयार केलेलीं कापडें द्यावी, परंतु कापूस देअूं नये... सांप्रत आपलेच लोक आपल्या लोकांस मारीत आहेत. जशी बाहेरची चांगली स्त्री पाहून लग्नाची स्त्री टाकून तिचे पाठीस लागतात आणि भुलतात तसें या लोकांचें झालें आहे."

**व्यक्तिमत्त्वाच्या घडणींतील फरक**

वरील दोन अुताऱ्यांपैकी पहिल्यास, म्हणजे लोकहितवादींच्या राजकीय विचारांस, रानडे निराशावाद म्हणते आणि दुसऱ्यास अर्थशास्त्रविरोधी म्हणते. लोकहितवादींच्या अुद्‌गारांत व्यक्त झालेला स्वदेशी बाणा १८९१ सालच्या स्वदेशीं चळवळीच्या वेळीं टिळकांनी दाखविला, तेव्हा रानडे यांनी तो अशास्त्रीय म्हणून त्याज्य ठरविला होता. त्याच सालीं भरलेल्या औद्योगिक परिषदेंत वाचण्याकरिता लिहिलेल्या निबंधांतहि परदेशी भांडवलाने आपल्या देशाचें हितच होत आहे, ही रानडयांची † "बालंबाल खात्री"च व्यक्त होत होती. तथापि हें त्यांचें मत टिळक-नामजोशी वगैरे जहाल तरुणांना पटत नसल्याने त्यांच्या आग्रहावरून त्यांनी तेवढा भाग आपल्या निबंधांतून गाळला! ज्या नेमस्त वृत्तीमुळे त्यांना ते विचार निबंधांत ग्रथित करणें योग्य वाटलें, त्याच नेमस्त वृत्तीमुळे लिहिलेले विचार न वाचणेंहि रास्त वाटलें!

रानडयांच्या विचारसरणींत व कार्यपद्धतींत दिसून येणारा फरक केवळ आर्थिक, अैतिहासिक किंवा राजकीय मतांचाच फरक होता काय? नेमस्त रानडे आणि जुने-नवे जहाल यांच्यापुढे असलेल्या वस्तुस्थितींत आणि योजनांत मोठासा फरक नव्हता. फरक स्वाभाविक वृतींत व व्यक्तिमत्त्वाच्या घडणींतच होता, असें म्हणावें लागतें. रानडयांच्या व्यक्तिमत्त्वाची घडण मुत्सद्याची व लोकनायकाची जेवढी होती, त्याहून धार्मिकाची व संताची अधिक होती. ओीश्वरभक्ति व वैयक्तिक चांगुलपणा यांचा भाग ज्यांच्या वृत्तींत

---

* क्षीरसागरकृत 'व्यक्ति आणि वाङ्मय'.

† फाटककृत रानडे चरित्र.

अधिक आहे असे पुरुष राजकीय निदानांत व करणींत बहुधा व्हावे तितके कठोर होऊं शकत नाहीत. क्रान्तिकारक अनुमानें काढणें व धाडसाची कृति करणें याच्या आड मनाचा मृदुपणा आल्यावांचून राहत नाही, असें रानडे यांच्या चरित्रावरून म्हणावें लागतें.

## नेमस्त वृत्तीचे घटक

स्वत: रानडे यांनी सार्वजनिक सभेंतून फुटून डेक्कन सभा काढण्याच्या वेळीं 'नेमस्त संप्रदाया'चें लक्षण पुढीलप्रमाणें केलें आहे व तें आजहि डेक्कन सभेच्या फलकावर लिहिलेलें आढळतें ! "The spirit of liberalism implies a freedom from race and creed prejudices and a steady devotion to all that seeks to do justice between man and man, giving, to the rulers, the loyalty due to the Law, they are bound to administer, but at the same time, to the ruled, the equality which is their right under the law. Moderation implies the condition of never vainly aspiring after the impossible or after too remote ideals... in a spirit of compromise and fairness."

साधारणत: नेमस्त वृत्तीचीं हीच लक्षणें मानण्यांत येतात. राज्यकर्त्यांचा, केवळ परकीय म्हणून, द्वेष न करणें, प्रतिपक्षाच्या हेतूबद्दल कुत्सित शंका न घेणें, आणि स्वमताचा आग्रह विकोपाला न नेतां जरूर तेव्हा तडजोड करणें हे नेमस्त वृत्तींतील घटक सर्वस्वी श्लाघ्य आणि अुचित असेच आहेत. हे घटक रानडे यांच्या व्यक्तिमत्त्वांत नि:संशय भरपूर होते.

## राजकीय वास्तववादाची हानी

तथापि अेवढ्याच घटकांनी नेमस्त वृत्तीची, विशेषत: रानडे यांच्या नेमस्त घडणीची, मीमांसा लागत नाही. सर्वत्र शांततेचें, मित्रत्वाचें आणि आशावादाचें वातावरण पाहण्याच्या आतुरतेमुळे आणि कोणतीहि गोष्ट विकोपाला न्यावयाची नाही याबद्दलच्या दक्षतेमुळे रानडे यांच्या राजकीय मीमांसेंत आणि कार्यक्रमांत राजकीय वास्तववादाची थोडीफार हानी झाल्याचें दिसून येतें. रानडे यांच्या वृत्तींतील वरील सद्गुण व्यक्तीव्यक्तींच्या व्यवहारांत किंवा सदृश हितसंबंधाच्या समाजांतील दोन पक्षांच्या वागणुकींत हितप्रदच ठरतील. तथापि सामाजिक व अैतिहासिक संघर्षाच्या वेगांत हितविरोध अुत्पन्न झाला असतां जे बनाव घडून येतात, त्यांचें पृथक्करण व प्रतिकार करण्यास वरील सद्वृत्ति पुरेशा पडत नाहीत– कित्येकदा अडथळाहि करतात. हिम्मतवान कारखानदाराच्या सुयशाबद्दल वैयक्तिक अभिनंदन करूनहि भांडवलशाही म्हणजे पद्धतशीर दरोडेखोरी होय असें निदान करण्यांत मार्क्सने कोणत्याहि सद्वृत्तीचा अव्हेर केला असें होत नाही. ब्रिटिश राज्याच्या सुधारलेल्या राज्ययंत्राची योग्यता ओळखूनहि व्यापारी पिळवणूक हा त्या राज्ययंत्राचा आद्य घटक होय असें तारस्वराने सांगण्यांत दादाभाअींना राज्यकर्त्यांच्या सद्धेतूबद्दल शंका घेतल्याचें पाप वाटत नसे; आणि अशा व्यापारी पायावर अुभारलेल्या नोकरशाही सरकाराच्या प्रत्येक कायद्याकडे डोळ्यांत तेल घालून बघण्यांत राजकीय सौजन्याची (political fairplay ची) हानी झाली, तरी टिळकांसारखा पुढारी पर्वा करीत नसे. सौजन्य, अक्रोध आणि निर्दैषित्व यांस आपल्या जीवनाचें जीवन समजणारे गांधीहि ब्रिटिश सरकाराला नि:शंकपणें सैतानी म्हणण्यास कचरले नाहीत ! विरुद्ध हितसंबंधाच्या मोठमोठ्या जनसमूहांचे आणि संघटनांचे प्रतिनिधि बनल्यावर वैयक्तिक सौजन्याचे नियम जसेच्या तसे लागू पडत नाहीत, निदान अंगीकृत सत्कार्यसाधनास पुरे पडत नाहीत हेंच यावरून दिसून येतें. वैयक्तिक नीतिमूल्यांच्या भाषेत, क्रोध, द्वेष, हेतूंबद्दल शंका, वगैरे जे दोष म्हणून समजण्यांत येतात त्यांचें स्तोम, मोठमोठाल्या वर्गांचें, राष्ट्रांचे व संघटनांचे पृथक्करण करतांना, करून चालत नाही, असेंहि दिसून येअील. अक्रोध नव्हे तर महत्कार्याकरिता क्रोध, सर्वदा तडजोड नव्हे, तर अिष्ट कार्यी आणि अिष्ट काळीं दुर्दम्य सत्याग्रह, हे सार्वजनिक पुढाऱ्यांचे सद्गुण होत.

## समाजसुधारणेच्या बाबतींतहि

समाजसुधारणेच्या बाबतींत व वैयक्तिक जीवनांतहि धार्मिकता व नेमस्त वृत्ति हींच रानड्यांच्या विचारांचीं व आचारांचीं गमकें ठरतात. वरवर पाहतां लोकहितवादी, जोतिबा फुले, आगरकर आणि रानडे यांच्या सामाजिक मतांत व कार्यक्रमांत अंतर दिसणार नाही; तथापि वरून अेक दिसणाऱ्या सुधारकांत दोन स्पष्ट वृत्तिभेद दिसतात. कोणी अन्यायाच्या व दुबळेपणाच्या रूढींनी संतप्त झालेले; तर कोणी नवीन सम्प्रदायाच्या भक्तिमार्गात



अनुक्रमणिका

विलीन झालेले. रानडे, भांडारकर, केशवचंद्र या मंडळींत हिंदु आचारधर्माच्या स्तब्ध आणि रोगट अवस्थेबद्दलच्या संतापाहूनहि अनेकदेवत्वाचा आणि मूर्तिपूजकत्वाचा राग अधिक होता. मध्ययुगीन ब्रह्मवृंदांनी कल्पिलेल्या आणि जपून वाढविलेल्या शेकडों कर्तृत्वविघातक रूढि पाहून ऋषितुल्य लोकहितवादी जमदग्नीप्रमाणें क्रोध ओकीत. अुलट कीर्तन्यांसारख्यांनी मर्यादित मूर्तिपूजेचा पुरस्कार करतांच अथवा आगरकरांनी निरीश्वरवादाचा अुच्चार करतांच कशानेहि क्रुद्ध न होणारे रानडे क्रोधायमान होत !

रानडे, लोकहितवादी, दयानंद, आगरकर, केशवचंद्र या सर्वांसच सुधारक म्हणून संबोधण्यांत येअी; तथापि त्यांच्यांतील फरक ओळखण्यांत येता, तर सुधारणेच्या कार्याला अधिक राष्ट्रहितप्रद वळण लागलें असतें. या सुधारक मंडळींत भक्तिमार्गी अूर्फ भाविक सुधारक आणि पराक्रममार्गी अूर्फ डोळस–राष्ट्रीय दृष्टीचे–सुधारक असे दोन भेद दिसून येतात. हिंदु समाजास सगुण की निर्गुण कोणत्याच भक्तीची कधीच फारशी अुणीव नव्हती; आणि या दृष्टीने पाहतां प्रार्थनासमाजांत भक्तिभावाने गहिवरणारे सुधारक कोणतीहि राष्ट्रीय गरज भागवीत नव्हते. रानडे, भांडारकर व केशवचंद्र यांस सामाजिक सुधारणाहि हव्या होत्या. पण धार्मिक सुधारणां (म्हणजे अुपासना)-बद्दल त्यांस विशेष जिव्हाळा होता. आश्चर्याची गोष्ट म्हणजे केवळ संन्याससंप्रदायाच्या व धर्म हाच "प्रबुद्ध भारता"चा प्राणवायु समजणाऱ्या स्वामी विवेकानंदांसहि रानडे यांजवर टीका करावी लागली.*

## नेमस्त वृत्तीची खरी अुपपत्ति

सारांश, राजकारण व सुधारणा या दोनहि क्षेत्रांत रानडे हे धार्मिक वृत्ति व वैयक्तिक सौजन्य यांसच प्राधान्य देत. या सद्गुणांना बाध न आणतां मांडलेले विचार व आंखलेले कार्यक्रम म्हणजे रानडे यांचें नेमस्त राजकारण व समाजकारण होय. हिंदी सार्वजनिक जीवनांतील नेमस्त संप्रदायाचीं मूलतत्त्वें निश्चित करणें सोपें नाही. त्यांतून जे वृत्तीने नमस्त नाहीत, त्यांनी नेमस्त संप्रदायाचें केलेलें निदान व वर्णन पुष्कळदा फसगत करणारें असतें. आत्मचरित्राच्या ओघाने केलेल्या राजकीय समालोचनांत जवाहरलाल यांसहि हिंदी राजकारणांतील या कांहीशा गूढरूप आणि गतकालविलीन संप्रदायाचें रूप रेखाटतांना मोठीच पंचाअीत पडलेली दिसते. विशेषत: "लिबरल" हें नामाभिधान घेतल्यामुळे तर नेमस्त संप्रदायाविषयीचें गूढ अधिकच वाढलें. अिंग्लिश लिबरल पक्ष हा मुख्यत्वेंकरून अर्थशास्त्रीय मतभेदावर (Free trade संबंधी आग्रहावर) आधारलेला होता. तसेंच नागरिक स्वातंत्र्याबद्दल अिंग्रजी लिबरलांचा तीव्र कटाक्ष असे. हिंदी "नेमस्त लिबरल" हे अर्थातच अर्थशास्त्रांत अितर पक्षांहून वेगळे नव्हते आणि नागरिक स्वातंत्र्याच्या बाबतींत तर अितर पक्षांनीच त्यांच्याहून अधिक जोर धरला, यावरून थोडेंफार बुचकळ्यांत पडून जवाहरलाल यांनी अखेर– 'The leading characteristic of the Party...is thus moderation in everything, good or bad. It is an outlook on life and the old name moderates was perhaps the most suitable', असा निष्कर्ष काढला आहे. नेमस्तांचे महाराष्ट्रीय टीकाकार तर अेके काळीं रानडे संप्रदायाबद्दल किती चिडून आणि कठोर होअून लिहीत त्याचें या प्रसंगीं स्मरण करणेंहि अप्रिय होअील ! "कर्म सदोष घडण्याच्या भीतीने ते कर्माचरणच टाळतात" (They do not act for fear of acting wrongly) हा या संप्रदायावरील नेहरू यांचा आक्षेप म्हणजे सौम्यांत सौम्य आक्षेप होय. पण याहि आक्षेपांत नेमस्तांसंबंधी थोडाफार अन्याय झाला आहे असें दिसून येअील. राजकीय कर्मपथ निश्चित दिसत असून, त्यावर पदार्पण करण्यास ते भितात या भाष्याहून "कळत वा न कळत मूलभूत प्रश्नांना ते बगल देतात,"† (consciously or unconsciously they avoid tackling fundamental issues) ही नेमस्त वृत्तीची अुपपत्तिच

* "Vive Ranade and the social reformers I... but oh India ! Anglicised India ! Do not forget, child, that there are in this society, problems that neither you nor your Western Guru can yet grasp the meaning of, much less, solve !" रानडे यांच्या अध्यक्षणीय भाषणावरील विवेकानंदांचा टीकालेख.

† नेहरू आत्मचरित्र.

अधिक खरी असल्याचें आढळून येअील. दादाभाअी आणि रानडे यांच्या आर्थिक व राजकीय दृष्टिभेदांचें कारण ही वृत्तिच दिसून येअील. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे टिळक आणि रानडे यांजमध्येहि तोच फरक दिसून येअील !

## रानड्यांच्या नेमस्तपणाचें बीज

ज्या न्यायमूर्तींस टिळकांनी "सर्वज्ञ माधवा"ची पदवी दिली, त्यांस मूलभूत राजकीय प्रश्नापर्यंत पोंचण्यास बुद्धीची अडचण खासच नव्हती. ही अडचण म्हणजे रानडे यांच्या मनाची धार्मिक घडण हीच होय. धार्मिक घडणीच्या मनांत सामाजिक वा राजकीय क्रान्तीस प्रधान स्थान मिळूं शकत नाही. व्यक्तींच्या सौजन्यावर आणि अीश्वराच्या दयाळूपणावर भिस्त ठेवल्यास अप्रिय प्रश्न आणि कठोर करणी टाळतां येअील. अगर टाळतां यावी – ही अशा मनांची पवित्र आणि प्रामाणिक मनीषा असते. रानड्यांच्या सामाजिक व राजकीय नेमस्तपणाचें बीज या धार्मिक वृत्तींत होतें.

या धार्मिक नेमस्त वृत्तीचा पगडा रानडे यांच्यावर जितका होता, तितका अितर नेमस्तांवर नव्हता ही गोष्ट लक्षांत ठेवल्याखेरीज या संप्रदायाच्या विकासाची आणि शाखोपशाखांची संगति लागणार नाही. ते नेमस्त होते पण 'धार्मिक' नव्हते ! फिरोजशहा विशिष्ट प्रश्नापुरते जहाल होअूं शकत. मंडलीक (की जे काँग्रेसच्या अुपक्रमालाहि तरुणांचे थेर समजून अलिप्त राहणें बरें मानीत) देखील विशिष्ट प्रश्नांवर अखेर गांठण्यास तयार असत. आणि यांचें कारण या दोघांच्याहि व्यक्तिमत्त्वाची घडण अुपासकाची नसून लढवय्याची होती; तथापि ज्यांच्या विकासाचा संबंध रानडे संप्रदायाशीं प्रत्यक्ष पोंचतो अशा गोखले आणि गांधी या दोन व्यक्तींचें राजकीय जीवन पाहिल्यास तर नेमस्त वृत्तीवर त्याहूनहि अुद्बोधक प्रकाश पडतो. वस्तुतः गोखले यांच्याअितका रानड्यांचा अेकनिष्ठ अनुयायी दाखविणें कठिण आहे. पण केवळ राजकीय दृष्टीने पाहणारास गोखले यांचें राजकारण तितकेंसें बुचकळ्यांत पाडणार नाही. सरळपणा व तडजोड या बाबतींत गोखले आपल्या गुरूचे शिष्य होते; आणि तरीहि राजकीय बाबतींत त्यांनी अनेकदा अधिक मूलगामी व आग्रही धोरण स्वीकारल्याचें व विचार व्यक्त केल्याचें आढळून येअील. याचें कारण गोखले यांच्या जीवनांत राजकारणास प्रथमस्थान होतें हेंच होय. गांधी व रानडे यांच्यामधील फरक पाहून तर अधिकच विस्मय वाटेल; कारण गांधींच्या जीवनांत धर्माला आद्य स्थान आहे असें गांधी स्वतःच सांगत असूनहि, ज्या अर्थाने रानडे धर्मप्रधान वृत्तीचे होते त्या अर्थाने गांधी धार्मिक नाहीत. अीश्वराकडे आणि अीश्वरी अिच्छेकडे पाहण्याच्या दोघांच्या दृष्टीत फरक आहे. गांधी यांस केवळ अीश्वरचिंतनाने समाधान लाभत नाही की अीश्वरी अिच्छा म्हणून अन्यायाची तीव्रता कमी भासत नाही. रानडे यांची धार्मिकता व्यक्तिवादी आणि समेटवादी होती, तर गांधी यांची धार्मिकता समाजवादी आणि आग्रही (अर्थात् क्रान्तिवादी) आहे. धार्मिक समाधानापेक्षा धार्मिक प्रतिकार हे गांधींच्या जीवनांचे प्रमुख सूत्र आहे. म्हणजे नेमस्त संप्रदायाच्या या दोन विख्यात हक्कदारांनी दोन विलक्षण चमत्कार केले ! रानडे यांस गुरु मानणारे गोखले यांनी धर्माचें प्राधान्य टाकून दिलें, तर गोखले यांस गुरुस्थानीं मानणाऱ्या गांधींनीं अीश्वरी अिच्छेपेक्षा मानवेच्छेस प्रमुख स्थान दिलें !

## 'राजकारणांतील संत'

सरकाराशीं, अन्यायाशीं किंवा अज्ञानाशीं झगडण्याच्या दृष्टीने रानडे यांची वृत्ति फाजील सौम्य ठरत असली, तरी वेगवेगळ्या व्यक्तींची व संस्थांची अुपयुक्तता ओळखणें, विविध शास्त्रांचें आकलन करणें, राष्ट्राच्या विविध बाजूंच्या विकासाकडे लक्ष पुरविणें, विरोधाने चिडून किंवा बिचकून न जातां प्रगतिकारक संस्थांची जोपासना करणें, वगैरे सार्वजनिक जीवनसंवर्धक कार्यांत त्यांच्या सर्वांगीण, संग्राहक व क्षमाशील दृष्टीचा अत्यंत अुपयोग होअी. ते मूर्तिभंजक आणि लढवय्ये नसून संग्राहक व संरक्षक होते. सीझर आणि परमेश्वर या दोघांचाहि करभार निमूटपणे व नियमितपणें पोचविणाऱ्या शांतिदूताची त्यांची भूमिका होती. त्यांच्या जीवितकार्याचा विचार करतांना स्वजनांकरिता परकीय पातशाहीवर तलवार अुपसणाऱ्या शिवाजीचा दाखला मनांत न आणतां पातशाह, पांडुरंग आणि प्रजा या सर्वांशीं सारखेंच अिमान राखणाऱ्या दामाजीची आठवण केली पाहिजे ! 'राजकारण व समाजकारण यांमधील संत' हें नामाभिधान गांधींहूनहि रानडे यांस अधिक शोभेल.



अनुक्रमणिका








# महादेव गोविंद रानडे यांची दूरदृष्टि*

भास्करराव जाधव

[ **भास्करराव जाधव** : ब्राह्मणेतर चळवळीतले एक नेते. १८८८ सालच्या मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिक परीक्षेत पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण. एलफिन्स्टन महाविद्यालयातून बी. ए. १८९४ साली, एम्. ए. १८९५ मध्ये. कोल्हापूर संस्थानात सहायक सरसुभे म्हणून नियुक्ती. मनावर फुल्यांच्या विचारांचा खोल ठसा. सत्यशोधक विचारांचे लोण कोल्हापूर संस्थानातील खेड्यापाड्यांपर्यंत नेले. भास्कररावांचे संस्कृतवर प्रभुत्व होते आणि विशेषत: वेदान्ताचा गाढा अभ्यास होता. कर्मठ सनातनी ब्राह्मणांच्या युक्तिवादाचे खंडन करण्यासाठी छत्रपती शाहू महाराजांना बहुमोल साहाय्य. पुढे बाँबे प्रेसिडन्सीमध्ये शिक्षणमंत्री. मद्रासमध्ये भरलेल्या नवव्या 'नॉन-ब्रॅह्मिन कॉन्फेंडरेशन' चे अध्यक्ष. ]

श्री. माधवराव रानडे यांस मी बरेच वेळा पाहिलें असलें, तरी त्यांचा माझा परिचय नव्हता. ते फार विद्वान व लोककल्याणार्थ झटणारे पुरुष आहेत अितकी जाणीव त्यांच्या हयातींत झाली होतीं. त्यांना दिवंगत होअून आता ४० वर्षे लोटलीं आहेत. या वेळीं त्यांच्या योग्यतेचा आढावा निरनिराळ्या बाबतींत, निर-निराळ्या दृष्टिकोनाने घेणें योग्य आहे. व्यक्ति दिवंगत होतांच तिच्या मृत्यूने झालेलें नुकसान ताजेंच असतें. यामुळे त्या व्यक्तीचे भक्त तिच्या गुणाविषयी जरा फाजील तारीफ करतात व तिच्या खऱ्या योग्यतेची पुरी जाणीवहि झालेली नसते. चाळीस वर्षांनी त्यांच्या कामगिरीविषयीचें अवलोकन खरें गुणग्राहक असण्याचा जास्त संभव आहे.

माधवराव यांच्यावर सरकारची अितराजी होअून त्यांची बदली धुळ्याचे फर्स्ट क्लास सबॉर्डिनेट जज्ज म्हणून झाली. तेथे असतांना आपल्या संगतीमुळे कोणाचें नुकसान होअूं नये याविषयी ते जपत असत. संध्याकाळीं फिरावयास जातांना हायस्कुलांतील अेखाद्या शिक्षकास त्यांच्या विचारांचा, आचाराचा व अेकंदरींत धोरणाचा परिचय होअी. रघुनाथ व्यंकाजी सबनीस हे त्यांपैकी अेक होते. ते पुढे कोल्हापुरास दिवाण झाले व आता तेथेच विश्रांतिसुख भोगीत आहेत. त्यांच्याकडून अैकलेल्या गोष्टींवरूनच हा लेख लिहिण्याची स्फूर्ति मला झाली.

## लोकहितवादी, फुले, रानडे

पेशवाअीचा अस्त १८१८ सालीं होअून अिंग्रजी अमलास सुरवात झाली. चारच वर्षांनी म्हणजे १८२२ सालीं लोकहितवादी सरदार गोपाळराव देशमुख यांचा जन्म झाला. पुढे ५ वर्षांनी म्हणजे सन १८२७ सालीं जोतीराव फुले जन्मले. त्यानंतर १४ वर्षांनी माधवराव रानडे जन्मास आलें. हे तीनहि पुरुष आपल्या पायापुरते पाहणारे कोत्या दृष्टीचे नव्हते. आपल्या देशाच्या हीन परिस्थितीची जाणीव त्यांना पुरेपूर होती. या अवनतीचीं कारणें कोणतीं आहेत तीं त्यांनी पूर्ण विचाराने ठरविली होतीं व हीं कारणें नष्ट होअून देशाचें शाश्वत कल्याण कोणत्या मार्गांनी होअील याविषयीहि त्यांचे विचार निश्चित झाले होते. लोकहितवादींनी ग्रंथ लिहून व वर्तमानपत्रांत लेख लिहून लोकजागृतीचें काम केलें. त्या लेखांचा परिणाम फक्त सुबुद्ध व विचारी लोकांवर झाला, बाकीच्यांवर फारसा परिणाम झाला नाही अितकेंच नव्हे, तर ते त्यांचा द्वेष करू लागले.

जोतीराव हे लोकवादीशीं समकालीन. वय पांचच वर्षांनी कमी. हिंदुधर्मग्रंथांविषयी लोकहितवादीप्रमाणेंच त्यांनाहि आदर नव्हता, वर्णाश्रमधर्म अुभयतांनाहि पसंत

* [ न्यायमूर्ती रानड्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने केसरी–मराठा संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'सह्याद्रि' मासिकाने जानेवारी १९४२ मध्ये 'सह्याद्रि रानडे विशेषांक' प्रसिद्ध केला. प्रस्तुत लेख केसरी–मराठा ट्रस्ट यांच्या सौजन्याने येथे पुनर्मद्रित करीत आहोत. – संपादक ]

अनुक्रमणिका

नव्हता. शूद्रातिशूद्रांची हीन स्थिति त्यांना सहन होत नसे. त्यांच्यामधलें व अुच्च वर्णांमधलें अंतर नाहीसें होअुन ते अेका पातळीवर येणें देशहिताच्या दृष्टीनें अिष्ट आहे अशी त्यांची खात्री होती. स्त्री ही पुरुषापेक्षा कमी योग्यतेची नाही, तिला पुरुषाशीं समान दर्जा मिळाला पाहिजे, यावर त्यांचा कटाक्ष होता. स्त्री व शूद्र हे दोनहि विद्येला पारखे झाल्याने त्यांची अवनति झाली होती. ती नाहीशी करण्यासाठी त्यांच्यांत विद्येचा प्रसार झाला पाहिजे, हें त्यांना पटल्यावर मोठ्या पगाराच्या व मानाच्या सरकारी नोकरीकडे न वळतां मोठा स्वार्थत्याग करून त्यांनी लोकसेवेस आपलें सर्व आयुष्य वाहिलें. व प्रथमत: मुलींची व नंतर अस्पृश्यांची शाळा सुरू करून आपण व आपलें कुटुंब अशा दोघांनी हें काम धडाडीने चालविलें.

गोपाळराव देशमुख व जोतीराव फुले या दोघांच्याहि विचारांचा व आचारांचा परिणाम माधवराव रानडे यांच्यावर होणें स्वाभाविक होतें. स्त्री-पुरुषांची योग्यता समान आहे हें त्यांस पटलें होतें व त्या दृष्टीने त्यांनी सामाजिक सुधारणेची चळवळ हातीं घेअून स्पृहणीय काम केलें. सर्व हिंदी लोकांत विद्येचा प्रसार सर्वत्र मोठ्या प्रमाणावर झाला पाहिजे, याविषयीहि त्यांची आस्था तीव्र होती. देशाची हलाकीची आर्थिक स्थिती दूर व्हावी म्हणून औद्योगिक चळवळीस त्यांनी महाराष्ट्रात व अितरत्र चांगलेंच चालन दिलें.

सर्व हिंदुस्थानांत ब्राह्मण वर्णाच्या हातीं धार्मिक वर्चस्व प्राचीन कालापासून आहे. अुत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मण तेवढ्यावरच संतुष्ट आहेत. यामुळे सामाजिक, औद्योगिक वगैरे अितर बाबतींत ब्राह्मणेतर पुढे आहेत. पण दक्षिण हिंदुस्थानांत केवळ धार्मिकच नव्हे, तर अितर सर्व बाबतींत ब्राह्मणांनी सर्व सत्ता आपल्या हातीं अेकवटण्याचें धोरण स्वीकारलें. जुन्या धर्मग्रंथांवर अयोग्य विश्वास ठेवल्याकारणाने अंधश्रद्धा वाढली व विचारशक्ति कुंठित झाली. जातिभेदाचें स्तोम अवास्तव वाढून जातिभेदापासून जातिद्वेष अुत्पन्न होअून वाढीस लागला, अेकोपा नाहीसा झाला, जो तो क्षुद्र स्वार्थाच्या मागे लागला. या सर्वांचा परिणाम देशाचें स्वातंत्र्य नष्ट होअून तो परकी सत्तेखाली पूर्णपणें गेला हा झाला.

या परकी सत्तेने आपले हातपाय विचारपूर्वक धिमेपणाने पसरण्यास सुरवात केली. त्यांनी आपल्या अिंग्रजी विद्येचा प्रसार प्रथमत: मिशनऱ्यांमार्फत व पुढे सरकारी विद्याखातें काढून झपाट्याने चालविला. यामुळे मनुष्यांमधील समानत्व वगैरे मूलभूत तत्त्वांचा प्रसार होण्यास सुरवात झाली. गोपाळराव हरी देशमुख व जोतीबा फुले यांच्या विचारशक्तीला चालना या अिंग्रजी शिक्षणापासूनच मिळाली होती. माधवराव रानडे यांनी तर या विद्येत पूर्वीच्या दोघांपेक्षा जास्त अवगाहन केलें होतें, ते आपल्या काळीं सर्व हिंदी विद्वानांचे मुकुटमणी होते. आपल्या देशास पारतंत्र्य येण्याचीं कारणें काय याविषयी या तिघांचें बहुतेक अेकमत होतें. पारतंत्र्य जाअून आपला देश स्वतंत्र व्हावा अशी तळमळ तिघांसहि होती. पण आपले दोष जाण्यास फार दीर्घकाल लागेल यासाठी सतत प्रयत्न करीत राहिलें पाहिजे; देशांतील फूट मोडून जूट झाल्याशिवाय स्वतंत्र्याचा लढा चालविण्यांत फायदा नाही, यासाठी जूट करण्याचे प्रयत्न त्यांनी प्रथम हातीं घेतले.

## जूट करण्याचे प्रयत्न

मुसलमान, मराठे व तत्सम जाति : आणि अस्पृश्य मानलेला वर्ग या सर्वांना विद्या व समाजांत समान दर्जा देअून, त्यांचें सख्य संपादून तें दृढ करणें राष्ट्रोन्नतीस अत्यंत आवश्यक आहे असें तिघेहि प्रतिपादीत. आपल्या ध्येयाच्या पूर्तीसाठी प्रथमत: विद्यादान जोतीरावांनी सुरू केलें व ब्राह्मणांच्या धार्मिक वर्चस्वावर हल्ला चढविण्याच्या अुद्देशाने सत्यशोधक समाजाची स्थापना केली. सर्व मानव जाति अेक दर्जाची आहे, हें समानतेचें तत्त्व लोकांच्या गळीं अुतरल्याशिवाय समता, बंधुता वगैरे पसरत नाहीत व त्यांची अुन्नति होत नाही हें स्पष्टच आहे. हें समानता आणण्याचें तत्त्व माधवरावजींस मान्य होतें. म्हणूनच त्यांनीं सत्यशोधक समाज स्थापण्याच्या कामीं जोतीरावांस मन:पूर्वक साहाय्य केलें व ते त्या समाजाच्या आद्य सभासदांपैकी अेक होते. मागसलेल्या विशेषत: मराठा समाजांत विद्येचा प्रसार झाला पाहिजे व त्यासाठी अिंग्रजी शिक्षण मिळण्याच्या कामीं गरीब मुलांस द्रव्यसाहाय्य मिळावें म्हणून गंगाराम भाअु म्हस्के व राजन्ना लिंगू यांनी डेक्कन असोसिअेशन नामक संस्था काढली. त्या कामीं माधवरावांनी त्यांना प्रोत्साहन देअून द्रव्यसाहाय्यहि केलें व तें कायम चालावें अशी तजवीजहि केली. या संस्थेकडून देण्यांत येणाऱ्या शिष्यवृत्त्यांपैकी अेक शिष्यवत्ति दरसाल माधवरावजींच्या नांवें





देण्यांत येत असते. आपलें स्मरण चिरकाल राखण्याची ही योजना त्यांनीच करून ठेविली आहे.

दडपून टाकलेल्या समाजांत विद्याप्रसार होअूं लागला म्हणजे त्यांतील सुशिक्षित तरुणांच्या सुप्त आकांक्षा जाग्या होत जातात, व पुढारलेल्या समाजाने आपणास बरोबरीच्या नात्याने वागवावें, अशी अिच्छा अुत्पन्न होते. दूरदर्शी शहाणे असतात ते या आकांक्षा अुत्पन्न होण्याच्या वेळीं त्यांना दडपून टाकण्याचा प्रयत्न न करतां त्या आकांक्षा पूर्ण करण्याला झटतात. यामुळे खटके न अुडतां समाजांत सलोखा राहतो व त्यामुळे सर्वांचीच प्रगति होते.

अिंडियन नॅशनल कॉंग्रेस स्थापन होतांना व तिचें धोरण ठरविण्याच्या कामीं माधवरावजींचा हात प्रथमपासूनच होता व म्हणून कॉंग्रेसमध्यें मुसलमान पुढारी आणून त्यांना योग्य तें महत्त्व देअून सलोखा कायम ठेवण्यावर चांगलेंच लक्ष दिलें गेलें. त्यांनी सामाजिक व औद्योगिक परिषदा स्थापन केल्या. त्यांतहि व्यापक धोरण ठेवण्यांत आलें होतें. त्यामुळे सर्व धर्मांचे व जातींचे लोक या कामीं अनुकूल असत.

## माधवरावांची दक्षता

माधवरावजी धुळ्यास असतेवेळीं कोणतीहि लहानमोठी सभा भरवितांना आमंत्रण-पत्रिकेवर १–२ मुसलमान व मराठे, माळी वगैरे प्रमुखांच्या सह्या मुद्दाम घेतल्या जात. तसेंच, ठराव मांडणें व त्यांना अनुमोदन देणें या कामीं मुसलमान व मराठे वगैरे यांस पुढे आणण्याची दक्षता घेण्यांत येत असे. या लोकांना लिहून दिलेले ठराव वाचतां येण्याचीही मारामार, मग समर्थनपर भाषण करणें अशक्य होतें हें सांगण्यास नको. यामुळे चांगल्या वक्त्यांना संधि न मिळाल्याने ते चिडत. या वेळीं धिमेपणाने माधवराव त्यांची समजूत घालीत. सभेंत जोरदार व मुद्देसूद भाषणें झालीं तरच ती सभा यशस्वी झाली असें म्हणतां येणार नाही. सभेंत जातिभेद, धर्मभेद विसरून अेकदिलानें काम करण्याची सवय झाली तरच देशाचें खरें हित होअील, असें ते पटवून देत. फोडा व झोडा हें तत्त्व माधवरावांस मुळीच मान्य नसे. सर्वांना अेकत्र आणून जोडा, त्यांच्यावर आजपर्यंत होत आलेले अन्याय दूर करा, त्यांचा विश्वास संपादन करा व अशा रीतीने गोडीच्या मार्गाने जोमाचें हिंदी राष्ट्र बनवा अशी त्यांची शिकवण होती.

हें त्यांचें परिणामी हितकारी धोरण दूरदृष्टीचें होतें व तें दूरदृष्टि माणसांस पसंत पडत असे. माधवरावांच्या मागे त्यांच्या सच्च्या शिष्य वर्गाने हें धोरण पुढे चालविलें. पण त्यांची संख्या कमी पडूं लागली. फोडा व झोडा हें तत्त्व महाराष्ट्राच्या व हिंदुस्थानाच्या राजकारणांत घुसलें. व दिवसेंदिवस तें वाढूं लागलें. याचा परिणाम एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीने फार वाअीट झाला, असें अनुभवास येत आहे. सर शंकरन् नायर, त्यागराज चेट्टी व डॉ. नायर यांसारखे मद्रासचे कट्टे कॉंग्रेसभक्त कॉंग्रेस सोडून गेले व त्यांतील शेवटच्या दोघांनी कॉंग्रेसला विरोधक असा जस्टिस म्हणजे न्याय या नांवाचा पक्ष स्थापन केला. हें नांव घेतल्याने आपणावर अन्याय होत आहे अशी ग्वाही या पक्षाने दिली होती. पण हा अन्याय दूर करण्याची व त्यायोगें अैक्य राखण्याची आवश्यकता न पटल्यामुळे मद्रासकडे फूट कायमची झाली. तेथेंहि फोडा या तत्त्वाचाच अवलंब कॉंग्रेस पक्ष करीत आहे. या रीतीने कांही ब्राह्मणेतर पुढारी फुटले, तरी ब्राह्मणेतर पक्ष नाहीसा होअून फूट नाहीशी होत नाही, कायम राहते व द्वेष तीव्र होतो, याची जाणीव पुढारी ठेवीत नाहीत ही दुःखाची गोष्ट आहे.

## पुढाऱ्यांचें मौन

जें मद्रासेस झालें तसाच प्रकार महाराष्ट्रांतहि झाला. महाराष्ट्रांतले ब्राह्मणेतर कॉंग्रेसमध्यें शिरण्याच्या योग्यतेचे फारसे नव्हते. पण येथे धार्मिक वर्चस्वाचा लढा तीव्रतेचा होत चालला होता. तो मिटवून घेणें हें सुशिक्षित वर्गांतील पुढाऱ्यांचें कर्तव्य होतें. रानडे हयात असते किंवा त्यांच्या शिष्यांमध्यें त्यांची कर्तबगारी असती, तर हें भांडण विकोपास जाण्याचें कारण नव्हतें. "तुम्हांला आपलीं धर्मकृत्यें स्वतः करावयाचीं आहेत; ब्राह्मण अुपाध्याय नको. बरें आहे, तुमच्या अिच्छेप्रमाणें तुम्ही करा" असें म्हटलें असतें, तर तंटा आपोआप तुटला असता. पण तसें न करतां पुढारी गप्प राहिले. यामुळे अुपाध्यायवर्ग आपले मानीव हक्क संभाळण्यासाठी पुढे सरसावला व यामुळे तेढ वाढून दडपशाहीस प्रारंभ झाला. दोनहि बाजूंचें भान सुटलें व याचा परिणाम ब्राह्मणेतर पक्ष जोरांत आला हें झालें. अेकंदरींत समाजांत फूट वाढत चालली. आजहि मोठमोठे वीर, सेनापति, सरदार, लोकनायक, राष्ट्रवीर, धर्मवीर, स्वातंत्र्यवीर अित्यादि अुपपदधारी पुढारी आमच्यांत










आहेत व आपआपल्या परीने अट्टाहास करून सर्व हिंदूंची अेकी करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत. पण त्यांना या घरच्या फुटीची कांही पर्वा वाटत नाही. आपल्या हातीं सत्ता आली, म्हणजे आपण हे पक्ष दडपून टाकूं अशी घमेंड त्यांस असावी. मद्रासेसहि तोच प्रकार. राजाजींसारख्या सर्वांस आदरणीय अशा सुज्ञ पुढाऱ्यांसहि आपल्यांतील फुटीची कीड काढून टाकण्याची बुद्धि होत नाही हें शोचनीय आहे. हिंदु-हिंदूंत फूट पडण्यास जीं कारणें झालीं, तशींच कारणें हिंदु-मुसलमान फुटीचीं आहेत. यासाठी त्याविषयी जास्त लिहिण्याची जरूरी नाही.

मानवजातीचे मूळ हक्क सर्वांस अुपभोगण्यास मिळाले पाहिजेत व तसें करण्याची जबाबदारी ज्यांच्या हातीं आज सामाजिक वर्चस्व आहे त्यांच्यावर आहे, हें माधवरावजींच्या वागण्याचें मुख्य तत्त्व होतें. मुसलमान व ब्राह्मणेतर यांचें समाधान झाल्याशिवाय देशाच्या राजकारणास जोर येणार नाही व देशाला स्वातंत्र्य प्राप्त होणार नाही, असें त्यांच्या दूरदृष्टीला ढळढळीत दिसत होतें. त्यांनी आंखून दिलेला मार्ग सुटला आणि आजची देशाची दुर्दैवी स्थिती आपणास दिसत आहे. हिंदु-मुसलमानांची अेकी होण्याची आशा दुरावत आहे. अेकोपा बाजूसच राहिला, पण त्यांच्यांत खटके अुडून अेकमेकांचे सुरी भोसकून खून करण्यापर्यंत मजल आलेली आहे.

आज महाराष्ट्राला देशाच्या राजकारणांत महत्त्व राहिलें नाही. कारण आमच्या पुढाऱ्यांस बहुजनसमाजाचा पाठिंबा नाही. असा पाठिंबा कसा राहील यावर माधवरावजींची नजर असे व त्यांचें धोरण कायम टिकलें असतें, तर महाराष्ट्राचा अेकोपा टिकून राहिला असता व आज आमचा महाराष्ट्र सर्व देशाची अेकी करण्याच्या कामी आघाडीवर राहता.

माधवरावजींचें थोरपण या त्यांच्या दूरदृष्टींत होतें.

* *



अनुक्रमणिका

# रानडे आणि सामाजिक सुधारणा*

द. ल. सहस्रबुद्धे, डी. अेस्सी., अेम्. अेजी., अेम्. अेस्सी.

[ रा. ब. द. ल. सहस्रबुद्धे ( अेम्. अेजी. अेम्. अेस्सी.) शेतकी खात्यात ३० वर्षे नोकरी करून यंदा १ सप्टें. १९३६ रोजी सेवानिवृत्त झाले. ते १७ वर्षे मुंबई सरकारचे अॅग्रिकल्चरल केमिस्ट व शेतकी कॉलेजात रसायन शास्त्राचे अध्यापक होते. त्यांनी आतापर्यंत बरेच संशोधनकार्य केले आहे. खतासंबंधी माहिती गोळा करून ती त्यांनी पुस्तकरूपाने सरकारमार्फत छापली आहे. खताच्या संशोधनावरील त्यांचे निबंधही सरकारने छापले आहेत. ]

कै. न्या. मू. महादेव गोविंद रानडे यांचा जन्म (१८४२) झाल्यापासूनच्या शंभर वर्षांत महाराष्ट्राच्या सुप्त अवस्थेचें ज्ञान करून देअून महाराष्ट्राला खडबडून जागे करणारे जे गृहस्थ झाले, त्या सर्वांच्या अग्रभागीं न्या. महादेव गोविंद रानडे यांचें नांव घेतलें पाहिजे. तेव्हा या शंभर वर्षांत महाराष्ट्राने काय केलें, विशेषत: त्यांत रानडे यांचा भाग काय होता, याचा विहंगम दृष्टीने आढावा घेणें अत्यंत जरूर आहे. रानडे यांनी सुरू केलेल्या अनेक चळवळींपैकी सामाजिक सुधारणेची चळवळ ही विशेष महत्त्वाची होती.

## शंभर वर्षांपूर्वी

राजकीय पारतंत्र्य आल्यावर आपण कोठे आहोंत, आपल्या समाजाची असावी तशी स्थिति आहे किंवा नाही, आपली स्थिति कोणत्याहि प्रकारें खालावली असल्यास समाज वर आणण्यासाठी काय केलें पाहिजे हें विचारी पुढारी लोकांचे मनांत घोळणें साहजिक होतें. लिहिण्यावाचण्याचा प्रसार वाढूं लागल्यावर या विचारांना वाचा फुटली व कांही लोक वर्तमानपत्रें, सभा वगैरेच्या द्वारें आपलें म्हणणें जनतेपुढे मांडूं लागले होते. अशा प्रकारची जागृति फक्त महाराष्ट्रांतच सुरू झाली होती असें नाही. अितर प्रांतांत – विशेषत: बंगालमध्ये – सर्व प्रकारची जागृति जोरांत होण्यास सुरुवात झाली होती. बंगालमध्ये राजा राममोहनराय, मुजुमदार, टागोर वगैरे कोणत्याहि देशाच्या अितिहासांत कायमचा ठसा अुमटवून जाणाऱ्या व्यक्ति झालेल्या असल्याने, बंगाल प्रांत सर्वांचे पुढे साहजिकपणें होता. पंजाबांतील शीख धर्माच्या शिकवणीमुळे व पुढे आर्यसमाजाने अुत्पन्न केलेल्या चैतन्यामुळें, तेथेहि सामाजिक सुधारणेचें पाअूल जोरांत रुजत चाललें होतें.

## महाराष्ट्राचें वैशिष्टच

बंगाल, पंजाब या दोन प्रांतांत व महाराष्ट्रांत अेक विशेष फरक दिसून येतो तो हा की, बंगाल-पंजाबमध्ये सामाजिक सुधारकांचा अेक धर्मपंथच बनला किंवा अेका विशिष्ट धर्मपंथांच्या लोकांनीच फक्त सामाजिक सुधारणा आत्मसात् केल्या व ते अितर बहुजनसमाजापासून दूर झाले. ही स्थिति महाराष्ट्रांत झाली नाही. बंगालमध्ये ब्रह्मोसमाज हा धार्मिक पंथ निघाला. या धर्मपंथाने सामाजिक सुधारणा करण्याचें ब्रीद ठेवलें होतें. यामुळे बंगालमध्ये अशी स्थिति झाली की, सामाजिक सुधारणा ब्राह्मो समाजापुरतीच राहिली. अितर समाजांत त्याचा प्रसार होणें कठीण झालें. सामाजिक सुधारणेला अनुकूल मत असतांना सुद्धा केवळ ब्राह्मो समाजांत जाण्याची अिच्छा नसल्यामुळे सामाजिक सुधारणेला मुकावें लागलें किंवा तिचा पुरस्कार करणें पुष्कळांना जमलें नाही.

महाराष्ट्रांत धार्मिक आणि सामाजिक विचारांची सांगड घातली गेली नाही. अशी सांगड घातली जाण्याचा संभव होता–कारण नवमतवादी लोकांना पसंत पडेल असा प्रार्थना समाजाचा धर्मपथ स्थापित झाला होता. या धर्मपंथांतील बहुतेक सभासदांना सामाजिक सुधारणा

* [ न्यायमूर्ती रानड्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने केसरी-मराठा संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'सह्याद्रि' मासिकाने जानेवारी १९४२ मध्ये 'सह्याद्रि रानडे विशेषांक' प्रसिद्ध केला. प्रस्तुत लेख केसरी-मराठा ट्रस्ट यांच्या सौजन्याने येथे पुनर्मुद्रित करीत आहोत. –संपादक ]

मान्य होत्या; परंतु ज्यांना सामाजिक सुधारणा मान्य होत्या असे सर्वचजण प्रार्थना समाजाचे सभासद होण्यास तयार नव्हते. यामुळे धार्मिक सुधारणा व सामाजिक सुधारणा यांचा अेका पंथांत समावेश झाला नाही. असें होण्यास वर दिलेलें अेक कारण आहेच, परंतु याशिवाय आणखी दोन विशिष्ट कारणें दाखवितां येण्यासारखीं आहेत.

## रानडे यांची संग्राहक दृष्टि

अेक कारण असें देतां येअील की, रानड्यां-सारख्यांचा सर्वसंग्रही स्वभाव. रानडे यांच्या दृष्टीने जो, जितका, देशकार्याला अुपयोगी असेल तितका त्याचा अुपयोग करून घ्यावयाचा. अेखादा माणूस धार्मिक बाबतींत आपली मतें न पटणारा परंतु राजकीय किंवा सामाजिक बाबतींत आपल्याशीं अेकमत असणारा, व आपल्याला त्या कामांत मदत करणारा असेल व आपल्या राष्ट्रकार्याला त्याचा अुपयोग असेल, तर अशा माणसाला त्या विषयाच्या बाबतींत योग्य तऱ्हेने पुढे येण्यास मदत करण्यास तयार असणें, हें रानडे आपलें कर्तव्य समजत. या त्यांच्या स्वभावामुळे त्यांचे भोवती निरनिराळ्या विषयांवर मतभेद असणारे लोक अेके ठिकाणीं येअूं शकत. असें असूनहि मधून मधून राज-कीय किंवा अितर मतभेदांचे परिणाम सामाजिक गोष्टींचा विचार करतांना घडल्याचीं अुदाहरणें देतां येणार नाहीत असें नाही. परंतु अेकंदरींत निरनिराळे विषय निरनिराळे ठेवण्याची त्यांनी पाडलेली प्रथा बरेच अंशाने पाळली जात होती व अजून ती तशी थोडयाफार प्रमाणांत पाळली जातेहि, असें म्हणण्यास हरकत नाही.

## आगरकरांची प्रथा

दुसरें अेक कारण असें होतें की, आगरकरांच्या-सारखे कांही समाजसुधारक महाराष्ट्रांत होअून गेले. सामाजिक बाबतींत अेका विशिष्ट प्रकारचीं मतें असलीं म्हणजे तीं मतें असणारांच्या मतासारखी धार्मिक मतें देखील असलींच पाहिजेत हें तत्त्व त्यांना कबूल नव्हतें. ते म्हणत सामाजिक बाबतीत त्यांचीं आमचीं मतें अेक आहेत तर तेवढ्यापुरतें आम्ही त्यांच्याशीं सहकार्य करण्यास तयार आहोंत; परंतु धार्मिक बाबतींत जर आमचीं मतें निराळीं आहेत, तर त्या ठिकाणीं आमचें त्यांच्याशी सहकार्य होअूं शकणार नाही. आपआपले मार्ग प्रत्येकाने आक्रमावेत. या स्वातंत्र्यवृत्तीचा जोर असल्यामुळे सामाजिक सुधारक म्हणजे प्रार्थना समाजी असा संबंध जडला नाही. या दोन गटांत धार्मिक बाबतींत मतभेद असला तरी एकमेकांकडे सहानुभूतीने पाहण्याची दृष्टि असे.

कै. डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर हे सामाजिक सुधारणेचे अध्वर्यु होते, त्याचप्रमाणें प्रार्थनासमाजाचेहि अध्वर्यु होते. आगरकर, प्रो. कर्वे, वासुदेवराव पटवर्धन, प्रि. भाटे, डॉ. परांजपे या सर्वांना डॉ. भांडारकरांच्या-बद्दल अत्यंत आदर असे; परंतु त्यांचेपैकी कोणीच प्रार्थना समाजी नव्हते व नाहीत. प्रो. पटवर्धन प्रार्थना-समाजांत भांडारकरांसारख्यांच्या प्रवचनांना व व्याख्या-नांना जात, अितकेंच नव्हे तर पुष्कळशा सभासदां-पेक्षा ते समाजांत जास्त वेळा जात; तरी ते समाजाचे कधीच सभासद झाले नाहीत. आपल्या स्वतःच्या व दुसऱ्याच्या मताबद्दल त्यांना जो आदर वाटे त्या आदरामुळे, मतभेद असतांनादेखील कामाकरिता अेके ठिकाणीं येण्यास सर्वांना आनंद वाटे.

सामाजिक सुधारकांतील हा जो विशेष गुण महाराष्ट्रांत दिसला त्याचा अुपयोग चांगला झाला. सामाजिक सुधारकांचा अेक गट होअून तो समाजांतून फुटून गेला नाही. ज्या कांही सामाजिक सुधारणा म्हणून त्या वेळी पुढे मांडल्या गेल्या त्यांचा आस्ते आस्ते समाजांत प्रसार होऊन त्यांपैकी बऱ्याचशा समाजांत रुजल्या गेल्या आहेत व त्या सर्व समाजभर स्वीकारल्या जातील अशीं चिन्हें दिसत आहेत. समाजसुधारकांचा धार्मिक तुटक गट झाला असता तर सर्व समाजाचा असा फायदा झाला नसता. पंजाबांत आर्य समाजिस्ट व बंगालमध्ये ब्राह्मो समाजिस्ट असे दोन गट बाहेर पडले व बाकी समाज जुन्यांच्या तडाख्यांतून जितक्या लवकर सुटावयास पाहिजे होता तितक्या लवकर सुटला नाही.

## ख्रिस्ती मिशनऱ्यांचा प्रचार

महादेव गोविंद रानडे यांचा अुदय होण्यापूर्वी महाराष्ट्र अगदी निद्रावस्थेंत होता असें नाही. ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी अिंग्रजी, मराठीच्या द्वारें व्याख्यानें देअून व लेख लिहून त्यावेळच्या समाजस्थितीचें दोषाविष्करण जोरांत चालविलें होतें. त्यांचें हें लिहिणें रास्त मार्गाने होत नव्हतें. त्यांच्या लिहिण्याचा जोर लोकांच्या दोषांवर आघात करून पूर्वीच्या संस्कृतीबद्दल





अनादर अुत्पन्न करण्याचा होता. या त्यांच्या लेखनाचा परिणास कांही लोकांवर झालाहि. त्यांना आपल्या समाजांत सर्व दोषच दिसूं लागले. त्यांत कांही चांगलें नाही असा समज पसरूं लागला. या वेळीं महाराष्ट्रांत विद्वान लोक नव्हते असें नाही. परंतु ते जुन्या परंपरेंत तयार झालेले होते व आपल्या व्यवसायापलिकडे जाअून, सामाजिक हालचालींत भाग घेअून, समाजाला नीट मार्ग दाखविण्याचें काम त्यांच्याने होण्यासारखें नव्हतें. मिशनरी लोकांनी चढविलेल्या हल्ल्यांना अुत्तरें देणें, त्यांच्या कोटीवर प्रतिकोटी करणें, जरूर तेथे ख्रिस्ती समाजांतील किंवा युरोपियन समाजांतील दोष दाखविणें व अितर तऱ्हेने समाजावर केलेले हल्ले परतविणें हे काम या वैदिक पद्धतींत तयार झालेल्या पंडितांच्या हातून जमण्यासारखें नव्हतें.

### पुढाऱ्यांनी केलेलें मोठें काम

ही स्थिति कांही दिवस चालू राहिली. परंतु लवकरच पुढल्या पिढींतील समाजाचे नेते आपलें कर्तव्य करतांना दिसूं लागले. विष्णुशास्त्री ब्रह्मचारी, बाळशास्त्री जांभेकर, विष्णुशास्त्री पंडीत, बाबा पदमनजी, दादोबा पांडुरंग व लोकहितवादी सरदार गोपाळ हरी देशमुख वगैरे पुढाऱ्यांचीं नांवें प्रसिद्ध आहेतच. या मंडळींनी फार मोठें काम केलेलें आहे. यांनी समाजांतील दोष लोकांच्या नजरेस आणून ते घालवून टाकण्याची जोराची खटपट केली. समाजावर या लोकांनी कटु टीका केली. परंतु त्या सर्वांच्या बुडाशीं समाजाचा अभिमान व देशकल्याण करण्याची अिच्छा असल्याने, समाजाच्या वातावरणांत अेक प्रकारची जागृति दिसूं लागली. अुलटसुलट वादविवाद, अुत्तरें प्रत्युत्तरें यांनी सर्व वातावरण मधून मधून दुमदुमून जाअूं लागलें. वरील लेखकांच्या लेखांत त्यांचे पाश्चिमात्यांच्या माहितीने डोळे दिपलेले दिसत नाहीत. त्यांच्या लेखांतून समतोलपणा होता. अर्थात समाजांतील दोष दाखविणें हें त्यांचें मुख्य काम असल्याने तें त्यांना करणें भाग होतें व तें त्यांनी लोकनिंदेची पर्वा न करतां चालू ठेवलें होतें.

या मंडळींत केवळ लेखक किंवा नुसते बोलके लोक होते असें नाही. प्रत्यक्ष सामाजिक सुधारणा घडवून आणणारेहि त्यांत होते. विष्णुशास्त्री पंडीत हे फार मोठे समाजसुधारक होअून गेले. विष्णुशास्त्री फार मोठे विद्वान होते. त्यांनी समाजसुधारणेच्या बाबतींत विशेष कामगिरी केलेली आहे. सामाजिक सुधारणा कोणत्या अवश्य आहेत, त्या रूढ झाल्याने समाजाला कोणते फायदे होणार आहेत, त्यांत न्याय, दया कशा प्रकारें समाजांत येअील याचीं साधक बाधक प्रमाणें देण्याचें काम त्यांनी केलेंच; पण त्याच्याहि पुढे जाअून ज्या सामाजिक सुधारणा अवश्य म्हणून लोकांना आपण सांगतों त्याला शास्त्राधार आहे, या सामाजिक सुधारणा केल्याने आपण धर्मविरुद्ध जात नाही, पूर्वींच्या आपल्या अुच्च कालांतील चालीच आपण समाजांत आणण्याचा प्रयत्न करीत आहोंत, यांत समाजाचें कल्याण आहे, देशाचें हित आहे, अशी लोकांची खात्री पटविण्याचें काम अबाधित चालू ठेवलें होतें.

### सनातनीमत-वाद्यांचा विरोध

या मतप्रसाराच्या कार्यामुळे सनातनीमत-वाद्यांना विषाद वाटणें साहजिक होतें व त्यांनी सुधारणाना विरोध दाखविण्याचें कार्य चालू ठेवलें होतें. त्यांची टीकास्त्रें ठरलेलींच असत – सुधारणा ज्याला म्हणतात त्या सुधारणा नसून कुधारणाच आहेत, त्यांना धर्मशास्त्राचा आधार नाही, पूर्वी कधी कोणी त्यांना मान्यता दिलेली नाही, अशा या सुधारणा समाजांत आल्याने समाजाची नीति बिघडेल, समाजांतील स्वाभिमान वगैरे गुण नाहीसे होअून समाज विस्कळीत होअील, वगैरें वगैरे ठराविक विरोध सनातन्यांनी चालू ठेवला होता.

कांही दिवसपर्यंत लेखन-भाषणद्वारें दोनहि बाजूंचे वादविवाद चालू होते. परंतु पुढे प्रत्यक्ष कृतीची वेळ येअूं लागली तशी वादांतील तीव्रता वाढून काम मधून मधून वर्दळीवर येअी. या वर्दळीचीं महत्त्वाचीं अुदाहरणें म्हणजे विधवाविवाह शास्त्रसंमत आहे किंवा नाही याचा निर्णय करण्याकरिता नेमलेल्या पंचांचें प्रकरण, सम्मतिवयाच्या बिलाच्या वादविवादाचें प्रकरण व मिशनऱ्यांचेकडे चहा घेतल्यामुळे घातलेलें ग्रामण्य.

सम्मतिवयाच्या बिलासंबंधाने वादविवाद चालू असताना कांही सनातनी लोकांनी असा बेत केला की, या सुधारक लोकांना ज्या बायकांच्या हक्काबद्दल हे भांडतात, त्या बायकांचाच या बिलाला विरोध आहे असें दाखवावें; म्हणजे यांच्या चळवळीला आपोआपच अेक प्रकारें खीळ बसल्यासारखें होईल. ही हकीकत रानडे [illegible] कळल्यावर ते म्हणाले की, ही तर

आनंदाची गोष्ट आहे. आज आम्ही बायकांच्या हक्काकरिता झगडत आहोंत, परंतु त्यांनी आपलें काम अुचलल्यास आम्हांस आनंदच होअील. त्यांनी काम करावयास लागून पुरुषांबरोबर समाजकार्याची जबाबदारी अुचलावी, हीच तर आमची अिच्छा आहे.' या प्रकारच्या रानडे यांच्या शांततेच्या विचाराने सुधारक व सनातनी यांच्यामधील तेढ कमी तीक्ष्ण होअून सुधारकांपैकी जास्त अुतावीळ असणारांवर त्यांच्या शांत विचारांचा दाब पडे.

## सुधारकांचे दोन वर्ग

रानडे यांच्या वेळीं सुधारकांतहि दोन प्रकारांचे लोक दृष्टीस पडत. एका पंथांतील लोक तत्त्वशुद्ध विवेचन करण्यास तयार असत व अशा प्रकारें तत्त्वाने कोणतीहि गोष्ट पटल्यावर तिचा जोराने पुरस्कार करणें व शक्य असेल तितकी ती सुधारणा घडवून आणणें ते आपलें कर्तव्य समजत. अशा मंडळींत प्रमुख बरेच असत. डॉ. भांडारकर, सदाशिवराव केळकर, वामनराव कोल्हटकर, वामनराव मोडक, विष्णुशास्त्री पंडीत, बाळशास्त्री जांभेकर, जोतीराव फुले, रा. ब. गोवंडे अित्यादि मंडळींचीं नांवें या वर्गांत घालतां येतील. परंतु या सर्वांच्या पुढे गेलेले व लोकांच्या स्मृतींत नेहमी राहतील व या सर्वांचे अध्वर्यु गणण्यास योग्य ठरतील असे प्रि. गोपाळराव आगरकर यांचें नांव घेतलें पाहिजे. यांच्याअितका खंबीर योद्धा महाराष्ट्रांत समाजसुधारणेच्या पुरस्काराला दुसरा कोणी मिळाला नाही. त्यांनी चालविलेल्या सुधारक पत्राच्या द्वारें त्यांनी समाजाची फार मोठी सेवा केली. आगरकरांच्या सारख्या कणखर व सडेतोड गृहस्थावर सुद्धा रानडे यांची छाप असे.

दुसऱ्या प्रकारचे सुधारक असत त्यांची मतें सुधारणेला अनुकूल असत, कोणी सुधारणा घडवून आणल्यास त्यांच्याबद्दल त्यांना सहानुभूति असें; परंतु स्वतः होअून कोणतीहि सुधारणा घडवून आणण्यास लागणारें धैर्य त्यांना नसे. अशांची संख्या साहजिकच मोठी होती. या लोकांना आपल्या बाजूस राखून सुधारणांच्याबद्दल समाजांत सहानुभूति तयार करून कार्य घडवून आणावें अशा मताला रानड्यांचा पाठिंबा होता. प्रचारकार्य करून जास्त लोकांचा पाठिंबा मिळविण्याचें काम त्यांनी नेटाने चालविलें होतें. या बाबतींतील त्यांचें विशेष कार्य म्हणजे सामाजिक परिषद होय.

## सामाजिक परिषद

रानड्यांनी सामाजिक सुधारणेचीं जीं कामें केलीं त्यांमध्ये सामाजिक परिषदेला पहिलें स्थान दिलें पाहिजे. रानडे हेच त्या परिषदेचे अुत्पादक व चालक होते. आणि त्यांच्या मरणानंतर परिषदेचें अस्तित्व नाहीसें झालें, यावरून ती परिषद सर्वस्वी त्यांचेवर अवलंबून होती हें निराळें सांगण्याची जरूरीच नाही. ते अेकटेच परिषदेचे जनरल सेक्रेटरी नव्हते; परंतु दरवर्षी परिषद व्यवस्थित रीतीने भरविण्याचें काम तेच करीत होते. ही परिषद नाहीशी झाल्याने देशाचें अपरिमित नुकसान झालें आहे. स्त्रियांचे प्रश्न, जातींचे प्रश्न, धर्माचे प्रश्न व अितर सामाजिक प्रश्न यांसंबंधाने तुटक तुटक प्रयत्न चालू आहेत, परंतु त्यांना यश यावें तसें येत नाही, याचें कारण परिषदेमुळे येणारा संघटितपणा, व राष्ट्रांतील पुढाऱ्यांचा अेकवटलेला पाठिंबा नाहीसा झालेला आहे. रानड्यांचें म्हणणें असें होतें की, निरनिराळ्या प्रांतांत चाललेले सामाजिक सुधारणेचे प्रश्न, निरनिराळ्या जातींनी चालविलेलीं कामें यांना प्रसिद्धी देणें, अेकमेकांची माहिती अेकमेकांस देणें, केलेल्या कामाचा आढावा घेणें, आणि अेखाद्या विशिष्ट गोष्टीबद्दल सर्वसाधारण सगळ्या जनतेत प्रसार करणें, व सरकारकडे दाद मागणें, ही परिषदेच्या कक्षेंतील कामें आहेत. यामुळे हिंदुस्थानांतील सर्व सामाजिक सुधारणांना अेकसूत्रीपणा येअून कार्याची प्रगति लवकर होअील (कलकत्ता सामाजिक परिषद, १८९०).

आपल्या सामाजिक सुधारणेचें अभिप्रेत ध्येय काय आहे, या बाबतींत आपली भूमिका रानड्यांनी लोकांपुढे वरचेवर मांडली. ते म्हणत की, सुधारक लोक अितर देशांतील लोकांचें अनुकरण करतात असें म्हणणें वेडेपणाचें व चुकीचें आहे. प्रत्येक देशांतील हवापाणी, अितर परिस्थिति, चालीरीति, समजुती सारख्याच नसल्याने कोणत्याहि अेका देशाने दुसऱ्या देशाचें अंध अनुकरण करणें कधीच रास्त होणार नाही व हिंदुस्थानांतील समाजसुधारक अशा अंध अनुकरणाच्या सर्वस्वी विरुद्ध आहेत. पहिल्यांदा दुष्ट अन्यायी चाली काढून टाकण्याचें काम करणें हें प्राप्तच आहे, परंतु त्यानंतर आपली अेकंदर समाज समानता, न्याय, दयाबुद्धि, अुदार मन अित्यादि अुच्च तत्त्वांवर चालेल अशी मनाची तयारी करणें व समाजाचा दर्जा वाढविणें हें सुधारणेचें ध्येय राहिलें पाहिजे. समाजांतील सर्व

व्यक्ति अुदार मताच्या व दयाशील हृदयाच्या होतील असें ध्येय असलें पाहिजे. 'सुधारणा करावयाची ती आपल्या स्वतःची–हृदय, बुद्धि व आत्मा यांची–पूर्व-ग्रहांची लोकभ्रमांची ...' (हिस्लॉप कॉलेजमधील भाषण, १८९१).

रानडे यांचें असें मत होतें की, राष्ट्राची अुन्नति व्हावयाची असेल तर ती सर्वांगीण झाली पाहिजे. अेखाद्या अंगाची सुधारणा करून राष्ट्र वर येणार नाही. राजकीय सुधारणा होणार त्याचेबरोबर सामाजिक व अितर सुधारणाहि घडवून आणणें अवश्य आहे. " राजकीय हक्कांची पायमल्ली चालू असतांना निर्दोष समाजपद्धति असणें किंवा सदोष समाजपद्धतीच्या समवेत समाधानकारक राजकीय परिस्थिति नांदणें अशक्यच आहे. केवळ राजकीय, केवळ सामाजिक, केवळ आर्थिक अगर केवळ धार्मिक असा प्रश्नच असूं शकत नाही. "

## सुधारणा घडवून आणण्याचे मार्ग

सामाजिक सुधारणेचें ध्येय ठरलें व त्याची आवश्यकता सिद्ध झाली तर त्यापुढे सामाजिक सुधारणा कोणत्या मार्गाने घडवून आणावी याचा विचार साहजिकच आपलेपुढे येतो. या ठिकाणीं दोनच महत्त्वाच्या मार्गांचा विचार करून त्यांसंबंधाने रानडे यांचीं काय मतें होतीं येवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे.

सामाजिक सुधारणा घडवू आणतांना सरकारी मदतीचा व कायद्याचा अुपयोग करावा किंवा नाही हा मुद्दा वरचेवर वादविवादाला निघतो. होतां होईल तों कायद्याची मदत व सरकारची मध्यस्थी मागूं नये. लोकांची समजूत पाडूनच सुधारणा घडवून आणणें चांगलें. परंतु तेवढ्यावरून कायद्याची मदत केव्हाच घेअूं नये असें म्हणणें रास्त होणार नाही. कांही गोष्टी कायदा बदलल्याखेरीज होणें शक्यच नसतात. पुनर्विवाहाचे बाबतींत कायद्याचीच अडचण होती ती काढल्याशिवाय विधवाविवाह कायदेशीर ठरत नसल्याने कायद्यांत दुरुस्ती झाल्याखेरीज लोकांचीं मनें वळविणें शक्य नव्हतें व रास्तहि नव्हतें. सम्मती बिलाचें बाबतींत कायद्याने दहा वर्षांची मर्यादा घातली होती, ती मर्यादा बारा वर्षेपर्यंत वाढवावयाची तर कायद्यांतच दुरुस्ती पाहिजे होती. अशा कायद्याची मदत घेणें अवश्य आहे व तशी ती घेण्यास कांहीच हरकत नाही, असें रानडे यांचें म्हणणें होतें.

सामाजिक सुधारणा घडवून आणण्याचा धर्मपंथ बदलून अिष्ट ती सुधारणा घडवून आणणें हा दुसरा अेक मार्ग आहे. महाराष्ट्रांतील सुधारक या मार्गाच्या अुलट आहेत. धार्मिक बाबींत आपलीं मतें पटलीं नाहीत म्हणून सामाजिक बाबतींत अेकजुटीने वागण्यास हरकत नसावी व सामाजिक कार्य करतांना धार्मिक मतांचा मध्येच अडथळा येतां कामा नये. बंगालमध्ये ब्राह्मो-समाज झाल्यामुळे त्या समाजाबाहेरचे लोक समाज-सुधारणेंत येणें अडचणीचें झालें. तीच स्थिति आर्य-समाजामुळे पंजाबांत झाली. तेव्हा या मार्गाखेरीज अितर मार्गांचा अवलंब करणें श्रेयस्कर आहे, असें रानड्यांनी या बाबतींत लाहोरमधील १८९३ च्या भाषणांत आपलें मत निस्संदिग्धपणें दिलें आहे.

## पाकिस्तान व रानडे

सध्याच्या हिंदुस्थानांत 'पाकिस्तान' हा विषय लोकांच्यापुढे फार जोराने टाकला गेला आहे. त्या संबंधाने रानडे यांनी काय मत दिलें असतें, हें जाणण्याची जिज्ञासा असणारच. हिंदुस्थान अेकजीव राष्ट्र असावें अशा मताचे रानडे होते. पाकिस्तानाच्या कल्पनेने त्यांचें हृदय विदीर्ण होअून गेलें असतें. त्यांना ही कल्पना डोळ्यापुढे येणेंसुद्धा आवडलें नसतें. १९०० सालीं रानडे यांनी जे विचार लखनौच्या परिषदेपुढे मांडले त्यांचें आज हिंदु व मुसलमान या दोनहि धर्मांच्या लोकांनी मनन करणें हितावह आहे. ते म्हणाले, 'गतकालापासून अेक धडा स्पष्टपणें घेतला पाहिजे– अकबराचे सल्लागारांनी दाखविलेली दिशा पत्करून म्हणजे औरंगजेबाच्या घोडचुका टाळून, हिंदुमुसलमानांनी सहकार्य केल्याशिवाय काडीभरहि प्रगति होणार नाही.' ("If the lessons of the past have any value, one thing is quite clear, viz., that in this vast country no progress is possible unless both Hindus and Mahomedans join hands together, and are determined to follow the lead of the men who flourished in Akbar's time, and were his chief advisers and councillors, and sedulously avoid the mistakes which were committed by his greatgrandson, Aurangzeb. ... ... Every effort on






the part of either Hindus or Mahomedans to regard their interests as separated and distinct and every attempt made by the two communities to create separate schools and interests among themselves and not to heal up the wounds inflicted by mutual hatred of caste and creed, must be deprecated on all hands.") अुतारा मोठा आहे, परंतु सध्याच्या स्थितींत योग्य असल्यामुळे तो दिला आहे.

### सामाजिक परिषद बंद पडण्याचें कारण

रानडे यांच्या मृत्यूनंतर त्यांच्यासारख्या अेकनिष्ठ व कर्तृत्ववान माणसाचा पाठिंबा नसल्यामुळेच सामाजिक परिषद बंद पडली असें म्हणण्यास हरकत नाही. पण त्याशिवाय दुसरेंहि अेक कारण घडले. रानडे यांच्या हयातींत प्रत्यक्ष सामाजिक सुधारणेची कामें करणाऱ्या ज्या अनेक संस्था स्थापन होअूं लागल्या होत्या, त्या पुढे संकुचित होअूं लागल्या. आपल्या संस्थेने जो सुधारणेचा भाग अुचलला असेल त्याव्यतिरिक्त आपण पूर्ण सनातनी आहों, असें भासवण्याचा प्रयत्न या संस्थांनी चालू केला. स्त्रीशिक्षणाच्या संस्थेंत विधवा पुर्नविवाहाचें नांवसुद्धा निघतां कामा नमे, असा निर्बंध घातला गेला. शिक्षणसंस्थांच्या चालकांना असें वाटलें की, अशा योगाने सनातनी लोक संस्थांना विरोध करणार नाहीत. पुर्नविवाहाच्या कामांत पुढाकार घेणारे गृहस्थ जातिभेदाच्या बाबतींत सनातन्यांहून सनातनी बनले. या अेककल्ली वर्तनाने त्यांच्या कार्याला जुन्या लोकांची सहानुभूति मिळाली नाहीच; परंतु कित्येकांना सुधारकांच्या रोषास पात्र व्हावे लागलें. प्रत्येक विषयाची संस्थावार वांटणी झाल्याने अेकंदर सामाजिक सुधारणेच्या अेकवटलेल्या जोमाला धक्का बसला. सामाजिक सुधारकांचे मनाचा अुदारपणा, समाजकार्याबद्दल हौस व निष्ठा हे अुच्च गुण मागे ढकलले गेले. ज्यांना अेखादी सुधारणा पसंत व सोयीची पडेल ती त्यांनी घ्यावी. विशेष दगदग न पडतां व समाजाचा विरोध सहन करण्याची पाळी न येतां जितकें काही कोणाला करावयाचें असेल तितकें त्याने करावें असा पायंडा पडत चालला; परंतु समाजसुधारकांचा संघटित असा पक्ष व त्याच्या हातून नेटाने होणारें काम मात्र सर्वस्वी मागे पडलें.

### समाजसुधारणा व समाजसेवा

रानडे यांच्या हयातींत आगरकरांचा अस्त (१८९५) व कर्वे यांचा अुदय जवळ जवळ अेकाच वेळीं झाला. कर्वे यांचा अुदय म्हणजे : अनाथ विधवा स्त्रियांकरिता शिक्षणाची सोय व राहण्या-जेवण्याची सोय करण्याच्या कल्पनेचा अुदय होय. ही कल्पना सर्वांना पसंत पडण्यासारखी होती. त्यामुळे सर्व सुधारकांचा तिला पाठिंबा मिळाला. पुढे लवकरच प्लेगाच्या तडाख्यांत बालविधवांची संख्या वाढल्याने जुन्या मताच्या लोकांना आवडली नाही तरी ही संस्था सोयीची होती. अशा संस्था सनातनी लोकांना पसंत पडाव्यात म्हणून विधवाविवाहाच्या प्रश्नावर विचार करण्यासमुद्धा यांमध्ये बंदी घातली गेली. अशा प्रकारच्या संस्था पुणें-मुंबअी या ठिकाणीं निघाल्या व या संस्थांनी लोकांच्या मनावर चांगलाच पगडा बसविला.

आता समाजसुधारकांची फळी फुटली व त्यांतून समाजसेवकांची फळी तयार होअूं लागली. मुलींच्या शाळा, मुली व बायका यांच्याकरिता गृहें ही ध्येयें पुढें ठेवणाऱ्या संस्था अुत्पन्न होअूं लागल्या. या संस्थांना योग्य अशी परिस्थितिहि तयार झाली होती. सुधारक कोणत्याहि चांगल्या कामास मदत करण्यास तयार असल्याने अशा प्रकारच्या समाजकार्य करणाऱ्या संस्थांना त्यांची पैशाची व सहानुभूतीची मदत असे. प्लेगाच्या सांथीवर सांथी येऊन स्त्रियांवर वाओीट प्रसंग आल्यामुळे स्त्रियांची तरी कांही सोय झाली पाहिजे असे समाजाचे विचार होअूं लागले होते; व शेवटीं या समाजसेवा करणाऱ्या संस्थांत पगार वगैरे पोटापाण्याची सोय होत असल्याने, काम करण्यास सनातनीसुद्धा येऊन मिळण्यास तयार होते. पुढे गोपाळराव देवधरांनी पुण्यांत मुंबअीच्या धर्तीवर 'सेवासदन संस्था' काढावयाची ठरविलें, तेव्हा या सर्व स्थितीचा फायदा त्यांना मिळाला. पूर्वी बायकांचा अेक क्लब जस्टिस रानडे यांच्या वाड्यांत भरत असे. त्याचेंच पुढे सेवासदन या संस्थेंत रूपांतर झालें. हें रूपांतर करतांना काय अुलाढाल्या कराव्या लागल्या याचा साद्यंत अितिहास जर कोणी लिहील तर तो फार अुद्बोधक व पुष्कळ गोष्टींवर प्रकाश पाडण्यास अुपयुक्त असा होओील.

गोपाळराव देवधर हे मूळचे अत्यन्त सनातनी होते. पुढे त्यांच्या मोठाल्या लोकांशीं गाठी पडल्या व त्यांच्या डोक्यात पुष्कळ नवीन प्रकाश पडला. त्यामुळें ते




अुदारमतवाद्याप्रमाणें बोलत; परंतु त्यांच्या मनांतील सनातनीत्व मात्र कधीच गेलें नाही. त्यांच्याभोवती त्यांनी सनातनी मतांचीं माणसेंच गोळा केलीं होतीं. गोपाळराव देवधर हे समाजसेवक होते, समाजसुधारक नव्हते.

## समारोप

रानडे यांच्याखेरीज अितर व्यक्तींचा जो निर्देश वर केला आहे त्याचें कारण एवढेंच की, रानडे यांच्या-आधी सुरू केलेल्या सामाजिक सुधारणेचा ओघ कसकसा वळत गेला व त्यांच्या मरणानंतर तो कोणत्या स्थितींत होता हें स्पष्ट लक्षांत यावें. रानडे यांच्यापूर्वी व त्यांच्या काळीं सुधारणेची ध्वजा प्रथमतः विष्णुशास्त्री पंडित, रा. ब. गोवंडे, रा. ब. गोपाळ हरि देशमुख यांनी फडकविली. त्यांनी आपल्या लेखांनी, भाषणांनी व प्रत्यक्ष कार्यांनी समाजांत जागृति अुत्पन्न केली. या निरनिराळ्या दिशांनी चालणाऱ्या समाज-सुधारणेच्या चळवळीला रानडे यांनी अेकसूत्रीपणा आणला व सुधारकांचा अेक गट करून, समाजांतील विरोधाला टक्कर देण्याची तयारी केली. त्यांच्याच हयातींत सुधारकगटांत अेक प्रकारचा जोम आगरकरांनी अुत्पन्न केला व त्यामुळे सुधाकरगटाचा समाजावर दरारा बसविला. प्रो. कर्वे यांनी सामाजिक सुधारणेस समाजसेवेचें वळण देण्यास सुरुवात केली. याच समाज-सेवेचें स्तोम गोपाळराव देवधर यांनी अितकें माजविलें की, समाजसुधारणा अेके बाजूस ढकलण्याचा प्रयत्न झाला. हा प्रयत्न सफल झाला नाही ही गोष्ट निराळी.

पुढे प्रो. कर्वे, वासुदेवराव पटवर्धन, प्रि. भाटे व डॉ. परांजपे यांच्यासारख्यांनी पुढे येअून सामाजिक सुधारणेची ध्वजा अुंच राहील असें करावयास पाहिजे होतें. परंतु ही मंडळी दुसऱ्या कामांत गुंतल्यामुळे त्यांच्या हातून हें कार्य व्हावें तसे झालें नाही. आगरकर व रानडे यांनी अुत्पन्न केलेली चेतना नष्ट झाली असें म्हणतां येणार नाही. परंतु आज ओजस्विता असलेले सुधारक, विचार करून मतें बनविणारे सुधारक, धैर्याने पुढे येअून समाजाचा विरोध सहन करणारे सुधारक, फार थोडे आहेत. सुधारणेच्या ओघांत सापडून ओघा-बरोबर वहावत चाललेले, मुलींना शिक्षण देणारे, मुलींचीं मोठेपणीं लग्नें करणारे लोक मात्र पुष्कळ सापडतात. सुधारणा पसरली, थोडीबहुत समाजाच्या पचनीं पडली; परंतु समाजसुधारकांची संख्या पाहिजे तशी वाढलेली नाही. समाजापुढे नवे नवे व अवघड सामाजिक प्रश्न येत आहेत. ते सोडविण्यास, विष्णु-शास्त्री पंडित, रानडे, आगरकर पाहिजे आहेत. ते केव्हा मिळतील ते मिळोत. आज तरी त्यांचा तुटवडा आहे. देशाच्या आयुष्यांत ही खालीवर होणारी स्थिति अपरिहार्य आहे. निराश होण्याचें कारण नाही. रानडे यांच्यासारखे आपण नेहमी आशावादीच राहिलें पाहिजे. देश जिवंत आहे. तो आपलें योग्य ठिकाण खात्रीने गांठील.



अनुक्रमणिका

# रानडे यांचे धर्मविचार व धर्मजीवन*

लेखक : **प्रि. वि. के. जोग**, अेम्. अे.

[ प्राचार्य व्ही. के. जोग हे प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ मॉडर्न एज्युकेशन सोसायटी, पुणे ह्याचे संस्थापक व वाडिया कॉलेजचे पहिले प्राचार्य होते. तत्त्वज्ञान हा त्यांच्या अध्ययन-अध्यापनाचा विषय होता. प्रार्थना-समाजाचे ते निष्ठावान सदस्य होते. ]

येथूनियां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ।। अुंची देवाचे चरण । तेथे झालें अधिष्ठान ।।
आघातावेगळा । असे ठाव हा निराळा ।। तुका म्हणे स्थळ । धरुनि राहिलों अचळ ।।

निरनिराळ्या प्रसंगाने रानडे यांच्या चरित्रावर व कामगिरीवर जीं भाषणें व लेखन होतें, त्यांतून मुख्यतः त्यांच्या राजकीय, अैतिहासिक, अर्थशास्त्र-विषयक, औद्योगिक, सामाजिक व अशाच अितर कार्यांचा गौरव होत असतो. परंतु कांही अपवाद वगळल्यास, त्यांच्या धर्ममतांचा व धर्मसेवेचा विचार फारसा केलेला आढळत नाही. परंतु रानडे यांच्या अेकंदर जीवनाकडे व विविध कामगिरीकडे पाहण्याची ही दृष्टि योग्य नव्हे. कारण त्यांची धर्मदृष्टि व धर्ममतें, यांचा विचार वगळल्यास, माझ्या समजुती-प्रमाणें त्यांच्या सर्व कार्यांचा व्हावा तसा अुलगडा होणार नाही. त्यांनी धर्म हा आपल्या साऱ्या जीवनाचा आधारभूत पायाच केला होता; व त्यांनी आपलीं अनेक क्षेत्रांतील कार्यें धर्मदृष्टीनेच शेवटपर्यंत चालविली होतीं. आणि म्हणूनच रानड्यांविषयी बोलतांना किंवा लिहितांना त्यांच्या धर्मविचारास योग्य स्थान दिलें जाणें अगदी अवश्य आहे. आता वास्तविक पाहतां, रानड्यांच्या धर्मविचारांचें व धर्मजीवनाचें सांगोपांग विवेचन अशा अेखाद्या लहानशा लेखांत करणें अशक्य आहे. म्हणून या लेखांत त्यांच्या धर्मविचारांची व धर्मजीवनाची थोडक्यांत फक्त रूपरेखाच दिली आहे.

## खऱ्या सुधारकांची विचारसरणी

पाश्चात्य विद्येचा फैलाव या देशांत झाल्यापासून लोकांमध्ये नवी जागृति अुत्पन्न झाली. अेके काळीं वैभवसंपन्न असलेला आपला देश सांप्रत साऱ्या बाजूंनी हीन स्थितीस पोंचला आहे; तेव्हा प्राचीन विचार व आचार नष्ट झाल्यामुळेच ही शोचनीय स्थिति देशास प्राप्त झाली आहे, असें निदान करून, तीवर प्राचीन विचारांचें व आचारांचें पुनरुज्जीवन करणें हाच अेक रामबाण अुपाय आहे, असें कांही मंडळी म्हणूं लागली. अुलट पश्चिमेकडून आलेल्या नवीन विचारांचा व आचारांचा सरसहा स्वीकार करून ते प्रवृत्तींत आणणें हाच अेक आपल्या देशाची स्थिति सुधारण्याचा खरा अुपाय आहे, असें दुसरी मंडळी म्हणूं लागली. परंतु जशी पहिली, तशीच दुसरीहि विचारसरणी खऱ्या सुधारकांस पटली नाही. त्यांच्या मतें आपल्या देशास पुनः मागील वैभव प्राप्त करून द्यावयाचें असल्यास देशांतील व्यक्तींचा, तसेच अेकंदर राष्ट्राचा, प्रपंच नेटका होअील असा अुद्योग झाला पाहिजे. आणि हा अुद्योग यशस्वी व्हावयास आपल्या वाडवडिलांनी जो विचारांचा व आचारांचा बहुमोल ठेवा आपणासाठी जतन करून आपणास दिला आहे, त्याची नवीन जागृतीमुळे आलेल्या नव्या दृष्टीने योग्य छाननी करून, त्यांतील देशकालपरत्वें आलेला अग्राह्य अंश काढून टाकून ग्राह्य भागाचा आपण स्वीकार केला पाहिजे; व त्याच्या पायावर नवीन युगास जुळेल अशी विचारांची व आचारांची नवी अुभारणी, नव्या ज्ञानास पटेल अशा रीतीने केली पाहिजे. रावसाहेब रानड्यांचीहि अशीच विचारसरणी होती.

## व्यक्ति-राष्ट्र-जीवनाचा गाभा

व्यक्तीच्या आणि राष्ट्राच्या जीवनाचा धर्म हा गाभाच होय अशी त्यांची सर्वथा योग्य अशी श्रद्धा

* [ न्यायमूर्ती रानड्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने केसरी-मराठा संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'सह्याद्रि' मासिकाने जानेवारी १९४२ मध्ये 'सह्याद्रि रानडे विशेषांक' प्रसिद्ध केला. प्रस्तुत लेख केसरी-मराठा ट्रस्ट यांच्या सौजन्याने येथे पुनर्मुद्रित करीत आहोत.– संपादक ]

असल्यामुळे अितर सुधारणांबरोबर, किंबहुना त्यांच्या आधी, धर्मसुधारणेचा पुरस्कार झाला पाहिजे, अशी रावसाहेब रानडे यांची दृष्टि होती. आणि म्हणूनच त्यांनी अितर सुधारणांबरोबर, जोराने, निष्ठेने आणि चिकाटीने धर्मसुधारणेचा पुरस्कार केला. मराठ्यांच्या सत्तेच्या अुदयास अनुकूल अशी परिस्थिति आधी बहुतकाळ साधुसंतांनी देशांमध्ये चहूंकडे केलेल्या धर्मसुधारणेच्या अुद्योगामुळेच अुत्पन्न झाली होती, हें त्यांनी "मराठ्यांच्या सत्तेचा अुदय" ह्या आपल्या ग्रंथामध्ये अुत्तम प्रकारें दाखविलें आहे. अितिहासाच्या या शिकवणीचा आपण अुपयोग केला पाहिजे; आणि नवीन युगांत, नवीन प्रकारांनी, देशास नवीन प्रकारचें अुच्च स्थान प्राप्त व्हावें, यासाठी अनुकूल परिस्थिति सिद्ध व्हावी म्हणून, अितर सुधारणांबरोबर धर्मसुधारणाहि आपण कृतींत आणण्याचा अुद्योग केला पाहिजे, अशी रावसाहेबांची दृष्टि होती. याच दृष्टीने बंगालमध्ये राजा राममोहन राय यांनी सन १८२८ सालीं ब्राह्मसमाज स्थापून धर्मसुधारणेची चळवळ चालू केली. तशाच प्रकारचा उद्योग आपल्या प्रांतामध्ये प्रार्थनासमाजाची स्थापना करून मंडळींनी चालू केला होता. मुंबअीस प्रार्थनासमाजाची स्थापना १८६७ सालीं झाली व रावसाहेब रानडे दुसऱ्याच वर्षी मुंबअीच्या समाजांत दाखल झाले. पुण्यास प्रार्थनासमाजाची स्थापना सन १८७० सालीं झाली. आणि रावसाहेब रानडे हे पुणें समाजांतहि सभासद म्हणून प्रविष्ट झाले. या दोन्ही समाजांच्या व्यासपीठांवरून, अुपासनांमधून व व्याख्यानांतून अनेक अुपदेश त्यांनी केले व धर्मसुधारणेच्या चळवळीस जोराची चालना दिली.

## रानडे यांचा समावेशक धर्म

ब्राह्मसमाजाचा धर्म किंवा प्रार्थनासमाजाचा धर्म किंवा शुद्ध भागवत धर्म हाच रावसाहेब रानडे यांचा धर्म होय. या धर्माची परंपरा फार प्राचीन आहे ही गोष्ट जशी राजा राममोहन राय यांनी, तशीच रावसाहेब रानडे यांनीहि वेळोवेळीं स्पष्ट करून सांगितली आहे. ब्राह्मधर्माचीं तत्त्वें, अुपनिषदें, पुराणें, गीता, साधुसंतांचीं वचनें यांवर आधारलेलीं आहेत. याशिवाय बौद्ध, जैन, महंमदी, ख्रिस्ती अशा धर्मांतील शुद्ध तत्त्वांचाहि ब्राह्मसमाजाने, ग्राह्याग्राह्यविवेक ठेवून, आदर केलेला आहे. त्याचप्रमाणें अितर देशांतील साधुसंतांच्या अनुभवाचा व वचनांचाहि त्याच दृष्टीने आदर केला आहे. यावरून हें अुघड होअील की, ब्राह्मधर्म हा जसा प्राचीन, तसाच अत्यंत अुदार आणि व्यापक आहे. ज्याचीं मुळें फार खोल गेलेलीं आहेत व जो वाढून फार विस्तीर्ण झालेला आहे अशा वटवृक्षासारखा हा ब्राह्मधर्म असून याच्या छायेखाली सर्व मनुष्यांस निवाऱ्याची जागा मिळण्यासारखी आहे. येथे कृत्रिम भेदास जागा नाही व **अेक अेका साह्य करूं। अवघे धरूं सुपंथ ॥** अशा वृत्तीने परस्परांच्या मदतीने, स्वतःचा, राष्ट्राचा व मनुष्यसमाजाचा प्रपंच अुत्तम व्हावा ह्यासाठी अवश्य त्या प्रयत्नांना पूर्ण वाव येथे मिळणारा आहे. यासाठीच आपसांतील भेदाभेदांची तीव्रता नाहीशी करून हिंदुस्थानचें अेक राष्ट्र बनविण्यास व शेवटीं आपलें ध्येय त्वरित साध्य होण्यास ब्राह्मधर्माची खरी मदत होअील अशी श्रद्धा असल्यामुळे रावसाहेब रानडे यांनी त्याचा स्वतः स्वीकार केला, व **सेवितों हा रस वाटितों आणिका।** या वृत्तीने, अितरांनीहि त्याचा स्वीकार करावा यासाठी आमरण परिश्रम केले. या कामीं जी जी संधि आपणास मिळेल तिचा अुपयोग आपण करून घ्यावा, असेंच रावसाहेबांचें धोरण असे. यामुळेच प्रसंगविशेषीं जुन्या मंदिरांतूनहि त्यांनी प्रवचनें केलीं होतीं. त्याचप्रमाणें अुदार धर्माचा प्रचार व्हावा यासाठी झटणाऱ्या आर्यसमाजासारख्या अितर संस्थांशीहि, शक्य तेथे, आपल्या मतास बाध येणार नाही अशा रीतीने, आपण जरूर सहकार्य केलें पाहिजे अशीहि त्यांची दृष्टि होती. शुद्ध धर्माचा प्रसार करितांना, मतभेदाचें स्तोम न माजवितां मतैक्यासच प्राधान्य द्यावें व सर्वांनी मिळून अुदार धर्मप्रसारासाठी खटपट करावी अशी त्यांची शिकवण असे. यामुळेच स्वामी दयानंद मुंबअी अिलाख्यांत प्रचारासाठी आले तेव्हा, आर्यसमाजाची सर्व तत्त्वें जरी त्यांना मान्य नव्हतीं तरी, रावसाहेबांनी स्वामी दयानंद यांना सर्व प्रकारें साहाय्य केलें.

## अीश्वराचें स्वरूप

परमेश्वर नित्य, ज्ञानस्वरूप, अनंत, कल्याणनिधान, आनंदमय, प्रेमस्वरूप, निरवयव, निराकार, अेकच, अद्वितीय, सर्वांचा नियंता, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वशक्ति, कृपानिधि, परमपवित्र, पतितपावन, असा आहे, अशी ब्राह्मसमाजाची देवाच्या स्वरूपाविषयी श्रद्धा आहे. देवावरील श्रद्धेची व त्याच्या स्वरूपाविषयीच्या ज्ञानाची जी विकसित परिणति, तीस अनुसरूनच ब्राह्मसमाजाने

अनुक्रमणिका

देवांच्या स्वरूपाविषयी आपलें मत ठरविलें आहे. ब्राह्मा-मताप्रमाणें ओीश्वर निर्गुण नाही, सगुण आहे, ही गोष्ट येथे सांगितली पाहिजे. परलोकवासी डॉक्टर सर रामकृष्ण भांडारकर यांनी सांगितल्याप्रमाणें "प्रार्थनासमाज सगुणाची म्हणजे विश्वकर्ता, विश्वव्यापक सर्वांतर्यामी, हृदयनिवासी, विश्वयोजक, आनंदस्वरूप, सत्यसंकल्प, प्रेमस्वरूप शाश्वतधर्मप्रतिष्ठ, अशा परमात्म्याची अुपासना करतो. परंतु या प्रकाराच्या गुणांनी परमेश्वर जरी विशिष्ट आहे, तथापि मनुष्यासारखा देह धारण करून, स्त्रीशीं विवाह करून, आम्हां मनुष्यांप्रमाणें, तो प्रपंच करीत नाही, किंवा पशुपाषाणाचें स्वरूप धारण करीत नाही. येथपर्यंत परमेश्वराची सगुणता प्रार्थनासमाज नेत नाही. अुपनिषदांत सांगितल्याप्रमाणें तो आदिपुरुष हातापायाशिवाय हातापायांची ग्रहणरूप क्रिया करतो, डोळे नसून तो पाहातो, कान नसून तो अैकतो (**अपाणिपादो जननो गृहीता। पश्यत्यचक्षुः स श्रृणोत्यकर्णः।**) असें समाज मानतो. समाज प्रतिमांचें पूजन करीत नाही... ... ... यास्तव, किंवा मनुष्य आणि अितर प्राण्याचें रूप धरून देव प्रपंच करीत नाही असें मानिल्यामुळे, समाज निर्गुणाची अुपासना करतो असें म्हणणें सर्वथा अयथार्थ आहे– सगुणाचीच अुपासना समाज करतो."

## देव आणि सृष्टि

"**अेष देवो विश्वकर्मा**" असें ओीश्वराविषयी अुपनिषदांत म्हटलें आहे. हें मत समाजासहि मान्य आहे आणि तें रावसाहेब रानडे यांच्याहि व्याख्यानांत प्रगट झालेलें आहे. तथापि परमेश्वर, सृष्टि अुत्पन्न केल्यावर, तिजपासून दूर कोठेतरी राहात नसून, तो सृष्टीमध्येच, वस्तुमात्रांत, वनस्पतींत, प्राणिजीवनांत आणि विशेषें-करून मनुष्यांच्या अंतःकरणांत राहून अखिल सृष्टीला– जड सृष्टीला, वनस्पतिसृष्टीला, प्राणिसृष्टीला आणि मनुष्यसृष्टीला – अुत्तरोत्तर शुभस्थितिप्रत नेत आहे, असें समाजाचें ओीश्वर आणि सृष्टि यांच्या परस्पर-संबंधाविषयी मत आहे. परमेश्वर विश्वप्रकाश आहे, म्हणजे सृष्टीविषयी आणि तिच्या स्वरूपाविषयी जें ज्ञान मनुष्यास होतें त्यांतून देवाचें स्वरूप प्रगट होतें, असा समाजाचा सिद्धांत आहे. अशा प्रकारें सृष्टीमध्ये व तिच्या व्यापारामध्ये प्रकाशित होणारा परमेश्वर आपणांस कधी रूद्र तर कधी शिव या स्वरूपाने गोचर होतो. अशा रीतीने विश्वाचा आणि देवाचा संबंध अत्यंत निकटचा असला तरी, आणि सृष्टि ही देव-स्वरूप असली तरी, सृष्टि म्हणजेच देव किंवा देव म्हणजेच सृष्टि असें म्हणणें योग्य नव्हे. सृष्टीच्या ठायीं राहणारा, तिचे व्यापार सुव्यवस्थित करणारा, देव, परमेश्वर, सृष्टीस व्यापून अुरतो आणि म्हणूनच तो सर्व सृष्टीच्या पलीकडे आहे, असें म्हणण्याची रीत पडलेली आहे. सृष्टीवरून व तिच्या व्यापारांवरून देवाची ओळख पटते; तथापि सृष्टि हें देवाच्या स्वरूपाचें माप होअू शकत नाही, हें समाजाचें मत रावसाहेब रानडे यांच्या व्याख्यानांमध्ये प्रतिपादिलेलें आढळून येतें.

## देव आणि मनुष्य

जसा सृष्टीमध्ये राहून परमेश्वर तिला अुत्तरोत्तर अधिकाधिक मंगल करीत आहे, तसाच तो मनुष्याच्या अंतःकरणामध्ये राहून, त्यास अधिकाधिक अुन्नत करीत आहे. परंतु अशा प्रकारें चराचर विश्वामध्ये नांदणारा देव, परमात्मा, आपल्या अंतःकरणामध्ये राहून आपला विकास करीत आहे, हें ज्ञान फक्त मनुष्यासच होतें. अशा प्रकारें देवाची ओळख पटली असतांना, मनुष्याच्या अंतःकरणामध्ये देवाविषयी प्रेम किंवा भक्ति जागृत होते. आणि या भक्तीस अनुसरून देवाचा समागम आपणास आपल्या जीवनामध्ये सतत व्हावा; अशी अिच्छा मनुष्यामध्ये अुत्पन्न होते. देव आपलासा करणें हेंच जीवनाचें खरें साध्य आहे, असा विचार अुत्पन्न होअून, हें साध्य जोडण्यासाठी मनुष्याचा अुद्योग चालू होतो. मनुष्याच्या जीवनामध्ये पशुजीवन व आध्यात्मिक जीवन अशीं दोन अंगें आहेत. पशुभावाचें दमन करून आध्यात्मिक जीवनाची वाढ करणें, हेंच मनुष्यास साधावयाचें आहे. हा अुद्योग संसारामध्ये राहूनच मनुष्यास करणें शक्य आहे. मनुष्यास देवाचा लाभ व्हावा, यासाठी संसार हें अत्यंत प्रभावी साधन आहे. मात्र मनुष्याने त्या साधनाचा योग्य असाच अुपयोग केला पाहिजे. संसारास योग्य वळण लावून आपल्या जीवनांतील निरनिराळे अुद्योग करीत असतांना, या साऱ्या अुद्योगांचा रोख पशुभावाचें नियमन करून दैवी अंशाची वाढ करण्याकडे राहील, अशा दृष्टीने केलेला प्रपंच खरा मोक्षदायक होतो, ही जागृति मनुष्यामध्ये कमीअधिक प्रमाणांत नेहमी असल्यामुळे, पशुभाव सोडून आपल्यांतील दैवी भावाचा विकास करण्यासाठी मनुष्याची आपल्या जीवनामध्ये नेहमी खटपट चालू असते. तथापि

त्यास वारंवार असा अनुभव येतो की, नाना प्रकारांच्या मोहामुळे, पशुभाव प्रबळ होतात आणि देवाची वाट सोडून आसुरी वाटेने चालण्याची प्रवृत्ति त्यास होते. आसुरी वृत्तींचा नाश करण्यास व दैवी अंशाच्या वाढीस जरूर तो अवसर मिळूं देण्यास लागणारें बळ आपल्यामध्ये नाही असा त्यास अनुभव येतो.

अशा प्रसंगी देवच आपणास साहाय्य करील, तर जरूर तें बळ आपणास प्राप्त होईल व आसुरी वृत्तींचा नाश करून आपल्या कल्याणाची वाट आपणास चालतां येईल असा विश्वास मनुष्यामध्ये अुत्पन्न होतो. आणि म्हणूनच आपला, आपल्या राष्ट्राचा किंबहुना साऱ्या मनुष्यसमाजाचा प्रपंच नेटका व्हावा, मोक्षदायी व्हावा, यासाठी देवाचें साहाय्य मिळावें म्हणून त्याची भक्तिभावाने आराधना मनुष्याने नेहमी करावी हें अुचित आहे. मनुष्य परमेश्वराचें भजन, पूजन, आराधना करूं लागला, म्हणजे अंतःकरणामध्ये नांदणारा देव, परमेश्वर, तितक्याच प्रेमाने मनुष्याच्या मदतीस धांवतो, हातीं धरून त्यास चालवितो आणि श्रेयाच्या वाटेने चालण्यास लागणारें बळ मनुष्यास देतो; आणि अशा प्रकारें मनुष्यास अुत्तरोत्तर अुन्नत करतो. देव आणि मनुष्य अथवा जीवात्मा आणि परमात्मा यांच्या परस्पर संबंधाविषयी ब्राह्मधर्माची अथवा भागवत धर्माची वर थोडक्यांत सांगितलेली विचारसरणी हीच रानडे यांचीहि विचारसरणी होती; आणि ती त्यांनी आपल्या प्रवचनांमध्ये वेळोवेळीं निरनिराळ्या प्रकारें प्रकट केलेली आहे. जीवात्मा आणि परमात्मा यांचा परस्पर संबंध अशा प्रकारें अत्यंत निकटचा आहे, जिव्हाळ्याचा आहे असें ब्राह्मधर्म अथवा भागवत धर्म मानतो. तथापि मनुष्य हाच देव अथवा "**अहं ब्रह्मास्मि**" हें अद्वैत मत ब्राह्मधर्म ग्राह्य मानीत नाही. देवाचें साहाय्य घेअून आपणांतील दैवी गुणांचा सतत विकास व्हावा व अशा प्रकारें आपण अुत्तरोत्तर देवाच्या अधिकाधिक सन्निध जावें, त्याच्या समागमामध्ये राहावें अशा प्रकारचा जो अुद्योग मनुष्य करीत असतो, त्याची पराकोटी म्हणजे देवाशीं समरस होणें ही होय, देवामध्ये शेवटीं विलीन होअून लय पावणें ही नव्हे, असें ब्राह्मधर्म मानितो.

## सामाजिक जीवन

मातापितरांचा आणि मुलांचा जसा, तसाच देवाचा आणि मनुष्यांचा अन्योन्य संबंध आहे. प्रत्येक मनुष्यामध्ये दैवी अंश आहे, जीवात्मा हा परमात्म्याचा रश्मि आहे या दृष्टीने सर्व मनुष्यें परमेश्वराचीं लेकरें आहेत, म्हणून परस्परांच्या अुन्नतीसाठी बंधुभावाने अेकमेकांस साहाय्य करणें हे मनुष्यांचें कर्तव्य आहे. ही जागृति लोकांमध्ये व्हावी यासाठी निरनिराळ्या समाजांतील कांही थोड्या व्यक्तींमध्ये देवाच्या योजनेप्रमाणेंच विशेष जागृति होते, व त्यांस अितरांपेक्षा आधी दिव्य दृष्टीचा लाभ होतो, आणि तेणेंकरून मनुष्याच्या जीवनाचें ध्येय त्यांस स्पष्ट दिसूं लागतें. अशा व्यक्तींना अवतारी व्यक्ति असें म्हणण्याची रीति आहे. अशा व्यक्तींकडे त्या त्या समाजांतील पुढारीपण स्वाभाविकच येतें. प्रत्येक समाजांत मधून मधून धर्माची ग्लानि होते, अशा वेळीं अशा अवतारी व्यक्ति समाजामध्ये अुदयास येतात.

यासाठी आपणामध्ये जे थोर साधुसंत होअून गेले किंवा आज हयात आहेत, त्यांची शिकवण आपण आपलीशी करावी व तिला अनुसरून आपल्या राष्ट्रांतील निरनिराळ्या व्यक्तींमध्ये व समाजांमध्ये बंधुभाव प्रस्थापित होईल अशाविषयी सतत झटावें व पृथ्वीवरील निरनिराळ्या राष्ट्रांमध्येहि तसाच बंधुभाव नांदूं लागेल अशाविषयीहि शक्य ती खटपट आपण करावी. निरनिराळ्या राष्ट्रांतील व्यक्ति देवाचीच वाट चालत आहेत, त्यांच्यामध्ये आणि या राष्ट्रामध्ये परस्पर बंधुभाव नांदत आहे अशी स्थिति म्हणजेच स्वर्ग. अुलट पशुभाव चोहोंकडे बोकाळलेला आहे, परस्पर कलह चोहोंकडे माजला आहे, खऱ्याखोट्याची चाड राहिलेली नाही, अन्यायाची प्रवृत्ति झालेली आहे, अशी स्थिति म्हणजेच नरक होय! हा भेद ओळखून पृथ्वीवर देवाचेंच राज्य स्थापन होईल, दैत्यांचें होणार नाही, अशासाठी मनुष्यांनी नेहमी झटलें पाहिजे.

## हा मार्ग पंगूपणाचा नव्हे !

साधुसंतांनी दाखविलेला हा देवाचा मार्ग पंगूपणाचा आहे, या वाटेने चालल्याने मनुष्यास दुबळेपणा, नेभळेपणा येतो असा कांहीं मंडळी आक्षेप घेतात. त्यांस रावसाहेब रानडे यांनी आपल्या अेका व्याख्यानामध्ये फार अुत्तम असें अुत्तर दिलेलें आहे. वास्तविक हा मार्ग पंगूपणाचा नसून, या वाटेने चालण्यानेच मनुष्यास आणि राष्ट्रास खरें सामर्थ्य प्राप्त होतें, असा साऱ्या थोर व्यक्तींचा अनुभव आहे. **भक्ति तों कठिण सुळावरील पोळी।** असें या मार्गाचें वर्णन करून, तुकोबांनी म्हटलें

आहे की, ही पोळी मी मिळवीन असें म्हणून प्रयत्न करणारा मनुष्य खरोखर सामर्थ्यवान होय. म्हणून आपणास आणि आपल्या राष्ट्रास खरें सामर्थ्य मिळवावयाचें असेल, तर आपण या साधुसंतांनी दाखविलेल्या देवाच्या वाटेची निवड करून, त्या वाटेने चालण्याचा सतत अुद्योग केला पाहिजे. देव आणि मनुष्य अथवा परमात्मा आणि जीवात्मा यांच्या परस्पर संबंधाविषयी, तसेंच मनुष्याच्या वैयक्तिक आणि सामाजिक जीवनांतील कर्तव्याविषयी ब्राह्मधर्माची किंवा शुद्ध भागवतधर्माची वर थोडक्यांत सांगितलेली विचारसरणी, रावसाहेब रानडे यांनी आपल्या व्याख्यानांतून आणि अुपदेशांतून निरनिराळ्या प्रकारांनी स्पष्ट करून सांगितलेली आहे.

## रानडे यांचें धर्मजीवन

विचारशक्ति, भावना आणि आचारप्रवृत्ति हीं मनुष्याच्या आध्यात्मिक जीवनाचीं तीन अंगें आहेत. हीं अेकमेकांपासून अलग राहूं शकत नाहीत. मनुष्याच्या आध्यात्मिक जीवनामध्ये हीं नेहमी अेकमेकांमध्ये गुंफलेलीं असतात. अेकाच जीवनाच्या या तीन बाजू आहेत. धर्माचा संबंध विशेषेंकरून मनुष्याच्या भावनेशीं असतो. तथापि त्यास विचारशक्तीचा आधार असल्याशिवाय धर्मास शुद्ध स्वरूप प्राप्त होत नाही, यासाठी धर्मभावनेला विचारशक्तीची जोड अवश्य असली पाहिजे; तसेंच धर्मभावना केवळ भावनाच राहिली तर ती निरुपयोगी ठरते; यासाठी धर्मभावनेस अनुरूप आचारांची, जीवनाची, जोड मिळाली पाहिजे. बुद्धीचें, विवेकाचें, साहाय्य मिळालेली, आपली धर्मश्रद्धा, धर्मभावना, जर आपल्या जीवनांत प्रकट झाली नाही, तर ती जीवंत श्रद्धा नव्हे. म्हणून आपली धर्मश्रद्धा नेहमी जिवंत असावी यासाठी तिला अनुसरून आपलें आचरण होओील याविषयी आपण नेहमी झटलें पाहिजे. अशीच रानडे यांची दृष्टि असल्यामुळे आपल्या धर्मश्रद्धेस आणि धर्मविचारास अनुसरून आपण आपल्या जीवनामध्ये नेहमी चालावें यासाठी त्यांचा सतत अुद्योग असे.

अशा प्रकारें धर्माचरण करण्यांत त्यांनी किती यश संपादन केलें होतें याची साक्ष, त्यांच्या जीवनाविषयी निरनिराळ्या मंडळींनी जे आपले अनुभव सांगितले आहेत, त्यांवरून सहज पटणार आहे. प्रार्थनामंदिरांतील रावसाहेबांच्या अुपासनेविषयी प. वा. रमाबाओी यांनी आपला असा अनुभव सांगितला आहे की, "अेकदा त्या प्रेममय रसाळ वाणीचा ओघ सुरू झाला की हृदय अुचंबळून यावें, मन तल्लीन व्हावें, क्षणांत प्रापंचिक दुःखाचा विसर पडावा, आशा व आस्था यांचा हृदयांत प्रवेश व्हावा." रावसाहेबांचे अेक चरित्रकार प. वा. द्वा. गो. वैद्य यांनीहि या अुपासनेविषयी आपला असा अनुभव सांगितला आहे की, "त्यांच्या (रावसाहेब रानडे यांच्या) त्या प्रेमळ प्रार्थना सुरू झाल्या की, ज्याच्या ठिकाणीं थोडी म्हणून धर्मबुद्धि जागृत आहे असा मनुष्य जागच्या जागीं खिळला जात असे. मनुष्य कितीहि चिंतेने व्यग्र झाला असला, तरी माधवरावांच्या त्या प्रेमळ प्रार्थना त्याने अैकल्या की त्याचें अर्धे दुःख, चिंता, नाहीशी होत असे." या प्रत्यक्ष अनुभवांवरून रावसाहेबांची धर्मश्रद्धा, ओीश्वरावरील भक्ति, किती गाढ होती हें स्पष्ट होतें.

तसेंच प. वा. गोपाळराव गोखले यांनी आपल्या अेका व्याख्यानांत सांगितलेल्या अनुभवावरून त्यांची वृत्ति नेहमी कशी भजनशील असे हेंहि आपणास दिसून येतें. परमेश्वराचा आधार घेअून त्याच्या भजन-पूजनाने मिळणारें सामर्थ्य संपादन करून, रावसाहेबांनी आपल्या जीवनामध्ये आपणांतील दैवी अंशाचा विकास व्हावा अशाविषयी सतत यशस्वी अुद्योग कसा केला व आपला जन्म कसा सफल केला याची साक्ष आपणास त्यांच्या चरित्रावरून पटल्याशिवाय राहत नाही. रावसाहेबांचा धर्म केवळ बुद्धीला पटलेला असा नसून, त्यांच्या जीवनामध्ये प्रतिबिंबित झालेला जिवन्त धर्म होता, हें यावरून अुघड होओील. आपणास पटला तो धर्म त्यांनी स्वतः आचरिला, आणि आपल्या अुपदेशाने आणि आचरणाने त्याचा जनांमध्ये प्रसार होओील, यासाठी त्यांनी आमरण परिश्रम केले. दास्यभक्तीची ध्वजा हातीं घेअून देवाचा डांगोरा जनांमध्ये पिटावा, यासाठी आधुनिक काळामध्ये जे भागवतोत्तम झाले, त्यांत रावसाहेब रानडे यांची योग्यता फार मोठी होती. असा थोर साधु पुरुष, आपणास वाट दाखवावी, यासाठी देवाच्या दयेने, या आपल्या महाराष्ट्र देशांत अुदयास आला, हें खरोखर या भूमीचें भाग्य होय.



हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका